








# अकल्पित यश

कपिशा नावाच्या नगरी माधवशर्मा नावाचा एक पंडित रहात असे. तो श्रीमंतच होता. त्याला श्यामला नावाची सुंदर मुलगी होती. ती आपल्या बापासारखी एक विदुषी व बुद्धिमान होती.

श्यामला लग्नाला योग्य झाली तेव्हां तिचे सौंदर्य व बुद्धिमत्ता यांचे वर्णन ऐकून अनेक ठिकाणाहून लोक मागणी घालू लागले. परंतु श्यामला अनेक प्रश्न विचारून तिला पहायला येणाऱ्या तरुणांचा उत्साह भंग करी आणि त्यांना निराश होऊन परत जावे लागे. जो तरुण तिच्या प्रश्नांची समाधानकारक अशी उत्तरे देईल त्याच्याशीच विवाह करावयाचा असा तिने मनातल्या मनात पण केला होता.

त्याच गावी राधाकांत नावाचा एक गरीब ब्राह्मण तरुण युवक रहात असे. त्याचा बाप भिक्षा मागून कुटुंबाचे पालन पोषण करीत असे. राधाकांत हुशार होता. त्याने गुरुसेवा करून विद्यार्जन केले होते. परंतु त्याची ज्ञानसंपादनाची तहान भागली नव्हती. आणखी विद्वानांच्या चरणी राहून ज्ञानार्जन करण्याची त्याच्या मनात इच्छा होती. 'उत्पद्यंते विलीयंते दरिद्राणां मनोरथाः' या न्यायाने त्याचे दारिद्र्य आड येई. म्हणून माधवशर्माच्या घरी तो, ते काही मदत करतील या आशेने आला होता.

श्यामलाला वाटले की हा तरुण युवक देखील तिच्याशी लग्न करण्याच्या हेतूने आला असावा. असे समजून तिने त्याला प्रश्न विचारले. म्हणाली—"मला एक शंका आहे. मी कित्येकांना विचारले, पण एकाने देखील समाधानकारक उत्तर दिले नाही."

"ऐकू द्या तरी शंका कोणती ती!" राधाकांत म्हणाला.

श्री वि. ना. एकबोटे

"इह परलोकांत कोण सुखी होतो आणि कोण दुःखी होतो?" श्यामलाने एकच प्रश्न विचारला.

"इहलोकी आणि परलोकी दोन्ही ठिकाणी संन्यासी सुखी होतो. त्याला सांसारिक चिंता नसते. तो कोणत्या तरी झाडाखाली पडून राहतो. जे मिळेल ते खाऊन त्यात संतोष मानतो. त्याच्या मनात लोभ किंवा मोह नसतो, म्हणून त्याला कधी निराश व्हावेच लागत नाही. अशा तऱ्हेने या जगात सुखपूर्वक राहून कोणत्याही बंधनात फसत नाही. म्हणून तो परलोकात जातो तेथेपण सुखी होतो. इहलोकी व परलोकी दुःखी होणारा मनुष्य भिकारी असतो. कारण इहलोकात त्याच्या इच्छा तृप्त होत नाहीत. त्याला उन्हात, पावसात वणवण फिरावे लागते, थंडी सहन करावी लागते. त्याचा सर्व काळ पोटाच्या चिंतेने व्यापलेला असतो. तरी त्याचे पोट कधी भरत नाही. तो आयुष्यात कधी दुसऱ्यावर उपकार करू शकत नाही. म्हणून त्याला परलोकी एक क्षणभरदेखील सुख मिळत नाही." राधाकांतने उत्तर दिले.

राधाकांतच्या या उत्तराने श्यामला खूष झाली-व त्याच्याशी विवाहास ती तयार झाली. परंतु राधाकांतच्या मनात विवाह



करण्याची इच्छाच नव्हती. व माधवशर्माकडून थोडी आर्थिक मदत मिळेल या आशेने तो आला होता. इतका वेळ श्यामलाशी बोलणे झाल्यावर त्याला वाटले की श्यामला देखील मदत करू शकेल. असा विचार करून तो श्यामलाला म्हणाला—"मी एक प्रश्न विचारावा म्हणतो. त्याचे तू उत्तर देऊ शकली नाहीस तर तुला तुझ्या वडिलांकडून मला थोडे आर्थिक सहाय्य देववावे लागेल."

श्यामलाने ती गोष्ट मान्य केली.

"या लोकात सुख भोगून परलोकांत कोण दुःख भोगतो? या लोकात कष्ट सोसून परलोकात कोण सुखी होतो?" राधाकांतने श्यामलाला विचारले.

श्यामलाने विचार करून उत्तर दिले—"या लोकांत सुख व परलोकात कष्ट भोगणारा मनुष्य दुष्ट स्वभावाचा श्रीमंत मनुष्य असतो. तो पैसे मिळविण्यासाठी वाटेल ती कुकर्मे करतो आणि इतरांच्या तोंडचा सुखाचा घास ओढून स्वतः सुख मानतो. असा मनुष्य परलोकी सुखी कसा काय होईल? या जगात देहाला शिणवून परलोकी सुखी होणारा योगी असतो. इहलोकी शरीर कष्ट सहन करण्यात त्याला आनंद होतो. म्हणून मरण आल्यावर त्याला स्वर्ग मिळतो. तेथे तो सुखी होतो."

आपल्या प्रश्नाचे बरोबर उत्तर मिळाल्यामुळे राधाकांत निराश झाला. इतक्यात शर्मा तेथे येऊन म्हणाला—"मुला! तू माझ्या मुलीच्या प्रश्नाचे समाधानकारक असे उत्तर दिले आहेस. ती तुझ्याशी विवाहास तयार आहे. तू देखील होकार दिलास तर तुमचा दोघांचा विवाह करून द्यावा, म्हणतो."

राधाकांत अचानकपणे माधवशर्मा म्हणाला ते ऐकून चकित झाला. त्याच्या कल्पनेबाहेर त्याला यश मिळाले होते आणि त्याने श्यामलाशी विवाहास आपली संमती दिली.





# परधन

एका गावी एक गरीब ब्राह्मण रहात असे. तो दररोज चार घरी जाऊन पंचांग वाचून त्या दिवसाचे विशेष सांगे. त्याला त्याच्या यजमानांकडून जे मिळे त्यावर त्याचा उदरनिर्वाह चाले.

राजाला त्या ब्राह्मणाच्या दारिद्र्याची गोष्ट कळली. त्याने त्याला मदत करण्याचे ठरविले. म्हणून त्याने त्या ब्राह्मणाला मुद्दाम बोलाविले.

ब्राह्मणाने राजाच्या राजवाड्यात जाऊन त्या दिवसाची तिथि, नक्षत्र, शकुन अपशकुन कर्तव्य अकर्तव्य वगैरे गोष्टी सांगितल्या. राजाने त्या ब्राह्मणाला एक भोपळा देवविला. ब्राह्मण तो भोपळा घेऊन निघाला. वाटेत तो आणखी एका ब्राह्मणाच्या घरासमोर उभा राहून म्हणाला—"अहो, मला हा भोपळा मिळाला आहे! आमच्या घरी कोणी भोपळा खात नाही. म्हणून तुम्ही याचा उपयोग करा." असे सांगून गरीब ब्राह्मण तो भोपळा त्या ब्राह्मणाला देऊन आपल्या घरी परतला."

त्यानंतर दुसऱ्या ब्राह्मणाच्या बायकोने भोपळा फोडला तर त्यातून सोन्याचा एक गोळा बाहेर येऊन पडला.

"अरेरे, बिचाऱ्याने भोपळा समजून आम्हांला देऊन टाकला पण ह्यात सोने आहे. तुम्ही लवकर जाऊन त्याची वस्तु त्याच्याकडे पोचती करा. परधन बाळगणे किंवा उपभोगणे महापाप आहे." ब्राह्मणाची बायको नवऱ्याला म्हणाली.

परंतु तो बायकोला म्हणाला—"तुझे म्हणणे बरोबर आहे. पण त्या ब्राह्मणाच्या नशिबी गरीबी लिहिलेली दिसते आहे. नाही तर चालून आलेले धन तो असे आपल्या घरी टाकून गेला नसता. घरी आलेल्या लक्ष्मीला घराबाहेर घालविणारा मूर्ख ठरतो."

कु. सुरेखा द. केसकर

"परंतु परधन हे नागासारखे आहे, हात लावला तर केव्हां कसे डसेल हे सांगता येणार नाही. मी म्हणते ते ऐका." बायको म्हणाली. परंतु ब्राह्मणाने तिकडे दुर्लक्ष केले.

दुसऱ्या दिवशी गरीब ब्राह्मण पंचांग सांगायला राजाच्या घरी आला तेव्हां राजाने त्याला विचारले–"काय हो गुरुजी! काल तुम्ही भोपळ्याची भाजी करून खाल्लीत का? कसा होता?"

खरी गोष्ट सांगितली तर राजा रागावेल या भीतीने ब्राह्मणाने सपशेल खोटे सांगितले. म्हणाला–"होय महाराज! भाजी केली होती, सर्वांना फार आवडली.

ब्राह्मण त्याला सोने सापडल्याचे काहीच बोलला नाही, हे पाहून चतुर राजाला वाटले की त्या ब्राह्मणाने भोपळा कोणाला तरी जशाचा तसा दान करून टाकला असावा. म्हणून तो म्हणाला–"काल जो भोपळा दिला होता तो लहान होता. आज आणखी मोठा देववितो. तो कसा आहे, उद्यां सांगा." असे सांगून राजाने ब्राह्मणाला आणखी एक मोठा भोपळा देवविला.

ब्राह्मण तो भोपळा पुन्हां त्याच ब्राह्मणाला देऊन घरी निघून गेला.

लोभी ब्राह्मणाला मोह आवरेना. त्याने लगेच तो कोहळा जमिनीवर आदळून



फोडला. त्यांतून एक नागसाप निघाला आणि ब्राह्मणाला चावण्यासाठी त्याच्यावर फूत्कार सोडू लागला.

"अग, हा तर नागसाप आहे. चावायला धावतो आहे. याला ठार केले पाहिजे." तो ब्राह्मण ओरडत होता.

"मी काल तुम्हांला सांगितले होते परधन हे नागासारखे भयंकर असते. पण काल तुम्ही माझ्या बोलण्याकडे लक्ष दिले नाही." असे म्हणत ती बाई त्या गरीब ब्राह्मणाच्या घरी धावली आणि म्हणाली–"अहो, भावजी! आमच्या घरी लवकर येऊन आपलं सोनं घेऊन जा आणि आमच्या ह्यांना वांचवा. त्यांच्या पाठीमागे नागसाप लागला आहे. तुमच्या पायां पडते!"

त्या बिचाऱ्याला त्याचे सोने काय आणि साप काय हे काहीच समजले नाही. तो चकित् अवाक् होऊन तिच्या तोंडाकडे पहात उभा राहीला.

ती त्या ब्राह्मणाला त्याचा हात धरून आपल्या घरी ओढीत घेऊन गेली. तोंपर्यंत त्याच्या घरी पुष्कळ गर्दी जमली होती. लोभी ब्राह्मण घाबऱ्या घाबऱ्या घडलेली गोष्ट सांगत होता. गर्दी पाहून साप घाबरून कोठेतरी पळून गेला.

गरीब ब्राह्मणाला पाहताच सांपाच्या भीतीने थरथर कापणारा ब्राह्मण म्हणाला–"मी तुझे सोने गडप केले होते आणि आज म्हणून एक साप माझ्या पाठीस लागला होता. पण देवाच्या कृपेने तो साप पळून गेला. तू आपले सोने घेऊन जा कसा!"

राजाने पंचांग सांगणाऱ्या ब्राह्मणाच्या पाठोपाठ आपले शिपाई पाठवून दिले होते. त्यांनी सापाला ठार केले आणि घडलेले वृत्त राजाला जाऊन सांगितले. राजाने त्या ब्राह्मणाला मदत करण्यासाठी एवढा खटाटोप केला होता. त्याचा परिणाम शेवटी गोड झालेला पाहून त्याला आनंद झाला.














# अमरवाणी

विपदि धैर्य, मथाभ्युदये क्षमा,
सदसि वाक्पटुता, युधि विक्रम:,
यशसि चाभिरति, व्यसनं श्रुतौ,
प्रकृतिसिद्ध मिदं हि महात्मनां... ॥ १ ॥

[आपद्काली धैर्य, अभ्युदयकाली क्षमावृत्ती, सभेत वाक् चातुर्य, युद्धात शौर्य, कीर्तिलाभाची अभिरुचि, विद्याव्यसन ही थोर पुरुषांची लक्षणे होत.]

संपत्सु महतां चित्तं भवे दुत्पल कोमलं,
आपत्सु च महाशैल शिला संघातकर्कशं ॥ २ ॥

[वैभव व ऐश्वर्य प्राप्त असतां थोर पुरुषांचे हृदय कुमद पुष्पासारखे कोमल असते आणि आपद् काली खडकासारखे कठीण असते.]

प्रदानं प्रच्छन्नं, गृह मुपगते संभ्रम विधि:,
प्रियं कृत्वा मौनं, सदसि कथनं चाप्युपकृते:,
अनुत्सेवे लक्ष्म्यां, निरभिभवसारा: परकथा:,
सतां केनोद्दिष्टं विषम मसिधाराव्रतमिदं ?... ॥ ३ ॥

[प्रसिद्धीची अपेक्षा न राखून दान करणे, अतिथि सत्कार करणे कोणाचे चांगले करून ते न सांगणे, कोणी उपकार केला तर तो जाहीर करणे, संपत्ति मिळाली तरी गर्व न करणे, हे सर्व गुण असिधारा व्रतासारखी आहेत. कोणी सांगितल्याने हे गुण अंगी येतील का ? ]





# शिलारथ

## [ २ ]

[ खड्गवर्मा व जीवदत्त नावाचे दोघे तरुण क्षत्रिय वीर पद्मपूरचे महाराज पद्मसेन यांना शिकारीच्या प्रसंगी वांचविण्यास कारणीभूत झाले. संध्याकाळी राजधानीत हत्ती पिसाळल्यामुळे पळापळ चालू होती. अशा प्रसंगी खड्गवर्मा व जीवदत्त दोघांनी मिळून त्या हत्तीला ठार केले. राजकन्या पद्मावतीने त्यांच्यावर पुष्पवृष्टी केली. त्यानंतर–]

मंत्री सोमदेवाने दिलेला सल्ला महाराज पद्मसेनाला फार आवडला. युवराणी पद्मावतीने शूर साहसी वीराशीच लग्न करीन, अशी फार पूर्वी प्रतिज्ञा केली होती. तिच्याशी विवाह करण्याच्या हेतूने अनेक राजकुमार आले होते. परंतु राजकन्येने काही तरी कारण सांगून त्यांना नकार दिला होता. राजकन्येने महाराजांना सांगून ठेवले होते की महाराजांचे जांवई होण्याची इच्छा मनात बाळगून अनेक राजकुमार येत आहेत. एकाहून एक सुंदर व हुशार पण आहेत. परंतु एकातही वीरोचित शौर्य व साहस नाही.

महाराजांना ती गोष्ट माहीत होती. म्हणून खड्गवर्मा व जीवदत्त यांचे शौर्य पाहून मनाचे समाधान झाल्यावरच महाराज पद्मसेनांनी आपल्या मुलीला दोघांपैकी एकाची निवड करण्यास सुचविण्याचे ठरविल













होते. प्राचीन काळातच अशा तऱ्हेने वाघ-सिंहाची सहजी शिकार करणाऱ्या शूरांच्या कथा ऐकायला मिळत. पण आतां तर त्यांनी प्रत्यक्ष डोळ्यासमोर दोघांचे शौर्य पाहिले होते.

मंत्री सोमदेवाच्या आज्ञेप्रमाणे दोघां तरुणांच्या उतरण्याची व्यवस्था सरकारी पाहुण्यांच्या उतरण्याच्या जागी करण्यात आली. राजाने मुलीला बोलावून दोघां तरुण वीरांच्या शौर्य साहसाचे वर्णन करून विचारले–"मुली! या दोघांनी हत्तीचा वध केला ते तू प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिले आहेस व आनंदाने तू त्यांच्या डोक्यावर पुष्पवृष्टी केली होतीस. तेव्हां दोघांपैकी तुला कोण जास्त पसंत पडला ते सांग."

पद्मावती स्मित करून म्हणाली–"बाबा! मी ते सर्व प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिले. दोघांनी आपल्या शौर्य व साहसाचा परिचय दिला आहे. पण यात असामान्य असे मला काही दिसले नाही."

"तरमग असामान्य साहस व शौर्य तुझ्या मते काय, ते तर ऐकू दे. माझ्या मते खड्गवर्मा व जीवदत्त असामान्य शूर आहेत." राजा पद्मसेन म्हणाला.

"तरमग त्यांना माझ्यासमोर बोलवा. त्यांच्यात किती शौर्य आहे हे मी पाहणार आहे. त्यांना मी काही प्रश्न विचारणार आहे." तिने राजाला ते प्रश्न कोणते हे देखील सांगितले.

त्यानंतर राजाने खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना बोलावून आणायला नोकरांना पाठविले. दोघे थोड्या वेळाने हजर झाल्यावर राजाने दोघांना विचारले–"तुम्ही दोघे देशाटनाला निघालां त्याचे कारण काय?"

ते ऐकून जीवदत्त म्हणाला–"महाराज! आमचा जन्म ज्या गांवी झाला त्या गावी आम्हांला, आम्ही संपादन केलेली शस्त्रास्त्र विद्या प्रदर्शन करण्यास संधी मिळाली नाही व मिळण्याची शक्यता पण नाही. म्हणून आम्ही देशाटन करण्याचे ठरविले. आपल्या कलेचे प्रदर्शन आपणांसमोर करण्याची इच्छा आहे."

"पण तुम्हांला आपल्या कलेचे प्रदर्शन कशासाठी करावयाचे आहे?" राजाने पुन्हा विचारले. राजाचा तो प्रश्न खड्गवर्माला अपमानाचा वाटला की काय कोण जाणे? त्याचा चेहरा रागाने लाल बुंद झाला. जीवदत्तने आपल्या मित्राच्या खांद्यावर हात ठेवून त्याला थोडे शांत व्हावयास सुचविले आणि स्मित करून म्हणाला– "महाराज! जंगलात बसून तपश्चर्या करणे हे एक काम सोडून बाकी सर्व कामे स्वतःच्या उदरभरणार्थंच मनुष्याला करावी लागतात. परंतु आम्ही कीर्ती व मान या दोन्हीबरोबर उदर निर्वाह होऊ शकला तर बरा या उद्देश्याने प्रयत्न करतो आहो."

राजाने जीवदत्तचे ते उत्तर ऐकून सहेतुक आपल्या मुलीकडे पाहिले. पद्मावती मंत्री सोमदेवांकडे पाहून म्हणाली–"मी येथे कां हजर आहे हे या दोघां वीरांनी कळले असणार!"

ते ऐकून खड्गवर्मा आणि जीवदत्त दोघांनी परस्परांकडे मार्मिकपणे पाहिले.





सोमदेवाला वाटले की दोघां तरुणांना राजकन्येचा हेतू कळला नसावा. म्हणून तो म्हणाला–"युवराणीसाठी योग्य वर मिळावा म्हणून महाराजांचा प्रयत्न चालू आहे. राजकन्या असामान्य अशा शूर तरुणाशीच विवाहास तयार आहेत." त्यानंतर राजकन्येने पूर्वी कित्येक राजकुमारांना कां व कशा तऱ्हेने नकार दिला होता हे सांगितले.

"खड्‌गयुद्धात माझी बरोबरी करू शकेल असा खड्‌गवीर दुनियेत तरी जन्मला नसावा." खड्‌गवर्मा म्हणाला.

मी युद्ध विद्येबरोबर मंत्रतंत्रांचा पण अभ्यास केलेला आहे. या दोन्ही विद्यांत माझी बरोबरी करण्याची हिंमत कोणी दाखवील असे मला नाही वाटत." जीवदत्त म्हणाला.

ते ऐकून राजकन्या पद्मावती एकदम मागे वळून आपल्या सखीच्या हातातून काही तरी वस्तु घेऊन ती दोघां तरुणांना दाखवीत म्हणाली–"हा एक शिलारथ आहे. विन्ध्य पर्वतात जो खरा शिलारथ आहे त्याचा हा लहानसा नमुना आहे. तो रथ हालवून दाखवील तोच खरा वीरपुरुष व जगातला सर्वात शक्तिशाली असा वीर ठरेल. मी त्याच्याशीच लग्न करीन."

पद्मावती म्हणाली ते ऐकून राजा व मंत्री दोघे चकित झाले. कारण त्यांनी त्या दिवसापर्यंत त्या शिलारथाविषयी पूर्वी कधी ऐकले नव्हते. राजा लगेच राजकन्येजवळ येऊन उभा राहला व तिच्या हातातला शिलारथाचा नमुना घेऊन न्याहाळून पाहू लागला. मंत्री सोमदेव चकित होऊन शिलारथाकडे पहात उभा राहला.

जीवदत्तने खड्‌गवर्माच्या कानात हळूच काही तरी सांगितले. नंतर महाराजांकडे वळून म्हणाला–"महाराज! हा शिलारथ ज्या मोठ्या शिलारथाचा नमुना आहे असे सांगण्यात आले आहे, तसा खरा शिलारथ विन्ध्य पर्वतात [illegible] आहे या [illegible] कसा काय विश्वास करायचा आम्ही? याला काही प्रमाण?"

राजाने राजकन्येकडे प्रश्नार्थी पाहिले राजकुमारी मंदहास्य करीत म्हणाली–"याचे प्रमाण सामान्य माणसांकडून मला मिळाले नसून मानवेतर महाशक्तींकडून मिळाले आहे."

"युवराणीशी विवाहाची अपेक्षा असो किंवा नसो, पण आम्ही स्वतःच्या शौर्य व साहसाची परीक्षा देण्यासाठी विन्ध्य पर्वतातील त्या शिलारथाच्या शोधार्थ व त्याला हालवण्याचा प्रयत्न करून पाहण्यासाठी जाणार आहोत. परंतु महाराज त्या मानवेतर शक्तीचा परिचय आम्हांला थोडा फार तरी मिळायला नको का?" जीवदत्तने विचारले.

"होय मुली! ती माहिती देणे न्यायोचित दिसते!" राजा म्हणाला.

पद्मावती आठवण केल्यासारखे करून म्हणाली–"गेल्या पौर्णिमेला मी गच्चीवर झोपले होते. मध्यरात्रीच्या सुमारास कसला तरी आवाज ऐकून जागी झाले. त्यावेळी एका मोठ्या राक्षसासारखा दिसणारा काळा ढग आकाशातून उडत उडत आला व ठीक माझ्यावर येऊन थांबला. मी














घाबरून जाऊन आपल्या सखींना जागी करणार होते की त्याने आपला हात खाली केला आणि त्याच्या हातातून हा शिलारथाचा नमुना खाली गच्चीवर 'पट्' दिशी पडला. त्या आवाजाने माझ्या सखींच्या झोपा मोडल्या. त्याच वेळी तो काळा ढगाकृती राक्षस अदृश्य झाला. ह्या शिलारथाला एक लहानशी चिट्ठी बांधलेली होती. त्या चिट्ठीत हे शब्द लिहिलेले होते,–'या शिलारथाच्या आकृतीचा एक भव्य शिलारथ विन्ध्य पर्वतात आहे.' मी ती चिट्ठी तुमची खात्री करून देण्यासाठी मागवून दाखवू का?"

राजा पद्मसेन व मंत्री सोमदेव ते ऐकून काही सुचविणार होतेसे दिसले. परंतु त्याच वेळी जीवदत्त म्हणाला–"राजकुमारीने सांगितले त्यावर आमचा पूर्ण विश्वास आहे. आकाशात ढगासारखा विहार करणारा कोणी यक्ष, किन्नर किंवा राक्षस असेल! त्याने स्वार्थबुद्धीने हा शिलारथाचा नमुना राजकुमारीजवळ टाकला असेल. आम्हांला त्याच्याशी काही कर्तव्य नाही. आतां आम्हांला निरोप द्यावा. उद्यां सकाळी आम्ही त्या मूळ शिलारथाच्या शोधार्थ निघू."

"मी तुमचे शौर्य व साहस उघड्या डोळ्यांनी पाहिले आहे. तुम्हांला तुमच्या प्रयत्नात यश येवो हा माझा आशीर्वाद." राजा पद्मसेन म्हणाला.

"मी देखील तुम्हां दोघांना आशीर्वाद देतो. तुम्हां दोघांपैकी जो कोणी थोर वीर ठरेल त्याच्याबरोबर राजकन्येचा विवाह करून देण्यात येईल." मंत्री सोमदेव म्हणाला.

जीवदत्त एक पाऊल पुढे टाकीत म्हणाला–"शिलारथाचा तो नमुना जवळून जरा पहायला मिळेल का? त्या विन्ध्य पर्वतात प्राचीन काळी कित्येक मोठमोठी नगरे स्थापित झाली व धुळीत मिळून गेली. असे अनेक शिलारथ असण्याची शक्यता आहे. परंतु आम्हांला या शिलारथाच्या नमुन्याचा शिलारथ शोधून काढावयाचा आहे आणि त्याला जागचा हलवायचा आहे!"

राजाने शिलारथाचा तो नमुना जीवदत्तच्या हातात दिला. जीवदत्त व खड्गवर्मा दोघांनी तो लक्षपूर्वक पाहून घेतला. नंतर तो राजाला परत देऊन दोघे अतिथिशालेकडे निघून गेले.

तों पर्यंत बरीच रात्र उलटून गेली होती. खड्गवर्मा व जीवदत्त झोपण्याच्या तयारीत होते. खड्गवर्माला झोप लागली होती. थोड्यावेळाने कसला तरी आवाज झालेला ऐकून जीवदत्तने डोळे उघडून पाहिले. कोणी दोघे जण तोंडावर बुरखा टाकून भिंतीला पाडलेल्या भोकाजवळ उभे होते. तसाच आणखी एक बुरखेवाला त्याच वेळी भोकातून आत आला.

ते लोक दोघांचा वध करण्यासाठी आले असल्याचा संशय येताच जीवदत्तने खड्गवर्माला मोठ्याने हाक मारली. म्हणाला–"उठ! मारेकरी आत शिरले आहेत." असे म्हणत त्याने लगेच आपला मंत्रदंड उचलला.

तिघां बुरखेवाल्यांनी एकदम आपापल्या तलवारी उपसल्या. तिघांपैकी दोघे







जीवदत्तावर धावले व एक जण खड्गवर्मा-वर धावला. जीवदत्तने स्वतःचा बचाव तर केलाच आणि खड्गवर्माच्या रक्षणार्थ पण धावला. त्याने आपला मंत्रदंड एका मारेकऱ्याच्या टाळक्यात मारला. त्या बरोबर बेशुद्ध होऊन तो मनुष्य जमिनीवर कोसळला तो पुन्हा उठला नाही.

त्याच वेळी खड्गवर्माची झोप मोडली. आपला एक साथी ठार झालेला पाहून उरलेले दोघे मारेकरी भोकांतून पळून जाण्याचा प्रयत्न करू लागले. एक जण भोकांतून पसार झाला आणि दुसरा अर्धा अधिक बाहेर गेला असेल नसेल, तेवढ्यात जीवदत्तने त्याचा पाय धरून त्याला आत ओढले आणि भिंतीजवळ अर्धमेल्या स्थितीत फेकून दिले.

"पळून गेलेल्या माणसाला मी पाहून घेतो," असे सांगून खड्गवर्मा भोकांतून बाहेर निघून गेला. तो पर्यंत पळून गेलेला मनुष्य आवाराच्या भिंतीपर्यंत पोचला होता. खड्गवर्मा ओरडून म्हणाला— "पळपुट्या! थांब! पाठ दाखविणाऱ्या शत्रूचा मी वध करणार नाही. पण तू पळण्याचा प्रयत्न केलास तर मात्र प्राणास मुकशील."

परंतु त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून तो भिंतीवर उडी मारून चढला. पलीकडे निसटून जाण्यासाठी तो भिंतीला धरून उतरत असतां खड्गवर्मा जवळ येऊन पोचला. खड्गवर्माला त्या बुरखेवाल्याचे फक्त पाय दिसत होते. त्याने दुरूनच त्या बुरखेवाल्याच्या पायावर तलवार फेकली व त्याचा नेम बरोबर लागल्यामुळे बुरखे-वाल्याचा पाय कापला जाऊन भिंतीच्या आतल्या बाजूला पडला आणि बुरखेवाला पलीकडच्या बाजूला पडला. त्याच वेळी दोन पहारेकरी त्या बाजूला धावत आले.

(पुढे चालू)





# जय पराजय

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही तो झाडाजवळ पुन्हा परत आला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला— "राजा! तुझी चिकाटी वाखाणण्यासारखी आहे. परंतु कधी कधी योग्य व समर्थ लोक सुद्धा शेवटी हार मानून हातात आलेले परिश्रमाचे फळ घालवून बसतात. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला सुवर्णखेटपूरचा युवराज जयसिंह यांची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला—

सुवर्णखेटपुरचे महाराज शूरसेन एकदा आजारी पडले. म्हणून त्यांचा मोठा मुलगा युवराज जयसिंह गादीवर बसला आणि आततायीपणाने गरीब प्रजेवर अत्याचार करू लागला.



जयसिहाला अधिकाराचा मोह फार होता. सत्ता गाजविण्यात त्याला मजा वाटत असे. स्वतःचे जेवढे राज्य होते तेवढयावर त्याच्या मनाचे समाधान झाले नाही. म्हणून त्याने शेजारच्या राज्यांवर स्वाऱ्या करून ती राज्ये जिंकली आणि राज्यांच्या राजांना आपले मांडलिक करून घेतले.

त्याने तोमरपुर नावाच्या एका रानातल्या राज्यावर स्वारी केली. ते राज्य लहानसे होते. त्या राज्याचा अधिपति वीरोत्तुंग त्या युद्धात हारला.

जयसिहाने त्याच्या राजवाड्यात शिरून असा हुकूम सोडला की संधीच्या अटी पुऱ्या होईपर्यंत वीरोत्तुंगाच्या कुटुंबातील एकाही व्यक्तीला राजवाड्याबाहेर जायला परवानगी मिळणार नाही. वीरोत्तुंगच्या कुटुंबातल्या माणसांची ओळख करून घेत असतां त्याची नजर वीरोत्तुंगाची मुलगी शरावती हिच्यावर पडली. ती एक अप्रतिम सुंदर राजकन्या होती. तिला पाहतांच जयसिह ती शत्रूची मुलगी आहे हे देखील विसरून गेला. लग्न करायचे तर तिच्याशीच असे त्याने मनाशी ठरवून टाकले.

तो विचार मनात आल्यावर वीरोत्तुंगाविषयी त्याच्या मनात बदल झाला. तो त्याला म्हणाला—"आपण शत्रुभाव सोडून काही तरी संधी किंवा तह करून घेऊया का. संधीच्या इतर कोणत्याही अटींची गरज नाही. तू जर आपल्या मुलीचा विवाह माझ्याशी करून द्यायला तयार असशील तर मी तुझे राज्य तुला परत करायला तयार आहे."

"यासंबंधी मी आपल्या मुलीला विचारल्याशिवाय काहीच उत्तर देऊ शकणार नाही." वीरोत्तुंग म्हणाला.

त्याने आपल्या मुलीला तिचा विचार जाणण्यासाठी विचारले तेव्हां ती म्हणाली—"विवाहासंबंधी माझे स्वतःचे असे निराळ



मत नाही. तुम्ही माझे लग्न ज्या कोणाशी करून द्याल त्याच्याशी मी विवाह करून घेण्यास खुशीने तयार होईन."

"जयसिहासारख्या क्रूर माणसाशी तुझा विवाह करून देण्यास माझे मन मानत नाही. तो सुंदर आहे, शूर आहे. पण तितकाच तो क्रूरपण आहे. त्याला राज्य व सत्ता दोन्हींचा फार मोह आहे. परंतु मी त्याच्याशी तुझा विवाह करून देण्यास नकार दिला तर तो तुझ्या इच्छेविरुद्ध बळजबरीने तुझ्याशी विवाह करून घेईल; आणि आपले सर्वांचे फार नुकसान करण्यासही मागेपुढे पाहणार नाही." वीरोत्तुंग म्हणाला.

"तरमग बाबा! तुम्ही त्याच्या इच्छेप्रमाणेच करा." शरावती म्हणाली.

वीरोत्तुंगाने जयसिहाला कळविले की शरावती त्याच्याशी विवाहास तयार आहे. ते कळल्यावर जयसिह सुमुहूर्त पाहून लग्नाच्या तयारीस लागला. शरावतीला भेटून तिच्याशी बोलण्याची त्याच्या मनात फार फार इच्छा होती. परंतु त्याला तशी संधी मिळाली नाही.

एक दिवशी शरावती आपल्या दोघां तिघां मैत्रिणींबरोबर नगराबाहेरच्या डोंगरा-



वर कालीच्या दर्शनासाठी गेली होती. ते कळल्यावर जयसिहपण तिला भेटण्यासाठी एकटाच त्या देवळाच्या दिशेने निघाला. वाटेत डोंगराच्या दोन्ही बाजूला एक मोठे जंगल होते.

जयसिह त्या वाटेने जात असतां शरावती सखींबरोबर परत येत होती. ती जवळ आल्याबरोबर जयसिह तिला म्हणाला—"मला तुझ्याशी एकांतात काही बोलायचे आहे."

"ठीक आहे!" असे शरावती म्हणाली व तोच संकेत समजून तिच्या मैत्रिणी बाजूला झाल्या.



जयसिहाला अधिकाराचा मोह फार होता. सत्ता गाजविण्यात त्याला मजा वाटत असे. स्वतःचे जेवढे राज्य होते तेवढयावर त्याच्या मनाचे समाधान झाले नाही. म्हणून त्याने शेजारच्या राज्यांवर स्वाऱ्या करून ती राज्ये जिकली आणि राज्यांच्या राजांना आपले मांडलिक करून घेतले.

त्याने तोमरपुर नावाच्या एका रानातल्या राज्यावर स्वारी केली. ते राज्य लहानसे होते. त्या राज्याचा अधिपति वीरोत्तुंग त्या युद्धात हारला.

जयसिहाने त्याच्या राजवाड्यात शिरून असा हुकूम सोडला की संधीच्या अटी पुऱ्या होईपर्यंत वीरोत्तुंगाच्या कुटुंबातील एकाही व्यक्तीला राजवाड्याबाहेर जायला परवानगी मिळणार नाही. वीरोत्तुंगच्या कुटुंबातल्या माणसांची ओळख करून घेत असतां त्याची नजर वीरोत्तुंगाची मुलगी शरावती हिच्यावर पडली. ती एक अप्रतिम सुंदर राजकन्या होती. तिला पाहतांच जयसिह ती शत्रूची मुलगी आहे हे देखील विसरून गेला. लग्न करायचे तर तिच्याशीच असे त्याने मनाशी ठरवून टाकले.

तो विचार मनात आल्यावर वीरोत्तुंगाविषयी त्याच्या मनात बदल झाला. तो त्याला म्हणाला–"आपण शत्रुभाव सोडून काही तरी संधी किंवा तह करून घेऊया का. संधीच्या इतर कोणत्याही अटींची गरज नाही. तू जर आपल्या मुलीचा विवाह माझ्याशी करून द्यायला तयार असशील तर मी तुझे राज्य तुला परत करायला तयार आहे."

"यासंबंधी मी आपल्या मुलीला विचारल्याशिवाय काहीच उत्तर देऊ शकणार नाही." वीरोत्तुंग म्हणाला.

त्याने आपल्या मुलीला तिचा विचार जाणण्यासाठी विचारले तेव्हां ती म्हणाली– "विवाहासंबंधी माझे स्वतःचे असे निराळ मत नाही. तुम्ही माझे लग्न ज्या कोणाशी करून द्याल त्याच्याशी मी विवाह करून घेण्यास खुशीने तयार होईन."

"जयसिहासारख्या क्रूर माणसाशी तुझा विवाह करून देण्यास माझे मन मानत नाही. तो सुंदर आहे, शूर आहे. पण तितकाच तो क्रूरपण आहे. त्याला राज्य व सत्ता दोन्हींचा फार मोह आहे. परंतु मी त्याच्याशी तुझा विवाह करून देण्यास नकार दिला तर तो तुझ्या इच्छेविरुद्ध बळजबरीने तुझ्याशी विवाह करून घेईल; आणि आपले सर्वांचे फार नुकसान करण्यासही मागेपुढे पाहणार नाही." वीरोत्तुंग म्हणाला.

"तरमग बाबा! तुम्ही त्याच्या इच्छेप्रमाणेच करा." शरावती म्हणाली.

वीरोत्तुंगाने जयसिहाला कळविले की शरावती त्याच्याशी विवाहास तयार आहे. ते कळल्यावर जयसिह सुमुहूर्त पाहून लग्नाच्या तयारीस लागला. शरावतीला भेटून तिच्याशी बोलण्याची त्याच्या मनात फार फार इच्छा होती. परंतु त्याला तशी संधी मिळाली नाही.

एक दिवशी शरावती आपल्या दोघां तिघां मैत्रिणींबरोबर नगराबाहेरच्या डोंगरावर कालीच्या दर्शनासाठी गेली होती. ते कळल्यावर जयसिहपण तिला भेटण्यासाठी एकटाच त्या देवळाच्या दिशेने निघाला. वाटेत डोंगराच्या दोन्ही बाजूला एक मोठे जंगल होते.



जयसिह त्या वाटेने जात असतां शरावती सखींबरोबर परत येत होती. ती जवळ आल्याबरोबर जयसिह तिला म्हणाला– "मला तुझ्याशी एकांतात काही बोलायचे आहे."

"ठीक आहे!" असे शरावती म्हणाली व तोच संकेत समजून तिच्या मैत्रिणी बाजूला झाल्या.



"मी आजपर्यंत एकाही मुलीवर प्रेम केले नाही, पण तुला पाहिल्याबरोबर माझे मन हिरावून गेले. तेव्हांपासून तुझ्या-वडिलांचे राज्य हरण करण्याचा विचार मी आपल्या मनातून काढून टाकला. तू माझ्याशी विवाह करण्यास तयार असल्याचे तुझ्या वडिलांनी मला सांगितले. परंतु तू ही कबुली, तुझे माझ्यावर प्रेम आहे म्हणून दिलीस की मी तुझ्या वडिलांचे राज्य जिंकले व नकार देणे बरोबर होणार नाही म्हणून दिलीस?" जयसिंहाने शरावतीला विचारले.

"मला प्रेम किंवा प्रणय हे काही कळत नाही. आपण युद्धात जिंकलात व माझे बाबा हारले, त्याच्याशी माझा काहीच संबंध नाही. माझे वडील ज्याच्याशी माझे लग्न ठरवितील त्याच्याशी करावयाचे एवढेच काय ते मला माहीत आहे." शरावती म्हणाली.

जयसिंह शरावतीला काही उत्तर देणार इतक्यात तिच्या मैत्रिणी मोठ्याने ओरडल्या–"वाघ, वाघ! वांचवा!"

शरावती व जयसिंहाने मागे वळून पाहिले तर खरोखरच एक वाघ त्यांची वाट अडवून उभा होता. शरावतीच्या सखी पळून दूर जात होत्या आणि वाघ शरावती व जयसिंहाकडे पहात एकेक पाऊल पुढे येत होता.

"शरावती, तू आता पळ!" असे म्हणत जयसिंह शेजारच्या एका झाडावर चढला. वाघ दूरच सुमारे वीस पंचवीस पावलांवर होता. शरावती बेशुद्ध होऊन खाली पडली.

त्याच वेळी कोठून तरी एक बाण येऊन वाघाला लागला. त्याच्या पाठोपाठ एक व्याध त्या बाजूला आला. त्याने आपला सुरा काढला आणि तो वाघावर तुटून पडला. त्या वाघाला त्या तरुण व्याधाने ठार केले, परंतु वाघाशी झुंजत असता तो तरुण जखमी झाला.





वाघाला ठार करुन तो तरुण शरावती जवळ आला. त्याचे शरीर रक्तबंबाळ झाले होते, तरी शरावती बेशुद्ध होऊन पडली होती, तिला उचलून तो तलावाकडे निघाला. इतक्यात शरावती शुद्धीवर आली व म्हणाली–"मला खाली उतरव! मी स्वतः चालू शकेन."

त्या तरुणाने शरावतीला खाली उतरवून ठेवले. तिने चारीबाजूला पाहिले. तेव्हां तिला वाघ मरून जमिनीवर पडलेला दिसला. तिने आश्चर्याने त्या तरुण व्याधाचे रक्तबंबाळ झालेले शरीर पाहिले आणि विचारले–"हे सर्व काय झाले? तू ठार केलेस या वाघाला?"

"होय! मी वेळेवर वाघाला पाहिले, नाहीतर काय झाले असते कोणास ठाऊक?" व्याध म्हणाला.

"तू चल माझ्याबरोबर, मी तुझ्या औषध पाण्याची व्यवस्था करते." असे म्हणत शरावती निघाली. जयसिंह झाडावरुन उतरुन आश्चर्य चकित होऊन हे सर्व दृश्य पाहू लागला.

आपल्या सखींना बोलावून त्या व्याधाला बरोबर घेऊन शरावती, जयसिंह झाडावरुन उतरला की अजून झाडावरच आहे, हे पाहिल्याशिवाय निघून गेली. राजवैद्यांनी व्याधाच्या जखमा धुवून औषधपाणी केले. मलमपट्टी बांधून त्याला राजवाड्याच्या एका खोलीत झोपविले.

जयसिंह थोड्या वेळाने राजवाड्यात परत आला. रात्री तो वीरोत्तुंगला भेटून म्हणाला–"मी तुझ्या मुलीशी लग्न करण्याचा आपला विचार बदलला आहे. मी विनाकारण तुम्हांला त्रास दिला. विवाहासाठी जी तयारी झाली आहे ती फुकट जाऊ नये यासाठी योग्य वर पाहून तू तिचे लग्न करून दे. उद्यां मी आपल्या सैन्यासह आपल्या देशात परत जातो. तुझ्याशी














माझे कधी युद्ध झाले होते ही गोष्टच तू विसरून जा."

बीरोत्तुंगला जयसिंह म्हणाला ते खरेच वाटेना. त्याचा स्वतःच्या कानावर विश्वासच बसेना.

तो जयसिंहला म्हणाला–"आपण म्हणालात ते मी आपल्या मुलीला सांगू म्हणता ?"

त्या दिवशी शरावतीने जयसिंहाला स्वतः जाऊन विचारले–"आपण माझ्या विवाहाचा विचार मनातून काढून टाकला, हे खरे का ?"

"होय, खरे आहे!" जयसिंह म्हणाला. "आपण काल वाघ येण्यापूर्वी मला प्रेम आहे का विचारले होते. तेव्हां मी प्रेम कशाला म्हणतात हे मला माहीत नाही, असे म्हटले होते. त्या प्रश्नाचे खरे उत्तर मी आता देणार आहे. प्रेम कशाला म्हणतात हे मला आता कळले आहे. माझे आपल्यावर प्रेम आहे. आपण उद्या जाऊ नये."

जयसिंह त्या प्रमाणे दुसऱ्या दिवशी थांबला. त्याचा शरावतीबरोबर विवाह झाला आणि दोघांचा संसार सुखाचा झाला.

बेताळाने येथवर गोष्ट सांगून विचारले–"राजा! माझ्या मनात एक शंका येते. जयसिंहावर तिचे प्रेम आहे हे शरावतीचे म्हणणे खोटे नाही का? जयसिंहाने स्वतः निघून जातो असे सांगितल्यावर शरावतीला आनंद होण्याऐवजी की पीडा गेली, तिने स्वतः त्याला थांबायला कां सांगितले? वाघाला मारणाऱ्या व्याधाला आपल्याबरोबर राजवाड्यात बोलावून नेत असतां तिने जयसिंहाकडे वळून पाहिले देखील नव्हते. मग तिच्या मनात जयसिंहावर एकाएकी प्रेम कसे काय जडले? या शंकाचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"जयसिंहाला आपल्या शौर्य पराक्रमाचा अभिमान होता. परंतु त्याचे शरावतीवर खरेखुरे प्रेम होते. शरावतीचे पण आपल्यावर प्रेम असले पाहिजे असे मनापासून त्याला वाटत होते. त्यासाठीच तो तिला एकांतात भेटायला गेला होता. परंतु राज्ये जिंकणे सोपे आहे तितके हृदये जिंकणे सोपे नाही हे त्याला माहीत नव्हते. म्हणून त्याने शरावतीशी विवाह करण्याचा विचार बदलला. या शिवाय तो शरावतीचे वाघापासून रक्षण करू शकला नाही आणि एका सामान्य व्याधाने तिचे रक्षण केले. म्हणून तो निराश झाला. परंतु जयसिंहाने बीरोत्तुंगाला राज्य परत देऊन स्वदेशी परत जाण्याचे ठरविले तेव्हांपासून तिच्या मनात त्याच्याविषयी प्रेमाचा अंकुर उपजला. वाघ आला त्या पूर्वीच तिला जयसिंहाचे तिच्यावर प्रेम आहे हे कळले होते. तिला हे देखील कळले होते की तिचे प्रेम त्याच्यावर आहे की नाही हे सद्भावनने कळून घेण्याच्या हेतूनेच जयसिंह तिला एकांतात भेटायला आला होता. बळजबरीने विवाह करण्याची शक्ति असून ही त्याने तसे केले नाही, हे तिने प्रत्यक्ष पाहिले होते. म्हणजे त्याचे तिच्यावर खरे प्रेम होते. व्याधाला बरोबर घेऊन जातांना तिने जयसिंहासंबंधी जास्त विचार केला नाही. कारण तो स्वतःचे रक्षण करण्यास समर्थ आहे हे तिला माहीत होते. वाघाशी झुंज करीत असता घायाळ झालेल्या व्याधाचे रक्षण करणे आपले प्रथम कर्तव्य आहे असे तिला वाटले."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच बेताळ प्रेतासह नाहींसा झाला व झाडावर जाऊन बसला. (कल्पित)





# दोन भामटे

एका व्यापाऱ्याने आपल्या मृत्युसमयी आपला मुलगा जयदेव याला जवळ बोलावून सांगितले, की मुला, तू कोणत्याही गावी व्यापार कर पण कपिल नावाच्या गावी मात्र करू नकोस.

बापाच्या मृत्यूनंतर जयदेवने व्यापाराला सुरवात केली. तो आपल्या आईला म्हणाला—"आई! मी कपिल नगरी जात आहे."

"कां रे? तुझ्या बाबांनी तुला कपिल नगरीत व्यापार करू नकोस असे बजावून सांगितले होते ना?" आईने विचारले.

"जावेच लागणार आई! व्यापारात कोठे जायचे आणि कोठे नाही हे काय आपल्या हातात असते?" जयदेव म्हणाला.

जयदेवने स्वस्तात पुष्कळसे चंदनाचे लाकूड विकत घेतले आणि कपिल नगरी चांगली किंमत मिळेल असा विचार करून निघाला. चार मण चंदन विकत घेऊन ते एका खेचरावर लादून तो निघाला आणि संध्याकाळी कपिल नगरीत येऊन पोचला. तोपर्यंत काळोख पडू लागला होता.

नगराबाहेर एक धर्मशाळा होती. धर्मशाळेबाहेर दोघे जण बसले होते. त्यांनी त्याला त्याच धर्मशाळेत रात्रभर उतरायला सांगितले. कारण इतर धर्मशाळा तिकडे पोचेपर्यंत बंद झालेल्या असणार.

त्या दोघांपैकी एकजण लंगडा होता व दुसरा एक डोळा फुटलेला होता. ते चंदन आहे हे वासांवरूनच त्यांनी ओळखले. एकाने रात्री चंदनाची एक मोळी चोरली. त्याने अर्धी धर्मशाळेत एका कोपऱ्यात लपवून ठेवून दिली आणि अर्धी चुलीत घातली. जयदेव जेवायला बसला तेव्हां लंगड्याने त्याला विचारले—"काय रे तू आपल्याबरोबर हा काय माल घेऊन आला आहेस?"

"चंदनाचे लाकूड आहे!" जयदेव म्हणाला.

"अरे वेड्या! तू तरी खुळाच दिसतोस. या गावी चंदन इतके स्वस्त मिळते की तुला यात काही मिळणार नाही. आम्ही ते सरपण म्हणून वापरतो. गावात तू चवकशी करून पहा, चंदन फुकट मिळेल." असे सांगून लंगड्याने चुलीत जळत असलेली चंदनाची लाकडे आणून दाखविली.

जयदेव ते ऐकून निराश झाला. त्याच्या चेहऱ्यावर निराशा पाहून लंगडा त्याला म्हणाला—"तू दूर कोठून तरी हे चंदन घेऊन आला आहेस. ते परत घेऊन जायला तुला फार त्रास होईल. तू आयुष्यभर आमच्या या गावाच्या नावाने खडे फोडशील. म्हणून तू आणलेले हे सर्व लाकूड मी ठेवून घेतो आणि तुला सात अशर्फी देतो. कमीत कमी तुझा वाटखर्च तरी निघेल."



जयदेवने, तो म्हणतो आहे ते बरोबर आहे असा विचार केला. दुसऱ्या दिवशी तो गाव पहायला निघाला. आपण इतके दूर आलो आणि हे नगर पाहील्याशिवाय गेलो तर लोक आपल्याला हसतील, असा विचार करून तो गावातल्या एका दुकानात गेला. दुकानदार वयाने चाळीशी उलटलेला होता. दिसायला बरा वाटत होता. जयदेवने त्याला विचारले—"काय हो, व्यापार कसा काय आहे? मी पण परगावचा एक व्यापारीच आहे."

दोघांच्या बराच वेळ गप्पा चालू होत्या. जयदेवने सहज विचारले—"काय हो! या गावी चंदनाचे लाकूड काय भावाने मिळते?"

"तुला किती पाहिजे बुवा?" दुकानदाराने विचारले.

"मला चारपाच मण पाहिजे!" जयदेव म्हणाला.



"चारपांच मण? सर्व गावभर फिरलास तरी तुला दोन मण देखील मिळणार नाही." दुकानदार म्हणाला.

ते ऐकून जयदेव चकितच झाला. तो त्या सज्जन दुकानदाराला म्हणाला–"मी एका मोठ्या संकटात सापडलो आहे हो." असे सांगून त्याने घडलेली गोष्ट सांगितली.

दुकानदार म्हणाला–"मुला! त्या धर्मशाळेत दोन वस्ताद भामटे आहेत. नव्या परदेशी लोकांना फसविणे हा एकच एक धंदा ते करतात. एक लंगडा आहे आणि दुसरा एक फुटक्या डोळ्याचा. या दोघांना सरळ मार्गावर आणणारा या गावात एकच मनुष्य आहे. तो त्या धर्मशाळेतला सैपाकी आहे. तू त्याच्याशी मैत्री करुन घे म्हणजे तो तुझे काम फत्ते करुन देईल."

जयदेवने धर्मशाळेत आल्यावर तेथल्या सैपाक्याची ओळख करुन घेतली व त्याला पैशाचा मोहपण दाखविला.

"मला पैशाची गरज नाही रे! आज दोघे भामटे तुझ्या खोलीच्या शेजारच्या खोलीतच आज रात्री एका ज्योतिष्याला भेटणार आहेत. त्यांचे बोलणे तू चांगले लक्ष देऊन ऐकून घे आणि मग तुला बरोबर वाटेल तसे कर." सैपाक्याने सल्ला दिला.

जयदेवने रात्री शेजारच्या खोलीत काय बोलणे झाले ते नीट ऐकून घेतले.

"काल येथे एक नवा व्यापारी आला आहे. त्याच्याजवळून आम्ही सर्व चंदनाचे लाकूड सात अशर्फींना विकत घेतले आहे. ते विकले तर आम्हांला किती फायदा होईल?" भामट्यानी ज्योतिष्याला विचारले.

तो व्यापारी इतक्या दुरुन आला आहे तर तो अगदीच मूर्ख नसणार. तो मला सात अशर्फी नकोत, सात शेर माशा द्या असे म्हणाला तर तुम्ही काय कराल?" ज्योतिष्याने विचारले.

"हा विचार त्याच्या डोक्यात कसा काय येईल?" ज्योतिषी म्हणाला.

[illegible] न्यायाधिशाकडे फिर्याद नोंदविली व न्याय करायला विनंती केली. म्हणाला–"मालक! मी चंदनाचे लाकूड दोघा जणांना विकले. मला लवकर किमत मिळाली तर मी आपल्या गावी परत जाईन."

न्यायाधिशाने दोघां भामट्यांना बोलावून विचारले–"कायरे, तुम्ही दोघांनी याचा माल विकत घेतलात म्हणे? त्याच्या मालाची किमत देऊन टाका!"

"आम्ही त्या मालाची किमत सात अशर्फी द्यायचे कबूल केले होते, सरकार!" दोघे भामटे म्हणाले.

"मला अशर्फी नकोत. मला माझ्या मालाची किमत सात शेर माशा हवी आहे." जयदेव म्हणाला. दोघे भामटे परस्पराकडे चकित होऊन पाहू लागले आणि न्यायाधिशाला म्हणाले, "तर मग आम्हांला त्या मालाची गरज नाही."

जयदेवला तेच हवे होते. त्याने सर्व लाकूड चांगल्या किमतीला गावात विकून टाकले.

त्याच दिवशी फुटका डोळा असलेल्या माणसाने दुसऱ्या एका न्यायाधिशाकडे फिर्याद केली की जयदेव नामक एक व्यापारी आपल्या गावी व्यापारासाठी



आला आहे आणि तो गावाबाहेरच्या धर्मशाळेत उतरला आहे. तो आमच्या गावचा आहे. तो जन्मला तेव्हां त्याला एक डोळा नव्हता. म्हणून त्याच्या बापाला फार वाईट वाटले. म्हणून मी त्याला आपला एक डोळा उधार दिला होता. 'आतां तो चांगल्या स्थितीत आहे, तेव्हां माझा डोळा परत द्यायला सांगावे."

न्यायाधिशाने जयदेवला बोलावून विचारले–"काय रे, ह्याने तुला आपला एक डोळा उधार दिला होता. तो आपला डोळा परत मागतो आहे. याविषयी तुझे काय म्हणणे आहे, बोल."

"सरकार! मी या माणसाला आयुष्यात कधी पाहिले देखील नाही." जयदेव म्हणाला.

"हा म्हणतो की हा तुझ्याच गावचा राहणारा आहे. तुझ्या वडिलांना चांगला ओळखतो म्हणूनच तर आणि त्याने आपला डोळा तुला दिला होता!" न्यायाधीश म्हणाला.

जयदेव थोडा वेळ विचार करून म्हणाला–"मालक! हा मनुष्य म्हणतो ते खरे आहे की नाही, हे देखील पाहून घेतले पाहिजे. याला सांगावे की याने आपला एक डोळा दाखवावा. मग मी त्याला आपला डोळा काढून देईन. मग आपण दोन्ही डोळ्यांचे वजन करून पहावे. त्याच्या डोळ्याच्या वजना इतकाच माझा डोळा निघाला तर मी काढून दिलेला त्याचा डोळा होता हे सिद्ध होईल."

"बरोबर आहे तुझे म्हणणे. तसेच करू या तर." न्यायाधीश म्हणाला. पण भामटा घाबरून गेला. म्हणाला–"मी दिलेले दान परत घेऊ इच्छित नाही." असे सांगून तो मनुष्य निघून गेला.

अशातऱ्हेने दोघां भामट्यांपासून स्वतःला वांचवून जयदेव फायदा मिळवून घरी परतला.





# चढाओढ

फार प्राचीन काळातली गोष्ट आहे. कमलपूर नावाच्या राज्याचा अधिपती कमलध्वज याला शूरध्वज नावाचा मुलगा आणि शालिनी नावाची मुलगी होती.

शूरध्वज नावाला साजेल असाच शूर होता. तो सर्व शस्त्रास्त्र विद्यांत पारंगत होता. त्या कित्येक युद्धात जय मिळाला होता. त्याचे नाव ऐकूनच शत्रू घाबरत असे.

कमलध्वजाने शूरध्वजाला युवराज नेमले. तो स्वतः नावापुरता राजा होता. त्याने राज्यव्यवस्थेचा सर्व भार युवराजावरच टाकला होता.

पुढे काही काळ लोटल्यावर शालिनी विवाहास योग्य झाली. तेव्हां राजाने आपल्या मुलीसाठी योग्य वर शोधण्यास सुरवात केली. शूरध्वजला ती गोष्ट कळली तेव्हां तो म्हणाला–"मी आपल्या बहिणीचा विवाह सामान्य माणसाशी होऊ देणार नाही. एका शूर क्षत्रियाशीच तिचा विवाह झाला पाहिजे. जो मला द्वंद्वयुद्धात जिंकेल त्याच्याशीच माझ्या बहिणीचा विवाह करून देऊ."

"तुझे म्हणणे बरोबर आहे, परंतु द्वंद्वयुद्ध तुझ्याशी होण्याऐवजी आणखी कोणाशी होईल अशी व्यवस्था करू या." राजा म्हणाला. परंतु शूरध्वजला ते मान्य नव्हते. शालिनीशी विवाह करण्याची इच्छा असणाऱ्या तरुणाने त्यालाच द्वंद्वयुद्धात जिंकले पाहिजे या गोष्टीचा शूरध्वजाने हट्ट धरला आणि त्याने तसे जाहीरपण केले.

काही काळ एकही राजकुमार शूरध्वजाशी द्वंद्वयुद्धास तयार नव्हता. कारण शूरध्वजाला जिंकण्याची हिंमत कोणाला होत नव्हती. शेवटी श्यामल देशाचा











राजकुमार वायुवर्मा द्वंद्वयुद्धास तयार झाला.

वायुवर्मा सर्व तऱ्हेने शालिनीला योग्य वर होईल असे राजाला वाटले. शालिनी देखील त्याला पसंत करून त्याच्याशी विवाहास तयार झाली. परंतु द्वंद्वयुद्धात शूरध्वजाला जिंकल्याशिवाय शालिनी त्याचा विवाह होणे शक्य नव्हते. द्वंद्वयुद्धासाठी एक सुमुहूर्त ठरवून वायुवर्माच्या उतरण्याची खास व्यवस्था करण्यात आली. परंतु द्वंद्वयुद्धासाठी ठरलेल्या मुहूर्ताच्या आदल्या दिवशी एक दुर्घटना घडली. राजकुमारी शालिनी बागेत फिरत असता काही दुष्ट लोक तिला धरून उचलून घेऊन पळून गेले.

ही गोष्ट घडली त्यावेळी शूरध्वज राजवाड्यात नव्हता. राजाच्या शिपायांनी सर्व राजधानी चाळून काढली तरी राजकन्येचा कोठे शोध लागला नाही. शूरध्वज राजवाड्यात परत आल्यावर वायुवर्माला म्हणाला–"माझ्या बहिणीला कोणी दुष्ट उचलून घेऊन गेला आहे. मी तिच्या शोधार्थ जातो. द्वंद्वयुद्धाचे आपण मागाहून पाहून घेऊ."

"मी देखील राजकन्येच्या शोधार्थ येतो." वायुवर्मा म्हणाला.

दोघे सशस्त्र होऊन राजकुमारीच्या शोधार्थ निघाले. पहिल्याने ते उद्यानाच्या दिशेनेच निघाले. तेथे शालिनीला उचलून दुष्ट लोक कोणत्या दिशेने गेले हे कळले. हुशार शालिनीने आपल्या डोक्यातली फुले वाटेत टाकून ठेवली होती. त्यांच्या खुणेने चालतचालत शूरध्वज आणि वायुवर्मा राजधानीबाहेर दूर एका झाडाखाली एक योगी होता तेथे येऊन पोचले.

तेथून ते पुढे जाऊ लागले, पण पुढे फुले नव्हती. म्हणून परतले आणि त्या योग्याला म्हणाले–"योगिराज! या वाटेने कोणी दुष्ट बळजबरीने एखाद्या तरुण मुलीला उचलून नेत असताना दिसले का?"

होय! चार जण होते, एका तरुण मुलीला उचलून नेत असलेले मी पाहिले. मी त्यांना तसे करणे महापाप आहे असे सांगितले देखील. परंतु त्यांनी माझ्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले आणि या दिशेने जंगलात निघून गेले.

जंगलातली वाट एका डोंगरी गुहेनजीक संपत होती. गुहेबाहेर त्यांना फुलांचा एक गुच्छ दिसला. "त्या दुष्टांनी राजकन्येला याच गुहेत ठेवले असावे. मी आंत जाऊन राजकन्येला सोडवून घेऊन येतो." वायुवर्मा म्हणाला.

"नको तू येथेच थांब. मी आपल्या बहिणीला सोडवून आणतो." शूरध्वज म्हणाला. असे म्हणत शूरध्वज गुहेत शिरला-देखील. तो आत गेल्याबरोबर गुहेचे दार बंद झाले.

गुहेबाहेर वायुवर्मा उभा होता. त्याला एका स्त्रीचा आक्रोश ऐकू येत होता. वायुवर्मा त्या बाजूला धावला. त्याला समोर शालिनी एका झाडाला बांधून ठेवलेल्या स्थितीत दिसली. तिच्या समोर चौघे योद्धे उभे होते. "वेडे पोरी,



तुझ्या रक्षणासाठी आलेल्यांना माझ्या अनुयायांनी गुहेत बंद करून ठेवले आहे. आतां तुला माझ्याशी लग्न करावें लागणार. तुझे रक्षण करणारा आतां कोणी उरला नाही." असे एकजण म्हणाला.

वायुवर्मा आपली तलवार उपसून त्याच्या अंगावर धावून गेला. चौघे वायुवर्माशी युद्धाला तयार होऊन उभे राहले. थोडा वेळ त्यांनी स्वतःचे रक्षण करण्याचा प्रयत्न केला, परंतु थोड्या वेळाने जणुंकाही पूर्वी ठरल्याप्रमाणे चौघे पळून गेले.

वायुवर्मा शालिनीला सोडवून पुन्हां गुहेजवळ आला. त्याच वेळी सुदैवाने काही रानटी लोक त्या बाजूला आले. त्याच्या मदतीने गुहेच्या तोंडावरची शिळा बाजूला सारून शूरध्वजला सोडविण्यात आले. त्यानंतर शूरध्वज व वायुवर्मा शालिनीला बरोबर घेऊन राजवाड्यात परतले.

राजाने शालिनीच्या विवाहासाठी मुहूर्त ठरविण्यास राजपुरोहितास सांगितले.

"द्वंद्वयुद्धात मला जिंकल्यानंतरच वायुवर्माचा विवाह माझ्या बहिणीशी होऊ शकेल." शूरध्वज म्हणाला.

"परंतु तुमचे द्वंद्व आजच संपले नाही का? मला सोडविण्याच्या कामी दोघांची चढाओढ झाली. हे एक तऱ्हेचे द्वंद्वच नाही का? त्यात वायुवर्मा जिंकला, आता दुसरे द्वंद्व कशासाठी?" शालिनी म्हणाली.

शूरध्वजाने लज्जित होऊन होकार दिला. शालिनीला उचलून नेल्यानंतर घडलेले सर्व वृत्त एक नाटक होते हे त्याला कळले नाही. राजा व राजकन्या दोघांच्या सल्लयाने हे नाटक केले गेले होते.





# धूर्त म्हातारी

[ ६ ]

जुरेकच्या मासळीच्या दुकानातून दीनदा दीनारांची पिशवी उचलून नेण्याचा पाराचा प्रयत्न फुकट गेला. तरीदेखील हिंमत न हारता तो या खेपेस एका गारुड्याचा वेष करून निघाला. त्याने तीन नाग एका टोपलीत घेतले आणि जुरेकच्या दुकानासमोर त्यांना खेळवू लागला. सापांना खेळवीत असता एका सांपाला त्याने जुरेकच्या दुकानाच्या बाजूला फेकले. तो साप जुरेकच्या पायाजवळ जाऊन पडला. जुरेक घाबरून आत पळून गेला.

त्या गडबडीत पाराने दीनारांची पिशवी उचलून घेतली आणि पळाला. परंतु जुरेक शिशाचे दोन गोळे घेऊन आला. एका गोळ्याने त्याने सापाचे डोके ठेचले व दुसरा गोळा पारावर फेकला. त्याचा तो नेम चुकला आणि रस्त्यावरून चालणाऱ्या एका म्हातारीला लागला आणि ती जागच्या जागी ठार झाली. तेथे जमलेले लोक जुरेक वर खूप रागावले. तो घाबरला आणि त्याने दुकानातली पिशवी पाराने उचलून नेल्याची गोष्ट मान्य केली. त्यानंतर त्याने ती पिशवी आपल्या सैपाकघरात नेऊन ठेवली. जुरेकची बायको त्याला म्हणाली–"आतां दीनारांच्या पिशवीची गरजच उरली नाही. म्हणून ते सर्व दीनार मुलाच्या व. दिवसाला खर्चून टाकूया." पण जुरेक त्याला तयार झाला नाही.

त्या दिवशी रात्री जुरेकला एक स्वप्न पडले. एक पक्षी आपल्या चोचीने पिशवी कुरतडून आतले दीनार काढीत होता. तो एकदम जागा झाला आणि बायकोला म्हणाला–"अग ऊठ, कोणता तरी पक्षी दीनारांची पिशवी कुरतडून आतले दीनार

रा. ना. सावंत



पळवीत आहे. जुरेकची बायको उठून पहायला गेली तेव्हां तिला कोणी तरी सैंपाकघराच्या खिडकीतून बाहेर उडी मारून पळून जात असलेला दिसला.

तो पळून जाणारा पाराच होता आणि त्याच्या हातात दीनारांची पिशवी होती. जुरेकने पिशवी सैंपाक घरात ठेवली तेव्हां-पासून पारा दुकानाच्या चारी बाजूला घिरट्या घालीत राहीला. त्याने जुरेकला पिशवी सैंपाकघरात पुरून ठेवीत असता पाहिले होते. रात्री तीच पिशवी उचलून तो पळाला होता. "मी मुलाचा वाढदिवस साजरा करू या म्हटलं होतं, पण तू ऐकले नाहीस. आता भोग, व्यर्थ चोराच्या हातात पैसे गेले की नाही?" जुरेकची बायको रडू लागली.

"अग, जातात कोठे? तू पहात रहा, मी आतां जाऊन परत घेऊन येतो." असे सांगून जुरेक दुकानातून बाहेर निघाला.

"दीनार आणल्याशिवाय परतलास तर तुला घरात पाऊलदेखील टाकू देणार नाही." जुरेकच्या बायकोने बजावून सांगितले.

दीनारांची पिशवी उडविण्याचा तीनदां कोणी प्रयत्न केला होता, हे जुरेकला चांगले माहीत होते. तो तरुण चोर अहमदच्या घरी राहतो हे देखील त्याला माहीत होते. म्हणून तो मधल्या आडवाटेने अहमदच्या घरी गेला आणि नकली किल्ल्यांनी त्याचे दार उघडून आत जाऊन बसला. थोड्या वेळाने पारा आला. त्याने दारावर थाप मारली.

जुरेक आतून अहमदच्या आवाजाची नक्कल करीत म्हणाला—"पारा! पिशवी घेऊन आलास का? दाराखालून ती आत सरकव. मी पैज लावली आहे. दार उघडल्यावर सर्व सांगतो तुला."

पाराला वाटले की आत अहमदच बोलतो आहे. म्हणून त्याने दीनारांची पिशवी दारा



खालून आत सरकविली. जुरेक पिशवी घेऊन जिना चढून गच्चीत गेला. वरच्या वर उड्या मारीत रस्त्याच्या टोकाच्या घरावरून खाली उतरला.

पाराने एकदोनदां दाराची कडी वाजवून पाहिली, पण आतून काहीच उत्तर आले नाही. त्याला संशय आला की त्याला जुरेकने फसविले असावे. म्हणून तो जवळच्या वाटेने सरळ जुरेकच्या घरी गेला. जुरेकची बायको गच्चीतल्या खोलीत मुलाला कुशीत घेऊन झोपलेली त्याला दिसली.

जुरेकच्या बायकोला जाग येण्यापूर्वी पाराने तिचे हातपाय बांधून ठेवले आणि मुलाला एका टोपलीत घालून जुरेक परत येण्याची वाट पहात बसला. इतक्यात जुरेक घरी परतला आणि त्याने दाराची कडी वाजवून बायकोला दार उघडायला सांगितले.

पाराने जुरेकच्या बायकोच्या आवाजाची नक्कल करून विचारले—"पिशवी मिळाली का?"

—"ही घे." जुरेक म्हणाला.

"पिशवी टोपलीत ठेवून दे. मी दीनार मोजून पाहाते आणि त्यानंतर दार उघडते." असे म्हणत पाराने एक टोपली दोरी बांधून खाली सोडली. जुरकने टोपलीत पिशवी




ठेवून दिली. पाराने ती वर ओढून घेतली. त्याने ती पिशवी व जुरेकच्या मुलाची टोपली उचलून घेतली आणि घरच्या गच्चीवरून पलीकडच्या घरावर जाऊन खाली उतरला आणि अहमदच्या घराची वाट धरली.

बराच वेळ झाला तरी बायकोने दार उघडले नाही तेव्हां जुरेक दार ठोठावू लागला. शेजारी पाजारी काय भानगड आहे हे पाहण्यासाठी जमा झाले. सर्वांनी मिळून दार फोडले आणि आत जाऊन पाहतात तर जुरेकच्या बायकोला कोणी खाटेला बांधून ठेवले होते. दीनारांची पिशवी नव्हती की मुलगा पण नव्हता.














जुरेकने बायकोला प्रथम सोडविले आणि तिच्याकडून सर्व गोष्टी ऐकून घेतल्या. तो घाबरून गेला आणि अहमदच्या घरी गेला. तोंपर्यंत छान उजाडले होते. अहमदच्या घरचे सर्व लोक जागे झाले होते.

जुरेकने पाराला पाहताच विचारले– "काय रे, ती दीनारांची पिशवी मिळविलीस ना, मग ती तुझी झाली, ठेवून घे. पण माझ्या मुलाला परत दे."

हसन जुरेकला म्हणाला–"घाबरू नकोस म्हाताऱ्या! तुझी दीनारांची पिशवी तुला मिळेल आणि तुझा मुलगापण मिळेल. माझ्या या मित्राबरोबर तू आपली भाची जीनावचा निकाह करून देण्याचे कबूल कर आणि घेऊन जा आपल्या पोराला."

"हसन! अरे हे तू काय म्हणतोस? जीनावचा निकाह अलीशी करून देण्यास मी केव्हां रे नकार दिला? परंतु जीनाव बकरी किंवा मेंढरू का आहे? तिच्याशी लग्न करण्याची इच्छा असणाऱ्याने तसे दागदागिने पण दिले पाहिजेत." जुरेक म्हणाला.

"दागिने किती व कोणकोणते सांग, मी द्यायला तयार आहे." पारा म्हणाला.

"अजरय्याजी पोरगी कमर आहे ना? तिच्याजवळ एक जरीची शाल आहे, तिचे दागिने, तिचा सोन्याचा कंबर पट्टा, सोन्याचा चढाव आणून देणाराशी तिचे लग्न होईल. तू आणून दिलेस तर ती तुझ्याशी आनंदाने लग्न करील." जुरेक म्हणाला.

"ठीक, कबूल! मी ते सर्व आणून द्यायला तयार आहे." पारा म्हणाला.

त्यानंतर जुरेक आपली दीनारांची पिशवी व मुलाला घेऊन घरी निघून गेला.

हसन पाराला म्हणाला–"अजरय्याला तू ओळखले नाहीससे दिसते. त्याला मंत्रतंत्र येतात. भूत व पिशाच्च त्याच्या हुकमाप्रमाणे वागतात. त्याने बगदाद शहराबाहेर आपले घर सोन्याच्या विटांचे





आणि चांदीच्या गाऱ्याचे बांधले आहे. तो दिवसभर बाजारपेठेत व्याजबट्ट्याचा धंदा करतो आणि रात्री घरी परत जातो. रात्री तो घरी असतो तेव्हांच त्याचे घर दिसते. तो एका खिडकीत उभा राहून एका सोन्याच्या थाळ्यात आपल्या मुलीची सोन्याची शाल ठेवून जाहीर करतो की इराक, इराण आणि अरबस्तान या देशातल्या वाटेल त्याने हिंमत करून ही शाल चोरी करून दाखवावी." कित्येक वस्ताद चोरांनी जंग पछाडले, पण त्यांच्या हाती काहीच लागले नाही. ते मात्र प्राणास मुकले. जुरेकने तुझा काटा दूर करण्यासाठीच हा घाट घातला आहे. तू त्याच्या जाळ्यात सापडून स्वतःचा जीव घालवून घेऊ नकोस."

"मी वचन दिले आहे जीनावच्या अंगावर ती सोन्याची शाल घालतो व तिला सोन्याचा कंबरपट्टा व चढाव आणून देतो म्हणून. त्यानंतरच मी तिच्याशी लग्न करीन." पारा म्हणाला.

पाराला थांबविणे कोणाला शक्य नव्हते. पारा लगेच घरून निघाला आणि अजरय्याच्या दुकानात गेला. अजरय्या दुकान बंद करीपर्यंत तो दुकानाबाहेर उभा राहीला. अजरय्याने सर्व सोने वजन करून पोत्यात भरले व ते गाढवावर टाकून स्वतः एका





गाढवावर हाकीत घरी निघाला. पारा देखील त्याच्या पाठोपाठ निघाला. अजरय्या एका जागी थांबला. आपल्या हातातल्या पिशवीतून वाळू हातात घेऊन त्याने ती मंत्रविली आणि हवेत वाऱ्यावर उडवून दिली. लगेच समोर एक वाडा दिसू लागला. तो हुसनने सांगितला तसा सोन्याच्या विटांचा आणि चांदीच्या गाऱ्याचा होता. अजरय्या गाढवांसह वाड्यात शिरला.

थोड्या वेळाने तो एका खिडकीजवळ येऊन उभा राहला. त्याच्या हातात एक सोन्याचा थाळा होता आणि त्यात एक सोनेरी शाल घडी करून ठेवलेली होती. तो मोठ्याने ओरडून म्हणाला–"छाती असेल तर इराक, इराण व अरबस्तानातील कोणत्याही चोराने, येऊन माझ्या मुलीची ही शाल चोरून तिच्याशी लग्न करून घ्यावे.

पारा मोठ्याने ओरडून म्हणाला–"अहो, मला आपल्याजवळ काही जरूरीचे बोलायाचे आहे."

"वर ये." अजरय्या म्हणाला. पारा वर गेला आणि त्याने अजरय्याजवळ त्याला कोणत्या वस्तू व कशासाठी हव्या होत्या ते सांगितले.

अजरय्या जोराने हंसला. त्याने पाराचा हात हातात घेऊन तो नीट पाहून घेतला आणि म्हणाला–"तुला स्वतःचा जीव हवा असेल तर तू हा प्रयत्न सोड. कोणीतरी तुला वाटेतल्या कांट्यासारखे बाजूला सारण्यासाठी तुला हे काम सांगितले असावे. परंतु तुझे वय तर माझ्याही पेक्षा जास्त दिसते आहे. नाही तर मी या क्षणीच तुला ठार केले असते."

पारा अजरय्या म्हणाला ते ऐकून चिडला आणि तलवार उपसून म्हणाला–"मला ओळखले नाहीस वाटते? मी जे मागतो आहे ते समोर ठेव, नाही तर माझी तलवार तुझ्या मानेच्या आरपार जाईल लक्षात ठेव."



"वर उठलेला हात खाली येवो!" अजरय्या ओरडला. त्याबरोबर पाराचा उजवा हात खाली येऊन अर्धांगाचा झटका यावा तसा होऊन खाली लोंबू लागला. पाराने चटकन हातात तलवार घेतली. डाव्या हाताची पण तीच गत झाली.

"बोल, आता तरी तुझ्या विचारात काही बदल झाला की नाही?" अजरय्याने विचारले.

"मला तेवढी शाल आणि ते दागिने पाहिजे आहेत." पाराने त्याच तोऱ्यात उत्तर दिले.

"तर मग तू गाढव होऊन त्या वस्तूंचे ओझे वहात रहा." असे म्हणत अजरय्याने पारावर थोडे पाणी शिंपडले. पारा एक गाढव होऊन गेला.

दुसऱ्या दिवशी पाराच्या पाठीवरच बसून अजरय्या आपल्या दुकानात निघून गेला. संध्याकाळी त्याला पुन्हां मनुष्य करून त्याने त्याला विचारले–"तू आपला जीव असा व्यर्थ कां घालवतो आहेस? मी तुला याहून क्षुद्र प्राणी करू शकेन."

"ते ऐकून पारा घाबरून जाण्याऐवजी जास्तच रागावला व त्याने अजरय्याच्या अंगावर उडीच मारली. अजरय्याने त्याच्या अंगावर पाणी शिंपडून त्याला अस्वल करून



टाकले. दुसऱ्या दिवशी अजरय्याची मुलगी कमर हिने बापाला विचारले–"बाबा! या तरुणाला माझ्याशी तो लग्नाला तयार आहे का हे विचारून तर पहा."

"तूच विचार!" असे रागाने म्हणत अजरय्या आपल्या खोलीत निघून गेला.

"तुला माझ्या वस्तूंची गरज आहे की मी हवी आहे?" कमरने पाराला विचारले.

"तुझ्या त्या वस्तूची मला गरज आहे. दिलैलाची पोरगी जीनाबला निकाहाच्या वेळी भेट म्हणून देण्यासाठी त्या वस्तू मला पाहिजे आहेत. ती फार सुंदर आहे." अली उर्फ पारा म्हणाला.

"त्याचे मन बदलणे शक्य नाही." असे म्हणत अजरय्याने पाराला माकड करून टाकले. परंतु कमरच्या मनातच बदल झाला. तिला वाटले की पारा तिच्याशी लग्न करो किंवा न करो, पण त्याला ज्या वस्तूंची गरज आहे त्या देऊन टाकाव्या. तिने आपल्या बापाच्या पायां पडून त्याचे कसे तरी मन वळविले आणि त्याने मागितलेल्या सर्व वस्तू पाराला देत ती म्हणाली— "तू या सर्व वस्तू जीनावला नेऊन दे व तिच्याशी निकाह् करून घे."

कमरचे ते औदार्य पाहून पारा चकित झाला व तिच्या प्रेमाचा अंकुर त्याच्या हृदयात रुजला. तो कमरला बरोबर घेऊन हसन व अहमदकडे गेला आणि सर्व वृत्त सांगून तिच्याशीच लग्न करण्याची इच्छा असल्याचे सांगितले.

"जीनावशी निकाह् करून घेऊन त्यानंतर अजरय्याच्या मुलीशी तुला लग्न करायला हरकत नाही. त्याच्या सर्व संपत्तीला तीच वारस आहे." दोघांनी त्याला सल्ला दिला.

त्यानंतर दोघांनी दिलैला व जीनावला बोलावून त्यांना त्या सर्व वस्तू दाखवून पाराशी लग्न करून घ्यायला जीनावचे मन वळविले. पाराने इतके कष्ट सहन करून त्या वस्तू कमरच्या कृपेने मिळविल्या होत्या. ते सर्व ऐकून जीनावने कमरशी पण विवाह करून घेण्यास पाराला परवानगी दिली.

अशा तऱ्हेने पाराचा दोघींशी निकाह् झाला.

त्यानंतर पाराने खलीफांच्या दरबारात नोकरीचा अर्ज केला. त्याच्या नावाची शिफारस दिलैलाने स्वत: आणि दोघां कोतवालांनी केली. म्हणून खलीफांनी मासिक एक हजार दीनार पगारावर पाराला आपला सर सेनापती नेमले. अली उर्फ पारा याचा संसार त्याच्या दोघां पत्नींबरोबर सुखाचा झाला.





# चिक्कू

एका गावी गोपाळराव नावाचा एक श्रीमंत मनुष्य रहात असे. त्याच्याकडे फार मोठी संपत्ती होती. परंतु तो चिक्कूपण तितकाच होता. ती गोष्ट गांवकऱ्यांच्या लक्षात आली नाही. म्हणून गावकऱ्यात गोपाळराव एक देवपुरुष म्हणून ओळखला जाई. त्याच्या पंक्तीला कोणीतरी रोज जेवायला असतो व तो त्याचा नियम होता, असे गांवकऱ्यांना वाटत होते. कारण रोज दुपारी जेवणापूर्वी गोपाळराव आपल्या दारासमोर उभा राहून ओरडून म्हणे—"आज माझ्या पंक्तीला कोणी अतिथी पाहुणा नाही हो!" परंतु अचानक कधी कोणी साधू संन्यासी नेमका त्यावेळी त्यांच्या गल्लीत दिसला तर गोपाळराव घाबरून गेल्यासारखा चटकन घरात जाऊन दार बंद करून घेत.

एकदा सोनदेव नावाचा एक गरीब मनुष्य आपल्या बायकोला घेऊन पोटापाण्यासाठी काही कामाच्या शोधार्थ त्या गावी आला. गावात चवकशी करता त्याला गोपाळराव एक उदार श्रीमंत गृहस्थ त्या गावात असल्याचे कळले. तो काही ना काही तरी काम देईल, या आशेने सोनदेव गोपाळरावांच्या घरी गेला.

सोनदेवने गोपाळरावच्या घरी जाऊन काम द्यायला विनंती केली. दोघां नवरा बायकोला काही काम मिळाले तर जो पगार मिळेल त्यावर त्यांचा उदर निर्वाह चालेल. आयुष्यभर गोपाळरावाच्या घरी चाकरी करायला तयारी असल्याचे सोनदेवने सांगितले.

त्यावेळी गोपाळरावांच्या घरी काही प्रतिष्ठित गावकरी मंडळी बसली होती. आपला मोठेपणा दाखविण्यासाठी गोपाळरावांनी त्यांना काम देण्याचे कबूल केले.



परंतु पगाराच्या गोष्टी त्यांनी त्यावेळी काढल्या नाहीत.

गोपाळरावांच्या घरापाठीमागे एक झोपडे होते. त्यात सोनदेव व त्याची बायको राहू लागले. सोनदेव बाहेरची कामे करी व बायको घरातली भांडी घासणे, कपडे धुणे वगैरे कामे करी. त्यांच्याकडून संध्याकाळपर्यंत खूप काम करवून घेऊन गोपाळराव त्यांना मजुरी मात्र फार कमी देत असत. त्या मजुरीवर दोघांची पोटें भागत नसत. म्हणून दोघे कण्हेरीवर व मिर्ची मीठ वाटून चटणीवर भागवीत. तरी दोघे नेहमी प्रसन्न रहात.

गोपाळरावांच्या घरी कधी काही उरत देखील नसे. कारण गोपाळरावांची बायको हुशार होती. नेहमी हात राखून संसार करी. कधी कोणती ही वस्तु फुकट जाऊ देत नसे. ती नवऱ्याचा स्वभाव ओळखून होती.

"आपण येथे इतकी हाडाची काडे करतो, त्यापेक्षां आणखी कोठे इतके काम केले तर पोटभर खायला तरी मिळेल!" सोनदेवची बायको नवऱ्याला एक दिवशी म्हणाली.

सोनदेवाच्या मनात तोच विचार होता. पण तो गोपाळरावाला चांगली अद्दल घडवून नंतर जायच्या विचारात होता. तो आपला राग थट्टेथट्टेत व्यक्त करीत असे. तो थट्टे थट्टेत थोडे स्मित करून आपल्या बायकोला म्हणे—"काय ग खीर झाली का? लवकर कां नाही आणीत वाढायला? साखर थोडी जास्तच घाल. आणि खिरीबरोबर दोन केळीपण वाढ." सोनदेवाची बायको ते ऐकून कण्हेरीत थोडे जास्त मीठ घाली आणि एका ऐवजी दोन मिर्च्या आणून नवऱ्यासमोर ठेवी.

दररोज सोनदेवच्या तोंडचे केळी खिरीचे नाव ऐकून गोपाळरावांच्या बायकोच्या तोंडाला पाणी सुटे. ती सासरी आली त्या दिवसापासून तिने कधी खीर पाहिली देखील नव्हती. केळ्यांची गोष्ट काढायलाच नको. म्हणून खिरीचे व केळ्यांचे नाव ऐकून तिचे मन आवरेना.

शेवटी तिने एक दिवशी नवऱ्याजवळ खिरीची गोष्ट काढली. गोपाळरावांनापण आश्चर्य वाटले. कारण त्यांच्याकडून जी थोडी मजुरी मिळे त्यावर दोघांना खीर व केळी खायला कशी काय मिळतात हे त्यांना कळेना. म्हणून त्यांनी सोनदेवाला विचारायचे ठरविले.

दुसऱ्या दिवशी सोनदेव कामावर आला तेव्हां गोपाळरावांनी त्याला विचारले—"काय रे बुवा सोनदेव! कसं काय ठीक चाललं आहे ना? काही कमी तर नाही ना पडत?"

"मालक! आमचं जिणं म्हणजे जिणं आहे का? मजा कसली? कोणते कष्ट नाहीत ते विचारा!" सोनदेव म्हणाला.

"अरे, तू असे रे काय बोलतोस? रोज खिरीच्या आणि केळ्यांचा गप्पा सांगतोस आणि जिणं कष्टाचं आहे म्हणतोस. तुझ्या बोलण्यावर विश्वास तरी कसा करावा माणसाने? खरं खरं काय ते सांग." गोपाळराव म्हणाले.

"असं आहे मालक! आमच्यासारख्या गरिबाला त्याच वस्तू सहजी मिळणे शक्य





आहे. आम्ही जी खीर खातो, ती माझी बायको किती छान करते म्हणून सांगू!" सोनदेव म्हणाला.

म्हणजे खीर स्वस्तात होते म्हणावयाची, असे गोपाळरावांना वाटले.

पुढे काही दिवसांनी गोपाळरावांच्या घरी त्यांच्या मुलीला पाहण्यासाठी शेजारच्या गावची मंडळी आली. मुलाबरोबर त्याचे आईवडील व आणखी चार सहाजण होते. त्यांना पाहून गोपाळरावांच्या मनात धडकीच भरली. कारण त्या सर्वांना मेजवानी देणे आवश्यक होते. पण काय करावे हे त्यांना सुचेना. खर्च केल्याशिवाय भागणार नव्हते. तेव्हां गोपाळरावांच्या मनात एक विचार आला. सोनदेवाला बोलावून तो म्हणाला–"अरे सोनदेव! बाजारात जाऊन तुझी बायको करते तशा खिरीचे सर्व सामान आणि तशीच केळीपण घेऊन ये. ती खीर तू आपल्या बायकोकरवीच करून माझ्याकडे पाठवून दे आणि हो, एवढे सांगून ठेव, उगाच वायफळ खर्च नको करायला."

गोपाळरावाची खोड मोडायला सोनदेवाला चांगली संधी मिळाली. तो बाजारात जाऊन थोडेसे सामान घेऊन आला. गुप्तपणे आपल्या बायकोला सर्व गोष्टी समजाऊन सांगून पाहुण्यांसाठी सैंपाकाला लागायला सांगितले.

पाहुणे मंडळी वधू परीक्षा व इतर बोलणे वगैरे उरकल्यावर जेवायला पानावर येऊन बसली. गोपाळरावाच्या बायकोने सोनदेवाच्या बायकोलाच वाढण्यास मदतीला बोलाविले.

तिने इतर पदार्थांबरोबर खीर नावाची कण्हेरी व केळी नावाने मोठमोठ्या हिरव्या मिरच्या व मीठ वाढले. मुलाच्या बापाच्या पानावर मिठाबरोबर मिरच्या व कण्हेरी होती. त्याने खीर समजून चाखून पाहिली. ती खरी कण्हेरी होती. रागाने पाहुण्यांचा चेहरा लाल झाला.

गोपाळरावांनी पाहिले, काहीतरी चुकले आहे. चकित होऊन म्हणाले–"मी मुद्दाम खिरीचा बेत ठेवायला सांगितला होता. गार व्हायच्या आधी पिऊन घ्या. नाहीतर खिरीची मजा राहणार नाही."

गोपाळरावांनी पुष्कळ बतावणी केली, पण काही उपयोग झाला नाही. मुलाचा बाप पानावरून उठला आणि मोठ्याने ओरडून म्हणाला–"तुम्ही आम्हांला समजलात काय? कण्हेरीला तुम्ही खीर म्हणता? आम्हांला दूधखुळे समजलात वाटते? तुमच्याशी आमचा संबंध झाला तर पदोपदी आमची मान अशीच खाली होईल."

असे रागारागाने बोलत मुलाचा बाप व सर्व पाहुणे मंडळी पानावरून उठली आणि निघून गेली. ती बातमी वणव्यासारखी गांवभर पसरली. गोपाळरावांना सोनदेव व त्याच्या बायकोचा फार राग आला. म्हणाले–"दुष्टा! तू आज माझ्यावर केव्हांचे वैर काढलंस सांग! बायकोकडून खीर सांगून कण्हेरी आमच्या पाहुण्यांना वाढलीस? माझा पाणउतारा तुझ्यामुळे झाला व माझ्या पाहुण्यांचा अपमान झाला." तेथे जमलेल्या लोकांनी पण सर्व हकीकत कळली.

सोनदेव शांतपणे सर्व ऐकून घेतल्यावर म्हणाला–"ज्याला पोटभर खायला मिळत नाही त्याला कण्हेरीलाच खीर मानून खावे लागते आणि मिरच्या केळी म्हणून खाव्या लागतात. तुम्हीच आम्ही रोज खातो ती खीर करायला सांगितली होती. मग आम्ही तीच खीर करून वाढली, त्यात काय चूक झाली?"

गोपाळरावांना वाटले कोणी त्यांचा शिरच्छेदच केला आहे. सोनदेवाने गोपाळरावांची चांगलीच खोड मोडली, याबद्दल गावकऱ्यांना आनंद झाला.






# गजपादलिंगेश्वर

मणिपुरच्या गादीवर मणिदत्त नावाचा एक राजा राज्य करीत होता. तो वेष पालटून राज्यभर फिरे आणि प्रजेच्या सुख-दु:खाच्या गोष्टी गुप्तपणे जाणून घेऊन प्रजेला जास्त सुखी कसे करतां येईल याचा उपाय करीत असे. एकदा तो एका झोपडीच्या आड उभा राहिला. एक मनुष्य आपल्या बायकोला सांगत होता, राजाच्या पदरी आपल्याला नोकरी मिळाली की आपले सर्व दु:ख कष्ट दूर होतील. मी सात मजली इमारत उभी करीन. राजाने दुसऱ्या दिवशी आपल्या दोघां नोकरांना पाठवून त्या माणसाला बोलावून घेतले आणि त्याला आपल्या तबेल्याचा मुख्य अधिकारी म्हणून नेमले. त्या माणसाचे नाव प्रताप यादव असे होते.

प्रताप यादवने नोकरीवर लागला त्या दिवसापासून तबेल्यात काम करणाऱ्या सर्वांवर कडक नजर ठेवायला सुरवात केली. घोड्यांना जो दाणा देण्यात येई त्यात थोडी थोडी कपात करून, जो दाणा उरे तो विकून तो पैसे जमवू लागला. एका वर्षाच्या आत त्याने घराचे बांधकाम सुरू केले व पहिला मजला बांधून तयार देखील झाला. राजाला ती गोष्ट कळली तेव्हां आश्चर्य वाटले. त्याने प्रताप यादवला तबेल्याच्या अधिकाऱ्याच्या पदावरून काढून माहूतांवरचा अधिकारी नेमले. आता प्रतापला जास्तच फावले. हत्तीच्या खाण्यातले बरेचसे वांचवून प्रतापने सहा महिन्यांच्या आत दुसरा मजला बांधून तयार केला. दोन मजली इमारत तयार झालेली पाहून राजाला जास्तच आश्चर्य वाटले. राजाने यादवला नदीकाठी एक झोपडी बांधून देऊन तेथे त्याची राहण्याची व्यवस्था केली. नदीत येणाऱ्या नावा पडावांवर लक्ष ठेवण्याचे काम त्याला दिले. आता यादवाला एका वर्षात आणखी दोन मजले चढवता येतील इतकी मिळकत नाववाल्यांकडून झाली. राजाला ते कळले तेव्हां त्याला आश्चर्याच वाटले. त्याने यादवला वाळवंटांत एका निर्जन स्थानी झोपडी बांधून देऊन तेथे रहायला सांगितले. आतां अशा निर्जन स्थानी यादव कशी मिळकत करून घेतो हे पहावे या हेतूने राजाने वाळवंटात त्याला नेऊन टाकले.

त्या वाळवंटातून पुष्कळ प्रवासी हत्तीवर किंवा उंटांवर येत जात. एकदा एक हत्ती तिकडून जात असतां त्याचा पाय मऊ ओलसर वाळूत रुतला. त्यातून आपला पाय काढून हत्ती मोठ्या कष्टाने निघून गेल्यावर पायाच्या आकृतीचा गोल खड्डा झाला. तो पाहून यादवला एक युक्ती सुचली. शिवलिंगासारखा एक दगड हुडकून त्याने त्या खड्ड्यात ठेवला आणि गजपाद-लिंग म्हणून लोकांना सांगून त्याने तो तेथे उभा केला.



येणारे जाणारे लोक तो मंडप पाहून उत्सुकतेने काय आहे हे पहायला येत आणि तेथे गजपादलिंग आहे हे पाहून त्याची पुजा करीत व देवासमोर पैसे व नारळ वगैरे वस्तु ठेवीत. हळू हळू लोक त्या गजपादलिंगेश्वराच्या नावी नवस करू लागले व इच्छित वस्तु मिळाल्यावर मन-मोकळेपणाने देवाच्या अभिषेकाकरितां व प्रसादाकरितां खर्च करू लागले. काही व्यापारी व्यापारात लाभ झाला तर पाच टक्के गजपादलिंगेश्वराला धर्म करू लागले. अशातऱ्हेने प्रताप यादवची प्राप्ती जोराने वाढू लागली.

हळू हळू गजपादलिंगेश्वराच्या महात्म्या-च्या गोष्टी मणिपुरापर्यंत जाऊन पोचल्या. मणिपुराहून लोकांचे थवेच्या थवे देवाच्या दर्शनाला येऊ लागले. दिवसेदिवस भक्तांची

संख्या जास्त जास्त वाढली व त्याबरोबर प्रताप यादवाची प्राप्ती पण झपाट्याने वाढू लागली.

त्याच सुमारास मणिपुरचा राजा मणिदत्त स्वत: एकाएकी आजारी पडला. राणीने गजपार्दलिंगेश्वराच्या नावाने नवस केला की राजाला एका महिन्याच्या आत आराम पडला तर ती आपले सर्व दागिने देवाच्या पायांवर अर्पण करील. खरोखरच एका महिन्याने राजाला आराम पडला व राणी नवस केल्याप्रमाणे राजाच्याबरोबर आपले सर्व दागिने घेऊन गजपार्दलिंगेश्वराच्या दर्शनाला निघाली.

राजा येत असल्याचे कळताच यादवने आपला वेष बदलून पुजाऱ्यासारखी देवाची पूजा केली व राणीने दिलेले सर्व दागिने स्वीकारले. त्यानंतर पाचसहा महिन्यांनी प्रताप यादवाचे सात मजली घर बांधून तयार झाले.

राजाला ते पाहून आश्चर्य वाटले. वाळवंटात राहणाऱ्या यादवाकडे इतके पैसे आले कोठून व कसे हे राजाला कळेना. राजाने त्याला बोलवून विचारले–"काय रे, तू माझ्या पदरी नोकरी करायला लागून तीन वर्षेच झाली असतील. एवढ्या अवधीत तू ही सात मजली इमारत कशी काय पुरी केलीस? इतके पैसे तुला कसे काय मिळाले?"

"महाराज! आपण मला प्रथम क्षमा कराल तर मी कसे पैसे मिळविले हे सांगेन." यादव म्हणाला.

राजाने होकार दिल्यावर यादवने राजाला सर्व वृत्त सांगितले.

यादवाची हुशारी पाहून राजा खूष झाला. त्याने त्याला बजावून सांगितले, आतां तू आपली बुद्धी स्वत:च्या स्वार्थासाठी न वापरतां राज्याच्या हितासाठी वापर. तेव्हांपासून यादव राजाचा एक प्रमुख सल्लागार म्हणून नेमला गेला.





# महाभारत

युधिष्ठिराने राजसूय यज्ञासंबंधी आपल्या भावंडांचा सल्ला घेतला. त्याच्या मनात दोन गोष्टी घोळत होत्या. राजसूय यज्ञ निर्विघ्न पार पडला तर असंख्य प्रजा मरणार. परंतु त्याचबरोबर दिव्य लोकांचा लाभ होणार ही आशा देखील त्याला वाटत होती. म्हणून विचारांती त्याने यज्ञ करण्याचा शेवटी निश्चयच केला.

हा निश्चय झाला तेव्हांपासून त्याला राजसूय यज्ञाशिवाय दुसरी गोष्ट सुचेनाशी झाली. तो मंत्र्यांशी, भावंडांशी, अतिथि अभ्यागतांशी बोलू लागला की यज्ञाच्या गोष्टीच बोले. त्याने आपल्या मंत्र्यांना विचारले, राजसूय यज्ञ करणे आपणांस इष्ट आहे ना?

"महाराज! राजसूय यज्ञ करण्यास आपण सर्व प्रकारे योग्य आहां. यज्ञ पुरा करून आपण एका साम्राज्याचे अधिपती व्हाल." मंत्री म्हणाले.

मंत्र्यांनीच प्रोत्साहन दिल्यावर त्याच्या मनाचा पक्का निश्चय झाला. त्याला दोन महापराक्रमी भाऊ होते. त्यांच्यासमोर इंद्र जरी रणांगणात उभा राहीला तरी त्याला हार मानावी लागेल. सर्व परिस्थिति त्याला अनुकूल वाटली. युद्ध आणि नाश यांची भीती त्याच्या मनातून पार नाहीशी झाली. तरी श्रीकृष्णाचा सल्ला घेणे उचित होईल. असा विचार करून युधिष्ठिराने द्वारकेला निरोप पाठविला.



कृष्ण निरोप मिळतांच खास खास लोकांना बरोबर घेऊन इंद्रप्रस्थ नगरी आला. स्वागत सत्काराच्या औपचारिक गोष्टी झाल्यावर युधिष्ठिर कृष्णाला म्हणाला—"कृष्णा! राजसूय यज्ञ करावा असे फार मनात आहे. माझे सर्व हितैषी व बंधुमित्र यज्ञ करून घ्यावा असा आग्रह करीत आहेत. परंतु राजसूय यज्ञात फार मोठ्या शक्ति सामर्थ्याची आवश्यकता आहे. आमची शक्ती अशा यज्ञाला पुरेशी नाही. दुसऱ्यांचा सल्ला असला तरी तेवढ्यावर इतकी मोठी जबाबदारी घेण्याची मनाची तयारी होत नाही. तू सल्ला दिलास तर मी या यज्ञाचा विचार मनातून काढून टाकीन. तुला काय वाटते?"

ते ऐकून कृष्ण म्हणाला—"युधिष्ठिरा! कोणत्या ही दृष्टीने पाहिले तरी तू राजसूय यज्ञास योग्य आहेस. तरी एक गोष्ट सांगावी म्हणतो. प्राचीन काळी परशुरामाने सारी पृथ्वी निःक्षत्रिय केली होती तेव्हां ऐलेक्ष्वाक वंशीय क्षत्रिय तेवढे जिवंत राहले होते. तेच पुढे एकशे एक वंशात विभागले गेले. ययाति आणि भोज हे वंश चवदा चवदा झाले. या सर्व राज वंशांचा पराभव करून जरासंध हा सम्राट चक्रवर्ती झाला आहे. तो महापराक्रमी व घमेंडखोर आहे. त्याचा पराभव करणे अशक्य आहे. त्याचा शिशुपाल नावाचा सेनापती आहे. पश्चिमेकडच्या देशाचा राजा भगदत्त हा तुझे वडील पांडुराजा यांचा मित्र असला तरी आज तो जरासंधाचे आधिपत्य मानतो आहे. याशिवाय जरासंध याच्या बाजूला मोठमोठे पराक्रमी राजे आहेत. त्या जरासंधाच्या तापानेच आम्ही द्वारकेला गेलो. म्हणून जरासंध जिवंत असे पर्यंत तुझा राजसूय यज्ञ होणे शक्य नाही. प्रथम त्याचा वध केला पाहिजे."

कृष्ण म्हणाला ते ऐकून युधिष्ठिराचा उत्साह थंड पडला. तो विचार करून





कृष्णाला म्हणाला—"सर्व राजे आपापल्या सुखासाठी प्रयत्न करीत आहेत. कोणाला साम्राज्य स्थापन करण्याची इच्छाच नाही. त्यांच्या मनात तशी इच्छा असली तरी ती पुरी होणे सोपे नाही. म्हणून मी आपला विचार बदलावा म्हणतो. आमच्यां वंशात पुढे कोणीतरी राजसूय यज्ञ करण्यास जन्मेल तो हा यज्ञ करीलच असे मनाचे समाधान करून घेईन. जरासंधासमोर तुला सुद्धा टिकाव धरून उभे राहता येत नाही तर आम्ही त्याला काय जिंकणार? कारण आम्ही तुझ्या शक्तीच्या भरवंशावर आहो."

भीमाला युधिष्ठिर म्हणाला ते आवडले नाही. तो म्हणाला—"कार्य आरंभ करते वेळीच जे लोक असे घाबरून जातात त्यांच्या हातून कोणतेच कार्य पुरे होणे शक्य नाही. सर्व योजना करण्यास व सल्ला देण्यास कृष्णासारखा चाणाक्ष सखा व मित्र असतां आणि मी व अर्जुन असतां असे हात पाय गाळून बसणे शोभत नाही. आम्ही तरी आपल्या शक्तीची परीक्षा केव्हां तरी दिली पाहिजेच."

कृष्ण म्हणाला—"जरासंधाला काहीतरी युक्ति करून ठार करणे अशक्य नाही." पण युधिष्ठिराला हिमत होईना. तो म्हणाला—



"साम्राज्य लोभाने मी तुझ्या सारख्या मित्राला किंवा मला दोन डोळ्यासारखे असलेल्या आपल्या दोघां धाकट्या भावांना जरासंधाला ठार करण्यास पाठविण्यास तयार नाही. त्याला जिंकणे तुमच्या पैकी एकालाही शक्य नाही."

ते ऐकून अर्जुन म्हणाला—"जो मनुष्य प्रयत्न करीत नाही, त्याचे जीवित व्यर्थ होय! माझे गांडीव, अक्षय भाथा, कपिध्वज असलेला रथ सर्व फुकट आहे. यांचा उपयोग शत्रूचा नाश करण्यासाठी होत नसेल तर त्यांना कुजत ठेवण्यात तरी काय अर्थ आहे?"




युधिष्ठिराला जरासंधाविषयी जास्त सविस्तर माहिती हवी होती म्हणून कृष्णाने जरासंधाची गोष्ट सांगितली, ती अशी–

बृहद्रथ नावाचा राजा मगध देशाच्या सिंहासनावर असता तो इंद्रासारखा पराक्रमी होता. त्याच्याकडे तीन अक्षौहिणी सैन्य होते. त्याने काशी राजाच्या जुळ्या मुलींशी विवाह करून घेतला होता. पण त्याला मूलबाळ झाले नाही. म्हणून त्याने तीर्थ-दर्शन करून पुत्रकामेष्ठी यज्ञ केला. तरी त्याला मुलगा झाला नाही. म्हणून तो शेवटी आपल्या दोघां राण्यांना बरोबर घेऊन तपश्चर्या करण्यासाठी रानात निघून गेला.

रानात फिरत असतां त्याला एका आंब्याच्या झाडाखाली चंडकौशिक नावाचे एक गौतम वंशीय ऋषी भेटले. बृहद्रथ त्यांची सेवा करू लागला. एकदां चंडकौशिक ऋषी बृहद्रथ राजाला म्हणाले–"मुला! मी तुझ्या सेवेने तृप्त झालो आहे. तुला जे पाहिजे ते मागून घे."

"मुनीवर्य! मी जपतप, तीर्थदर्शन आणि पुत्रकामेष्ठी आदि यज्ञ केले, परंतु मला मूलबाळ नाही. म्हणून मला संसारापासून विरक्ती झाली आणि तपश्चर्या करण्यासाठी मी या अरण्यात आलो आहे. मला आणखी कोणतीही इच्छा नाही." बृहद्रथ म्हणाला.



त्याच वेळी एक आंबा झाडावरून खाली गळून पडला. तो आंबा चंडकौशिक ऋषींच्या बरोबर मांडीवर पडला होता. तो आंबा चंडकौशिकाने बृहद्रथ राजाला दिला आणि म्हणाला–"राजा! तू हे फळ घेऊन जा! तुला मुलगा होईल."

बृहद्रथ राजा तो आंबा घेऊन आपल्या दोघां राण्यांसह राजधानीत परत आला. त्याचे दोघां राण्यांवर सारखे प्रेम होते. म्हणून त्याने तो आंबा मधोमध कापला व अर्धाअर्धा आपल्या दोघां राण्यांना खायला दिला. दोघींना दिवस राहले आणि दोघींना अर्धें शरीर असलेला एकेक मुलगा झाला. एक हात, एक डोळा, एक कान, एक पाय, अर्धे तोंड व अर्धे नाक असलेले ते मूल पाहून दोघी राण्या रडू लागल्या. तेव्हां सुईणींनी त्या मुलांना बाहेर रस्त्यावर फेंकून दिले.

त्या प्रदेशात जरा नावाची एक राक्षसीण रहात असे. ती मनुष्य व जनावरे खात असे. ती त्या अर्ध्या शरिराच्या दोघां मुलांना खायला आली. तिने दोघांचे शरीर जवळजवळ धरल्याबरोबर दोन तुकडे एक झाले आणि एक सुंदर मुलगा झाला. तो मुलगा जोरजोराने रडू लागला. मुलाच्या





रडण्याचा आवाज ऐकून राजा दोघी राण्या व दासदासी त्या बाजूला धावले.

जरा राक्षसिणीला त्यावरून तो राजकुमार असला पाहिजे असे वाटले. तेव्हां तिने मानव रूप धारण करून त्या मुलाला राजाच्या हातात देत घडलेली गोष्ट सांगितली. राण्यांना परमानंद झाला त्यांनी त्या बालकाला प्रेमाने उचलून राजवाड्यात नेले. जरा राक्षसिणीने जोडलेला मुलगा म्हणून बृहद्रथ राजाने आपल्या मुलाचे नाव जरासंध असे ठेवले आणि दरवर्षी जरा राक्षसिणीच्या नावाने त्या दिवशी उत्सव करण्याचे जाहीर केले. जरासंध वाढू लागला तसतसा पराक्रमी निघाला. त्याने एक मागून एक अनेक राजांचा पराभव करून त्यांना तरुंगात टाकले.

कृष्णाने कंसाचा वध केल्याचे वृत्त जेव्हां जरासंधाला मिळाले तेव्हां त्याने मथुरेवर स्वारी केली. कारण कंसाच्या राण्या जरासंधाच्या मुली होत्या.

येथवर जरासंधाचे चरित्र सांगून कृष्ण म्हणाला–"युधिष्ठिरा! जरासंधाचा शस्त्रास्त्राने वध करणे अशक्य आहे. मल्लयुद्धात भीम त्याचा वध करू शकेल. माझ्या म्हणण्यावर तुझा विश्वास असेल तर तू भीमार्जुनांना माझ्या बरोबर पाठव."

"कृष्णा! तुझ्याशिवाय आम्हांला खरा सल्ला देणारा सखामित्र दुसरा कोण आहे. जरासंध भीमाच्या हाती मरेल असे तू म्हणालास की तो मेलाच असे मी मानतो. तू सांगितलेस की मी राजसूय यज्ञ करावा तर तो यज्ञ पूरा झालाच. तू भीमार्जुनांबरोबर राहलास तर माझे दोघे बंधु काय करु शकणार नाहीत? तर मग तुम्ही तिघे निघा आणि विजयी होऊन परत या." युधिष्ठिर म्हणाला.

कृष्ण, भीम व अर्जुन ब्राह्मणाचा वेष धारण करून इंद्रप्रस्थाहून निघाले. वाटेत




कालाकूट, गंडकी, महाशोण आदि नदीनद पार करून पूर्व कोशल व मिथिला नगर पहात ते पूर्वेकडच्या मगध देशात पोचले. ते गोरथ पर्वतावर चढून गेले. त्यांनी तेथून राजधानी पाहिली. ती एक वैभवशाली नगरी होती. जिकडे पहावे तिकडे पाणी व पशू दिसत होते. नगराच्या चारीबाजूला किल्ल्यासारखे पांच डोंगर होते. म्हणून त्या नगराला गिरिव्रज असे नाव पडले होते.

गिरिव्रजच्या चारी बाजूच्या डोंगरापैकी चैत्यक नामक पर्वतावर नौबत होती. कोणी परदेशी नगराच्या आसपास आल्याबरोबर ती नौबत आपोआप वाजे. म्हणून कृष्ण, अर्जुन व भीम तिघांनी डोंगर चढून प्रथम ती नौबत फोडली. परंतु नगर द्वारावर सशस्त्र शिपाई उभे होते. म्हणून तिघे त्या बाजूला गेलेच नाहीत आणि चैत्यक डोंगराच्या शिखरावर पोचले. तेथून नगराचा कोट ओलांडून ते नगरात गेले.

त्याच वेळी जरासंधाला अपशकुन घडले. त्याने त्या अपशकुनांबद्दल शांत करण्याचे ठरविले. स्नानादि करून तो व्रतस्थ बसला. कृष्ण व भीमार्जुन माळा करणाऱ्यांकडे गेले आणि त्यांच्याकडून एकेक माळा घेऊन ती आपापल्या गळ्यात घातली. त्यांनी सर्वांगाला चंदन लावले आणि अशा तऱ्हेने ब्राह्मण वेषात ते जरासंधाकडे गेले. जरासंधाने त्यांना ब्राह्मण समजून त्यांचे यथाप्रकारे स्वागत केले. तो अर्घ्य, पाद्य, नैवेद्य देऊन त्यांचा सत्कार करू लागला. तो सत्कार तिघांनी स्वीकारला नाही. ते मौन बसून राहले.

कृष्ण भीमार्जुनांकडे बोट दाखवून जरासंधाला म्हणाला—"राजा! या दोघांनी मौनव्रत घेतले आहे. म्हणून मध्यरात्र उलटल्यावरच दोघे आपल्याशी बोलतील."

"ठीक, तरमग मी मध्यरात्र उलटल्यावरच त्यांचा सत्कार करीन." असे सांगून जरासंधाने त्यांना यज्ञशाळेत पाठवून दिले.





# तीन यक्षिणी

एका शेतकऱ्याला मंगल नावाचा एक मुलगा होता. तो बापाच्या शेतीच्या कामाला कधी हातभार लावीत नसे. म्हणून शेतकऱ्याने आपल्या मुलाला कोणता तरी चांगला उद्योगधंदा शिकवून देण्याचे ठरविले आणि मुलाला घेऊन तो निघाला.

तो एकामागून एक कित्येक गावी गेला, परंतु मुलाला एखादा चांगला धंदा शिकविणारा कोणी भेटला नाही. असाच फिरत असता शेतकऱ्याला एका मैदानात एक मोठे घर दिसले. शेतकरी त्या घराजवळ येऊन पोचला तेव्हां एक मनुष्य बाहेर येऊन विचारू लागला—"कोण दोघे तुम्ही, आणि तुम्हांला काय पाहिजे?"

शेतकरी म्हणाला—"मी शेतकरी आहे आणि हा माझा मुलगा मंगल. याला कोणता तरी चांगला धंदा तुम्ही शिकवून दिल्यास मी तुमचा फार आभारी होईन."

"आम्ही कोणता धंदा करतो हे तुला माहीत नसेल." तो मनुष्य म्हणाला.

"तुमचा धंदा काय वाटेल तो असो, मला त्याच्याशी काही कर्तव्य नाही. तुम्ही आपला धंदा माझ्या मुलाला शिकवून दिलात की झाले." शेतकरी म्हणाला.

"ठीक! आम्ही तुझ्या मुलाला आपल्या धंद्यात प्रवीण करून त्याला तुझ्याकडे पाठवून देऊ." तो मनुष्य म्हणाला.

तो मनुष्य एका सोनेरी टोळीचा सरदार होता. त्याच्या टोळीत चाळीस चोर होते व ते त्याच घरात रहात असत. शेतकरी मुलाला त्या माणसाकडे रहायला सांगून आपल्या गावी निघून गेला.

त्या चोरांनी मंगलला पाणी आणायला पाठविले. मंगल एक मडके घेऊन ओढ्यावर पाणी आणायला गेला. पाणी भरण्यासाठी मडके पाण्यात बुडवू लागला. तेव्हां



पाण्यातून एका स्त्रीचा हात बाहेर आला मडके धरले. मंगल आपले मडके सोडवून घेण्यासाठी ओढाताण करू लागला. पण तेवढ्यात कोणी तरी त्याच्या डोक्यात एक टपली मारली व पाण्यातून बाहेर आलेला हात नाहीसा झाला. मंगल वर मान करून कोणी मारले हे पाहू लागला तेव्हां त्याला काठावर एक सुंदर घागरी-सारखे भांडे दिसले. ते भांडे स्वच्छ धुवून मंगल चोरांच्याकडे परतला. भांडे पाहून सर्व चोर चकित झाले.

चोरांचा सरदार मंगलला शाबासकी देत म्हणाला–"अरे! तू हे जे भांडे आणले आहेस याची काय किंमत आहे तुला माहीत नसेल. हे विकले तर आम्हांला पुढे आयुष्य-भर आपला धंदा करण्याची गरजच राहणार नाही. तू आपला वांटा घरी घेऊन जाऊन पुढले आयुष्य आनंदाने घालवू शकशील."

चोरांचा सरदार ते भांडे घेऊन एका जव्हेऱ्याकडे गेला आणि त्या भांड्याची जी किंमत असेल ती द्यायला सांगितले.

जव्हेरी म्हणाला–"मी, एवढी किंमत कोठून देऊ बाबा? एका मोठ्या जव्हेऱ्याकडे आपण जाऊ. तो या भांड्याची योग्य ती किंमत देईल." त्या प्रमाणे दोघे त्या मोठ्या जव्हेऱ्याकडे गेले. त्या जव्हेऱ्याने ते भांडे पाहून म्हटले–"आपण राजाकडे जाऊ. महाराज याची जी किंमत सांगतील ती आम्ही देऊ."

दोघांना बरोबर घेऊन तो राजाकडे गेला.

जव्हेरी राजाला म्हणाला–"महाराज! गेल्या वर्षी चोरीला गेलेले भांडे व चोरून नेणारा चोर मिळाला आहे." असे सांगून त्याने चोरांच्या सरदाराकडे बोट दाखविले.

"काय रे, तुला हे भांडे कोठून व कसे काय मिळाले?" राजाने चोरांच्या सर-दाराला विचारले.



"आमच्याकडे काम शिकायला हा मुलगा आला. हा पाणी भरायला ओढ्यावर गेला होता. त्याला हे भांडे काठावर मिळाले." चोरांचा सरदार म्हणाला.

"तुम्ही काय करता?" राजाने विचारले.

"महाराज! मी खरे सांगतो, खोटे बोलणार नाही, आम्ही चोरीचा धंदा करतो, आम्ही एक्केचाळीस चोर आहो. कालच हा मुलगा आमच्याकडे काम शिकायला आला. त्याला हे भांडे मिळाले." चोरांचा सरदार म्हणाला.

राजाने आपल्या शिपायांना पाठवून सर्व चोरांना धरून आणविले. मंगल राजाला नमस्कार करून म्हणाला–"महाराज! मलाच हे भांडे मिळाले. आपला हुकूम झाला तर मी अशी भांडी दर महिन्याला एक या प्रमाणे आणून देऊ शकेन. पण त्याला एक अट आहे. एका वर्षानंतर या गावातल्या सर्व लबाड जव्हेऱ्यांचा शिरच्छेद करण्याची आज्ञा आपण काढली पाहिजे."

"मी तुला सोडतो आणि तू एका वर्षाच्या आत अशी अकरा भांडी आणून दे. मी तोंपर्यंत या सर्व चोरांना जामीन म्हणून आपल्या कैदेत ठेवून देतो." राजा म्हणाला.



मंगल ते भांडे घेऊन चोरांच्या सर-दाराच्या घोड्यावर बसून दुसऱ्या राज्यात निघून गेला. तेथे तो एका खाणावळीच्या मालकिणीच्या घरी उतरला. म्हणाला–"मावशी! या गावात विशेष असे काय आहे हो?"

"तसं काही नाही रे. पण या गावचा राजकुमार जो वयाने तुझ्याच वयाचा होता नुकताच वारला. त्याची एक समाधी आहे. दररोज रात्री कोणीतरी येऊन त्याचे प्रेत जागचे हलविते. राजाला त्यामुळे चैन पडत नाही." खानावळवाली म्हणाली.



मंगल त्या खानावळवालीबरोबर राजाकडे गेला व म्हणाला–"महाराज मी रात्री राजकुमाराच्या समाधीजवळ पाहरा देतो. मला परवानगी द्या."

"अरे तू खुळा आहेस. आजपर्यंत पाहरेकरी काही करु शकले नाहीत आणि आतां तू काय करणार? पहा, पाहिजे तर." राजा म्हणाला.

मंगल धनुष्य बाण घेऊन राजकुमाराच्या समाधीजवळून थोड्या अंतरावर काळोखात लपून बसला. मध्यरात्रीच्या सुमारास तीन पांढरी कबुतरे आकाशातून उडत येऊन समाधीजवळ उतरली. जमिनीला त्यांचे पाय लागताच त्यांचे रूप बदलून त्यांच्या जागी तीन तरुण स्त्रिया दिसल्या. एका स्त्रीच्या हातात एक तांबडी छडी होती. तिने एक पांढरे कापड जमिनीवर अंथरले आणि त्यावर ती काठी मारीत म्हणाली–"यावर वाढ." त्यावरोबर त्या कापडावर चार ताटे वाढून आलेली दिसली. त्यानंतर ती स्त्री समाधीजवळ गेली व समाधीवरच्या दगडाला काठी लावून म्हणाली–"उघड!" त्याबरोबर समाधी खुली झाली आणि पुन्हां काठी आतल्या प्रेताला लावून ती म्हणाली–"उठून बाहेर ये."

त्याबरोबर राजकुमार उठून स्वतःच्या पायांनी चालत आला आणि सर्व मिळून जेवायला बसले.

संधी पाहून मंगलने एक बाण त्या सर्वांच्या दिशेने सोडला. तो बाण राजकुमाराला लागू नये याची अर्थातच त्याने काळजी घेतली होती. तो बाण त्या बाजूला येताच तिघी स्त्रिया कबूतर होऊन उडून गेल्या. त्यांनी बरोबर आणलेले ते कापड आणि छडी राहून गेली. मंगलने ती काठी व कापड उचलून घेतले व राजकुमाराला म्हणाला–"आता तुला या समाधीची काय गरज? चल घरी."

(चालू)



# १०८. वक्तृत्वदात्री शिला

आयर्लंडच्या कार्क नामक नगराजीक ब्लार्नी नावाचा किल्ला आहे. त्याच्या बुरुजाच्या भितीत एक शिला आहे. त्याला ब्लार्नी स्टोन म्हणतात. म्हणे, एका जादुगारणीने त्या शिलेला वर दिला होता की जो कोणी या दगडाचे चुंबन करील त्याला ही शिला वक्तृत्वदान करील. परंतु या शिलेचे चुंबन घेणे तितके सोपे नाही. तरी असे सांगतात, चुंबन घेऊन ही शिला गुळगुळी झाली आहे. ब्लार्नी या शब्दाचा अर्थ हांजी हांजी करणारा होतो. आयर्लंडला 'ब्लार्नी लँड' देखील म्हणतात.





# भोळी भाबडी कनकांगी

एका गावी एक शिल्पी रहात असे. त्याला दोन मुलगे होते. दोघांची लग्ने झाली होती. धाकटी सून शिल्पीच्या बायकोची फार लाडकी होती. सुनेचे नाव कनकांगी असे होते. कनकांगी सासूची लाडकी होती त्याचे एक कारण होते. ती श्रद्धा व भक्तीने सासूची सेवा करी व सासूच्या सांगण्याप्रमाणे वागे. मोठी सून शारदा ही स्वभावाने थोडी निराळी होती. ती सासू-विषयी थोडीशी बेफिकीरच होती.

पुढे काही दिवसांनी सासू वारली. शिल्पीने आपल्या बायकोची एक मूर्त घडवून घरात एका बाजूला ठेवून दिली. आणखी काही दिवसांनी शिल्पीसुद्धा मरण पावला.

सासूसासरे वारल्यावर दोघां सुनांचे लहानसहान गोष्टीवर भांडण होऊ लागले. म्हणून दोघां भावांनी घराचे वांटे करून घेतले आणि निरनिराळे राहू लागले. घराच्या मध्यभागी एक खोली होती. दोघां भावांच्या सल्लयाने त्या खोलीत शिल्पीच्या बायकोची मूर्त ठेवण्यात आली.

त्या मूर्तीकडे दोघां भावांचे कधी लक्ष गेलेच नाही. मोठ्या सुनेने त्या खोलीकडे कधी ढुंकून सुद्धा पाहिले नाही, उलट तिने त्या बाजूला जे दार होते त्याला कडी लावून ठेवून दिली. परंतु धाकटी सून कनकांगी मात्र त्या मूर्तीला रोज भक्तिभावनेने नमस्कार करून चार फुले वाही आणि म्हणे–"सासुबाई! आशीर्वाद द्यावा." त्या दिवशी जो सैपाक करायचा असेल तो सासूला जणुंकाही विचारून करी. म्हणे–"सासुबाई आज आपल्या आवडीची भाजी करते."

कनकांगीचा भाबडेपणा इतका वाढला की एक दिवशी तिने पान वाढून सासूच्या मूर्तीसमोर ठेवून दिले आणि नमस्कार करून म्हणाली–"तुम्ही पहिल्याने जेवून घ्या, सासुबाई ! तुम्ही जेवल्याशिवाय मी जेवणार नाही."

मोठी सून दाराच्या फटीतून ही सर्व गंमत पहात होती. म्हणाली–"अग वेडे! सासूबाई सर्वांसमोर कशा काय जेवणार? त्यांना काही वेळ एकट्या कां नाही सोडत? काय ग बाई तरी!"

बाई म्हणतात ते ही बरोबर आहे असा विचार करून कनकांगीने खोलीत पान वाढून ठेवले, उठून आपल्या बाजूचे दार बंद करून घेतले आणि आपले काम करायला निघून गेली. शारदा जवळपास कोणी नाही असे पाहून दार उघडून आत गेली आणि तिने पानावर वाढलेले सर्व उचलून आपल्या घरात आणून ठेवले.

थोड्या वेळाने कनकांगीने जाऊन पाहिले, पत्रावळ साफ झाली होती. ती चकित झाली. सासुबाईच जेवल्या असे समजून तिच्या मनाला फार आनंद झाला. दुसऱ्या दिवसापासून ती दररोज पान वाढून ठेवी आणि "सासुबाई, जेवून घ्या हं!" असे सांगून निघून जाई. थोड्या वेळाने येऊन पाही तर पान रिकामे झालेले असे."



कनकांगीच्या नवऱ्याने एक दिवशी हे सर्व पाहिले आणि विचारले–"अग, तुला वेड तर नाही लागले? दगडाची मूर्त कधी जेवते का?"

"अहो, असं काय म्हणतां? सासूबाई रोज खातात, पाहिजे तर पाहून घ्या." कनकांगी म्हणाली.

दुसऱ्या दिवशी कनकांगीच्या नवऱ्याने खोलीत काय होतं हे दाराच्या फटीतून पाहिले आणि आपल्या भावजयीचे हे काम मोठ्या भावाला कळले तर त्याला किती वाईट वाटेल असा विचार करून कोणाला काही कळू दिल्याशिवाय भावजयीची










खोड मोडण्याचे ठरविले. तो आपल्या बायकोला म्हणाला—"कनकांगी, तू आईला रोज पान वाढून ठेवतेस, पण ती कोण-त्या रूपाने येऊन खाऊन जाते पाहिले आहेस का? उद्यां दाराच्या फटीतून जरा पहा तरी!"

"मी पहात राहले तर सासुबाई जेवणारच नाहीत." कनकांगी म्हणाली.

"अग! तू पाहते आहेस हे तुझ्या सासूला कसे दिसेल?" नवरा म्हणाला.

कनकांगीच्या मनाचे त्या उत्तराने समाधान झाले.

कनकांगीने दुसऱ्या दिवशी नवऱ्याच्या सांगण्याप्रमाणे पाहिले. तिला शारदा दिसली. त्यात तिला सासूच्या मनाचा थोरपणा दिसला. तिला वाटले, सासुबाईंची दोघां सुनांवर कशी सारखी माया आहे. म्हणून त्या मोठ्या सुनेच्या रूपाने येऊन जेवून जातात.

कनकांगी आपल्या जावेला म्हणाली—"बाई, तुमचे केवढे भाग्य हो? सासुबाई तुमच्या रूपाने येऊन जेवून जातात. आज-पासून मी तुम्हांलाच सासू मानून वागत जाईन." शारदाला कनकांगीचे ते बोलणे व्यंग्यात्मक वाटले व दुसऱ्या दिवसापासून तिने खोलीत जाऊन सासूच्या मूर्तीसमोरचे अन्न उचलून आणायचे बंद केले.

दोन तीन दिवसांनी कनकांगी आपल्या नवऱ्याला म्हणाली—"मला वाटते, मी दाराआडून पाहते, हे सासुबाईंना कळले असावे. म्हणून त्या रागावून हल्ली खात नाहीशा झाल्या आहेत."

पतीने बायकोला खरी गोष्ट सांगून तिला हा वेडेपणा मनातून काढून टाकायला सांगितले. शारदा तिच्याशी बोलायला भेटायला लाजते हे कनकांगीने पाहिले व नवऱ्याने सांगितले ते खरे असल्याची तिची खात्री पटली.





# मेजवानी

प्राचीन काळी विदर्भ देशावर शक्तिसेन नावाचा राजा राज्य करीत असे. कलिंग देशाचा राजा शूरसेन याने एकदा विदर्भ राज्य बळकावण्याचा विचार केला. आणी त्याने गुप्त हेर पाठवून त्यांना जागोजागच्या गुप्त स्थानांची माहिती कळविण्यास सांगून ठेवले.

शक्तिसेन राजाला ही गोष्ट वेळीच कळली. त्याने शूरसेनाच्या हेरांना ओळखून कैद करविले. तरी कांही हेर कैद झाले नाहीत. त्यांना दहशत बसावी म्हणून शक्तिसेनाने जे हेर कैद झाले होते त्यांच्यावर पुष्कळ अत्याचार केले.

परंतु शक्तिसेनाच्या खास दरबारातच काही हेर शिरलेले होते. राजाला ते माहीत नव्हते. त्यांनी राजाच्या दरबारातल्याच नव्हे, तर अंतःपुरातील गुप्त गोष्टी देखील शूरसेन राजाकडे लिहून पाठविल्या. शक्ति-सेनाला हळूहळू हे सर्व कळले. आपल्याच दरबारातले काही लोक शूरसेनाने विकत घेतले आहेत, याची माहिती राजाला कळल्याशिवाय राहली नाही.

राजाने आपल्या स्वामिद्रोही दरबाऱ्यांना कैद करण्याचे ठरविले. परंतु स्वामिद्रोही व लांचखाऊ दरबारी कोण हे कळायला मार्ग नव्हता. कारण विश्वासपात्र कोण व विश्वासघातकी कोण हे ठरविणे कठीण झाले. सर्वच विश्वासपात्र असल्यासारखे वागत होते. मग संशय कोणावर करावयाचा, हा प्रश्न होता.

लांचखाऊ गुप्त हेरांचे बिंग बाहेर पाडण्याचे काम राजाने आपल्या बुद्धिमान नावाच्या एका सल्लागाराला सोंपविले. यापूर्वी बुद्धिमान याने गुप्त हेरांचा शोध लावण्यात राजाला सांगून हेरांना पकडवून दिले होते.

      



बुद्धिमान याने दरबारातल्या गुप्त हेरांचा शोध लावण्यासाठी पुष्कळ विचार करून एक युक्ति योजली.

दुसऱ्या दिवशी रात्री त्याने दरबारातल्या निवडक पंचवीस जणांना आपल्या घरी मेजवानी दिली. मेजवानीला सर्व हजर होते. मेजवानी फार थाटात पार पडली. पंचपक्वान्नांचे जेवण होते. प्यायला निरनिराळी पेये होती. बुद्धिमान स्वतः जातीने पाहुण्यांना काय हवे किंवा नको याची चवकशी करीत होता. सर्व पाहुणेमंडळी खूष झाली. मेजवानी संपली. निरोप घेतांना बुद्धिमान प्रत्येकाला निराळे बोलावून म्हणाला—"ही मेजवानी माझ्या निरोपाची आहे. राजाने मला नोकरीवरून कमी केले आहे. कारण राजाला मी शत्रूचा हेर आहे हे कोणी कसे व केव्हां सांगितले नकळे. राजाला आजच्या मेजवानीला हजर असलेल्यात कोण कोण हेर आहेत हे देखील माहीत आहे. त्या सर्वांना उद्यां संध्याकाळच्या आत फांसावर चढवायचे राजाने ठरविले आहे. माझ्यावर राजाला जो संशय आहे तो खरा ठरला तर मला सुद्धा फांशी मिळणार! म्हणून मी उजाडण्यापूर्वी राज्यातून पळून जायचे ठरविले आहे. ही गोष्ट तुम्ही कोणाजवळ बोलू नका. उद्या



वाचलो तर पुन्हा आपली भेट होईलच. बरं तर नमस्कार!"

प्रत्येकाजवळ हेच बोलून बुद्धिमानाने सर्वांचा निरोप घेतला. जे खरे राजभक्त होते त्यांनी सरळ राजाकडे जाऊन बुद्धिमान म्हणाला ते सांगितले.

"त्या दुष्टाला मी किती दिवसांपासून ओळखतो आहे. परंतु तो बाहेर जातो कसा, पाहतो. मी जागोजागी सर्व नाक्यावर शिपाई नेमले आहेत. तुम्ही बेफिकीर रहा." असे सांगून व त्यांना धीर देऊन राजाने त्यांना पाठवून दिले.

बुद्धिमान दुसऱ्या दिवशी उजाडण्यापूर्वी पहाटे उठून एका घोड्यावर बसून राज्याच्या सरहद्दीकडे निघाला. सरहद्दीजवळ पोचताच दोन घोडेस्वार झाडीतून समोर आले. ते दोघे राजाच्या दरबारातलेच होते. म्हणून बुद्धिमानाने त्यांना ओळखले. म्हणाला— "तुम्ही सुद्धां निघाला का? फार छान!"

"होय हो, काल रात्री तुम्ही सावध केलेत म्हणून बरे झाले. महाराजांना आमच्यावर संशय आला आहे तर आता या राज्यात राहण्यात शहाणपण नाही. तुम्ही बुद्धिमानच, तुम्हांला सर्व पहिल्यानेच कळले." दोघे घोडेस्वार म्हणाले.

"चला, पलीकडे एक पडके जुनाट देऊळ आहे. तेथे थोडा वेळ विश्रांती घेऊ. माझा घोडा दमला आहे." बुद्धिमान त्यांना म्हणाला.

तिघे देवळाजवळ घोड्यावरून उतरले आणि देवळात गेले. आत पाऊल टाकल्या बरोबर राजाच्या शिपायांनी त्यांना अटक केली. बुद्धिमानाच्या बरोबर दोघा घोडेस्वारांना राजाच्या समोर हजर करण्यात आले. राजासमोर दोघांनी आपला अपराध कबूल केला. राजाने बुद्धिमानाच्या चातुर्याची प्रशंसा करून त्याला एक मोठे बक्षिस दिले.















# अमरवाणी

सन्तप्तायसि संस्थितस्य पयसो नामापि न श्रूयते
मुक्ताकारतया तदेव नलिनीपत्रस्थितं दृश्यते
अंतस्सागर शुक्तिमध्य पतितं तन्मौक्तिकं जायते
प्रायेणाधम मध्य, मोत्तमजुषा मेवंविधा वृत्तयः ॥ १ ॥

[ तापलेल्या लोखंडावर पडलेल्या पाण्याचे नाव देखील उरत नाही . (ते वाफ होऊन उडून जाते.) तेच पाणी कमळाच्या पानावर पडले की कसे मोत्यासारखे भासते. परंतु तेच पाणी जेव्हां समुद्राच्या तळाला असलेल्या शिंपल्यात जाऊन पडते तेव्हां त्याचे मोती होते. अशातऱ्हेने अधम, मध्यम वा उत्तम स्थाने लाभणारांची दशा होते. ]

यः प्रीणयेत् सुचरितैः पितरं स पुत्रः
यद्भर्तुरेव हित मिच्छति तत् कलत्रं,
तन्मित्र मापदि सुखेच समक्रियं यत्
एतत् त्रयं जगति पुण्यकृतो लभंते ॥ २ ॥

[ सदाचार वृत्तीने राहून पित्याला संतुष्ट करणाराच खरा पुत्र, पतीचे हित सर्वदा जिच्या मनात वसते तीच पत्नी आणि संपत्ति आणि विपत्ति दोन्ही वेळी सारखाच प्रेमाने वागणारा तोच मित्र होय ! हे तिघे पुण्यवान पुरुषांनाच लाभतात. ]

दुर्भिक्षे चान्नदातारं, सुभिक्षे च हिरण्यदं,
चतुरोहंनमस्यामि, रणे धीरं, ऋणे शुचिं ॥ ३ ॥

[ दुष्काळात अन्नदान करणाऱ्याला, सुगीच्या वेळी सुवर्णदान करणाऱ्याला, युद्धसमयी शौर्य दाखविणाऱ्याला आणि जो कर्जाखाली गांजलेला नाही त्याला मी नमस्कार करतो. ]



# शिलारथ

[ ३ ]

[ राजकुमारी पद्मावतीने शिलारथाचा छोटासा नमुना दाखविला आणि विन्ध्य पर्वतातला शिलारथ हलवून दाखविण्यासाठी खड्गवर्मा आणि जीवदत्त दोघांस जायला सांगितले. त्या दिवशी रात्री तिथे बुरखेवाले मारेकरी दोघांना ठार करायला आले. त्यांपैकी एकाचा पाय खड्गवर्माने कापून टाकला. त्याचवेळी राजाचे शिपाई तिकडे धावत आले. पुढे– ]

आवाराच्या भिंतीबाहेर जो गलबला झाला तो ऐकून जीवदत्त अतिथिशाळेतून घटनास्थळी आला. खड्गवर्मा, बुरखेवाल्याला राजाचे शिपाई प्रश्न विचारीत होते ते ऐकत उभा राहिला. परंतु बिचारा बुरखेवाला कण्हत होता.

खड्गवर्माने जीवदत्तला घडलेली गोष्ट थोडक्यांत सांगितली. जीवदत्त विचार करीत होता, एका बुरखेवाल्याचा मृतदेह अतिथिशालेत पडला आहे, दुसरा पळून गेला आहे व तिसरा पाय तुटून पडल्यामुळे हम रस्त्यावर पडला आहे. या तिघांना पाठविणारा कोण बरे असावा आणि तो कोणत्या उद्देश्याने आम्हां दोघांच्या खुनाचा प्रयत्न करीत असावा.

जीवदत्तला, पुढे काय करावयाचे हे ठरवायला जास्त वेळ लागला नाही. तो आवाराच्या भिंतीवर चढून राजाच्या




शिपायांना म्हणाला—"तुम्हीच गलका केलात तर येथे लोकांची गर्दी जमा होईल. हा बुरखेवाला राजवाड्याच्या आत शिरण्याच्या प्रयत्नात होता. त्याला योग्य तो दंड मिळाला. आतां यांच्या विषयी जो न्याय करावयाचा असेल तो महाराज करतील. म्हणून या पाय तुटलेल्या माणसाला उचलून आतल्या बाजूला सोडा.

जीवदत्त राजवाड्यातल्या अतिथि गृहात उतरला होता. म्हणून शिपायांना वाटले की तो राजघराण्यातलाच कोणीतरी असावा. म्हणून त्यांनी त्या पाय तुटलेल्या माणसाला जीवदत्तच्या मदतीने आंत सोडले. जीवदत्तने खड्गवर्माला हात द्यायला सांगून त्या माणसाला अलगद खाली उतरविले आणि त्यानंतर स्वत: खाली भिंतीवरून उतरला.

त्या लंगड्याच्या तोंडावरचा बुरखा बाजूला सरकला होता. एक काळे फडके त्याच्या खांद्यांवर लोंबत होते. जीवदत्तने त्या फडक्याचीच एक पट्टी फाडून ती लंगड्याचा पायाला बांधली. नंतर दोघांनी मिळून त्याला उचलून अतिथिशाळेत नेऊन जमिनीवर ठेवले.

"कोण रे तू? आम्हांला ठार करण्या-साठीं तुला व तुझ्या साथीदारांना कोणी पाठविले होते?" जीवदत्तने लंगड्याला विचारले.

लंगड्याने त्याला प्यायला पाणी हवे असल्याचे खुणेने सांगितले. खड्गवर्माने भांड्यात पाणी आणून त्याच्या तोंडाला भांडे लावले. पाणी प्याल्यावर तो कण्हत थोडा वेळ गप्प राहिला. नंतर डोळे उघडून त्याने एकदा चारी पाहिले. तेव्हां त्याला एका बाजूला कोपऱ्यात पडलेले त्याच्या साथीदाराचे प्रेत दिसले. ते पाहून घाबरल्या-सारखा तो मोठ्याने कण्हू लागला. तो बोलला नाही. त्याच्या चेहऱ्यावर भीतीची छाया स्पष्ट दिसत होती.



CHITRA



असता तर तो शिवून पट्टी बांधून टाकली असती."

"पाय तुटून पडल्याला बराच वेळ झाला आहे. याला वांचविण्याचा पुरा प्रयत्न कर. महाराज खूष होतील!" जीवदत्त म्हणाला.

"माझ्या हातून आजपर्यंत कोणी मेला नाही आणि खरी वस्तु स्थिती अशी आहे की, मी आजपर्यंत स्वतःच्या जबाबदारीवर कोणाचा इलाजदेखील केला नाही." असे म्हणत त्या तरुण वैद्याने, जीवदत्तने बांधून ठेवलेली पट्टी सोडली. जखमेवर औषध लावून पुन्हां पट्टी बांधून ठेवली.

तरुण वैद्य निघून गेल्यावर पंधरा मिनिटांनी महाराज पद्मसेन व मंत्री सोमदेव अतिथिशालेत आले व पाहारेकऱ्याकरवी आल्याचे जीवदत्त व खड्गवर्माला कळविले. बाहेर अवेळी महाराज व मंत्री दोघे आल्याची बातमी ऐकून दोघांना आश्चर्यच वाटले.

मंत्र्याने त्यांना वाटत असलेले आश्चर्य ओळखले आणि ते खालच्या आवाजात म्हणाले–"या अघटित घटनेची गोष्ट आम्हांला इतक्या लवकर कशी काय कळली, या गोष्टीचे तुम्हांला आश्चर्य वाटत असेल. आमचे हेर व पाहरेकरी नेहमी सावध असतात. बरे, आतां हे सांगा हा प्रतापचंद्र जगेल का? याच्याशी कसा व्यवहार करावा असे तुम्हांला वाटते?"

मंत्री बोलत असतांना राजा पद्मसेन दोघांकडे खोल नजरेने पहात होता. प्रतापचंद्रावर आपल्या राज्यात घडलेल्या प्रकारा मुळे महेंद्रनगरच्या राजाशी आपले युद्ध होते की काय याची शंका त्याला वाटू लागली होती. या अनपेक्षित युद्धाला जीवदत्त व खड्गवर्माच मुख्य करून कारण आहेत असे देखील राजाला वाटले.



जीवदत्तने राजाचे मौन कां असावे हे ओळखले. तो महाराजांना थोडक्यात, घडले ते सर्व वृत्त सांगून म्हणाला–"महाराज! फक्त आत्मरक्षणासाठीच आम्हांला सर्व हे करावे लागले. याशिवाय या बुरखेवाल्यांचा पुढारी महेंद्रनगराच्या महाराजाचे युवराज असावेत याची कल्पनादेखील आम्हांला नव्हती."

"जे व्हायचे ते झाले. आता पुढे काय करायचे हे तुम्हीच सांगा!" राजाने विचारले. तो प्रश्न मंत्री, जीवदत्त व खड्गवर्मा तिघांना उद्देश्यून राजाने केला होता.

मंत्री काय म्हणतात हे ऐकण्यासाठी काही वेळ जीवदत्त बोलला नाही. परंतु मंत्री सोमदेवदेखील काही वेळ विचार करीत स्वस्थ उभा राहला. नंतर थोड्या वेळाने जीवदत्तला म्हणाला–"समज, मला किंवा महाराजांना ही गोष्ट कळलीच नसती तर तुम्ही काय केले असते?"

जीवदत्तने खड्गवर्माकडे पाहिले. खड्गवर्माने जीवदत्तकडे अशा तऱ्हेने पाहिले की, तूच याचे उत्तर दे, असे खुणेने जीवदत्तला त्याला सुचवायचे होते. तेव्हां जीवदत्त म्हणाला–"मला असे वाटते की



महाराज आणि महामंत्र्यांना आमच्या वागण्यात घाई दिसेल असे आम्ही काही केले नसते. प्रतापचंद्राविषयीं आम्हांलाच काहीतरी निर्णय घेऊन करावे लागले असते तर आम्ही उजाडण्यापूर्वी त्याला गावाबाहेर कोठे तरी जंगलात झाडाखाली ठेवून दिले असते आणि विंध्य पर्वतात शिलारथाच्या शोधार्थ निघून गेलो असतो."

"जंगलात त्याला कोणी क्रूर जनावराने खाऊन टाकले असते, परंतु पळून गेलेल्या सेनापतीच्या मुलाचे काय होणार? महेंद्रनगरच्या राजाला त्याने सर्व सांगितले असते की नाही?" राजाने विचारले.










"त्यामुळे महाराजांवर काही संकट आले नसते. कारण त्याने तक्रार केलीच असती तर आम्हां दोघांविषयीच काही म्हणाला असता. महेंद्रनगराच्या राजाने आमच्या वरच काय तो सूड घेतला असता. आपल्यावर राग काढण्याचे कारणच नव्हते. मंत्र्याच्या मुलाच्या प्रेताला व प्रतापचंद्रला गावाबाहेर नेऊन टाकायला आम्हांला एक गाडी आणि परवाना द्या. बाकी सर्व कामे आम्ही जंगलात पुरी करून घेऊ." जीवदत्त म्हणाला.

पद्मसेन महाराज व मंत्री दोघे एका बाजूला जाऊन परस्परांशी सल्ला करून आले. जीवदत्तने सुचविलेले उपाय त्यांना बरोबर वाटला. म्हणाले–"बरे तर तू म्हणतोस तशी गाडी तुम्हांला देववितो. प्रेत आणि प्रतापचंद्र दोन्ही या गाडीतून घेऊन सूर्योदयापूर्वी नगराबाहेर जंगलात निघून जा. त्यानंतर तुम्हांला दोघांना जे काय करावयाचे असेल ते करा."

राजाज्ञेप्रमाणे एक बैलगाडी घेऊन एक पाहरेकरी आला. गाडीच्या चारीबाजूला पडदे होते. द्वारपालकांच्या नावी गाडीबाहेर घेऊन जायला परवाना लिहून मंत्र्याने त्यावर आपली मोहर लावली.

खड्गवर्मा व जीवदत्त महेंद्रनगराच्या मंत्र्याच्या मुलाचे प्रेत व प्रतापचंद्र दोघांना गाडीत ठेवून नगरद्वारावर आले. द्वारपालकांना परवाना दाखविल्यावर त्यांनी गाडी घेऊन बाहेर जायला परवानगी दिली.

नगराबाहेर खड्गवर्मा व जीवदत्त गाडी घेऊन घाईघाईने जंगलातल्या एका झोपडी-जवळ आले. तेथेच बाहेर एक मेलेले जनावर पडले होते. त्याच वेळी तिकडे प्रतापचंद्रचा मित्र जो जिवंत सुटला होता ही बातमी आपल्या राजाला देण्यासाठी घोड्यावर बसून महेंद्रनगराकडे निघाला.

(चालू)





# चोराची साक्ष

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ परत आला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तू आपल्या एखाद्या मित्रासाठी एवढे कष्ट सहन करीत असशील तर मी तुला सावध करून ठेवण्याच्या हेतूने सांगत आहे, कोणाही मित्रावर डोळे मिटून एवढा विश्वास करणे बरोबर नाही. परिस्थितीवश सखामित्रदेखील हाडवैरी होऊ शकतो. मी तुला या मैत्रीमुळे संकटात सापडलेल्या तारानाथची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

एका लहानशा गावी तारानाथ व सोमनाथ नावाचे दोघे जीवश्च कंठश्च मित्र रहात असत. दोघे कामधंदा करून पैसे




मिळविण्यासाठी आपले गाव सोडून परगावी गेले. व्यापार करून त्यांनी पुष्कळ पैसे मिळविले. त्यांनी पैसे वांटून घेतले आणि आनंदाने आपापल्या घरी राहू लागले.

तारानाथ कमी खर्चात रहात असल्याने त्याच्या कुटुंबाचा उदरनिर्वाह चांगल्या तऱ्हेने होऊन त्याच्या हातात पैसे शिल्लकच रहात असत. परंतु सोमनाथ नेहमी राजधानीच्या गावी राहून दारू व जुगारीत पैसा उडवीत असल्याने हळूहळू आपले घरदार सर्व घालवून बसला आणि त्याच्या हातात करवंटी आली.

एक दिवशी सोमनाथ तारानाथच्या घरी आला. सोमनाथला जुन्या मळक्या कपड्यात पाहून तारानाथच्या मनाला फार वाईट वाटले. सोमनाथचा चेहरा उतरलेला होता. तारानाथने आपल्या मित्राला विचारले– "सोमनाथ! तुझी ही दशा कशी काय रे झाली?" त्याने मित्राला चांगले कपडे अंगात घालायला दिले आणि बरोबर जेवायला बसायला सांगितले. रात्री सोमनाथ तारानाथच्या घरीच आरामाने झोपला.

परंतु सोमनाथला रात्री झोप आली नाही. त्याच्या मित्राने त्याचा एवढा आदर सत्कार केला तो त्याला आवडला नाही. त्याच्या मनात मत्सराग्नी पेटला. त्याच्या बरोबर व्यापार करणारा व सारखे सारखे धन वांटून घेणारा तारानाथ इतका आनंदाने व सुखासमाधानानाने कसा काय राहतो? त्याला स्वतःला पोटभर खायला प्यायला पण मिळत नाही. विचार करतां करतां त्याच्या डोक्यात जणुकाही राक्षसच शिरला. त्याने एक काठी घेतली आणि झोपलेल्या तारानाथला बडवू लागला. तारानाथ थोड्याच वेळात बेशुद्ध झाला. तारानाथ मेला असावा असे समजून सोमनाथ पळून गेला.

दुसऱ्या दिवशी राजाच्या दरबारात जाऊन त्याने फिर्याद केली की महाराज, माझ्या गावातला तारानाथ नावाचा माझा एक मित्र होता. मी व्यापार करण्यासाठी या गावी गेलो असतां तो माझ्या घरात शिरून बसला. मी घर रिकामे करायला सांगितले तर त्याने माझ्यावरच मारहाण करायला सुरवात केली. मी आपणांकडे न्याय मागायला आलो आहे."

राजाने आपल्या शिपायांना चवकशी साठी तारानाथच्या घरी पाठविले. शिपाई तारानाथला धरून घेऊन आले. तारानाथच्या अंगाला जागोजागी जखमा होत्या. राजा म्हणाला–"काय रे, तू ज्या घरात राहतोस ते सोमनाथचे आहे, म्हणे?"

तारानाथ फक्त एकदांच सोमनाथकडे पाहून व प्रसंग ओळखून म्हणाला– "होय महाराज! ते घर सोमनाथचे आहे!"

"आणि सोमनाथने तुला घर रिकामे करायला सांगितले तेव्हां तू उलट त्यालाच मारलेस, हे खरे आहे की नाही?" राजाने विचारले.

सोमनाथची ही खोटी तक्रार ऐकून तारानाथ थक्कच झाला. तरी मित्राविरुद्ध काही न बोलता खाली मान करून उभा राहला व म्हणाला–"होय महाराज, तो म्हणाला ते सर्व खरे आहे."





सोमनाथ तारानाथशी त्याची मैत्री होती ही गोष्ट जणुकाही पार विसरून गेला. म्हणून त्याने विचार केला की मार खाल्लचा-मुळे तारानाथला वेड लागले असावे व तो वेडाच्या भरात बरळत असावा. बरं झालं, आपण सुटलो!

राजाने तारानाथला तुरुंगात टाकले. शिपाई त्याला धरून घेऊन गेले.

तो निकाल ऐकून एक चोर, जो त्यावेळी दरबारात हजर होता, मोठ्याने हसूं लागला. राजाने त्याला जवळ बोलावून हसण्याचे कारण विचारले. चोराने हसण्याचे कारण सांगितले.

राजाने सोमनाथकडे तावडतोब निरोप पाठवून त्याला आपले अतिथ्य स्वीकारण्यास कळविले. त्याला परमानंद झाला व तो ठरल्या वेळी राजवाड्यात हजर झाला.

सोमनाथला उरात आनंद मावेनासा झाला. कारण राजाने त्याच्या बाजूने निकाल दिला होता व त्याला स्वतःच्या पंगतीला जेवायला बोलाविले होते.

सोमनाथच्या स्वागताची राजवाड्यातच एका जागी व्यवस्था करण्यात आली. त्याच्यासाठी उत्तमोत्तम पक्वान्नें व दारूची उत्तम व्यवस्था त्या जागी करण्यात आली. सोमनाथ पोटभर जेवला. दारू पिऊन झाल्यावर थंडगार वारा मिळावा म्हणून त्याने खिडकी उघडली तेव्हां त्याला समो-रच्या खोलीत हातकड्या व बेड्या पडलेला तारानाथ हिंडत असलेला दिसला.

सोमनाथने तारानाथला हाक मारून ऐटीत म्हटले–"बस आतां आयुष्यभर तुरुंगात खितपत! तू आपले सर्व धन कोठे लपवून ठेवले आहेस ते मला सांग!"

तारानाथने त्याच्याकडे सहानुभूतीच्या दृष्टीने पाहिले व म्हणाला–"मी आपल्या घराच्या पूर्वेकडील खोलीत सर्व धन पुरून ठेवले आहे. ते घेऊन तू आजपासून आपल्या [illegible] आयुष्य तरी सुखाने घालव."

दुसऱ्या क्षणाला राजाचे शिपाई सोम-नाथच्या खोलीत शिरले आणि त्याला धरून नेऊन राजासमोर हजर केले.

दुसऱ्या दिवशी सोमनाथला दरबारात हजर करण्यात आले. राजाने त्याला जन्मठेप तुरुंगवासाची शिक्षा केली. तारानाथची शिक्षापण कायम राहली.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा! चोर कां हसला? त्याने गुप्तपणे राजाच्या कानात काही गुपित सांगितले होते का? सोमनाथ दोषी आहे व तारानाथ निर्दोष आहे हे कळल्यावर राजाने सोम-नाथला शिक्षा केली ती अर्थातच बरोबर होती. पण तारानाथला तुरुंगवास कां भोगावा लागला? त्याला कां सुटका देण्यात आली नाही?" या शंकांचे समाधान माहीत असून तू केले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"तारानाथ जखमी होता हे प्रत्यक्ष दिसत असून तो म्हणाला ते खरे समजून राजाने त्याला शिक्षा केली हे चोराने पाहिले होते. त्याने राजाला तारा-नाथ म्हणाला ते खरे दिसत नाही असे सांगितले असावे. म्हणून खरी गोष्ट कळून घेण्यासाठी राजाने सोमनाथाला आपले आतिथ्य स्वीकारण्यास सांगितले असावे. सोमनाथाला शिक्षा भोगावी लागली ती एवढ्यासाठी की त्यानेदेखील खोटे बोलून अन्यायाचे समर्थन केले होते. सोमनाथचा अपराध उघडकीस न येऊ देण्यास तारा-नाथने मदत केली. म्हणून तोदेखील शिक्षेला योग्य ठरला.

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# राजयोग

एका गावी आनंद नावाचा एक तरुण युवक रहात असे. योग्य समयी त्याच्या आईवडिलांनी त्याच्यासाठी एक सुंदर मुलगी पाहून लग्न ठरविले. मुलीचे नाव लावण्यवती होते. नावासारखीच ती सुंदर पण होती. आनंदचा ज्योतिष शास्त्रावर विश्वास होता. म्हणून त्याने एका ज्योतिष्याला, त्या मुलीशी लग्न झाल्यास त्याचे भाग्य उदयास येईल की नाही विचारले.

ज्योतिष्याने लावण्यवतीचे वर्णन आनंदच्या तोंडून ऐकून घेऊन भविष्य वर्तवले– "आनंद तुझे लग्न या मुलीशी झाले तर तुला हिची पादत्राणे उचलावी लागतील व हिला 'आई' म्हणून हाक मारावी लागेल. म्हणून ही मुलगी लग्न करून तुझ्या घरी आली तर तू एक वर्ष भर हिच्याशी एका शब्दानीदेखील बोलू नकोस. तसे तू करु शकलास तर तुला तिची पादत्राणे उचलावी लागणार नाहीत आणि तिला 'आई' म्हणून हाक मारावे पण लागणार नाहीं. या शिवाय तुझा हिच्यामुळे फायदा पण होईल. तुला तिच्याकडून राजयोगाची प्राप्ती होईल. म्हणून तुला ते मान्य असेल तर तू तिच्याशी लग्न करून घे. नाही तर दुसरी मुलगी पहा."

आनंदने ज्योतिष्याने सांगितले त्यावर पुष्कळ विचार करून त्या मुलीशीच विवाह करण्याचे ठरविले. दोघांचे लग्न झाले. त्याची बायको घरी आली तरी तो तिच्याशी एका शब्दानेदेखील बोलला नाही, एवढेच नव्हे तर त्याने तिच्याकडे डोळे उघडून पाहिले देखील नाही.

लावण्यवतीला नवऱ्याचे हे वागणे विचित्र वाटले. आपल्यात असा कोणता दोष आहे? आपल्यावर कोणत्या गोष्टीचा राग आहे? तिला कळले नाही. म्हणून लावण्यवतीने नवऱ्याला खूष करण्यासाठी अनेक प्रयत्न करून पाहिले. उत्तमोत्तम स्वादिष्ट पक्वान्ने तयार करून वाढली. नवरा बाहेरून येई तेव्हां नटून हसतमुखाने समोर उभी राही की तो काही बोलेल. पण एक न दोन. आनंदने तोंडाला जणुकाही कुलूपच घातले होते. त्याने तिच्याकडे तोंड वळवून पाहिले सुद्धां नाहीं. आतां तिने नवऱ्याला राग येईल अशी कामे सुरू केली. कधी आमटी भाजीत मीठच घालायचे नाही, तर कधी फार जास्त घालायचे. आंघोळीला उकळते पाणी काढून ठेवायचे तर कधी थंडगारच. परंतु हे सर्व प्रयत्न पण फुकट गेले.



लावण्यवतीचे ते सर्व प्रयत्न पाहून आनंदला तिची कीव येई. त्याला कळत नव्हते असे मुळीच नाही. वर्ष पुरे होण्यापूर्वी आपले तोंड उघडते की काय याची त्याला भीतीपण वाटू लागली. म्हणून तो एक दिवशी बायकोला आणि घरातल्या इतर लोकांना काही सांगितल्याशिवाय पळून गेला. पुष्कळ चवकशी झाली, पण तो कोठे गेला कळले नाही.

आनंद निघून गेल्यावर काही दिवसांनी गावात पाणी मिळतनासे झाले. गावात प्यायला पाणी एका ओढ्याचे होते. पण ओढा वाहायचा बंद झाला होता. वर कोठे तरी एक खडक आडवा आल्यामुळे पाणी वरचे वर राहून गेले. तो खडक दूर सारण्याचा गावकऱ्यांनी पुष्कळ प्रयत्न केला, पण काही उपयोग झाला नाही.

एका सिद्ध योग्याने असे सांगितले की जी मुलगी लग्न झाल्यावर गृहिणीची सर्व जबाबदारी संभाळून ब्रह्मचारिणी राहिली असेल तिने हात लावला तर खडक बाजूला सरकेल. लावण्यवतीला जेव्हां ती गोष्ट कळली तेव्हां ती राजाकडे जाऊन म्हणाली– "महाराज! एका वर्षापूर्वी माझे लग्न झाले आणि मी सासरी आले. परंतु आजपर्यंत माझे पतिराज माझ्याशी एका शब्दाने

देखील बोलले नाहीत. म्हणून मी तो खडक ढकलून पाहते."

राजाने लावण्यवतीकडे चकित होऊन पाहिले व म्हणाला–"ताई! तुमच्या हातून हे कार्य घडले तर मी आपले अर्धे राज्य तुम्हांला देईन. प्रयत्न करून पहा. प्रजा सुखी होईल."

त्यानंतर ती राजाच्या अधिकाऱ्यांबरोबर डोंगर चढून गेली. तिचा हात लागल्याबरोबर खरोखरच तो खडक हलला आणि पाणी वाहू लागले. ज्या तलावातून गावकरी पाणी नेत तो याच नदीच्या पाण्याने भरत असे. ओढ्याचे पाणी वाहू लागल्यानंतर तलाव भरला.

राजाने लावण्यवतीला अर्धे राज्य देऊन राज्याच्या त्या भागाची राणी म्हणून तिचा राज्याभिषेक केला.

काही दिवसांनी आनंद भिकाऱ्यासारखा जुनें मळके कपडे घालून त्या गावी परत आला. तोंपर्यंत एक वर्ष पुरे झाले नव्हते. तो हमरस्त्यावर पायी चालत असतां समोरून राणीचा रथ आला. रथातून राणीचे एक पादत्राण खाली पडले. ते घेऊन आनंद धावत रथापर्यंत गेला व म्हणाला–"माझे आई! आपले पादत्राण खाली पडले होते. घ्यावे."

पादत्राण देते वेळी आनंदने लावण्यवतीला ओळखले नाही. पण तिने नवऱ्याला ओळखले. पतीने तिला जे संबोधन करून हाक मारली ते ऐकून आश्चर्य आनंद झाला. त्याला रथात बसवून घेऊन ती राजवाड्यात गेली.

आनंदला अपरंपार आनंद झाला. त्याने आपले व्रत पुरे केले म्हणून तिला राज्य मिळाले, असे त्याला वाटले. त्याने, तो इतके दिवस कां बोलला नाही त्या व्रताचे फळ दोघांना कसे मिळाले हे सांगितले. दुसऱ्या दिवशी त्याचा राज्याभिषेक झाला व तो सुखपूर्वक राज्य करू लागला.





# भावाभावांचें प्रेम

एका गावी पंढरी नावाचा शेतकरी रहात असे. त्याला दोन मुलगे होते. एकाचे नाव राम होते व दुसऱ्याचे लक्ष्मण. खरोखरच रामलक्ष्मणासारखीच दोघांची जोडी होती. त्यांचे परस्परांवर फार प्रेम होते. मोठेपणी त्यांची लग्ने झाली आणि दोघांचे संसार थाटले.

पुढे काही दिवसांनी त्यांचे आईवडील वारले. तरी दोघे भाऊ परस्पर सहकाराने शेतीभातीची कामे करीत. आनंदाने असाच काही काळ लोटला. रामाला मूलबाळ नव्हते. परंतु लक्ष्मणाला पाच मुले झाली. त्यामुळे दोघांच्या बायकांची परस्पर मत्सराने भांडणे सुरू झाली. हळूहळू घरातल्या कामाच्या वांटणीबद्दल दोघींचे परस्परांशी भांडण वाढत गेले. म्हणून दोघांनी घराचे व शेतीचे वाटे करून घेतले आणि निरनिराळे संसार थाटले. दोघा जावा परस्परांशी मुळीच बोलत नसत. परंतु दोघां भावांचे परस्परांवरील प्रेम कायम राहिले.

एका वर्षी पीक छान आले. दोघां भावांनी कापणी झाल्यावर धान्याचे ढीग लावले. आतां धान्य घरी पोचविण्याचे काम काय ते उरले.

त्या दिवशी राम व लक्ष्मण आपापल्या शेतातल्या खळ्यात पाहारा देत रात्रभर जागत राहिले. रात्री खाण्याची वेळ झाली तेव्हां रामने आपल्या धाकट्या भावाला बोलाविले व म्हणाला–"अरे लखू मी जरा घरी जाऊन खाऊन पिऊन येतो. तोपर्यंत तू माझ्या शेतावर सुद्धा नजर ठेव. मी परत आल्यावर तू जा खायला."

लक्ष्मणने होकार दिल्यावर राम जेवायला घरी गेला. लक्ष्मण एकटा दोघांच्या खळ्यावर पाहरा देत बसला. त्याच्या डोक्यात विचार आला, आपल्याला तीन मुलगे व

दोन मुली आहेत. मोठा मुलगा दोन तीन वर्षांनी मोठा होईल. तेव्हां तो आपल्याला मदत करील. पण मोठ्या भावाला मूलबाळ काही नाही. त्याला म्हातारपणी मदत कोण करणार? म्हातारपणी काम करणे त्याला जड जाईल. म्हणून त्याने आतांपासून थोडं थोडं वांचविले पाहिजे म्हणजे उतारवयात काही उपयोग होईल. मी त्याला मदत करायला गेलो तर तो मानणार नाही. तो कबूल झाला तरी वहिनींना ते खपणार नाही. असा विचार करून त्याने एक मोठे टोपले घेतले आणि आपल्या खळ्यातले दहा टोपल्या धान्य उचलून भावाच्या खळ्यात नेऊन टाकले. भाऊ येण्यापूर्वी जणु काही त्याला काही माहीतच नाही अशातऱ्हेने परत येऊन आपल्या खळ्यात खाटेवर बसून राहिला.

इतक्यात राम जेवण आटोपून परतला आणि लक्ष्मणाला जेवून यायला घरी पाठविले. लक्ष्मण घरी निघून गेल्यावर मोठा भाऊ एकटा खाटेवर पडल्या पडल्या विचार करू लागला. यावर्षी देवाच्या कृपेने पीक छान निघाले आहे. पण लक्ष्मणाच्या घरी नवरा बायको शिवाय पांच पोटे भरून काय उरणार? आपल्याला काय? दोघं नवरा बायको, खाऊन किती खाणार? थोडक्यात भागेल. यावर्षी लक्ष्मणाला थोडा हातभार लावायला हरकत नाही. उघड उचलून काही दिलं तर तो घेणार नाही व दोघांच्या बायका उगाच आपसात भांडतील. म्हणून लक्ष्मणाला परत यायला थोडा वेळ लागेल असा विचार करून आणि जवळपास कोणी नाही हे पाहून त्याने, भावाने ज्या टोपल्याने दहा टोपली त्याच्या धान्याच्या राशीवर टाकली होती त्याच टोपल्याने दहा टोपली धान्य भरून त्याने लक्ष्मणच्या खळ्यातल्या राशीत टाकले आणि काही बोलल्याशिवाय आपल्या खाटेवर येऊन पडून राहिला.






एका गावी एक लोभी व दुष्ट जमीनदार रहात असे. त्याने एका वर्षी चाळीस एकर जमिनीत आंब्यांची झाडे लावली. त्याने झाडांना पाणी घालायला व राखण करायला एक माळी ठेवण्याचे ठरविले. एक दिवशी त्याने महादू नावाच्या एका गरीब माणसाला बोलाविले व म्हणाला–"हे बघ, तू या सर्व झाडांना पाणी घालीत जा आणि यांची राखण कर. फळे लागू लागली म्हणजे मी तुला चार एकर देईन."

महादू त्याला कबूल झाला. त्याने आमराईत एक झोपडी बांधली. तो दररोज झाडांना पाणी घाली व पाहरा देई. चार वर्षे लोटली. झाडांना फळे लागली. महादू मालकाला म्हणाला–"मालक! फळे लागली आहेत. येऊन पहा तरी!"

जमीनदाराने अमराई जाऊन पाहिली व म्हणाला–"अजून सर्व झाडांना कोठे रे फळे लागली आहेत? आणखी एक वर्षभर तू काम कर." महादूने त्याप्रमाणे आणखी एक वर्षभर काम केले आणि मालकाला वर्ष पुरे झाल्याची आठवण करून दिली.

जमीनदार चार एकर पडीत ओसाड जमीन दाखवून म्हणाला–"मी ही जमीन तुला देईन म्हटले होते. तू येथे शेती कर, तुला हवी तशी!"

महादू मालकाला म्हणाला–"मालक! आपण अमराईतले चार एकर देतो म्हणाला होता नव्हं का?"

"मी तुला चार एकर जमीन देतो, म्हटले होते. आमराईतली जमीन देईन असे नव्हते म्हटले. या शिवाय सर्व झाडांना फळे कोठे लागली आहेत?" असे म्हणत त्याने फळे न लागलेली दोन झाडे महादूला दाखविली.

महादू मालकाची लबाडी ऐकून पश्चात्ताप करीत घरी गेला. महादूचा मुलगा ते



ऐकून खूप चिडला आणि त्याने जमिन-दाराला चांगला धडा शिकवायचे मनाशी ठरविले.

काही दिवसांनी महादूने संन्याश्याचा वेष करून आपल्या दोघां मित्रांना आपले शिष्य म्हणून बरोबर चलायला सांगितले. गुरु शिष्य गावाबाहेर गेले. एका वडाच्या झाडा-खाली तो स्वतः बसला व आपल्या शिष्यांना त्याने गावात पाठविले. दोघे शिष्य आपल्या गुरूचा महिमा सांगत गावभर फिरले. त्यांनी गांवकऱ्यांना असेदेखील सांगितले की त्यांचे गुरु काशीयात्रेला जातांना वाटेत या गावाच्या बाहेर वडाच्या पारावर उतरले आहेत. कोणाला हवे असेल तर त्यांच्या दर्शनाचा लाभ घेता येईल.

ते ऐकून गावकरी फळे व दूध घेऊन त्या संन्याश्याच्या दर्शनासाठी आले. महादूचा मुलगा सर्वांना ओळखत होता, म्हणून त्याने सर्वांच्या घरच्या गोष्टी अशा काही सांगि-तल्या की जणुंकाही दिव्य दृष्टीनेच त्याला सर्व कळले होते. आपली सर्व गुपिते संन्या-श्याच्या तोंडून ऐकून त्यांचा त्याच्यावर जास्तच विश्वास वाढला.

त्या दिवशी शिष्यांनी जमिनीत पुरून ठेवलेले गुप्तधन गावात कोठे कोठे आहे हे गुरुजी विचारील त्याला सांगतील असे जाहीर केले. ती बातमी जमिनदाराला पण अर्थातच कळली. त्या दिवशी रात्री जमिन-दार दूध, फळे वगैरे सर्व पदार्थ घेऊन गुरुजींच्या दर्शनास गेला. संन्याश्याचे पाय धरून म्हणाला–"महाराज! मला कमीत कमी एक तरी गुपित स्थान सांगावे. मी ते सर्व धन पुण्य कार्यात खर्च करीन."

जमिनदाराने फारच गळ घातली तेव्हां संन्याश्याने अगदी नाइलाजाने मान्य केल्याचे सोंग करीत म्हटले–"तू माझ्यावरोबर चल, मी तुला एक जागा दाखवितो." असे सांगून संन्यासी जमिनदाराला, त्याने महादूला दिलेल्या पडीत जमिनीत घेऊन गेला. तेथे पोचल्यावर त्याने एक वर्तुळाकार रेघ काढून दाखविली आणि म्हणाला–"या जागी दहा फुट जागा खणून पहा, तुला अपार सोने मिळेल."

त्यानंतर संन्यासी जमिनदाराला म्हणाला–"मी उद्यां सकाळी काशीयात्रेला जात आहे. मी परत येईपर्यंत यातून जे धन मिळेल ते खर्च करून तू एक शिव मंदिर बांधून ठेवले पाहिजेस." असे सांगून संन्यासी आपल्या शिष्यांसह निघून गेला.

जमिनदाराने दुसऱ्या दिवशी सकाळी महादूला बोलाविले व म्हणाला–"महादू! तुला मी जी पाच एकरजमीन दिली होती ती परत दे. आता या उतारवयात तू ही जमीन केव्हां कसणार व यातून पीक तरी केव्हां काढणार? म्हणून तू म्हणालास तशी आमराईतलीच चार एकर जमीन मी तुला देणार आहे."

महादू म्हणाला–"नको मालक! मला ती पडीत जमीनच राहू द्या. आपण मला ती चाळीस एकरांची सगळी आमराई दिलीत तरी नको.

जमिनदार घाबरून गेला आणि महादूची मनधरणी करू लागला, आमराईतली जमीन घ्यायला. शेवटी जमिनदार आमराईतली दहा एकर जमीन द्यायला तयार झाला, परंतु ते महादूला मान्य नव्हते. जमिन-दाराने वीस एकर जमीन देऊ केली. तरीदेखील महादू मानेना. शेवटी चाळीस एकरांची सर्व आमराई द्यायला जमीनदार कबूल झाला. आपल्या नावावर सारी आमराई लिहून घेतल्यावर महादूने पडीत जमीन सोडली. जमिनदार त्या पडीत जमिनीत सोन्याची स्वप्नें पहात खणू लागला. दहा फूट जमीन खणून झाली तरी सोन्याचा एक तुकडादेखील त्याच्या दृष्टीस पडला नाही.





# कान धरला

एका जंगलात एक ऋषी तपश्चर्या करीत होते. जंगलात लाकडे फोडायला जाणारे लोक त्यांच्यासमोर फळे आणून ठेवीत व त्यांना नमस्कार करून आपल्या घरी जात. मुनी कधी कधी डोळे उघडून समोर काही ठेवले आहे का पहात व दिसले की खाऊन घेत. कधी कधी ते ध्यानस्थ असले म्हणजे पक्षी किंवा रानटी जनावरे येऊन खाऊन जात. हा क्रम नित्य चालू होता. काही लोकांनी अनेक वेळां त्यांच्याकडे पाहले, पण त्यांच्याकडे विशेष लक्ष दिले नाही, असे देखील होई.

एकदा एक मनुष्य नारळांचे एक गाठोडे घेऊन त्या वाटेने जात होता. त्याची नजर त्या मुनींवर पडली. त्याने चार नारळ मुनींसमोर ठेवले आणि पुढे निघून गेला. मुनींनी काही वेळाने डोळे उघडून पाहिले. त्यांना नारळ दिसले. मुनी एक नारळ आपटून फोडणार होते, तेवढ्यात एका लाकूडफोड्याने येऊन नारळ फोडून दिला. मुनी नारळाचे पाणी पिऊन खोबरे खाऊ लागले. तेव्हां लाकूडफोड्या आणखी एक नारळ फोडून देऊ लागला. मुनींनी त्याला थांबायला सांगितले व म्हणाले–"तू हे तिन्ही नारळ घेऊन जा. ते फोडताना तुझ्या मनात जी इच्छा असेल ती पुरी होईल."

लाकूडफोड्या ते नारळ लाकडाच्या मोळीवर ठेवून ते घरी घेऊन आला.

त्या लाकूडफोड्याचे नाव रामू होते. लाकडे विकून त्याला जे पैसे मिळत त्यातले अर्धे पैसे तो खाण्याचे पदार्थ विकत घेण्यासाठी खर्च करी. पाव भाग दान-धर्मात खर्च करी व पाव भाग शिलकेत टाकी. किती पैसे जमले तरी लाकडे फोडण्याचे काम बंद करावयाचे नाही असे त्याने मनाशी ठरविले होते. ज्या दिवशी त्याला कमी पैसे मिळत त्या दिवशी दान करण्याची रक्कम कमी झाली, याचे त्याला दुःख होई. त्याला स्वतःच्या खर्चाला पैसे कमी पडल्याचे दुःख होत नसे.

रामूने घरी गेल्यावर त्याची प्रतिज्ञा कधी भंग होऊ नये व त्याच्या मुला बाळांना पोटभर खायला मिळत रहावे, अशी इच्छा करून नारळ फोडला. त्या दिवसापासून त्याला लाकडाच्या धंद्यात बरकत होत गेली. हळू हळू त्याने एक घर बांधून घेतले आणि पहिल्यापेक्षा अधिक दानधर्म करू लागला आणि त्याची बायको व मुले यांना अंगभर वस्त्र व पोटभर खायला मिळू लागले. सर्व लोक त्याला रामू ऐवजी रामजी काका म्हणू लागले.

रामूच्या घराजवळच एका श्रीमंताचे घर होते. त्याला हे पाहून आश्चर्य वाटे की त्याच्यापेक्षा रामूच जास्त दानधर्म कसा काय करतो व त्याची कीर्ती का वाढत चालली आहे? तो रामूचा हेवा करू लागला.

एकदां त्या श्रीमंताने रामूला सरळ सरळ विचारले–"काय रे रामू, तू येऊन जाऊन एक लाकूडफोड्या, मग तुझी दर



रोज ही बरकत कशी काय होत चालली आहे? मला फार आनंद झाला. तुला राग येणार नसेल तर एक विचारू का? तुला जंगलात गुपित धन कोठे मिळाले का?"

"नाही मालक! तसं काही नाही. ही सर्व एका मुनीश्वरांची कृपा आहे. भोळ्या भावड्या रामूने सर्व खरे ते सांगून टाकले.

"काय रे, तरमग तुझ्याकडे आणखी दोन नारळ आहेत ना? काय पण नशीबवान आहेस रे तू? ते नारळ एकदा दाखविशील का? मी येईन तुझ्या घरी पहायला. श्रीमंताने निस्संकोचपणे विचारले व रामूने मान्य केले.








दुसऱ्या दिवशी तो श्रीमंत मनुष्य दुसरा एक साधा नारळ एका टोपलीत घेऊन रामूच्या घरी गेला. रामूचे नारळ हातात घेऊन बराच वेळ पहात राहिल्यावर रामूच्या नजरेआड त्याने रामूचा एक नारळ उचलून आपल्या टोपलीत ठेवला व आपला नारळ रामूच्या नारळाच्या जागी ठेवून दिला. नंतर काही बोलल्याशिवाय तो घरी निघून गेला.

तो श्रीमंत मनुष्य धनापेक्षेने नारळ फोडणार इतक्यात त्याची बायको येऊन म्हणाली—"अहो, नारळातले पाणी या पेल्यात धरा."

त्या श्रीमंत माणसाच्या जिव्हेला बायकोला पाहिल्यावर नेहमी 'दरिद्री' म्हणण्याची एक संवय झाली होती. बायकोने पाणी मागितले म्हणून याही वेळेस तोच शब्द मनातल्या मनात म्हणत त्याने नारळ फोडला.

परंतु आपली चूक उशिरा त्याच्या लक्षात आली व तो बायकोला वाटेल ते रागाने बोलला. परंतु चूक झाली ती सुधारणे शक्य नव्हते. त्याची संपत्ति हळू हळू कमी होत गेली आणि एक दिवशी दरोडेखोरांनी घरात शिरून घरात होते नव्हते ते सर्व चोरून नेले. शेवटी त्याला रामूच्या घरी जाऊन त्याच्याकडून दान मागून घ्यावे लागले. त्याने नारळ चोरून आणल्याचे कबूल करून ती चूक केल्याबद्दल स्वतःचे कान धरून रामूची माफी मागितली.

रामूला त्याची कीव आली. म्हणाला—"माझ्या जवळ जे दोन नारळ आहेत त्यात एक महिमा असलेला एक नारळ आहे. तुम्ही काळजी करूं नका. मी तो तुमच्यासाठी फोडतो." अशातऱ्हेने रामूच्या कृपेने श्रीमंत मनुष्य पहिल्यापेक्षा जास्त श्रीमंत झाला. तो दानधर्म करू लागला.





# खरे झालेले स्वप्न

एका राजाने त्याच्या राज्यातल्या सर्वात हुशार व प्रसिद्ध सोनाराला बोलावून त्याच्या हातात थोडे सोने व हिरे देऊन त्याच्या दोन अंगठ्या करून द्यायला सांगितले.

सोनार सोने व हिरे घेऊन परत आला. त्याच्याजवळ राघव नावाचा एक तरुण सोनार काम शिकत होता. तो त्याला म्हणाला—"राजाने दोन अंगठ्या करून द्यायला सांगितल्या आहेत. मी घरी जाऊन खाऊन पिऊन येतो, मग काम सुरू करीन. तोपर्यंत या वस्तू काळजीपूर्वक संभाळून ठेव." असे सांगून सोनार घरी निघून गेला. मालक घरी निघून गेल्यावर राघव झोपला आणि छान घोरू लागला.

त्याच वेळी राजा वेष पालटून त्या सोनाराच्या दुकानासमोर आला. दुकानात निश्चिंतपणे तरुण सोनार झोपलेला होता. राजाने दुकानात जाऊन त्या तरुणाच्या पाठीवर जोराने एक चापटी मारली आणि बाहेर निघून गेला.

"कोण रे तू दुष्ट? मला काय गोड सोनेरी स्वप्न पडले होते. मध्येच मोडले." असे म्हणत राघव जागा झाला.

राघव म्हणाला ते राजाला ऐकू आले. तो राजवाड्यात परत आला आणि राघवला धरून घेऊन यायला शिपायांना पाठविले.

राघवला राजासमोर हजर करण्यात आले. राजाने त्याला विचारले—"काय रे, तुला दुकानात कोणते स्वप्न दिसले?"

"महाराज, ते स्वप्न खरे होईपर्यंत मी ते सांगणार नाही." राघव म्हणाला.

"नाही सांगितलेस तर तुझ्यावर निरनिराळी संकटे ओढवतील." राजाने त्याला सावध करीत सांगितले.



"आपण पहिजे तर मला फाशी द्या नाहीतर सुळावर चढवा, पण मी ते काही सांगणार नाही." राघव निर्भयपणे म्हणाला.

"याला अंधारकोठडीत टाका." राजाने आपल्या शिपायांना आज्ञा केली.

राघवला कोठडीत दिवस काढणे कठीण वाटू लागले. त्याने कोठडीतून पळून जाण्याचा प्रयत्न केला. त्याला एक लहानशी काठी मिळाली. त्या काठीने त्याने खणून एक भुयारासारखे भोक पाडले आणि बाहेर आला. जवळच राजवाडा होता. एका खिडकीतून तो राजवाड्यात वरच्या मजल्यातल्या एका खोलीत शिरला. ती राजकन्येचीच खोली होती. राजकन्या पलंगावर झोपलेली होती. तिच्या समोर सोन्याच्या ताटात अन्न वाढलेले होते. राघव मांजराच्या पावलाने जवळ गेला व राजकन्येला जवळून पाहिले. तिचे सौंदर्य पाहून तिच्याशीच लग्न करण्याची इच्छा त्याच्या मनात उत्पन्न झाली.

राघव खोलीतून बाहेर जाऊ लागला तेव्हां राजकन्येची झोप मोडली. तिने विचारले—"कोण तू? माझ्या खोलीत शिरण्याची हिंमत तुला कशी झाली? मी बाबांना सांगून तुझे हे डोकेच उडविते."

"राजकन्या! माझा जीव घ्यायला तुझ्या वडिलांनी कष्ट करण्याचे कारणच नाही. तू आपल्या हातांनी ते काम कां उरकून टाकीत नाहीस? तुझ्यावर माझे किती प्रेम आहे, हे मी शब्दात वर्णन करून सांगू शकणार नाही." राघव म्हणाला.

त्या बोलण्याचा राजकुमारीच्या मनावर परिणाम झाला. तिने राघवला तो कोण काय व तो तेथे कसा आला सर्व विचारून घेतले. राघव उजाडण्याच्या सुमारास आल्या वाटेने आपल्या कोठडीत जाऊन बसला.

त्याच सुमारास राजासमोर एक मोठा प्रश्न उभा राहीला. त्या देशाच्या चक्रवर्ती राजाने आपल्या या मांडलिक राजाकडे आपले दूत पाठविले. दूतांबरोबर तीन घोडे होते. दूत म्हणाले—"महाराज! या घोड्यांचे काय वय असेल हे सांगावे किंवा आमच्या महाराजांचे वर्चस्व कबूल करावे. आपण दोन्ही गोष्टी करण्याचे नाकारलेत तर आमच्या चक्रवर्ती महाराजांचे सैन्य आपल्या राज्यावर चालून येईल व आपले राज्य जमिनदोस्त करून टाकील.

राजाच्या दरबारातील एकालाही घोड्यांचे वय किती असेल हे सांगता आले नाही. राजाच्या मुलीला ते माहीत होते, पण तिने राजाला ते न सांगतां रात्री राघव आला त्याला सांगितले.

राजाला अचानक राघवची आठवण झाली. त्याने राघव जिवंत असेल तर त्याला घेऊन यायला शिपायांना आज्ञा केली. त्याप्रमाणे राघवला राजासमोर हजर करण्यात आले. तो जिवंत होता एवढेच नव्हे तर चांगला जाडजूड झाला होता. राजाने त्याला विचारले—"काय रे, या घोड्यांचे काय वय आहे सांगू शकशील का?"

"मी सांगू शकेन महाराज! पण प्रथम त्यांना यव खायला घाला." राघव म्हणाला.

तिघां घोड्यासमोर यव धान्य ठेवण्यात आले. एका घोड्याने समोर ठेवलेले सर्व





धान्य खाऊन टाकले. दुसऱ्याने अर्धेच खाल्ले व तिसऱ्याने नुसते तोंड चाळवले, एक दाणा देखील खाल्ला नाही.

ते पाहून राघव म्हणाला–"महाराज, पहिला तीन वर्षांचा आहे, दुसरा दोन वर्षांचा व तिसरा फक्त एक वर्षाचा आहे." चक्रवर्तीचे दूत ते उत्तर बरोबर असल्याचे मान्य करून निघून गेले.

दूत निघून गेल्यावर राघवला राजाने विचारले–"काय रे तू आपल्या जिवावर असा एवढा उदार कां झाला आहेस? अजून सर्व आयुष्य तुझ्यासमोर आहे. अजून तरी सांग, तुला कोणते स्वप्न पडले होते?"

"महाराज, क्षमा करावी. मी त्या स्वप्नाविषयी काही बोलायला तयार नाही." राघव म्हणाला.

राजाने राघवला अंधारकोठडीत घेऊन जायला शिपायांना सांगितले.

असेच एक वर्ष लोटले. चक्रवर्ती राजाचे दूत पुन्हा आले. या खेपेस ते बरोबर तीन फळे घेऊन आले. ती फळे किती दिवसांपूर्वी काढली हे राजाने सांगितले नाही तर चक्रवर्तीचे सैन्य राजधानीवर चालून येईल असे दूतांनी सांगितले. तिन्ही फळे दिसायला सारखी होती. कोणाला बरोबर उत्तर सांगता आले नाही. राजाने आपल्या मुलीला विचारले. पण माहीत असूनही राजकन्येने राजाला सांगितले नाही, राघवला तो रात्री भेटला तेव्हां सांगितले.

नाईलाजाने राजाला या खेपेसही राघवलाच बोलवावे लागले. "तुला या फळांचे वय किती आहे हे सांगता येईल का?" राजाने विचारले.

राघवने पाणी मागवून फळे पाण्यात टाकली. एक फळ तळाला गेले. एक अर्धवट बुडले व एक वरच तरंगत राहले. ते पाहून राघव म्हणाला–"महाराज! पहीले फळ एक वर्षाचे आहे, दुसरे दोन वर्षाचे व तिसरे तीन वर्षाचे आहे." उत्तर बरोबर असल्याचे दूतांनी मान्य केले आणि निघून गेले.

राजाने पुन्हां राघवला विचारले–"मुला! तू उगाच आपले जीवित व्यर्थ कां घालवीत आहेस? तुला काय स्वप्न प्रडले होते ते सांगून टाक व मोकळा हो!"

राघव म्हणाला–"महाराज! आपण मला वारंवार हा प्रश्न कां करता, कळत नाही. मी याचे उत्तर देणार नाही, हे आपणांला माहीत आहे."

राजाने राघवला पुन्हां अंधारकोठडीत पाठवून दिले. एक वर्ष आणखी लोटले. या खेपेस चक्रवर्तीने बारा मुलांना दूतांबरोबर पाठविले. दूतांनी विचारले–"महाराज, यातली मुले कोण कोणती व मुली कोण कोणत्या, सांगावे. नाहीतर चक्रवर्तीची असंख्य सेना आपल्या राज्यावर चालून येईल."

सर्व मुलांना एकाच तऱ्हेचे पोशाख घालण्यात आले होते. म्हणून मुले कोण व मुली कोण हे ओळखणे कठीण होते.

राजा घाबरला. राजाने राजकन्येला जाऊन विचारले. परंतु राजकन्येने मुलांमुलींना ओळखण्याची खूण राजाला न सांगता राघवला सांगितली. या खेपेसही राजाने राघवला अंधारकोठडीतून बोलावून



आणविले आणि मुले कोणती व मुली कोणकोणत्या हे सांगायला सांगितले.

"महाराज, मुले कोण व मुली कोण हे मी ओळखतो, पण माझी एक अट आहे, मी मागेन ते मला मिळाले पाहिजे." राघव म्हणाला.

"वाटेल ते मागून घे. सारे राज्य मागितलेस तरी मी द्यायला तयार आहे. हे राज्य नष्ट होऊ नये, एवढीच माझी इच्छा आहे." राजा म्हणाला.

"आपणाला एक मुलगी आहे व ती अप्रतिम सुंदर आहे, असे ऐकतो. तिच्याशी माझे लग्न करून द्यावे." राघव म्हणाला.













"हे संकट टळले तर मी त्याला कबूल आहे." राजाने वचन दिले.

राघवने सर्वांना जेवायला तयार व्हायला सांगितले. हात धुवायला त्याने ऊन पाणी मागविले. बारा पैकी सहा मुले ऊन पाण्याने हात धुवायला मागेपुढे करू लागली. बाकी सहा जणांनी आनंदाने हात धुवून घेतले. राघव म्हणाला—"ऊन पाण्याने हात न धुणारी मुले मुलेच आहेत व बाकी सहा मुली आहेत." राघवचे उत्तर बरोबर असल्याचे चक्रवर्तीच्या दूतांनी मान्य केले व राजाचा निरोप घेऊन निघून गेले.

राजाने वचन दिल्याप्रमाणे आपल्या मुलीचे राघवशी लग्न करून देऊन त्याला आपला जांवई करून घेतले.

मध्यंतरी चक्रवर्ती महाराजांच्या मनात आणखी एक विचार आला. त्यांच्या प्रश्नांची बरोबर उत्तरे देणाऱ्याचा काटा दूर केला की आपल्याला शत्रूचे राज्य बळकाविता येईल, असा विचार करून चक्रवर्तीने राघवलाच आपल्या दरबारी आदरपूर्वक बोलाविले. राजा त्याला म्हणाला—"माझ्या दूतांकरवी, माझ्या सर्व प्रश्नांची तू समर्पक अशी उत्तरे दिली आहेस असे कळले. मी तुझ्या हुशारीची आणखी एक परीक्षा घ्यावी म्हणतो. हा लोखंडाचा गज मी तुला देतो. तू तीन दिवसांच्या आत याचे रेशमी वस्त्र विणून घेऊन ये. जर तू तीन दिवसात हे काम पुरे कलेस तर मी तुझ्याशी माझ्या मुलीचे लग्न करून देईन. नाहीतर तुझा शिरच्छेद करीन."

चक्रवर्तीने आपल्याला ठार करण्यासाठीच ही युक्ती काढली असावी हे कळायला राघवला वेळ लागला नाही. उत्तर सांगायला त्याची बायको म्हणजे राजकन्या जवळ नव्हती. तो याच विचारात राजवाड्याच्या उद्यानात फिरत असतां चक्रवर्तीची मुलगी समोर येऊन त्याला म्हणाली—"तू कोणत्या काळजीत आहेस?"

चक्रवर्तीच्या मुलीने प्रथमदर्शनीच राघवला पाहतांच मनाने त्याला वरले होते.

राघव म्हणाला—"चिंता करण्याचे कारण म्हणजे चक्रवर्तीने मला एक लोखंडी गज देऊन त्याचे रेशमी वस्त्र विणून तीन दिवसांच्या आत आणून द्यायला सांगितले आहे. चक्रवर्तीच्या कन्येने एक उपाय सुचविला. राघवने त्याप्रमाणे चक्रवर्तीला भेटून तो प्रश्न विचारला. चक्रवर्ती राघवने विचारलेला प्रश्नच पुन्हां उच्चारीत विचारले—"वाळूचे सूत कसे काढायचे, हा काय प्रश्न झाला?"

"चक्रवर्ती! लोखंडातून रेशमी वस्त्र कसे तयार करायचे हा तरी काय प्रश्न झाला?" राघव म्हणाला.

"तू जिंकलास. मी हारलो. मी आपल्या मुलीचे तुझ्याशी लग्न करून द्यायला तयार आहे." चक्रवर्ती आनंदाने म्हणाला.

राघव चक्रवर्तीच्या मुलीशी लग्न करून परत आला व राजाला म्हणाला—"महाराज! मी त्या दिवशी दुकानात जे स्वप्न पाहिले होते ते काय हे आज सांगतो. स्वप्न असे होते. मी उद्यानात बसलो आहे. एका बाजूला चक्रवर्तीची कन्या बसली आहे व दुसऱ्या बाजूला आपली राजकन्या बसली आहे, असे ते स्वप्न होते. हे स्वप्न मी त्याच दिवशी सांगून टाकले असते तर ते कधी खरे होऊ शकले असते का?"

"राघव, तू हुशार व विवेकशील शहाणा आहेस. तू चक्रवर्तीचा जांवई झाला आहेस. म्हणून माझ्या राज्यावरचे संकट आतां कायमचे टळले आहे. आतां मी तुलाच माझ्या गादीचा वारस करून मोकळा होतो." त्याप्रमाणे राजाने राघवला आपल्या गादीवर बसविले आणि स्वतः वानप्रस्थाश्रम घेतला.





# बोलके फळ

एका राजाकडे पुष्कळ गायी होत्या. गाईंची राखण करण्यासाठी गुराखी दररोज गाईंना डोंगरावर चरायला घेऊन जात. संध्याकाळी गोठ्यात बांधण्यापूर्वी मोजताना गाई कमी निघत. राजाने कडक पाहरा ठेवला. तरी गाईंची संख्या झपाट्याने कमी होऊ लागली तेव्हां राजाने आपल्या तिघां राजकुमारांना गाईंच्या शोधार्थ गाईंच्या पाठोपाठ पाठवून दिले.

राजकुमार दिवसभर हिंडत संध्याकाळच्या सुमारास एका जंगलात पोंचले. तेथे त्यांना विक्षिप्त अशी एक म्हातारी भेटली. तिने राजकुमारांना विचारले— "बाळांनो! तुम्ही कोठे रे निघालात?"

राजकुमार रागावून म्हणाले—"तुला काय करायचे आहे? आपल्या वाटेने जा."

ती बाई काही तरी बडबडत निघून गेली. चांगला काळोख पडू लागला त्या सुमारास ते एका किल्ल्याजवळ येऊन पोंचले. त्यांनी आत डोकावून पाहिले. त्यांना गाई बांधून ठेवलेल्या दिसल्या आणि एक म्हातारी राक्षसीण पण घोरत पडलेली दिसली. राजकुमारांच्या पावलांची चाहूल लागताच ती जागी झाली.

राजकुमारांनी थोडे साहस दाखवून तिला विचारले—"आजी! आम्हांला काही काम देता का? आम्ही येथेच राहू."

राक्षसीण भोळी नव्हती. हे तिघे गाईंना सोडवून घेऊन जायला आले आहेत, हे तिने ओळखले. राजकुमारांना काही तरी करून ठार करण्याचे ठरवून ती म्हणाली— "ठीक आहे मुलांनो! गाईंचे दूध काढायची वेळ झाली आहे. दूध काढून घेऊन या. उद्यांपासून माझ्या गाईंची राखण करण्याचे काम मी तुम्हांलाच देणार आहे."

राजकुमार दूध काढून घेऊन आले.

म्हातारी दूध तापवायला बसली. राजकुमार गाईंना कसे सोडवून न्यायचे हा विचार करीत बाहेर उभे होते. थोड्या वेळाने राक्षसीण त्यांना आत बोलावून म्हणाली—"तुम्ही उपाशी दिसतां, पहिल्याने एवढे दूध पिऊन घ्या." असे सांगून तिने तीन भांड्यात विष घातलेले दूध प्यायला दिले. दूध प्याल्याबरोबर ते जागच्या जागी मरून पडले. राक्षसिणीने तिघांची प्रेते एका पेटीत घालून ठेवून दिली.

राजकुमार बरेच दिवस झाले तरी परत न आलेले पाहून राजाला काळजी वाटू लागली. राजाच्या गुराख्यात गोविंद नावाचा एक हुशार तरुण गुराखी होता. तो धाडस करून राजाला म्हणाला—"महाराज! मला आज्ञा करावी, मी राजकुमारांचा व गाईंचा शोध काढून त्यांना सुखरूप घरी घेऊन येतो." राजाने त्याला परवानगी दिली.

ज्या वाटेने राजकुमार गेले होते त्याच वाटेने गोविंद पण गेला. त्याला देखील ती कुरूप म्हातारी भेटली. तिने त्याला विचारले—"कोठे रे चाललास बाळ?"

गोविंदने खरेखरे ते सांगून टाकले.

ते ऐकून म्हातारी म्हणाली—"येथून थोड्या अंतरावर एक किल्ला आहे. तू



असाच पुढे चालत जा. त्या किल्ल्यात वाटसरूंना फसवून खाणारी एक राक्षसीण राहते. ती गाई गुरे चोरते. माझ्या बहिणीच्या मदतीने तिने राजाच्या गाई चोरून किल्ल्यात नेऊन ठेवल्या आहेत. तिचे काम निघून गेल्यावर तिने माझ्या बहिणीला ठार केले. आतापर्यंत तिने तुझ्या राजाच्या राजकुमारांना पण ठार केले असल्यास नवल नाही. मी त्यांना ही गोष्ट सांगून सावध करणार होते. पण मी त्यांना कोठे जाता आहां, असे विचारले तर त्यांना राग आला आणि ते काही बोलल्याशिवाय निघून गेले. गोविंदने त्या म्हातारीला विचारले—














"तुझी बहीण कोण आहे? त्या राक्षसिणीने आमच्या गाई कां चोरून नेल्या?"

त्यावर ती कुरूप म्हातारी म्हणाली– "त्या राक्षसिणीला म्हातारपणामुळे स्वतःचे पोट भरणे देखील कठीण झाले. तिची नजर तुमच्या राजाच्या गाईंवर पडली. माझी बहीण एक जादुगारीण होती. त्या राक्षसिणीची माझ्या बहिणीशी कशी ओळख झाली कोणास ठाऊक. तिने माझ्या बहिणीला लोभ दाखविला की चोरून आणलेल्या गाई अर्ध्या अर्ध्या वांटून घेऊ. तिने माझ्या बहिणीकडून गाई मिळविल्यावर माझ्या बहिणीला मारून टाकले. म्हणून मी तिच्यावर सूड उगविण्याचे मनात ठरविले. मी म्हातारी असले तरी मला दोन तीन मंत्र येतात. तुझ्यासारख्यांच्या मदतीने मी आपल्या मंत्रशक्तीचा उपयोग करून सूड उगवावा, म्हणते."

सर्व काही ऐकून घेतल्यावर गोविंद म्हणाला–"त्या राक्षसिणीच्या हातातून राजकुमारांना आणि गाईंना सोडवायला काही युक्ती असेल तर सांग."

"मी तुला सांगितले ना, काही मंत्रशक्ती अद्याप माझ्याजवळ आहेत." असे सांगून एक फळ व तीन खडे गोविंदच्या हातात देत ती म्हणाली–"हे फळ तुझ्यावर येणाऱ्या संकटाची सूचना तुला अगोदरच देऊन ठेवतोल. हे बोलके आहे. तुझे काम झाले की या फळाचे बी काढून पाण्यात थोडेसे- हातातच घासून ते पाणी मेलेल्या लोकांवर शिंपड, मेलेले लोक जिवंत होतील. हे खडे एकेक करून जमिनीवर टाक व तुला जे मागायचे असेल ते मागून घे. तुला इच्छित फळ मिळेल. तुझ्या हातून त्या राक्षसिणीचा वध निश्चित होईल अशी माझी खात्री आहे. आता तू आपले काम कर."

त्या वस्तू घेऊन गोविंद किल्ल्याकडे निघाला. म्हाताऱ्या राक्षसिणीला भेटताच



त्याने काही तरी कामाची मागणी केली. हा देखील गाईंना पळवून घेऊन जायला आलेला दिसतो आहे. "बरे तर तू माझ्या गाईंची राखण कर व यांना रोज चरायला घेऊन जात जा." असे सांगून म्हातारी राक्षसीण घरात निघून गेली. थोड्या वेळाने एका पेल्यात दूध आणून देऊन म्हणाली– "मुला! दमला असशील, पहिल्याने एवढे दूध पिऊन घे."

"दूध पिऊ नकोस! यात विष आहे!" फळ गोविंदला हळूच सावध करीत म्हणाले.

राक्षसिणीच्या नजरेआड गोविंदने ते दूध ओतून टाकले.

गोविंदला जिवंत पाहून राक्षसिण चकित झाली. म्हणाली–"मुला, तेथे अंथरूण अंथरून ठेवले आहे, जाऊन झोप."

"त्या अंथरुणावर झोपू नकोस. खड्ड्यात पडून मरून जाशील." फळ हळूच म्हणाले.

राक्षसीण निघून गेल्यावर गोविंदने तो बिछाना उचलून पाहिला, त्याच्या खाली एका खोल खड्ड्यात काटे होते. दोन्ही वेळ गोविंदचा जीव वांचला. आता गोविंद खात्रीने मेला असावा असे समजून म्हातारी राक्षसीण झोपी गेली.



गोविंदला रात्रभर झोप आली नाही. तो किल्ल्यांत फिरून राजकुमार कोठे आहेत हे पाहू लागला, तेव्हां त्याला एका जागी एका पेटीत राजकुमारांची प्रेते दिसली. त्या कुरूप म्हातारीच्या बहिणीचे प्रेत पुष्कळ शोधून पाहिले तरी गोविंदला मिळाले नाही. म्हणून आतां या फळाचा पुढला उपयोग करून घेण्याच्या हेतूने फळातले बी काढून हातातल्या हातातच पाण्यात जरा घासले आणि ते पाणी कुरूप म्हातारीने सांगितल्या- प्रमाणे राजकुमारांवर शिंपडले. राजकुमार जिवंत होऊन उभे राहले. त्यांनी गोविंदला ओळखले.










त्यानंतर चौघांनी आपल्या सर्व गाई सोडून किल्ल्याबाहेर नेल्या. गोविंदने वाटेत कोठे ती कुरूप म्हातारी भेटेल, म्हणून पाहिले, पण ती भेटली नाही.

तिकडे राक्षसिणीची झोप मोडली. गोविंदचे अंथरूण जसेच्या तसे त्या खड्ड्यावर होते. ते पाहून तिला संशय आला. तिने गोठ्यात जाऊन पाहिले. गाई नव्हत्या. गोविंदच गाईंना सोडवून पळून गेला असावा असा विचार करून ती धावत धावत किल्ल्याबाहेर आली.

राजकुमार व गोविंद चौघांना म्हातारी राक्षसीण ओरडत होती ते ऐकू आले. ती मोठमोठी पावले टाकीत धावत जवळ येऊन पोचणार यात त्यांना शंका उरली नाही. गोविंदला कुरूप म्हातारीने दिलेल्या खड्यांची आठवण झाली. एक खडा टाकून 'समोर राक्षसिणीच्या वाटेवर काटेरी झाडे येऊन पडू देत' असे तो म्हणाला. काटेरी झाडांपलीकडे थोड्या कष्टाने का होईना राक्षसीण आली आणि घाईघाईने चालू लागली. ती जवळ पोचत आहे हे पाहून गोविंदने आणखी एक खडा फेकून 'आगीचे लोट राक्षसिणीच्या वाटेवर उभे होऊ देत?' असे म्हटल्याबरोबर आगीच्या लोटात म्हातारी राक्षसीण सापडली. विस्तव विझेपर्यंत तिला जागच्या जागी उभे रहावे लागले. गोविंदला व राजकुमारांना दूर निघून जायला पुष्कळ अवधी मिळाला.

परंतु पुन्हा राक्षसीण जवळ येऊन पोचलेली पाहून गोविंदने तिसरा खडा फेकून म्हटले–"मध्ये एक नदी होऊ दे." नदीला मोठा पूर आला. राक्षसीण नदी पार करण्याच्या प्रयत्नात नदीत बुडून वाहून गेली. संध्याकाळपर्यंत गोविंद व राजकुमार आपल्या गाईंना घेऊन सुखरूप येऊन पोचले. गोविंदच्या हुशारीबद्दल राजाने त्याला शाबासकी दिली व त्याला एक मोठे इनाम दिले.





# डोळे उघडले

कांचीपुरम् येथे एक वाणी रहात असे. त्याने व्यापारात कोट्यावधी रुपये मिळविले. त्याला लोक नवकुबेर म्हणत. त्याला मुले मुली पुष्कळ होती. त्याचे सर्व जांवई घरजांवई होते. त्याने त्यांना सुद्धां आपल्याच धंद्यात कामावर लावले होते. अशा तऱ्हेने त्याचा व्यापार खूप वाढला.

हा कुबेर लोभीपण तितकाच होता. त्याने दानधर्म केला नाही की देऊळ किंवा धर्मशाळा बांधण्यासाठी खर्च केला नाही.

एकदा एक बैरागी त्या धनकुबेराकडे आला. त्याने एक वेळचे जेवण वाढावे अशी विनंती केली.

"कोण रे चोरा तू? भामटा कुठला! तुला मरायला माझेच घर मिळाले का?" कुबेर म्हणाला.

"मी चोरच असतो तर तुझ्यासमोर हात पसरून भीक मागायला आलो असतो का?" बैराग्याने विचारले.

थोडा वेळ दोघांचे असेच बोलणे होत राहले. नंतर याच्याशी वाद घालण्यात वेळ घालविणे फुकट आहे असा विचार करून कुबेराने त्याला नोकरांकरवी बाहेर हाकलून लावले. बाहेर ढकलून लावले तरी बैराग्याने आपला हट्ट सोडला नाही. त्याला एक दिवसाचा शिधा मिळेपर्यंत मी तेथून जाणार नाही असे सांगून तो संध्याकाळपर्यंत घरासमोर हट्ट धरून बसून राहला.

"तू माझ्या दारासमोर उपाशी मेलास तरी मी तुला काही देणार नाही." कुबेर रागाने म्हणाला. बैरागी तीन दिवस व रात्री कुबेराच्या घरासमोर बसून राहला. कुबेराला त्याच्या नातेवाइकांनी, बैराग्याचा शाप भोवला नाही म्हणजे पुरे, म्हणून



समजावून सांगितले. कुबेर तरीपण घाबरला नाही. त्याने घराचे दार बंदच ठेवले. तो दुसऱ्याच एका दाराने येऊ जाऊ लागला. काही दिवसांनी बैरागी निघून गेल्याचे कुबेराच्या लक्षात आले. कुबेराला वाटले की आपणच जिकलो. परंतु दार उघडल्याबरोबर बैरागी पुन्हां येऊन बसला.

"हा बैरागी शनीसारखा माझ्या पाठीशी लागला आहे. विचारा तरी असं कां?" कुबेराने आपल्या नोकरांना असे सांगून पाठविले.

"मी तुझ्याकडे काही मागायला आलो नाही. तुझ्याजवळ मला काही बोलावयाचे आहे." बैराग्याने कुबेराला उलट निरोप पाठविला. कुबेराने सहा महिने मला कोणाला भेटायला वेळ नाही. तरी तसे जरूरी काम असेल तर सहा महिन्यांनी येऊन भेट, असे सांगून पाठविले. बैरागी निघून गेला व बरोबर सहा महिने झाल्यावर आला. तरी कुबेर त्याला भेटायचे टाळीत राहला. तो त्याला जितक्या दिवसांनी यायला सांगे तितक्या दिवसांनी बैरागी येऊन उभा राही. आतां बैरागी काय म्हणतो ते ऐकावेच लागणार असा विचार करून कुबेराने त्याला बोलाविले.

"मी एक वर्ष झाले, पाहतो आहे माया तुला काही पाहू देत नाही. तुझी बायको, मुले व बन्धुबांधव यांची माया तुझ्या नजरेवर पडदा घालून बसली आहे. डोळे उघडून पहा, सत्य तुला स्पष्ट दिसेल." बैरागी म्हणाला.

"आपल्या आत्मीयांना सोडून द्यायला सांगण्यासाठी, हा उपदेश करायला का तू इतके दिवस येत राहलास? तुझ्या उपदेशाची मला गरज नाही. मी काय करावे हे मला कळते." कुबेर म्हणाला.

"यांपैकी तुझा असा कोण आहे रे? तू मिळवितो आहेस तोंपर्यंत हे सर्व, मुंगळे गुळाला चिकटून असतात तसे चिकटून आहेत. तुझ्याजवळ पैसा नसेल तर कुत्रादेखील तुझ्याकडे फिरकणार नाही. पाहिजे तर मी तुला ही गोष्ट सिद्ध करून दाखवितो." वाणी त्या गोष्टीस कबूल झाला आणि बैरागी त्याला उपाय सांगितल्यावर निघून गेला.

त्यानंतर काही दिवसांनी कुबेराने, तो आजारी पडला असल्याचे सोंग केले. तो बायकोला म्हणाला—"मरण जवळ येऊन ठेपले आहे. इतके दिवस फुकट गेले. दानधर्म केला नाही, पुण्य कमाविले नाही. हे मरण आणखी एका वर्षाने आले असते तर काय बिघडले असते?" असे म्हणत त्याने एकदम डोळे फिरविले आणि अकडल्यासारखा पडून राहला. कुबेराची बायको घाबरून गेली. तिने वैद्याला बोलाविले. रोग काय आहे हे वैद्यालादेखील कळले नाही. तो निराश होऊन निघून गेला. कुबेर, बैराग्याने सांगितला होता तसा श्वास रोखून बसला होता.

त्याच्या घरी रोज अन्नसत्रच जणुकाही चालू होते. कारण त्याची नातेवाईक मंडळी शे दोनशे तरी त्याच्या घरी नेहमी रहात. सर्व कुबेराच्या चारी बाजूला घोळका करून रडू लागले. काही जण म्हणाले—"मोठ-



मोठी माणसे सुद्धा मृत्यूच्या जबड्यातून सुटत नाहीत."

बरोबर त्याच वेळी बैरागी तेथे आला. त्याने एका पेल्यात दूध घेऊन सर्वांना गप्प बसायला सांगितले. हा पुन्हां जिवंत व्हावा असे तुमच्या पैकी कोणाला वाटत असेल तर त्याने सांगावे. हे पहा औषध."

कुबेराची बायको वगैरे सर्व बैराग्याचे पाय धरून म्हणाले–"आमचे रक्षण करा. आपणच काय पाहिजे ते द्या. हे औषध देऊन यांना जिवंत करा."

"मूर्ख आहांत, मरण जवळ येऊन ठेपले की कोणतेच औषध उपयोगी पडत नाही. हे औषध तुमच्यापैकी को गी घेतलेत तर त्याला एका क्षणात मरण येईल, आणि औषध घेणाऱ्याचे उरलेले आयुष्य शेटजींना मिळेल. जो कोणी आपले उरलेले आयुष्य शेटजींना द्यायला तयार असेल त्याने हे औषध घ्यावे."

पण कोणी पुढे यायला तयार झाला नाही. सर्व जागच्या जागी बसून राहले. काही वेळ वाट पाहून बैराग्याने विचारले–"कोणी यांच्यासाठी आपले आयुष्य द्यायला तयार नाही तर?"

त्याला उत्तर मिळाले नाही.

"काय पण जग आहे, तुम्हां सर्वांना सुखी करण्यासाठी याने दानधर्म सुद्धा केला नाही आणि आज याच्यासाठी कोणी आपले प्राण द्यायला तयार नाही. फुकट रे तुझे हे वैभव कुबेरा!" बैरागी म्हणाला.

"बैरागी बुवा, माझे डोळे उघडले!" म्हणत उठून बसला. सर्व चकित होऊन त्यांच्याकडे पहात बसले. त्यानंतर कुबेराने आपल्या सर्व नातेवाईकांना घराबाहेर काढले आणि आपले धनदान धर्म करण्यासाठी खर्च करायला सुरवात केली. त्याने सर्व कामधंदा आपल्या मुलांच्या हाती दिला व स्वतः ईशचिंतनात पुढील आयुष्य घालवू लागला.






मध्यरात्रीची वेळ असेल, जरासंधाला आपल्या पाहुण्यांची आठवण झाली. तो यज्ञशाळेत जाऊन कृष्ण व भीमार्जुनांस म्हणाला–"आपण ब्रह्मचारी स्नातक म्हणवितां, पण ब्रह्मचारी गळ्यात फुलांच्या माळा घालीत नाहीत. त्या शिवाय तुमच्या खांद्यांला धनुष्याचे घट्टे पडलेले दिसत आहेत. तुम्ही नगराच्या मुख्य द्वारातून प्रवेश केला नाही. भुईकोट ओलांडून आलां आहां. यावरून तुम्ही ब्राह्मण वेषधारी क्षत्रिय असाल असे मला वाटते. मग माझा अंदाज बरोबर आहे की चुकीचा? तुम्ही कोणत्या हेतूने आलां आहां?"

ते ऐकून कृष्ण म्हणाला–"ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य तिन्ही वर्णांचे लोक ब्रह्मचारी व स्नातक असू शकतात. आम्ही क्षत्रिय स्नातक आहो. थोरां मोठ्यांच्या सांगण्याप्रमाणे मित्र व स्नेही असेल तर त्याच्या घरी समोरच्या दाराने प्रवेश करावा आणि शत्रूच्या घरी दार नसेल तेथून प्रवेश करावा. तू आमचा शत्रू आहेस, म्हणून आम्ही भुईकोट ओलांडून आलो. तुझ्याशी आमचा स्नेह वा मैत्री जमणे शक्य नाही हे माहीत होते. म्हणून आम्ही तुझी अर्घ्य आदिसह पूजा स्वीकारली नाही. आम्ही आपल्या शौर्याचा व पराक्रमाचा परिचय तुला देण्यासाठी आलो आहो."

जरासंध शांत आवाजात कृष्णाला म्हणाला–"पुष्कळ विचार करून पाहिला तरी तुमच्या विषयी मनात द्वेष किंवा राग



येतच नाही. मग मी तुमचा शत्रू कसा काय? निरपराध्याला शत्रू मानणे धर्मविरुद्ध नाही का?"

"एका थोर पुरुषाने आपल्या कुळातल्या एका धर्म कार्यासाठीच तुझ्याशी युद्ध करण्यास आम्हांला पाठवले आहे. कारणाशिवाय कित्येक राजांना कैदेत ठेवून दररोज एक या प्रमाणे भैरवासमोर बळी देणारा तू निरपराधी कसा होऊ शकशील? याहून मोठा अधर्म कोणता होऊ शकेल? तुझा वध करून त्या राजांची सुटका करण्यासाठी आम्ही आलो आहों. तुझ्यासारख्या कार्तवीर्य आदिकांची काय अवस्था झाली तुला माहीत नाही वाटते? तू सर्व राजांना कैदेतून मुक्त करून स्वतःचा प्राण वाचवायचा असेल तर वाचव, नाही तर आमच्याशी द्वंद्वयुद्धास तयार हो. मी कृष्ण आहे व हे दोघे भीमार्जुन आहेत." कृष्णाने स्पष्ट शब्दातच आपला परिचय दिला.

कृष्ण म्हणाला ते ऐकून जरासंधाच्या सर्व अंगाचा जळफळाट झाला. म्हणाला—"मी ज्या राजांना आपल्या शौर्यपराक्रमाने जिंकून कैदेत टाकले त्यांना तुमच्या धमक्यांवर सोडून देईन असे वाटले होय तुला? माझ्याशी युद्ध करायचे असेल तर ये आपले सैन्य घेऊन. नाहीतर तुमच्या पैकी कोणी माझ्याशी द्वंद्वयुद्धास येणार असाल तर या. मी तयार आहे."

त्यानंतर जरासंधाने त्याचा मुलगा सहदेव याला गादीवर बसविले आणि स्वतः द्वंद्वयुद्धास तयार होऊन आला.

"आमच्या पैकी तू कोणाशी द्वंद्वयुद्ध प्रथम करणार?" कृष्णाने विचारले.

जरासंधाला आपल्या शक्तीची घमेंड होती. म्हणून त्याने भीमाशी द्वंद्वयुद्ध करण्यास तयार असल्याचे सांगितले व दोघांचे द्वंद्वयुद्ध सुरू पण झाले. दोघांचे ते युद्ध दोघां मदोन्मत्त हत्तींचे युद्धच वाटले.

राजधानीतली प्रजा ते द्वंद्वयुद्ध पहायला जमा झाली. ते भयंकर द्वंद्वयुद्ध कार्तिक शुक्ल प्रतिपदेच्या दिवशी सुरू झाले. चतुर्दशीच्या दिवशी जरासंध दमून गेल्यासारखे दिसले. तेव्हां कृष्ण भीमाला म्हणाला—"भीमा! आजच जरासंधाचा वध करून टाक."

कृष्णाने ते सुचविताच भीमाचा उत्साह वाढला. त्याने जरासंधाला सहजी जमिनीवर पाडले आणि त्याचे दोन्ही पाय धरून त्याला उभा फाडून टाकले. पण जरासंधाचे विभागलेले दोन्ही भाग आपोआप सांधले गेले. तेव्हां कृष्णाने खुणेने एका काडीचे दोन तुकडे करून ते उलटे विरुद्ध दिशेला फेकून सुचविले की उजवा भाग डावीकडे टाकावा आणि डावा उजवीकडे टाकावा. भीमाने हुबेहूब तसेच केले. अशातऱ्हेने जरासंधाचा शेवट झाला.

त्यानंतर कृष्ण भीमार्जुनांना बरोबर घेऊन कैदखान्याकडे गेला आणि सर्व राजांना मुक्त केले. गिरिव्रजच्या सर्व ब्राह्मणांनी तिघांना खुल्या हृदयाने आशीर्वाद दिले. बंदीगृहातून सुटका केल्याद्दल सर्व राजांनी कृष्णाची स्तुती केली. कृष्ण त्यांना म्हणाला—"युधिष्ठिर राजसूय यज्ञ करीत



आहे. तुम्ही सर्वांनी त्याला मदत केली पाहिजे." सर्व राजांनी ते मान्य केले.

जरासंधाचा मुलगा सहदेव नवरत्नांनी भरलेला थाळ घेऊन पुरोहितांबरोबर त्यांच्या जवळ आला. कृष्णाने ती भेट स्वीकारून सहदेवाला मगधचा राजा म्हणून विधिवत् राज्याभिषेक केला. त्यानंतर कृष्ण जरासंधाच्या रथात भीमार्जुनासह बसून बंदीमुक्त झालेल्या राजांना बरोबर घेऊन इंद्रप्रस्थ नगरी परत आला. तो युधिष्ठिराला म्हणाला—"ईश्वर कृपेने तुझे दोघे भाऊ सकुशल परत आले आहेत. मल्लयुद्धात भीमाच्या हाती जरासंधाचा वध झाला आणि



हे सर्व राजे बंदीमुक्त झाले." युधिष्ठिराने सर्व राजांना आदरपूर्वक त्यांच्या त्यांच्या राज्यात जाण्यास निरोप दिला. कृष्णाने युधिष्ठिराचा निरोप घेतला व तो जरासंधाच्या रथात बसून द्वारकेला निघून गेला.

पुढे काही दिवसांनी अर्जुन युधिष्ठिराला म्हणाला–"माझ्या जवळ अद्वितीय असे गांडीव धनुष्य आहे व अग्नीने दिलेला रथ व अमोघ अस्त्रे आहेत. मी दिग्विजय करून अपार धन आणावे म्हणतो, म्हणजे आपला राजकोष अखंड होईल.

ते ऐकून युधिष्ठिराला आनंदच झाला. त्याने दिग्विजयास प्रारंभ करण्यासाठी एक मुहूर्त ठरविला. त्या सुमुहूर्तावर उत्तरेकडे अर्जुन, पूर्वेकडे भीम, दक्षिणेकडे सहदेव व पश्चिमेकडे नकुल अनुक्रमे दिग्विजयासाठी निघण्याची सर्व तयारी झाली. युधिष्ठिराने इंद्रप्रस्थ नगरी राहून राज्य व्यवस्था पहावी असे ठरले.

अर्जुन उत्तरेकडे ससैन्य निघाला. सर्वात प्रथम त्याने पुलिंद राजाला जिंकले व त्यानंतर क्रमाने आनर्त, कालकूट, कुलिंद व सुमंडलच्या राजांना जिंकले. शाकल द्वीपाचा राजा महा पराक्रमी प्रतिविंध अर्जुनाशी युद्ध करीत असता हारला. प्राग्ज्योतिषपुरचा राजा भगदत्त याच्या मदतीला रानटी जातीचे प्रमुख पण होते. म्हणून आठ दिवस युद्ध झाले आणि शेवटी मोघांनी मैत्रीपूर्ण संधी संधी करून घेतली.

अर्जुन भगदत्ताला म्हणाला–"माझ्या वडील बंधूंनी राजसूय यज्ञ करून एक मोठे साम्राज्य स्थापन करण्याचे ठरविले आहे. त्यासाठी अपार धन एकत्र करणे आवश्यक आहे. तुझ्या कडून मोठ्या प्रमाणावर धन मिळण्याची अपेक्षा आहे. या व्यतिरिक्त कोणत्याही वस्तूची गरज नाही." भगदत्ताने अर्जुनाला पुष्कळ धन देऊन आणखी काही हवे आहे का असे विचारले.

अर्जुन अशा तऱ्हेने अनेक राज्यें जिंकीत नजराणे घेत पुढे निघाला. किंपुरुष, गंधर्व इत्यादिकांचा पराभव करून उत्तर कुरु देशाच्या हरिवर्ष नामक राज्यात पोचला तो ते राज्य जिंकण्याच्या विचारात होता परंतु त्या देशाचे द्वारपालक म्हणाले–"तुला हे राज्य जिंकता येणार नाही. म्हणून तू परत जा." द्वारपालक शूर आणि विशाल देहधारी होते. त्यांनी आपल्या नगराचे वर्णन या शब्दात केले–"या नगरात जो कोणी प्रवेश करतो त्याला काही दिसेनासे होते. मानव शरीर धारण करून या नगरात प्रवेश करणे शक्य नाही. म्हणून तुला काय हवे असेल ते सांग, आम्ही तुला देतो."

"युधिष्ठिर महाराज राजसूय यज्ञ करून साम्राज्य स्थापन करणार आहेत. त्यासाठी देणगीची आवश्यकता आहे." अर्जुन द्वारपालकांना म्हणाला. ते ऐकून द्वारपालक अपार धन, रत्नांच्या राशी, निरनिराळ्या प्रकारची लोकरी वस्त्रे, चित्रविचित्र प्रकारच्या हरणांची कातडी घेऊन आले व त्यांनी अर्जुनाला या सर्व वस्तूंचा नजराणा दिला.

अशा तऱ्हेने अर्जुन उत्तरेकडील सर्व देश जिंकून इंद्रप्रस्थ नगरी परतला आणि तो जी



संपत्ति घेऊन आला होता, त्या संपत्तीने राज्याचा सर्व खजिना भरला.

पूर्व दिशेला भीम गेला होता. पांचाल देशाच्या राजाने त्याचा सत्कार केला. मिथिलेच्या राजाला त्याने जिंकले. दशार्णचा राजा सुधन्वा याच्याशी युद्ध करून त्याच्या शौर्याची प्रशंसा केली आणि त्याला आपला सेनापती नेमला. त्यानंतर तो रोचमान आणि त्याच्या बंधुबांधवांचा पराभव करून आणि पुलिंद, सुकुमार, सुमित्र आदिकांना जिंकून चेदि देशात येऊन दाखल झाला.

चेदि देशाचा राजा शिशुपाल, युधिष्ठिर साम्राज्य स्थापनेसाठी राजसूय यज्ञ करीत

      





असल्याचे ऐकून खूष झाला आणि त्याने भीमाला काही दिवस आपले आतिथ्य स्वीकारण्यास आग्रह केला. त्याने भीमाला निरोप देताना अपार धन देऊन त्याच्याशी सख्य करून घेतले.

भीम तेथून अनेक राज्यं जिकीत मगध देशात आला. मगध देशाचा राजा सहदेव याच्याकडून एक मोठा नजराणा घेऊन त्याने त्याच्या मदतीने पौंड्रिक वासुदेव व अनेक राजांचा पराभव केला. शेवटी समुद्र किनाऱ्याची राज्यं जिकून सोने, चांदी, मोती, चंदन इत्यादि घेऊन इंद्रप्रस्थ नगरी आपल्या सैन्यासह परतला.

दक्षिणेकडे सहदेव शूरसेन, मत्स्य, निषाद आदिकांचा पराभव केला आणि मामा कुंतिभोज यांना भेटून त्यांच्याकडून पुष्कळ धन घेतले. त्यानंतर अनेक लहान थोर राजांचा पराभव करून माहिष्मतिपुर येथे आला. तेथे नील नावाचा राजा राज्य करीत होता, त्याच्याशी युद्ध करीत असतां सहदेवाचे सैन्य जळू लागले. ते पाहून सहदेव चकित झाला.

सहदेवाचे सैन्य जळू लागले त्याचे कारण होते. एकदा माहिष्मतीचा राजा नील याने आपल्या मुलीला अग्नीच्या सेवेला नेमले. तिचे सौंदर्य पाहून अग्नि ब्राह्मणाचे रूप घेऊन प्रगट झाला. दोघांना एकत्र पाहून नीलने ब्राह्मण वेषधारी अग्नीला दंड दिला. तेव्हां अग्नीने स्वत:चे रूप दाखविले. नीलने अग्नीसमोर साष्टांग नमस्कार घालून त्याची क्षमा मागितली आणि अग्नीशी आपल्या मुलीचा शास्त्रोक्त विधीने विवाह करून दिला. त्याने अग्नीकडून एक वर मिळविला की त्याला किंवा त्याच्या राजधानीला शत्रूचे भय नसावे. त्या दिवसापासून माहिष्मती नगरीवर कोणी स्वारी केली की अग्नी मदतीला धावून येई.

सहदेव दर्भासनावर बसला आणि होम करून अग्निनारायणाची स्तुती केली. म्हणून अग्नीने प्रसन्न होऊन सहदेव व नील यांची परस्पर ओळख करून दिली आणि त्याला पुष्कळसे धन दिले.

त्यानंतर सहदेव दक्षिणेकडे निघाला. कलिंग, ओड्र, आन्ध्र, केरळ इत्यादि देशांच्या राजांकडे आपले दूत पाठवून त्याने त्यांना वश करून घेतले. समुद्रतीरी बिभीषण राज्य करीत होता त्याच्याकडून धन घेऊन इंद्रप्रस्थ येथे परत आला.

पश्चिम दिशेकडे नकुल गेला होता. त्याने रोहतक देशाचा राजा मयूर याचा पराभव केला आणि तेथून शैरीषक आणि महेत्थ देशांकडे निघाला. हे देश जिंकून दशार्ण, शिबि, त्रिगर्त, अंबष्ठ आणि मालव देशांवर चालून गेला. तेथील राजे त्याच्याशी युद्धात हारले. तेथून अनेक देश जिंकीत तो द्वारकेजवळ आला आणि तो येऊन पोचल्याची बातमी कृष्णाला कळविली. तेथून तो मद्र देशात आला, तेथून शाकलपूर जाऊन त्याचे मामा शल्य यास राजसूय यज्ञ आरंभिल्याची वार्ता सांगितली. शल्य राजाने आनंदित होऊन पुष्कळसे धन, सोने आणि वाहनादि सहदेवाला दिले. त्यानंतर नकुलने समुद्रालगतच्या अनेक राजांना जिंकले. वरुणाचे राज्य व त्यापूर्वी कृष्णाने ज्या ज्या राजांचा पराभव केला होता त्यांचा पुन्हां पराभव केला. अशा तऱ्हेने अलोट धन घेऊन तो इंद्रप्रस्थ नगरी परत आला.

चौघे भाऊ चतुर्दिक् दिग्विजय करून अलोट धन व संपत्ति घेऊन आले. म्हणून युधिष्ठिर वरुण आणि कुबेर दोघांहून जास्त वैभवशाली झाला. युधिष्ठिराने राजसूय यज्ञ सुरू करण्याचा निश्चय केला. युधिष्ठिराचा हेतू ओळखून मंत्र्यांनी राजसूय यज्ञ प्रारंभ करण्यास त्याला प्रोत्साहन दिले.





# तीन यक्षिणी

[२]

आपला मुलगा जिवंत घरी आलेला पाहून राजाला फार आनंद झाला. तेव्हां राजा मंगलला म्हणाला—"मंगल, तुझे माझ्यावर फार उपकार झाले. तुझे हे ऋण मी कसे काय फेडू शकेन, कोणास ठाऊक? तू काय वाटेल ते मागून घे. मी शक्यतोवर तुझी इच्छा पुरी करीन."

मंगलने आपल्या कपड्यातून एक भांडे काढले आणि राजाला म्हणाला—"महाराज! मला अशाच तऱ्हेची आणखी अकरा भांडी पाहिजेत."

"ते शक्य नाही मंगल!" राजा म्हणाला.

"तर मग मला आणखी काही नको." असे सांगून मंगल आपल्या घोड्यावर बसून निघून गेला. काही दिवसांनी तो समुद्रकाठच्या एका शहरात येऊन पोचला आणि एका घरी गेला.

घराचा मालक म्हणाला—"मुला, आम्ही तुझे आतिथ्य करू शकणार नाही. आम्ही स्वतःच उपाशी आहो. या गावात तुला मूठभर तांदूळ सुद्धा कोणी घालणार नाही. या देशात दुष्काळ पडला आहे."

"मी तुमच्याकडे काही मागायला आलो नाही." असे म्हणत मंगलने आपला पंचा अंथरला आणि त्यावर जादूची छडी मारून म्हणाला—"जेवण वाढ!" लगेच ताटे वाढून समोर आली. मंगल म्हणाला—"घरातल्या सर्वांना जेवायला बोलवा." मंगलच्या कृपेने घरातल्या सर्व लोकांची पोटे भरली.

"या गावात दुष्काळ पडण्याचे कारण काय?" मंगलने विचारले.

"आमच्या गावात नागरिकांना पुरेल एवढे धान्य उत्पन्न होत नाही. म्हणून आम्ही



समुद्रपारच्या देशातून अन्न मागवितो. परंतु काही दिवसांपूर्वी एका अदृश्य व्यक्तीच्या हाताने आमचे अन्न आणणारे जहाज पाण्यात बुडविले. म्हणून अन्नाचा दुष्काळ आहे. काय करावे, सुचत नाही." घरमालक म्हणाला.

"काय करायचे हे मी सांगेन. मला माहीत आहे. तुम्ही मला आपल्या राजाकडे घेऊन चला!" मंगल म्हणाला. घर मालक मंगलला राजाकडे घेऊन गेला.

मंगल दरबारात पोचताच राजाला म्हणाला–"महाराज, मी आपली धान्याची जहाजे सुरक्षित आणून पोचती करतो. त्या बद्दल आपण मला काय द्याल?"

राजा म्हणाला–"तू मागशील ते देईन!"

मंगल चाळीस गलबते धान्य भरून घेऊन येत असता एकाएकी एक हात पाण्यातून वर आला. मंगलने तो हात धरून ओढला. तो हात पाण्यात परत बुडला, पण हातातले सोन्याचे कडे मंगलच्या हातात आले.

त्यानंतर सर्व गलबते सुरक्षितपणे किनाऱ्याला लागली. दुष्काळ संपला व सर्व लोक सुखी झाले.

राजा मंगलला म्हणाला–"मंगल, तुला जे हवे ते, मागून घे! तुला काय पाहिजे?"

मंगलने आपल्या कपड्यांतून एक भांडे काढून दाखविले व म्हणाला–"असली आणखी अकरा भांडी पाहिजेत, महाराज!"

"मी आपले सर्व राज्य विकून टाकले तरी असले भांडे मिळणार नाही. तू माझ्या मुलीशी लग्न करायला तयार असशील तर मी करून देईन. तू सर्व राज्य मागून घेतलेस तरी देईन, पण असली अकरा भांडी कोठून आणून देऊ?" राजा म्हणाला.

"मला असली भांडीच पाहिजेत. दुसरे काही नको. माझे चाळीस भाऊ तुरुंगात पडले आहेत. त्यांच्या आठवणीने मला झोप सुद्धा लागत नाही." मंगल म्हणाला.



मी तुला एका गोष्टीची मदत करू शकेन. तू उद्यां सकाळी मला येऊन भेट." असे सांगून राजाने मंगलला पाठवून दिले. नंतर आपल्या जहाजांच्या प्रमुखाला बोलावून म्हणाला–"तुला यक्षकन्या जेवतात तो प्रदेश माहीत आहे का?"

"माहीत आहे महाराज!" नौकादलाचा प्रमुख म्हणाला.

"उद्या मंगलला आपल्या बरोबर घेऊन जाऊन तो प्रदेश दाखव." राजाने आज्ञा केली. दुसऱ्या दिवशी मंगल आल्यावर त्याला म्हणाला–"मी तुला यक्षकन्या जेवतात तो प्रदेश दाखवायला व तुला त्या देशात पोचवायला मदत करतो. तू तेथे गेलास तर तुला त्यांच्याकडून, तू मागतोस तशी भांडी मिळू शकतील."

मंगल आपला घोडा त्याच गावी सोडून राजाच्या नौकादलाच्या प्रमुखाबरोबर निघाला. सात दिवस प्रवास केल्यावर तो समुद्रपार पोचला. नौकादलाच्या प्रमुखाने मंगलला दूर दिसणारा एक किल्ला दाखविला व म्हणाला–"समोर दिसतो तोच यक्षिणीचा किल्ला आहे."

मंगल किनाऱ्यावरून उतरून किल्ल्यात गेला. किल्ल्यात एक म्हातारा सैपाक करीत होता. सैपाक्याने मंगलला पाहून



विचारले—"कोण रे बाबा तू? यक्षिणी येण्याची वेळ झाली आहे. त्यांनी तुला पाहिले तर तुझा जीव व्यर्थ धोक्यात पडेल. म्हणून तू त्या पडद्याआड लपून बस!" सैपाक्याने मंगलला पडदा दाखवीत म्हटले.

थोड्या वेळाने यक्षिणी येऊन पोचल्या. त्यांना पाहताच सैपाक्याने विचारले—"सैपाक तयार आहे, वाढू का?"

तिघींनी होकार दिल्यावर सैपाक्याने त्यांचे जेवण वाढून सर्व तयारी केली. यक्षिणी जेवायला बसल्या.

एक यक्षिणी म्हणाली—"मी त्या चाळीस चोरांना सात वर्षे पाणी मिळणार नाही याची व्यवस्था केली. पण तेवढ्यात एका तरुण मुलाने माझा हात धरला. आपला हात सोडवून घेण्यासाठी मला भांड्याने त्याला मारावे लागले. तो कोणी धाडसी तरुण होता."

दुसरी यक्षिणी म्हणाली—"माझ्या हातातला मंत्रदंड बळकावून त्या तरुणाने राजकुमाराला जिवंत केले. तो खरोखरच फार मोठा धाडसी दिसतो, खरा!"

तिसरी यक्षिणी म्हणाली—"माझ्या हातातून सर्व गलबते सोडवून त्याने धान्य किनाऱ्याला पोचते केले. मग तो कमी धाडसी कसा असणार?"

मंगल इतका वेळ पडद्याआडून ते सर्व ऐकत होता. बाहेर येऊन म्हणाला—"तो तरुण तुमच्या समोर येऊन उभा राहीला तर?"

"तो मागेल ते आम्ही देऊ!" तिघी म्हणाल्या.

दुसऱ्या क्षणाला तिघींनी त्याला ओळखले व चकित होऊन त्याच्याकडे पहात राहल्या. नंतर त्याला आपल्या बरोबर जेवायला बसायला सांगून म्हणाल्या—"पहिल्याने तू आमच्याबरोबर जेव तर!"

(पुढल्या अंकात संपूर्ण)



## ...लणारा दगड

ब्यूनोस एरिस (अर्जेन्टिना) नगराच्या दक्षिणेकडील डोंगराळ प्रदेशात हा विचित्र दगड आहे. याचे वजन ७०० टन आहे. तरी कोणी त्याला हलविला की तो हालतो. पाऊस किंवा वारा लागून हा तुळतुळीत झाला आहे व त्यामुळे हा दगड समतोल राहला आहे.



# अमरवाणी

परोपकाराय फलंति वृक्षा:,
परोपकाराय वहंति नद्य:,
परोपकाराय चरंति गाव:,
परोपकारार्थ मिदं शरीरं... ॥ १ ॥

[परोपकारार्थ झाडांना फळे लागतात, परोपकारार्थ नद्या वाहतात आणि परोपकारार्थ गाई चरतात. तसाच परोपकारार्थच हा मानव देह आहे.]

श्रोत्रं श्रुतेनैव न कुंडलेन,
दानेन पाणि र्नतु कंकणेन,
विभाति काय: करुणापराणां
परोपकारेण न चंदनेन... ॥ २ ॥

[चांगल्या व शुभ गोष्टी श्रवण करण्यात कानांची शोभा आहे, कुंडले घालण्यात नाही, हातांची शोभा दान करण्यात आहे, सोन्याचे कंकण धारण करण्यात नाही, दयाशील माणसाच्या देहाचे थोरपण परोपकार करण्यात आहे, चंदनाचे लेप लावून बसण्यात नाही.]

पद्माकरं दिनकरो विकचं करोति;
चंद्रो विकासयति कैरवचक्रवालं;
नाभ्यर्थितो जलधरोपि जलं ददाति;
सन्त: स्वयं परहिते विहिताभियोगा: ॥ ३ ॥

[सूर्य कमळांचे सरोवर विकसित करतो. चंद्र कुमुदपुष्पे विकसित करतो. ढग सर्वांना पाणी देतो अशाच प्रकारे चांगल्या स्वभावाचे लोक स्वत:च परोपकार करतात.]



# अडाण्या अटी

एका गावी दगडू नावाचा एक गरीब शेतकरी रहात असे. तो खूप काबाड कष्ट करून मेहनत करी, परंतु त्याला पोट भर खायलादेखील मिळत नसे. म्हणून त्याने मोठ्या शहरात जाऊन थोडी मेहनत केल्यास थोडी फार तरी शिल्लक उरेल व ती पुष्कळ जमली की शेत विकत घेऊन राहता येईल असा विचार केला.

म्हणून तो दुसऱ्या दिवशी शहरात कामाच्या शोधार्थ निघाला. परंतु त्याला कोठे काम मिळेना. शेवटी हताश होऊन तो एका वाण्याच्या दुकानासमोर दम घ्यायला बसला. दुकानदाराने दगडूला विचारले— "कोण रे बाबा तू? काय पाहिजे तुला?"

दगडूने त्याला कामाच्या शोधार्थ निघाला असल्याचे सांगितले.

दुकानदाराला एका नोकराची गरज होती. परंतु त्याच्याकडे कोणी नोकर टिकत नसे. त्याच्या अटी पुऱ्या करतां करतां प्रत्येक नोकर दमून नोकरी सोडून निघून जाई. म्हणून दुकानदाराने, हा मनुष्य खेडेगावातून आलेला दिसतो आहे, काही दिवसतरी टिकेल, असा विचार करून दगडूला म्हटले—"हे पहा, मला माझ्या घरी व दुकानात काम करणाऱ्या नोकराची गरज आहे. तू तयार आहेस का?"

"पगार काय द्याल धनी?" दगडूने विचारले.

"तू वर्षभर काम केलेस तर दोनशे रुपये देईन. दोन वेळ पान भरून वाढत जाईन. पण माझी एक अट आहे. तू मध्येच नोकरी सोडून निघून गेलास तर तुला कवडीदेखील मिळणार नाही. या उलट तुला मी काढले तर दुप्पट पगार देईन. तुला ही अट मान्य असेल तर आजपासूनच कामावर लाग." वाणी म्हणाला.



दगडूने दुकानदाराच्या अटी मान्य केल्या आणि नोकरीला लागला. सकाळी घर व आंगण झाडणे, झाडांना पाणी घालणे, मालकाच्या मुलांना खेळवणे, नंतर दुकानात जाऊन दुकानदाराला घरी जेवायला पाठविणे, दुकानदार परत येईपर्यंत गिऱ्हाइकांना सामान विकणे आणि दुकानदार आला की घरी जाऊन जेवणे असे काम होते.

पहिल्या दिवशी सर्व काम करून दगडू जेवायला बसला तेव्हां वाण्याच्या बायकोने भात पत्रावळभर पसरून वाढला आणि वर थोडे वरण वाढले. दगडू वाढण्याची ती रीत पाहून चकितच झाला. आणखी मागून घ्यायला त्याला लाज वाटली. वाढलेला तेवढा भात खाऊन काही बोलल्या-शिवाय तो कामावर निघून गेला.

असेच दोनतीन दिवस गेले. परंतु पुढे मात्र दगडूला ते पसंत पडले नाही. वाण्याला म्हणाला–"धनी! मला खायला पोटभर मिळत नाही."

त्यावर दुकानदार रागावून म्हणाला–"मी आपल्या अटीप्रमाणे तुला पान भर वाढून द्यायला सांगितले आहे. तुला काम पसंत नसेल तर तू आपली वाट धर."

दगडूला ते ऐकून राग आला. त्याने केरसुणी घेऊन एका बाजूचा केर दुसऱ्या बाजूला व दुसऱ्या बाजूचा पुन्हा पहिल्या बाजूला लोटला. नंतर त्याने भांडी घासताना जोरजोराने आपटली. भांड्यांना पोचे पडले. त्यानंतर मुलांना खेळवायला म्हणून मुद्दाम उंच सखल व खडबडीत जमिनीवर घेऊन गेला. मुले पडली झडली. धाकटा मुलगा पडल्याबरोबर रडू लागला. तेव्हां दगडू मुलांना घरी घेऊन आला व मालकिणीला म्हणाला–"बाई, मुले रडताहेत हो!"

"अरे, एवढ्यात? अजून सैपाकाचे सर्व काम जसेच्या तसेच आहे. जाऊन आणखी काही वेळ खेळव." असे सांगून मालकिणीने मुलांना खायला खाऊ देऊन त्यांना समजावून पुन्हां पाठवून दिले.

दगडू मुलांना बाहेर घेऊन गेला. त्यांच्या हातातले खायला दिलेले सर्व खाऊन टाकले आणि मुले फार रडू लागल्याचे सांगून त्यांना घरात ठेवले आणि दुकानात निघून गेला. दुकानदार घरी जेवायला गेला तेव्हां दगडू गिऱ्हाइकांना माल देण्याचे काम करू लागला. त्याने खाण्यासारखे जे मिळाले ते खातखात गिऱ्हाइकांना स्वस्तात सामान विकले.

दुकानदार, खाऊनपिऊन दुकानात आला तेव्हां दगडू जेवायला घरी गेला. त्याने तीन पत्रावळी जोडून एक मोठी पत्रावळ तयार केली आणि ती समोर ठेवून मालकिणीला वाढायला सांगितले. मालकीण ती मोठी पत्रावळ पाहून चकित झाली. पण काही बोलली नाही. तिने पत्रावळभर भाताची शिते पसरून वाढली. दगडूने चार घास खाऊन उरलेली शिते व पत्रावळ कुत्र्या समोर टाकली.

त्या दिवशी रात्री मालकिणीने नवऱ्याला दगडूच्या मोठ्या पत्रावळीची गोष्ट सांगितली. रात्री दगडू पुन्हां जेवायला बसला तेव्हां वाणी म्हणाला–"तुला इतक्या मोठ्या पत्रावळीवर जेवायला वाढणार नाही, समजले!"

"मालक! आपल्या अटीत पत्रावळ लहान किंवा मोठी असे काही नव्हते. पाहिजे तर चार मोठ्या लोकांना बोलावून या गोष्टीचा निवाडा करून घ्यावा." दगडू म्हणाला. दुकानदाराने, या सर्व गोष्टी





बाहेर आल्या तर त्याचीच मान खाली होईल, असा विचार करून ती गोष्ट पुन्हां काढलीच नाही, गप्प राहिला.

दगडू एक बालडीभर पाणी काढून तेवढेच सर्व झाडांवर शिंपून बाकी कामाला लागे. हळूहळू झाडे वाळू लागली.

"अरे दगडू सगळी झाडे वाळून चालली आहेत, झाडांना तू पाणी घालीत नाहीस का?" मालकाने नोकराला विचारले तेव्हां दगडूने झाडाखालची माती ओली असल्याचे दुकानदाराला दाखविले.

दुकानदार दगडूचे काम पाहून कंटाळला. त्याला काढून टाकण्याचा विचार त्याच्या मनात दोनतीनदा आला. परंतु आपण [illegible] काढले तर [illegible]प्रमाणे दुप्पट रुपये मोजावे लागतील, असा विचार करून तो काहीच बोलला नाही.

त्याच सुमारास दुकानदाराच्या मेहुण्यासाठी मुली पहायला सासुरवाडहून आग्रहाचे पत्र आले. दुकानदाराने नोकर बरोबर असला तर बरे, असा विचार केला. दुकानदाराच्या बायकोने नवऱ्यासाठी पोळ्या करून दिल्या आणि नोकरासाठी भाकऱ्या भाजून दिल्या. दुकानदार घोड्यावर बसून निघाला व दगडू पायीच निघाला.

दगडू मागे मागे चालत होता. त्याने पोळी भाजी खाऊन टाकली. दुपारच्या सुमारास दोघे एका तलावाजवळ येऊन पोचले. दुकानदार हात धुवायला गेला तेव्हां दगडूने भाकऱ्यांचे गाठोडे सोडून घोड्यासमोर ठेवून दिले आणि ते आपल्या गावीच नाही अशातऱ्हेने स्वतः दुसरीकडे पहात बसला.

दुकानदार परत येऊन दगडूवर ओरडला– "अरे पहात कोठे आहेस? घोड्याने सर्व पोळ्या फस्त केल्या आणि भाकऱ्या खाऊ लागला आहे. काय करीत होतास रे?"

"माफ करा मालक! चुकलो. थोड्या भाकऱ्या उरल्या आहेत त्या दोघे वांटून खाऊ या." दगडू म्हणाला.

"मूर्ख! मी खाऊ म्हणतोस या भाकऱ्या?" दुकानदार जास्तच संतापून म्हणाला।

ते ऐकून [illegible] म्हणाला– "मालक! मी घोड्यावर पुढे जाऊन आपल्या जेवणाखाण्याची व्यवस्था करतो. आपण सावकाश पाठीमागून येता का?"

दुकानदार त्या गोष्टीस कबूल झाला. दगडू पुढे जाऊन दुकानदाराच्या सासुरवाडच्या लोकांना म्हणाला–"मालक येत आहेत पाठीमागून. नुकतेच आजारातून उठले ते. वैद्याने पथ्य सांगितले आहे, बाजरीच्या भाकरी खायला. हे कळवायला मुद्दाम मला पुढे पाठविले आहे."

दुकानदाराच्या सासऱ्याला जांवई आजारातून उठून आल्याचे ऐकून फार वाईट वाटले. उगीच त्रास दिला त्यांना. दगडू परत जाऊन मालकाला म्हणाला– "जेवणाखाण्याची उत्तम सोय करून ठेवायला सांगून आलो आहे."

सासुरवाडी पोचताच सर्व मंडळी जांवईबापूंच्या तब्येतीविषयी चवकशी करू लागली. पण दुकानदाराला ते सर्व कळेना व तो ठीक आहे, असे सांगून गप्प बसला. तो जेवायला बसला तेव्हां त्याला झुणका व बाजरीची भाकरी वाढली. परंतु असे कां झाले, हे त्याला कळेना. त्याला भूक लागली होती, म्हणून जे समोर आले ते खाऊ लागला. परंतु रात्री पोटात दुखू लागले व रात्रभर झोप लागली नाही.

दगडू मालकाला म्हणाला–"मालक! जेवयाला कोणी झुणका भाकर का सासुरवाडी वाढतात?" दुकानदाराला सासुर-



वाडच्या लोकांची ती वागणूक पाहून फार राग आला. तो मेहुण्याच्या लग्नाविषयी जास्त काही बोलल्याशिवाय आपल्या घरी निघून गेला.

दोघे गावानजीक पोचले असतील तेव्हां मालक दगडूला म्हणाला–"दगडू! तू पुढे जाऊन घरात आंघोळीसाठी पाणी तापवून ठेवायला सांग."

दगडू धावतच पुढे गेला आणि रडण्याचे सोंग करून मालकिणीला म्हणाला–"बाई साहेब! मालकांच्या मानेवर भूत बसल्या-सारखे झाले आहे. ते येतील तेव्हां काहीतरी भूत उतरवायचा उपाय केला पाहिजे." मालकिणीला दगडू जे काही म्हणाला ते सर्व खरे वाटले.

त्यानंतर दगडू मालकाकडे धावत परत येऊन रडत म्हणाला–"मालक, काय सांगू? आपण घर सोडले त्याच दिवशी माल-किणीच्या मानेवर एक भूत बसले. त्यांचे भूत उतरवायला चिंचेच्या फांदीने किंवा केर-सुणीने झोडपण्याशिवाय दुसरा उपाय नाही."

[illegible] वाटले आणि घरी आल्याबरोबर तो केसुणीने मालकिणीला झोडपूं लागला. मालकिणीने पण केरसुणी घेऊन नवऱ्याला मारायला सुरवात केली. ती गडबड पाहून शेजार पाजारची मंडळी जमा झाली. सर्व विचारू लागले–"अहो, झाले तरी काय?" चवकशी करतां खरी गोष्ट बाहेर पडली.

दगडूने सर्वांसमक्ष आपली चूक कबूल केली व म्हणाला–"हे सर्व काम माझे आहे. भुकेने कावलेला मनुष्य काय करू शकतो, हे मालकाला कळावे म्हणून मीच हा सर्व उपद्व्याप केला."

गावकऱ्यांनी दगडूचे म्हणणे ऐकल्यावर दुकानदारालाच सर्व प्रकारे दोषी ठरविले. दुकानदाराने दगडूला नोकरीवरून काढून टाकण्याचे ठरवून त्याला अटीप्रमाणे चारशे रुपये देऊन टाकले. दगडूने पैसे नेऊन थोडी जमीन विकत घेतली. त्याचे पुढील आयुष्य सुखाचे झाले.






# शिलारथ

[४]

[ खड्गवर्मा आणि जीवदत्त यांचा वध करण्याचा प्रयत्न महेंद्रनगरचा राजकुमार व त्याच्या मित्रांनी केला होता. पद्मपूरचा राजा व त्याचा मंत्री यांच्या परवानगीने खड्गवर्मा व जीवदत्त दोघांनी महेंद्रनगरच्या मंत्र्यांच्या मुलाचा मृत देह आणि पाय कापला गेल्याने अपंग झालेल्या राजकुमार प्रतापचंद्रला एका बैलगाडीत घातले आणि जंगलात निघून गेले. पुढे–]

सूर्योदयापूर्वी खड्गवर्मा आणि जीवदत्त वृद्ध गुराख्याच्या झोपडीजवळ येऊन पोचले. त्या झोपडीपर्यंत जंगलांत बैलगाडी घेऊन जाणे जीवदत्तला बरोबर वाटले नाही. कारण झोपडीजवळ बैलगाडी दिसली तर म्हाताऱ्यावर विनाकारण संकट येईल, असा त्याने विचार केला.

त्या झोपडीपासून पुष्कळ दूर बैलगाडी थांबवून जीवदत्त खड्गवर्माला बरोबर घेऊन गेला. दोघे गाडीतून उतरून एका झाडाखाली जाऊन उभे राहले. चारी बाजूला दाट काळोख होता. दूर कोठून तरी हिंस्र श्वापदांचे ओरडणे ऐकू येत होते.

"खड्गवर्मा, आपण पुढे काय करायचे याचा नीट विचार करूनच पुढे पाऊल टाकलेले बरे! महेंद्रनगरच्या त्या दोघां दुष्टांच्या मूर्खपणाने आपण दोघे उगाच फसलो आहो. आपण प्रत्येक पाऊल फार



काळजीपूर्वक पुढे टाकले पाहिजे." जीवदत्त म्हणाला.

"बुरखेवाला तो तिसरा मनुष्य तुझ्या निष्काळजीपणामुळेच निसटला. त्याला एकटा सोडून देऊन तू आवाराच्या भिंतीकडे धावलास हे बरोबर झाले नाही. त्याला पकडले असतेस तर आपल्याला असे अडकून रहावे लागले नसते. त्याने महेंद्रनगरला जाऊन सर्व काही आपल्या राजाला सांगितले असावे." खड्गवर्मा म्हणाला.

"मला पण तेच वाटते आहे. आता कदाचित पद्मपूरचे महाराज आणि महेंद्र-नगरचा राजा आपसातले वैर वाढू नये यासाठी आपल्याला अटक करून कैदेत डांबून ठेवतील. आपण विनाकारण या संकटात सापडलो आहो." जीवदत्त म्हणाला.

"जीवदत्त! तू म्हणालास ते अगदी बरोबर आहे. तर मग आपण ती बैलगाडी आहे तेथेच सोडून देऊन त्यातला तो मृतदेह आणि तो लंगडा दोघांना त्यांच्या त्यांच्या नशिबावर सोडून देऊन उजाडण्या-पूर्वी या राज्याच्या सीमेबाहेर पळून जाऊ या." खड्गवर्माने सुचविले.

"खड्गवर्मा, एका मेलेल्या माणसाला व असहाय लंगड्याला आपण त्यांच्या नशिबा-वर या दाट जंगलात सोडून जावे म्हणतोस?" जीवदत्तने विचारले.

जीवदत्त अजून बोलतच होता, इतक्यात एक काळी आकृती जवळ येऊन बेताच्या हळू आवाजात म्हणाली–"तुम्ही का! घंटांचा आवाज ऐकून मी झोपडीबाहेर, कोण आहे, पहायला आलो."

दोघांनी त्या व्यक्तीकडे पाहिले. ती व्यक्ति इतर कोणी नसून तो वृद्ध गुराखीच होता. त्याला पाहून व ओळखून दोघांना फार आनंद झाला.

"अहो काका, आम्ही दोघे एका संकटात सापडलो आहो. ती बैलगाडी राजधानीतून येथवर आम्हीच घेऊन आलो. त्यात एक प्रेत व एक पाय कापला गेलेला मनुष्य असे दोघे आहेत. त्या दोघांची अशी स्थिती व्हायला ते दोघेच कारण आहेत, आम्ही दोघे निर्दोष आहो. उजाडेपर्यंत या दोघांच्या रक्षणाची जबाबदारी तुमच्यावर टाकून आम्ही येथून पाय काढावा, म्हणतो." जीवदत्त म्हणाला.

"त्यांचे रक्षण म्हणजे हिंस्र श्वापदां-पासूनच ना?" असे विचारीत म्हाताऱ्याने बैलगाडीकडे वळून पाहिले. त्याच वेळी त्या बाजूने एक अस्वल गुरगुरत येत होते आणि एक वाघ डरकाळ्या फोडीत होता.

खड्गवर्मा आणि जीवदत्त दोघांनी त्या बाजूला पाहिले. गाडी पाठीमागून अस्वल येत होते आणि समोरून वाघ येत होता. दोघे जोराने गरजले. दोघे परस्परांवर हल्ला करण्याच्या बेतात होते. त्या भयंकर जनावरांना पाहून व त्यांचे ओरडणे ऐकून दोन्ही बैल उधळले आणि वाट फुटेल तिकडे जंगलात पळू लागले.

ही सर्व घटना घडायला एक मिनिट देखील लागले नसेल. बैलांच्या गळ्यातल्या घंटांचा आवाज आणि वाघाअस्वलांचे कर्कश ओरडणे छान ऐकू येत होते.

"आपल्या समोरचा प्रश्न देवानेच सोडविला आहेसे दिसते आहे, जीवदत्त!" खड्गवर्मा आनंदातिरेकाने म्हणाला.

"तसेच दिसते आहे. पण तो लंगडा राजकुमार..."

जीवदत्तचे बोलणे पुरे होण्यापूर्वीच तो म्हातारा गुराखी मध्येच म्हणाला–





“राजकुमार? कोणत्या देशातला राजकुमार? आहे काय ही सर्व भानगड? पहिल्याने या अस्वलाला आणि वाघाला दूर पळवून लावले पाहिजे.”

खड्गवर्माने झाडाखालीच पडलेली एक लांबुडकी काठीसारखी फांदी अस्वल आणि वाघ दोघांची लढंत चालू होती त्या बाजूला फेकली. एकाएकी पडलेल्या त्या काठीने घाबरून जाऊन वाघ व अस्वल निरनिराळ्या दिशेने पळून गेले.

जीवदत्तने रात्री घडलेली घटना थोडक्यात सांगितली. म्हातारा काही वेळ विचार करीत उभा राहिला. नंतर म्हणाला—“तुम्ही थोडा वेळदेखील येथे थांबता कामा [illegible] राज्याच्या हद्दीबाहेर निघून जा. आमच्या राजाहून महेंद्रनगरचा राजा बलाढ्य आहे आणि वर दुष्टपण आहे. तो आमच्या राजावर दडपण घालून तुम्हाला कैद करवील.”

खड्गवर्मा आणि जीवदत्त दोघांना तीच शंका होती. म्हणून दोघांनी त्या वृद्ध गुराख्याचे आभार मानून तेथून पाय काढला. उजाडण्यापूर्वी पद्मपुरापासून जितके दूर जाता येईल तितके जायचे त्यांनी ठरविले.

तिकडे महेंद्रनगरच्या सेनापतीचा मुलगा पद्मपुराहून निसटून तीन प्रहर रात्र उलटण्याच्या सुमारास महेंद्रनगरी पोचला. त्याने आपल्या बापाला घडलेले सर्व वृत्त सांगितले. राजकुमार व मंत्र्याचा मुलगा दोघे पद्मपूरला संकटात सापडल्याचे कळल्यावर सेनापतीने रात्रीच राजाला व मंत्र्याला जागे करून त्यांना सर्व बातमी कळविली.

राजा व मंत्री दोघांनी सेनापतीच्या मुलाला बोलावून त्याच्या तोंडून सर्व वृत्त ऐकून घेतले. सेनापतीच्या मुलाने मंत्र्याचा मुलगा जीवदत्तच्या मंत्रदंडाचा तडाखा लागल्यामुळे कसा जमिनीवर आदळला होता, हे सांगितले. त्याच बरोबर राजकुमार आंवाराची भिंत ओलांडून जात असता तलवारीचा वार लागल्याने ओरडल्याचे [illegible] पाठलाग केला तेव्हा भिंतीवरून उडी मारून तो स्वतः कसा पळून आला हे वर्णन करून सांगितले.

सेनापतीच्या मुलाने हे सर्व सांगितले, पण तिथे बुरखा घालून पद्मपूर नगरात कां शिरले होते हे सांगितले नाही. कोणातरी दोघां क्षत्रिय तरुणांनी त्यांचे स्वागत केले म्हणून ते अतिथिशाळेत गेले होते, असे सपशेल खोटे सांगून टाकले.

महेंद्रनगरचा राजा व मंत्री दोघांना त्यांची मुले आता कसल्या कसल्या संकटात सापडली असतील या काळजीत काय करावे सुचेना. दोघे जिवंत तरी असतील की नाही, याचीच शंका दोघांना वाटू लागली. म्हणून दोघांनी एक पत्र लिहून एक दूत पद्मपूरच्या राजाकडे पाठविला.

महेंद्रनगरचा राजदूत सूर्योदयानंतर थोड्याच वेळाने पद्मपूरला येऊन पोचला. त्याने आपल्या राजाने दिलेले पत्र पद्मपूरच्या राजाला दिले. त्या पत्रात महेंद्रनगरच्या राजाने राजकुमाराला व मंत्र्याच्या मुलाला, जखमी करणाऱ्या दोघां क्षत्रिय तरुणांना कैद करून त्यांच्या सह पाठवून द्यावे, असा मजकूर होता.

मजकूर वाचून सेनापतीचा मुलगा निसटून पळून गेला असल्याचे पद्मपूरच्या महाराजांना



कळले. परंतु त्याला मंत्र्याचा मुलगा मेल्याचे व राजकुमाराचा पाय कापला गेला असल्याचे वृत्त माहीत नसावे, हे देखील कळले. पद्मसेनने मंत्र्यांना बोलावून आणावयास आज्ञा केली आणि महेंद्रनगराच्या राजदूताला अतिथिशाळेत विश्राम करण्यास पाठवून दिले.

मंत्री सोमदेव राजाचा निरोप कळताच आला. त्याने दोन तीनदां ध्यानपूर्वक पत्र वाचले आणि विचार करून व मनाशी काही तरी ठरवून म्हणाला—“या पत्रावरून महेंद्रनगरच्या महाराजांना वस्तुस्थितीची पूर्ण माहिती नाही, हे स्पष्ट दिसते आहे. तरी आपण या पत्राचे उत्तर तर पाठविलेच



पाहिजे. आपण असे लिहून कळवू की ते दोघे क्षत्रिय तरुण उजाडण्यापूर्वी ठरल्या-प्रमाणे अतिथिशालेतून निघून गेले. रात्री काय घडले हे त्यांना माहीत नसावे. आम्हांला तर काहीच माहीत नाही. तरी देखील आम्ही त्या दोघां तरुणांना अटक करण्याचा आणि राजकुमार व मंत्र्यांचा मुलगा दोघे कोठे आहेत या गोष्टीचा शोध काढण्याचा पुरा प्रयत्न करीत आहो, वगैरे वगैरे..."

"तुम्ही म्हणता ते बरोबर आहे, पण त्या निर्दोष खड्गवर्मा आणि जीवदत्त दोघांना पकडून महेंद्रवर्माकडे कसे पाठविता येईल? तसे केल्यास त्यांना आपणच मरणाची

... होणार नाही का?" पद्मसेनने विचारले.

"या संकटातून सुटायला एक उपाय आहे. जीवदत्त आणि खड्गवर्मा दोघांना ओळखणारे,—त्यांचे नाव व रूप माहीत असलेले लोक फारच कमी आहेत. जे त्यांना ओळखू शकतील असे आपले नागरिक व काही अधिकारी आहेत. म्हणून आपण त्यांची खोटी नावे सांगून महेंद्रवर्माला भुलविण्याचा प्रयत्न करण्यासारखा आहे. या वेळी मंत्र्याच्या मुलाचे प्रेत व राजकुमार कोणत्या स्थितीत कोठे आहेत, हे आपल्याला तरी कोठे माहीत आहे?" मंत्री सोमदेवने सुचविले.

"या सर्व गोष्टींचा विचार करून एक पत्र लिहा आणि त्या राजदूताच्या हाती महेंद्रवर्माकडे पाठवून द्या. काय वाटेल ते झाले तरी खड्गवर्मा व जीवदत्त दोघांवर कोणते ही संकट येता कामा नये. ते दोघे खरोखरच शूरवीर आहेत. त्यांच्यापैकी कोणीतरी एक खात्रीनेच पद्मावतीने सांगि-तलेला शिलारथ हलवू शकेल. तसे होऊ शकले तर मी आपल्या जावयाला राज्याचा भार सोपवून विश्रांती घेईन." राजा पद्मसेन म्हणाला.

मंत्री सोमदेवने, राजाने सुचविल्याप्रमाणे पत्र लिहून त्याच्यावर राजाची मुद्रा लावली आणि ते ... राजदूताकरवी ...वर्माकडे पाठ-वून दिले. राजदूताने सध्याकाळी आपल्या राजधानीत पोचताच ते पत्र राजाला दिले.

महेंद्रवर्मा व त्याचा मंत्री ते पत्र वाचून चकित झाले. त्यांची मुले आणि दोघे क्षत्रिय असे एकाएकी नाहीसे कसे काय झाले. परंतु त्या दोघां क्षत्रिय वीरांची नावे आणि त्यांचे रूप रंग याचे वर्णन दिले होते ते वाचून त्यांना थोडी आशा वाटली. कारण त्यांच्या आधारे त्यांना शोधून पकडणे शक्य होते.

मंत्री सोमदेवने त्या पत्रात खड्गवर्मा आणि जीवदत्त यांची नावे अनुक्रमे वीरभद्र आणि रामभद्र अशी लिहिली होती आणि वीरभद्राचा एक डोळा गेला असून राम-भद्राच्या डाव्या हाताला सहा बोटे आहेत अशा त्यांच्या खुणा लिहिल्या होत्या. असे वर्णन लिहून त्या पुढे या तरुण क्षत्रियांना पकडण्यासाठी राजाचे शिपाई त्यांचा शोध काढीत आहेत आणि राज्यभर या गोष्टीची दवंडी पिटविण्यात येत आहे, असेदेखील पत्रात लिहिले होते.

"मंत्री, समजा, ते दोघे क्षत्रिय तरुण आपल्या हाती पकडले गेले, पण आपल्या मुलांची काहीच माहिती त्यांना नसली तर ते वेष पालटून आपल्या राजधानीत आले असतील किंवा येण्याच्या प्रयत्नात




असतील असे का तुम्हांला वाटत?" महेंद्र-वर्माने विचारले.

मंत्री वामपाल थोडा वेळ काहीच बोलला नाही. विचार करून म्हणाला— "आपल्या मुलांचा पोरकटपणा अजून गेलेला नाही. त्या दोघां क्षत्रिय तरुणांबरोबर ते देशपर्यटनाला गेले असल्यास नवल नाही. सेनापतीच्या मुलाच्या बोलण्यावरून त्यांचे आपसात वैर किंवा वांकडे येण्याचे कारण झाले असेल असे मला नाही वाटत. तो तर आपल्या मुलापेक्षा जास्तच पोरकट आहे."

"खरे काय ते हळूहळू उघड होईल. आपल्या राज्यात देखील वीरभद्र व रामभद्र

दोघांना पकडण्यासाठी दवंडी पिटविण्याची व्यवस्था करा." महेंद्रवर्मा म्हणाला.

त्या दिवशी संध्याकाळी पद्मपूर आणि महेंद्रनगर राज्यांच्या खेडेगावातून आणि शहरातून वीरभद्र व रामभद्र यांना पकडण्यासाठी त्यांच्या वर्णनासह दवंडी पिटविण्यात आली.

पद्मपुराहून पुष्कळ दूर एका गावी एका खानावळवालीकडे उतरलेले खड्गवर्मा व जीवदत्त यांनी ती दवंडी ऐकली. दवंडी ऐकून तीत काही गूढ लपलेले आहे, असा संशय दोघांना आला. आपणाला सावध करण्यासाठीच राणी पद्मसेन याने अशा तऱ्हेची दवंडी पिटवली असावी असेदेखील दोघांना वाटले.

लवकर ते गाव सोडून जाण्यात शहाणपण आहे असे खड्गवर्माला साहजिकच वाटले. परंतु जीवदत्तला तशी घाई करून निघून जाण्यात जास्तच धोका असल्यासे भासले. म्हणून संध्याकाळी निघावे आणि ती रात्र कोठेतरी जंगलातच काढून दुसऱ्या दिवशी काहीतरी [illegible] पद्मपूर राज्याच्या हद्दीबाहेर जावे, असे जीवदत्तने सुचविले.

ते दोघे बोलतच होते तेवढ्यात राजाच्या दोघां शिपायांनी खानावळवालीला येऊन विचारले–"काय हो बाई! तुमच्या घरी जे दोघे तरुण येऊन उतरले आहेत ते कोठे आहेत?"

म्हातारी घाबऱ्या आवाजात म्हणाली–"आहेत आत, बोलावते त्यांना." असे म्हणत ती खड्गवर्मा व जीवदत्त होते तेथे गेली.

शिपायांच्या इच्छेप्रमाणे खड्गवर्मा व जीवदत्त बाहेर आले. शिपायांनी दोघांकडे लक्षपूर्वक पाहिले, पण दवंडीत सांगितलेल्या खुणा नव्हत्या. म्हणून म्हणाले–"गावच्या पाटलाने तुम्हां दोघांना बोलावून आणायला आम्हांला पाठविले आहे."

"ठीक, येतो, चला!" जीवदत्त म्हणाला. पुढे शिपाई आणि पाठीमागून खड्गवर्मा आणि जीवदत्त पोलीस पाटलाच्या कचेरीकडे निघाले. (चालू)



# सिद्धहस्त

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ परत आला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि पुन्हां स्मशानाच्या दिशेने मौनपणे चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, अपौरुषेय कामे करायला अपौरुषेय म्हणजे दैवी शक्ती आवश्यक असतात. अशा शक्तींची प्राप्ती ज्याला झाली आहे त्याला कोणतेही काम सहज करता येते. त्याचे एक उदाहरण म्हणून मी तुला गोवर्धन नामक एका तरुण मुलाची गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक!", असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

एका गावी एक श्रीमंत मनुष्य रहात असे. त्याच्याकडे एक नोकर व त्याची बायको काम करीत. सोयीसाठी त्या श्रीमंताने आपल्या नोकराला आपल्या घराच्या पिछाडीला एक झोपडे बांधून दिले होते.

## वेताळाच्या गोष्टी



त्या नोकराला दोन मुले होती. ती मोठी झाल्यावर कामधंद्याच्या शोधार्थ परगावी निघून गेली. आता त्या नवराबायकोला घरात एकटेपणा वाटू लागला. ईश्वरकृपेने त्यांना एक तिसरा मुलगा झाला. ज्या दिवशी नोकराची बायको बाळंत झाली त्याच दिवशी त्या श्रीमंत माणसाची बायको पण बाळंत झाली आणि तिला एक मुलगी झाली. एकाच दिवशी व एकाच वेळी दोघांचा जन्म झाला हा एक विचित्र योगायोगच होता. पूर्वजन्मीचे काही कारण असेल त्याशिवाय असे होणार नाही, असे जवळपासच्या लोकांना वाटू लागले.

[illegible] मुलाचे नाव गोवर्धन होते व श्रीमंताचा मुलीचे नाव होते लीला. दोघं बरोबर खेळत आणि दिवसभर मनाला वाटेल तिथे हिंडत फिरत. दोघं थोडी मोठी झाल्यावर एकाच गुरूकडे विद्याभ्यास करू लागली. कधी लीला आपल्या बाबांच्या गाडीत हिंडायला गेली की गोवर्धनला बरोबर घेऊन जायला हट्ट करी. त्या श्रीमंत मनुष्याला जेव्हां दोघं गाडीत बसून हिंडायला जातात हे कळले तेव्हां त्याला राग आला. त्याने गोवर्धनला गाडीत घेऊन जाऊ नये अशी नोकराला ताकीद करून ठेवली. त्या दिवसापासून लीलाने फिरायला जायचेच बंद केले.

शाळेत मधल्या वेळी खायला लीला बरोबर काही तरी गोडधोड नेत असे. दोघं मुले ते अर्धे अर्धे वाटून खात. श्रीमंताच्या बायकोला आश्चर्य वाटे की घरी जी मुलगी एकदा गोडपदार्थ केला तर त्याला हात देखील लावीत नाही ती शाळेत दुप्पट कशी काय खाते. श्रीमंताला ती गोष्ट कळली तेव्हां तो नोकराला बोलावून म्हणाला– "तू मुलाला शिकवतोस कशाला रे? तो येऊन जाऊन शेतीची कामे करणार. म्हणून त्याला शाळेत पाठवू नकोस."

ते ऐकून नोकर म्हणाला– "धनी! मुलगा अजून लहान आहे. मोठा होईल तेव्हां ना त्याला शेताची कामे शिकावी लागतील? तोपर्यंत थोडा शिकला तर बरेच नव्हे का?"

"अरे, आजपर्यंत तो जितका शिकला आहे, तितके पुरे झाले! उद्यापासून मी त्याला गुरे चरायला घेऊन जायला पाठविणार आहे." श्रीमंत म्हणाला.

दुसऱ्या दिवसापासून गोवर्धन श्रीमंत माणसाची गुरे चरायला घेऊन जाऊ लागला. ते कळल्यावर लीलाने शाळेत जायचे सोडून दिले आणि गोवर्धनच्या मागोमाग ती रानात जाऊ लागली. दोघे कधी झाडाखाली तर कधी झाडावर चढून गप्पा गोष्टी करीत आणि लीला बरोबर आणलेले खाणे गोवर्धनला खायला देई.

असे तीन दिवस गेले. चवथ्या दिवशी गुरुजींनी त्या श्रीमंत माणसाकडे येऊन लीला आजारी तर नाही, अशी चवकशी केली आणि ती तीन दिवसापासून शाळेत आली नसल्याचे सांगितले. त्या श्रीमंताला ते ऐकून आश्चर्यच वाटले. त्याने मुलीला बोलावून शाळेत न जाण्याचे कारण विचारले तेव्हां ती म्हणाली–"गोवर्धनने शाळा सोडली म्हणून मी पण सोडली."

त्या श्रीमंताला मुलीचे तसे वागणे आवडले नाही. ती मुलगी तशी वागत राहिली तर आपली मान खाली होईल, असा विचार करून त्याने गोवर्धनच्या बापाला



बोलाविले व म्हणाला–"तुझ्या मुलाला या गावात या पुढे राहता येणार नाही. तू त्याला, तुला पाहिजे तिकडे पाठवून दे."

म्हातारा नोकर म्हणाला–"आहो पण, माझे दोघे मोठे मुलगे पण माझ्याजवळ नाहीत. निदान हा लहान मुलगा जिवाला आधार आहे. त्याला राहू द्या."

"तुला तुझा मुलगा हवा आहे की नोकरी? मुलगा हवा असेल तर मुलाबरोबर तू सुद्धा निघून जा. तुम्ही येथे राहण्याची गरज नाही." श्रीमंत निष्ठुरपणाने म्हणाला.

गोवर्धनला जेव्हां हे सगळे कळले तेव्हां तो आपल्या आईवडिलांना म्हणाला–



"बाबा! मी कोठेतरी निघून जातो. तुम्ही मुळीच काळजी करू नका."

गोवर्धन लीलाचा निरोप घेण्यासाठी निघाला तेव्हां ती म्हणाली—"तू मोठा झाल्यावर परत ये. मी तुझी वाट पहात राहीन. आपण मोठेपणी लग्न करून घेऊ. तू ही गोष्ट विसरू नकोस."

गोवर्धन चालत चालत एका ओढ्याच्या काठी संध्याकाळच्या सुमारास येऊन पोचला. त्या ओढ्यावर एक लहानसा अरुंद पूल होता. गोवर्धन त्या पुलावरून पलीकडे जायला पुलाजवळ पोचला असेल नसेल तेवढ्यात एक म्हातारी हातातली काठी उगारून त्याला म्हणाली—"अरे ए! थांब! [illegible] बदके पलीकडे जाताहे[illegible] मग तू जा."

म्हातारीच्या पाठीमागे बदकांची एक मोठी रांग होती. तरी गोवर्धन थांबला. बदके एकामागून एक हळूहळू पूल पार करू लागली. बराच वेळ झाला तरी बदकांची रांग संपतच नव्हती. काळोख वाढू लागला होता आणि वर त्याला भूकपण लागली होती. म्हणून तो एका झाडाला टेकून बसला आणि त्याला झोप केव्हां लागली, हे कळले देखील नाही. त्याची झोप मोडली तेव्हां उजाडले होते. परंतु बदकांची रांग मात्र संपली नव्हती. थोड्या वेळाने सर्व बदके पार निघून गेल्यावर म्हातारी गोवर्धन-जवळ आली आणि म्हणाली—"तुला कंटाळा आला असेल नाही? रागही आला असेल, माझा! आता तू जा पलीकडे."

"तसे माझे गर्दीचे काम नव्हतेच. मी कामाच्या शोधार्थ जातो आहे." गोवर्धन म्हणाला.

"विवेकी व शाहणी माणसे चिडत किंवा रागावत नाहीत. तू हात पुढे कर, मी तुला 'हस्तलाघव' नामक विद्या देते." म्हातारी म्हणाली.

गोवर्धनने हात पुढे केल्यावर म्हातारीने जोराने हातावर काठी मारली आणि म्हणाली—"आता तुला जायचे असेल तिकडे [illegible] तू कोणते ही काम [illegible] घेतलेस की तुला त्यात यश मिळेल." असे सांगून म्हातारी निघून गेली.

"ही म्हातारी मोठी विचित्रच दिसते आहे." असे मनातल्या मनात म्हणत गोवर्धन पूल पार करून गेला. संध्याकाळपर्यंत तो एका मोठ्या गावात येऊन पोचला. ती एका राजाची राजधानी होती. तो एका सोनाराच्या घरासमोर उभा राहून विचारू लागला—"काय हो, मला काही काम शिकविता का?"

"होय, मी शिकवितो. तू मन लावून काम केलेस तर तुला चांगले काम येईल." सोनार म्हणाला. नंतर गोवर्धनला आपल्या खोलीत बोलावून घेऊन गेला आणि तेथे काही कारागीर काम करीत होते त्यांच्याकडे बोट दाखवून तो म्हणाला—"तू एक वर्षभर मेहनत केलीस तर तुला हे काम येईल." पुन्हा दुसऱ्या एका खोलीत घेऊन जाऊन म्हणाला—"ही कारागिरी शिकायला चार वर्षे मेहनत करावी लागेल. शेवटी तो आपल्या स्वतःच्या खोलीत घेऊन गेला आणि म्हणाला—"मी राजाकरिता मुकुट करतो आहे." तू आयुष्यभर काम शिकलास तर कदाचित हे काम येईल."

"का? हे काम मला करता येते!" अर्धवट तयार झालेल्या मुकुटाला हातात घेऊन खालपासून वरपर्यंत पहात गोवर्धन म्हणाला.

ते ऐकून सोनाराला राग आला. "काय रे, तू माझ्याकडे काम शिकायला





आला आहेस की फुशारक्या मारायला. ये, दाखव करून, पाहतो मी. हा किरीट पुरा होईपर्यंत मी तुला खोलीबाहेर येऊ देणार नाही." असे म्हणत सोनाराने दार बंद करून बाहेरून कडी लावून टाकली.

दुसऱ्या दिवशी सोनाराने दरवाजा उघडून पाहिला तर राजाचा मुकुट तयार झाला होता. निरनिराळी रत्ने यथास्थानी बसविलेली होती. सोनाराने चकित होऊन गोवर्धनच्या हातातून तो मुकुट घेऊन लक्षपूर्वक पाहिला आणि थक्क झाला. कोठे ही काही दोष राहिला नव्हता. त्याला तो मुकुट मढवायला निदान चार आठवडे लागले असते. पण त्या लहानग्या मुलाने फक्त एका रात्रीत कसा काय पुरा केला याचे त्याला फार आश्चर्य वाटले. म्हणून तो गोवर्धनला म्हणाला—"मुला! तू इतका उत्तम करागीर असशील याची मला कल्पनादेखील नव्हती. मला यापुढे जी मिळकत होईल त्यातला अर्धा वांटा मी तुला यापुढे देत जाईन."

गोवर्धनने ते मान्य केले. परंतु काही दिवसांनी सोनार खरा हिशोब न ठेवून त्याला कमी पैसे देत असल्याचे गोवर्धनला कळले व त्याने ती नोकरी सोडून दुसरीकडे नोकरी करण्याचे ठरविले.

दुसऱ्या दिवशी तो गावभर फिरला आणि एका मूर्ती करणाऱ्याकडे जाऊन त्याने त्याच्याकडे नोकरी करण्याचे ठरविले. मूर्तीकाराने गोवर्धनकडे पाहूनच तो मुलगा हुशार असल्याचे ओळखले व काम लवकर शिकेल असे समजून त्याला आपल्या पदरी नोकरी दिली. मूर्तिकाराने एका नव्या देवळातल्या मूर्ती करण्याचे काम हाती घेतले होते. गोवर्धनला म्हणाला—"मी या मूर्ती तयार करून दिल्यावर देवळात त्यांची प्राणप्रतिष्ठा झाली की राजकन्येचा आजार बरा होईल असे राजाच्या पुरोहितांनी सांगितले आहे."

"या सर्व मूर्ती मी तयार करून देतो." गोवर्धन म्हणाला.

[illegible] बोलणे 'लहान तोंडी मोठा घास' वाटले. म्हणाला—"तुला हे करता येईल असे वाटले होय? उद्यां संध्याकाळपर्यंत या सर्व मूर्ती तयार करून दाखवतोस का?"

गोवर्धनने होकार दिला व टाकी व हतोडा घेऊन मूर्ती गढायला बसला. इतक्यात देवीची मूर्ती बोलू लागली—"मुला! तू सिद्धहस्त आहेस. मी तुला एक वर देते. तू आपल्या टाकीने मेलेल्या माणसाच्या पायाला भोक केलेस तर तो मनुष्य जिवंत होईल." असे सांगून देवी पुन्हा मूर्ती होऊन गेली.

संध्याकाळी येऊन मूर्तिकाराने पाहिले. सर्व मूर्ती तयार झाल्या होत्या. गोवर्धनला शाबासकी देत तो मूर्तिकार म्हणाला—"मुला, तू सामान्य मनुष्य नसून मय किंवा विश्वकर्म्याच्या वंशातला कोणी असावास असे दिसते. तू माझ्याजवळच राहून काम कर. आपण जो फायदा होईल तो अर्धाअर्धा वांटून घेऊ."

गोवर्धन त्या गोष्टीस कबूल झाला.

ठरल्याप्रमाणे मूर्तींची प्राणप्रतिष्ठा सुमुहूर्तावर झाली. परंतु राजकन्या बरी झाली नाही व तिचे प्राणोत्क्रमण झाले.

राजाला फार वाईट वाटले व रागपण आला. त्याने राजपुरोहिताला बोलावून विचारले—"राजकन्येचे प्राणोत्क्रमण असे कसे झाले? तुम्ही सर्वांनी मला फंसविले होते. देऊळ बांधण्याचा सल्ला ज्या कोणी दिला होता त्याला देहांत शिक्षा मी देतो."






राजपुरोहित घाबरून गेला व म्हणाला– "महाराज! मला वाटते की मूर्तिकाराने जी मूर्ती घडविली तिच्यात काही तरी दोष राहून गेला असणार त्याशिवाय असे होणे शक्य नाही."

राजाचे शिपाई प्रथम मूर्तिकाराला व नंतर गोवर्धनला धरून घेऊन आले. गोवर्धन राजाला म्हणाला–"महाराज! या मूर्ती मी तयार केल्या आहेत, मूर्तिकाराने नव्हे. या मूर्तीत कोणताही दोष नाही. मला असे वाटते आहे की राजकन्या अजून जिवंत असली पाहिजे. मी त्यांना एकदा पहावे म्हणतो."

राजाने गोवर्धनला राजकन्येचे प्रेत ठेवले होते त्या खोलीत न्यायला सांगितले.

[illegible] सर्व लोकांना बाहेर जायला सांगून राजकन्येच्या पायाला टाकीने लहानसे भोक केले. लगेच राजकन्या जिवंत होऊन उभी राहली. गोवर्धन तिला घेऊन राजाकडे आला.

राजाने गोवर्धनला शाबासकी दिली आणि मोठे इनाम देऊन त्याचा सत्कार केला.

अशा तऱ्हेने गोवर्धन एकाएकी श्रीमंत झाला. या अवधीत तो एक तरुण युवकपण झाला होता. आता आपण परत आपल्या गावी जाऊन लीलाशी विवाह करावा असा त्याने विचार केला. तो राजाने दिलेल्या घोड्यावर बसून राजाने दिलेली सर्व बक्षिसे व परितोषिके घेऊन आपल्या गावी निघाला.

गोवर्धन आपल्या गावाच्या जवळ येऊन पोचला तेव्हां त्याला एक पांढरी इमारत दिसली. पण त्या इमारतीला कोठे दारच नव्हते. तो गाव सोडून गेला त्या वेळी तेथे ती इमारतपण नव्हती. तो विचार करीत उभा होता तेव्हां ती म्हातारी एकदम कोठून तरी येऊन दत्त म्हणून समोर उभी राहली व म्हणाली–"ओहो, तूच का? अरे, तू तर राजा झाला आहेस!"

"अहो आजी! ही सर्व तुमची मेहेरबानी होती म्हणून झाले. यात तुमचा वांटापण आहे." असे म्हणत गोवर्धनने त्याच्या ऐश्वर्याचा सर्व सांठा उघडून दाखविला.

"अरे [illegible] ! मला [illegible] वस्तूंची काय रे गरज? परंतु गावात गेल्यावर तुला आनंद वाटणार नाही. कारण तुझे आईवडील वारल्याला कित्येक दिवस झाले. तू ज्या मुलीला भेटायला म्हणून इतका दूर आलास. ती देखील वारली. कारण तिच्या आई-वडिलांनी तिच्या इच्छेविरुद्ध तिचे लग्न करून द्यायचे ठरविले. तिने आत्महत्या करून घेते वेळी एक चिट्ठी लिहून ठेवली होती. त्या चिट्ठीत या बागेत तिची समाधी बांधावी असे तिने लिहून ठेवले होते. तिच्या आईवडिलांनी तिला एका पेटीत ठेवीत त्या पेटीवर समाधी बांधली. हीच ती समाधी." म्हातारी म्हणाली.

"मी लीलाला पुन्हां जिवंत करतो. पण आत जायचे कसे? वाटच नाही आजी!" गोवर्धन म्हणाला.

म्हातारीने आपली काठी भिंतीवर मारली. त्याबरोबर भिंतीत एक भगदाड पडले. आत एक पेटी होती. ती उघडून पाहिल्यावर लीला त्या पेटीत थोड्या वेळा-पूर्वीच झोपल्यासारखी दिसली. गोवर्धनने टाकी घेऊन तिच्या पायाला भोक केल्या-बरोबर ती उठून बसली. ती गोवर्धनकडे चकित होऊन पाहू लागली.

"लीला! तू मला नाही ओळखलंस का? अग, मी गोवर्धन!" गोवर्धन, चकित होऊन



त्याच्याकडे पहात असलेल्या लीलाला म्हणाला. गोवर्धनने हातातली टाकी फेकून दिली.

"तू परत येशील याची मला खात्री होती. माझ्या आईवडिलांनी माझ्या इच्छे-विरुद्ध बळजबरीने माझे लग्न करून देण्याचे ठरविले. म्हणून मी मेल्यासारखी दिसेन असे एक औषध खाल्ले आणि माझ्या जिवाला दुखापत झाल्याशिवाय माझ्यावर समाधी बांधण्याची व्यवस्था करविली. मी जिवंतच होते." लीला म्हणाली.

दोघं त्या इमारतीतून बाहेर आली. तुला जिवंत पाहून तुझ्या आईवडिलांना किती

आनंद होईल? म्हणून चल, त्यांना जाऊन भेटूं या!” गोवर्धन म्हणाला.

“मी परत आपल्या घरी जाणार नाही. आपण आणखी कोठेतरी जाऊन राहू.” लीला म्हणाली.

“माझी टाकी समाधीत राहली आहे, ती मी घेऊन येतो.” असे म्हणत गोवर्धन समाधीजवळ गेला. परंतु समाधीच्या भितीला पडलेले खिंडार बुजलेले होते व भित जशीच्या तशी होती. आत जायला वाटच नव्हती. म्हातारीपण जवळपास कोठे दिसली नाही. आता आपली टाकी आपल्याला मिळणे शक्य नाही, असे गोवर्धनला वाटले. तो लीलाला घोड्यावर बसवून राजधानीकडे निघाला. गावात एक घर ठरवून त्यात दोघं सुखाने आपला संसार करू लागली.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—“राजा! लीलाने जिवंत झाल्यावर आपल्या आईवडिलांना भेटायला कां नकार दिला उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या ... पायावर लोळू लागतील.”

ते ऐकून विक्रमादित्य म्हणाला—“लीला एक निश्चयी मुलगी होती. म्हणून लहानपणी सुद्धा आईवडिलांच्या इच्छेविरुद्ध त्यांच्या रागावण्याची भीती न बाळगता ती गोवर्धनच्या सुख दुःखात समभागी होण्याचा प्रयत्न करीत होती. त्याच्याशी लग्न व्हावे यासाठी तिने आत्महत्त्येचा अभिनय केला आणि आपल्या आईवडिलांना दुःखी केले. गोवर्धन तिच्या आईवडिलांहून जास्त श्रीमंत झाल्यावर ते, तिचे त्याच्याशी लग्न करून द्यायला तयार होतील हे तिला कळत होते. परंतु तिला त्यांच्या संमतीची अगर पसंतीची गरज भासली नाही. त्यांच्या दुःखी मनाला पुन्हां सुखी करण्याचा विचार देखील तिच्या मनात आला नाही. म्हणून तिने आपल्या घरी परत न जाण्याचा विचार केला.”

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)



# तेल्याचा पोपट

एका तेल्याजवळ एक सुंदर पोपट होता. तो तेलाच्या दुकानात समोर पिंजऱ्यात टांगलेला असे.

एक दिवशी दुकानात एक बोका आला. त्याला पाहून पोपट भ्याला आणि पिंजऱ्यात पंख फडफडून,उड्या मारू लागला. म्हणून पिंजरा तुटून खाली पडला. तेलाची हंडी फुटली आणि चारीबाजूला तेल पसरले.

तेल्याला पोपटाचा फार राग आला. त्याने पोपटाच्या डोक्यावरची सर्व लव उपटून टाकली. त्यामुळे पोपटाला टक्कल पडल्यासारखे दिसू लागले. म्हणून पोपटाने रुसून जाऊन आपल्या धन्याशी बोलायचे सोडून दिले. आपल्या करणीबद्दल तेल्याला पश्चात्ताप वाटू लागला.

दोन आठवड्यांनी एक टक्कल पडलेला मनुष्य तेल विकत घ्यायला दुकानात आला. पोपट त्याला पाहून हंसू लागला.

“तू फार खूश दिसतोस की रे? असे काय रे झाले? काही तरी कारण असलेच पाहिजे की नाही. तू खरे कारण सांगितले नाहीस तर तुला मी बंद करीन.” मालक पोपटाला म्हणाला.

“मला वाटते की या माणसाचा मालकपण कोणीतरी तेलीच असावा. कारण याच्या डोक्यावर एकदेखील केस नाही.” पोपट म्हणाला.





# राधामाधव

एका गावी रामदास आणि सोमदास नावाचे दोघे जीवश्च कंठश्च मित्र रहात असत. रामदास व्यापार करून मोठा धनी झाला होता. परंतु सोमदास देशाटन करून मोठा विद्वान व पंडित झाला. सोमदासाची मिळकत रामदासाच्या मानाने दशांश सुद्धा नव्हती. तरी देखील त्याच्या कुटुंबाला ती मिळकत पुरत असे. दोघांच्या मिळकतीत इतका फरक होता तरी दोघांच्या मैत्रीत अंतर आले नाही. सोमदासचे पांडित्य पाहून रामदास त्याची प्रशंसा करी आणि रामदासाचे व्यापारातील कौशल्य पाहून सोमदास त्याची प्रशंसा करी. अशा तऱ्हेने दोघे मित्र परस्परांच्या गुणांचे कौतुक करीत.

काही काळ लोटल्यावर रामदासाला एक मुलगा झाला. आणखी काही काळ लोटल्यावर सोमदासाला एक मुलगी झाली. रामदासाच्या मुलाचे नाव माधव होते तर सोमदासच्या मुलीचे नाव राधा होते.

राधा जन्मल्यानंतर काही दिवसांनी सोमदासची बायको वारली. म्हणून रामदास व त्याची बायको त्या लहान मुलीला आपल्या घरी घेऊन प्रेमाने तिचे कोडकौतुक करू लागली. लोकांना राधा रामदासचीच मुलगी आहे असे वाटू लागले आणि राधालापण रामदास व त्याची बायको तिचे आईवडील आहेत असे वाटू लागले.

काही काळ लोटल्यावर रामादासच्या मनात एक विचार आला. श्रीमंताचा व एका अशिक्षित बापाचा मुलगा असल्यामुळे माधवचे लक्ष अभ्यासात नाही असे रामदासने पाहिले व मुलाला सोमदासकडे आणून ठेवले व म्हणाला—"तू याला आपला मुलगा समजून आपल्या घरी ठेवून घे आणि याला शिकवून आपल्या सारखाच विद्वान कर."

[illegible] दोघांनी आपापल्या मुलांची अदलाबदल करून घेतली. राधा एका गरीब आईबापाची मुलगी असून ही एका श्रीमंत माणसाच्या घरात वाढली.

माधव हुशार होता. तो एका श्रीमंत आईबापांचा मुलगा असूनही एका गरीब विद्वान माणसाच्या घरी राहून चांगला विद्याभ्यास करू लागला. तो मोठा होऊ लागला तसतसा सोमदासलाच आपले वडील मानू लागला आणि बापाला म्हातारपणी मदत करता यावी यासाठी छान शिकू लागला. त्याने विद्याभ्यास मन लावून केल्यामुळे तो विद्वान होऊ लागला. ते पाहून रामदास व त्याची बायको दोघांना आनंद झाला.

रामदास व सोमदास पाहिल्यापासूनच चांगले मित्र होते. म्हणून दोघांचे येणे जाणे फार होते. राधा व माधव यांचीपण चांगली मैत्री जमली होती आणि हळूहळू वयाबरोबर माधवच्या मनात राधाविषयी प्रेमाचा अंकुर रुजला व तो वाढू लागला.

परंतु राधाच्या मनात असा काही फरक झाला नाही. ती एका श्रीमंत आईबापांची मुलगी असल्याबद्दलचा अभिमान मात्र वाढत गेला. ती रामदासाबरोबर जेव्हां जेव्हां सोमनाथच्या घरी जाई तेव्हां तेव्हां ती आपल्या घरी परत जाण्याची घाई करी. सोमदास व माधव यांच्याबद्दल तिच्या मनात प्रेम होते. परंतु त्यांची गरीबी पाहून तिला ती त्यांच्याहून मोठी आहे असे वाटे.



राधा व माधव वयात आले तेव्हां रामदास व सोमदास दोघांनी त्यांना खरी वस्तुस्थिति सांगून दोघांचा विवाह करून द्यायचे ठरविले.

सोमदासने माधवला विचारले—"माधव, राधा तुला पसंत आहे का? तिच्याबरोबर तुझे लग्न करून दिले तर तू तयार होशील का? तुला काय वाटते?"

"मी राधाशिवाय आणखी कोणाशी लग्न करायचे नाही असे केव्हांच मनाशी ठरविले आहे, बाबा." माधव सोमनाथला म्हणाला.

रामदासने पण तोच प्रश्न राधाला विचारला. म्हणाला—"मुली! तुझे लग्न करून द्यावे, म्हणतो. माधवशी तुझे लग्न करून दिले तर तुला आवडेल का?"

"माधव चांगला आहे, बाबा! परंतु ते गरीब लोक आहेत, नाही का?" राधा म्हणाली.

राधाच्या तोंडचे ते वाक्य ऐकून रामदास चकितच झाला. तो राधाला म्हणाला—"...मी आजपर्यंत तुला जे सांगितले नाही ते आज सांगत आहे. माधव गरीब आहे असे तुला कोणी सांगितले? माझ्या सर्व ऐश्वर्याला तोच तर वारस आहे. तो माझाच मुलगा आहे. तू सोमदासाची मुलगी आहेस. तुझी आई लहानपणीं वारली, म्हणून तुला आम्ही आपल्या घरी आणून ठेवली. माधव श्रीमंत घरात वाढला तर बिघडून जाईल म्हणून त्याला लहानपणीच विद्याभ्यासासाठी सोमदासाच्या घरी मी नेऊन ठेवला. आता तो शिकून विद्वान झाला आहे. म्हणून तू त्याच्याशी लग्नाला तयार झाले पाहिजे."

रामदास म्हणाला ते ऐकून राधाच्या डोक्यात प्रकाश पडला. ती, आपण किती मूर्खपणाने आपल्या वडिलांचा अपमान केला याबद्दल मनातल्या मनात पश्चात्ताप करू लागली.

त्यानंतर यथासमयी राधा व माधव यांचा विवाह एका सुमुहूर्तावर झाला. दोघांचा संसार सुखाचा झाला.



# अशक्त 'अ'

एका गावी एक ब्राह्मण रहात असे त्याला एकुलता एक मुलगा होता. मुलाचे नाव विद्याधर होते. तो शाळेत जाऊ लागला, पण पाटीवर लिहिलेल्या 'अ, आ' अक्षरांपलीकडे त्याची मजल गेली नाही. मोठेपणी त्याचे लग्न झाले. दिवाळीला तो सासुरवाडीला गेला. तो सासुरवाडीच्या गावी पोचला तेव्हां त्याच्या सासऱ्याला कोणत्या तरी कामासाठी दुसऱ्या एका गावाला जावे लागले. त्यांनी तेथून पत्र लिहून कळविले की मला यायला थोडा उशीर होणार आहे. अमुक दिवशी परत येईन.

सासूने पत्र वाचून दाखवायला जांवई बापूंना सांगितले. रामूने चिट्ठी हातात घेतली. त्याला पत्र वाचतां येईना. तो आपल्या मूर्खपणाबद्दल फार दुःखी होऊन रडू लागला. जावयाला रडत असलेला पाहून घरच्या सर्व मंडळींना वाटले की पत्रात काहीतरी वाईट बातमी आहे आणि सर्व मंडळी रडू लागली. सर्वांच्या रडण्याचा आवाज ऐकून शेजार पाजारची मंडळी धावली. एकाने पत्र वाचले व म्हणाला—"अहो, या पत्रात तशी काही वाईट बातमी तर दिसत नाही. शास्त्रीबुवांनी परवापर्यंत परत येईन असे लिहिले आहे. मग तुम्ही कां रडता आहां?"

"मी शिकत असताना 'अ' फार मोठा होता म्हणून मला तो सहज वाचता येत होता. तो माझ्या चांगल्या ओळखीचा आहे. परंतु या चिट्ठीत तो असा अशक्त कां झाला आहे, कळत नाही, म्हणून मी रडत होतो." रामू म्हणाला.

तेव्हां सासूला कळले की तिच्या जांवयाला लिहितावाचता येत नाही.





# होतकरू

नार्वे देशात एक श्रीमंत मनुष्य रहात असे. त्याला दोन मुलगे होते. समुद्रात एक लहानसे बेट होते, ते त्या श्रीमंत माणसाच्या मालकीचे होते. ते बेट मासे धरण्याच्या धंद्याला फार सोयीचे होते. त्या श्रीमंताचे दोघे मुलगे त्या बेटावर मासे धरायला जात असत. म्हणून त्या श्रीमंत गृहस्थाने एक घर बांधून ठेवले होते.

दोघां भावंडांपैकी मोठा थोडा गंभीर स्वभावाचा होता. कोणाशी तो मनमोकळे-पणाने बोलत नसे. दुसरा धाकटा अगदी त्याच्या उलट होता. नेहमी धाडसाची कामे करण्यात त्याचे पाऊल पुढे असे. कधी कधी त्याच्या धाडसीपणामुळे नुकसानपण होई, परंतु तो होतकरू होता व तो स्वतःला तसा समजे देखील.

तो श्रीमंत मनुष्य वारल्यावर त्याच्या सर्व संपत्तीबरोबर दोघां भावंडांचा त्या बेटावर अधिकार झाला. दोघांनी बापाची इस्टेट वाटून घेतली नाही. दोघे भाऊ उन्हाळ्यात बेटावर निघून जात, मासे धरण्याचे काम करीत आणि पावसाळा आला की घरी येऊन रहात. हिवाळ्यात त्या बेटावर खुजे येऊन राहतात असे ऐकिवात होते. पण कधी कोणी त्यांना प्रत्यक्ष पाहिले नव्हते. ते मनुष्यांना कधी भेटत नसत. कारण मनुष्य त्यांना भीत असत.

एक वर्षी दोघे भाऊ त्या बेटावर दर-वर्षीप्रमाणे मासे धरायला गेले आणि परत येते वेळी त्यांचे काही सामान बेटावरच राहून गेले. ते सामान घेऊन येण्यासाठी दोघे भाऊ काही दिवसांनी त्या बेटावर आले. ते सामान आपल्या नावावर घालून निघणार होते तेवढ्यात सूर्यास्त झाला.

मोठा भाऊ धाकट्या भावाला म्हणाला– "आपण रात्रभर या बेटावर काढून उद्या [illegible] पुढे भाऊ [illegible] येण्याची शक्यता दिसते आहे. आकाश भरून आले आहे."

"छे, आत्तां कोठून येणार वादळ? चल, आपण आतांच निघू." धाकटा भाऊ म्हणाला.

"मी अगदी दमलो आहे बुवा! मला नाही झेपणार नाव वल्हवून नेणे. मी सांगतो ते ऐक. अशी घाई करू नकोस." मोठा म्हणाला.

दोघे भाऊ रात्रभर त्या बेटावर राहाले. सकाळी उठल्यावर धाकट्या भावाला मोठा भाऊ कोठे दिसेना. त्याची नाव सुद्धा त्याला कोठे दिसली नाही. परंतु खाण्यापिण्याचे सर्व सामान, एक बंदूक आणखी इतर काही वस्तू होत्या.

मोठा भाऊ संध्याकाळपर्यंत, कोठे गेला असल्यास परतेल असा विचार करून धाकट्या भावाने सैंपाक करून पोटभर खाऊन पिऊन घेतले. दिवसामागून दिवस आणि कित्येक आठवडे लोटले तरी मोठा भाऊ परतला नाही. आपल्या वांटचाची जमीन आणि वडिलार्जित इस्टेट बळका-कावण्याच्या हेतूने मोठ्या भावाने ही सर्व लबाडी केली असावी, अशी शंका धाकट्या भावाच्या मनात आली आणि तेच खरे ठरले. मोठ्या भावाने घरी पोचल्यावर आपली नाव पाण्यात बुडवून टाकली आणि धाकटा भाऊ पाण्यात बुडून मरण पावला. त्याला वांचवण्याचा त्याने पुष्कळ प्रयत्न केला, पण तो फुकट गेला. असे गावकऱ्यांना सांगितले.





परंतु धाकट्या भावाचा धीर खचला नाही. त्याने लाकडे व ओणकी जमा करून त्यांची एक जुजबी नाव तयार केली आणि त्या नावेत बसून मासे धरायला जाऊ लागला. बंदूकीने तो मधून पक्ष्याची शिकार करी. अशा तऱ्हेने त्याला पोट भरण्याची चिंता राहिली नाही. असेच काही दिवस लोटले.

हिंवाळा आला. धाकट्या भावाने विचार केला की खुजे लोक येथे या हिंवाळ्यात आले तर त्यांच्या संगतीत वेळ मजेत जाईल.

एक दिवशी त्याला समुद्रांतून वाद्यांचा गोड आवाज ऐकू आला. त्याला दुरून दिव्यांचा उजेडपण दिसला. तशी नाव [illegible] गलबत त्याने पूर्वी कधी पाहिले नव्हते. त्याची शिडे चौकोनी होती आणि ती रेशमी कापडाची होती. गलबतात सर्व खुजे होते आणि त्यांच्या अंगावर सर्व निळे कपडे होते. सुकाणूजवळ एक तरुण स्त्री नव्या नवऱ्या मुलीसारखी सजून उभी होती. दिसायला ती एखाद्या महाराणीसारखी दिसत होती. ती खुजी नव्हती, सामान्य स्त्रियांच्या उंचीची होती. त्या स्त्रीसारखी सुंदर स्त्री धाकट्या भावाने पूर्वी कधी पाहिली नव्हती. खुजांच्या जातीतली ती नव्हतीच.

बेटाकडे नाव येत असलेली पाहून धाकटा भाऊ पळत आपल्या घरात गेला आणि बंदूक घेऊन माळ्यावर जाऊन खाली काय काय होत आहे हे पहात पडून राहला.

थोड्या वेळाने सर्व खुजे त्या घरात आले. पुष्कळ खुजे होते ते. त्यांनी सर्व घर खूप सजविले. आता ते एखाद्या राजवाड्यासारखे दिसूं लागले. जिकडे पहावे तिकडे सोन्या चांदीची भांडी होती. ते सर्व पाहून धाकटा भाऊ चकितच झाला.

सर्व खुजांनी मिळून जेवून घेतले व ते त्यानंतर नाचू लागले. फक्त नवरी मुलगी एका बाजूला घाबरल्यासारखी बसून होती. खुजा नवऱ्या मुलाने तिला नाचायला बोलाविले. पण तिने त्याचा हात झिडकारून त्याला दूर ढकलले.

धाकटा भाऊ [illegible] माळ्यावरून खाली उतरून आला. त्याने खुजांची नाव बांधून ठेवली आणि दारात उभा राहून गंमत पाहू लागला. थोडा वेळ गंमत पहात उभा राहल्यावर त्याने बंदुकीचा एक बार उडविला. तो आवाज ऐकून सर्व खुजे घाबरून घराबाहेर पळाले. त्यांची नाव बांधलेली होती. ती पाहून व आता समुद्रात पळून जायला मार्ग नाही हे ओळखून ते डोंगरात वाट फुटेल तिकडे पळून गेले.

घरात आता फक्त ती नवरी मुलगी आणि सोन्या चांदीची भांडी काय ती उरली. नवऱ्या मुलीने त्याला, तिच्यावर आलेल्या प्रसंगाचे वर्णन करून सांगितले. ती लहान असतानाच तिला हे खुजे पळवून घेऊन गेले होते. त्यांनीच तिला वाढविले व ती लहानाची मोठी झाली. तिला दुसरा कोणता ही त्रास झाला नाही, पण तिला हे खुजे मुळीच आवडत नसत. एक खुजा तिच्याशी लग्न करून घेण्यासाठी तिला त्रास देऊ लागला. तेव्हांपासून तिला आपल्या जिवाचा वीट आला आणि त्या खुजांच्याविषयी तिच्या मनात घृणा उत्पन्न झाली.

त्या नवऱ्या मुलीचे नाव गाव आणि आईवडिलांचे नाव ऐकून धाकट्या भावाला ती त्याची दूरची नातलगच असल्याचे कळले. "मी किती भाग्यवान आहे, यात काही शंका आहे का?"

त्यानंतर ती दोघं खुजांच्या गलबतात बसून समुद्र पार करून आपल्या गावी येऊन



पोचली आणि लग्न करून आनंदाने राहू लागली.

आपल्या धाकट्या भावाला एकाएकी श्रीमंती आलेली कळल्यावर व त्याचे वैभव पाहून मोठ्या भावाला, ते सर्व वैभव खुजांकडून मिळाले असावे असे वाटले. हिंवाळ्यात खुजे त्या बेटावर येऊन राहतात हे त्याने ऐकले पण होते. म्हणून दुसऱ्या वर्षी हिंवाळा सुरू व्हायच्या आधी मोठा भाऊ बेटावर जाऊन राहण्यासाठी निघाला. बेटावर पोचल्यावर त्याला खुजांचे विचित्र व भयंकर आवाज ऐकू येऊ लागले. त्याला समुद्रात दिवे दिसले. तो घाबरून आपल्या घरात जाऊन बसला.

या खेपेस समुद्रातून जे खुजे आले ते दुसऱ्याच एका जातीचे होते. ते दिसायला लठ्ठ होते आणि त्यांच्या अंगात कातड्याचे कपडे होते. ते नावेतून आले नव्हते, पोहोत आले होते. त्यांना घरात येतांना पाहून मोठा भाऊ माळ्यावर जाऊन लपून बसला. एक खुजा चुलीजवळ जाऊन [illegible] विस्तवात खुजांनी ओली लाकडे घातली. त्यामुळे घरात धूरच धूर झाला. मोठ्या भावाला पळून जावेसे वाटले पण तो अंगाने लठ्ठ होता, म्हणून खिडकीतून पळून जाता येईना. तो घाबरून जाऊन मोठ्याने ओरडला, पण त्या खुजांच्या गोंगाटामुळे त्याचा आवाज कोणाला ऐकू न आला नाही.

उजाडण्यापूर्वी सर्व खुजे त्या घरातून निघून गेले. तो घराबाहेर आला आणि कसाबसा आपल्या घरी पोचला. पण त्याचे डोके फिरले होते. मधून मधून तो मोठ्याने ओरडे. मरण येण्यापूर्वी त्याचा वेडेपणा कमी झाला. त्या बेटावर त्याला जे कष्ट सहन करावे लागले त्यांचे वर्णन आपल्या घरच्या लोकांना सांगितल्यानंतरच त्याला मरण आले.

त्यानंतर त्या बेटावर जाण्याचे धाडस कधी कोणी केले नाही. एका मोठ्या वादळात ते बेट पाण्यात बुडले.





# अलीबाबा आणि चाळीस चोर

फार पूर्वी इराण देशात एका गावी अलीबाबा व कासिम नावाचे दोघे भाऊ रहात असत. त्यांचे आईवडील गरीब होते. त्यांच्याकडे स्वतःचा जमीनजुमला वगैरे काही एक नव्हते. म्हणून सकाळची काळजी संध्याकाळी आणि संध्याकाळची काळजी सकाळी करावी लागे. आईवडील वारल्यावर कासिमने एका म्हातारीच्या मदतीने एका श्रीमंताच्या मुलीशी लग्न करून घेतले. त्याने एक दुकान काढले. त्याचा संसार सुखाने चालू लागला. त्याला कसलीच फिकीर उरली नाही.

धाकटा भाऊ अलीबाबा लाकडे फोडी आणि त्यावर त्याचा उदर निर्वाह चाले. त्याची बायको एका गरिबाची मुलगी होती. नवरा बायको काटकसरीने रहात. अलीबाबाने थोडे पैसे वाचवून पहिल्याने एक गाढव विकत घेतले. नंतर दुसरे व त्यानंतर तिसरे अशी तीन गाढवे त्याच्याकडे झाली. तो तिन्ही गाढवांना जंगलात घेऊन जाई व लाकडे तोडून गाढवांच्या पाठीवर घालून बाजारात जाऊन विकी. अशाऱ्हेने त्याला सुद्धा पोटापाण्याची फिकीर उरली नाही. आपल्या मोठ्या भावा इतका पैसा अडका त्याच्याजवळ नसला तरी तो व त्याची बायको सुखासमाधानाने रहात. तशी अलीबाबाची बायको स्वभावाने भोळी होती, पण घरकामात हुशार होती. अलीबाबाला मुले बाळे झाली. ती सर्व लाकडे तोडून विकण्याचाच धंदा करीत व त्यात जेवढी मिळकत होई तेवढ्यावर त्यांचा सर्व कौटुंबिक खर्च भागे.

एक दिवशी अलीबाबा नित्याप्रमाणे आपली गाढवे घेऊन दाट रानात लाकडे तोडून आणायला गेला. गाढवे रानात चरत होती आणि अलीबाबा झाडावर चढून लाकडे तोडीत



होता. अचानक त्याला दुरून घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकू आला. त्याने झाडावर थोडे उंच चढून कोण येत आहे हे पाहिले. त्याला दूरवर छान दिसत होते.

थोड्या वेळाने तो ज्या झाडावर चढला होता तेथून थोड्याच अंतरावर काही घोडेस्वार आलेले त्याला दिसले. त्यांच्या हातात शस्त्रास्त्रे होती व घोड्यांच्या पाठीवर कसल्या तरी पिशव्या होत्या. त्यांच्या वागण्यावरून ते चोर असावेत हे अलीबाबाने ओळखले.

त्यांच्या सरदाराने खूण केल्याबरोबर सर्व घोड्यावरून खाली उतरले. घोड्यांना दाणा देऊन झाडाच्या बुंधाला बांधून ठेवले आणि त्यांच्या पाठीवरच्या पिशव्या काढून घेऊन आपल्या सरदाराच्या पाठीमागून चालू लागले. अलीबाबाने मोजून पाहिले ते बरोबर चाळीस जण होते.

अलीबाबा ज्या झाडावर चढला होता ते एका लहानशा टेकडीवर होते. तेथून थोड्या अंतरावर एका खडकानजीक ते चोर येऊन थांबले. चोरांच्या सरदाराने त्या खडकाजवळ जाऊन “तिळा तिळा! दार उघड!” म्हटल्याबरोबर तो खडक दार उघडावे तसा बाजूला झाला. सर्व चोर आत गेल्यावर त्यांचा सरदार आत गेला आणि आत गेल्यावर म्हणाला– “तिळा तिळा! दार बंद कर.” लगेच तो दगड जागच्या जागी येऊन बसला.

अलीबाबा चकित होऊन डोळे फाड-फाडून ते दृश्य पहात होता. त्याने देवाचा धावा केला की देवा यांची नजर माझ्यावर पडू देऊ नकोस. तो झाडावर पानांच्या आड लपून बसून राहिला. गाढवे मात्र चरतां चरतां मधून मधून रेकत होती. या गाढवांमुळे आपला जीव धोक्यात पडतो की काय याची त्याला भीती वाटत होती.

थोड्या वेळाने एक कर्कश आवाज झाला आणि पुन्हां तो खडक बाजूला सरकून दार उघडले गेले. चाळीस चोर रिकाम्या पिशव्या घेऊन बाहेर आले आणि [illegible] चोरांचा सरदार “तिळा तिळा! दार बंद कर” म्हणाला आणि दार बंद झाले.

अलीबाबा बराच वेळ, चोर पुन्हा परत तर येणार नाहीत ना, असा विचार करून झाडावरच बसून राहिला. सर्व चोर दृष्टी-आड झाल्यावर तो झाडावरून खाली उतरला. भीतभीतच तो त्या खडकाजवळ गेला. त्याने तो खडक जवळून लक्षपूर्वक पाहिला. त्याला कोठें चीर किंवा भेग दिसली नाही. मग त्याला चोरांच्या सर-दाराने म्हटलेला मंत्र आठवला. आपण तो मंत्र म्हटला तर दार उघडेल का, त्याच्या मनात एक शंका आली. आपण दार उघडल्यावर आत जायचे का? बाहेर गाढवे ओरडून गडबड तर करणार नाहीत ना? कोणी आपल्याला आत जातांना पाहिले तर? असे अनेक विचार त्याच्या मनात येऊ लागले.

हळू हळू त्याची भीती नाहीशी झाली. त्याने धीर करून एकदा त्या खडकाकडे पाहिले आणि “तिळा, तिळा! दार उघड” म्हणाला. त्याने भीतभीत हळूच ते म्हटले होते. तरी पण दार उघडलेले पाहून त्याला आनंद झाला आणि आत काय आहे हे पाहण्यासाठी त्याच्या मनात उत्साह वाढला.

त्याला आत काळोख असेलसे वाटलें. पण आत बरीच मोठी उघडी जागा होती व उजेड पण होता. डोंगर पोखरून ती गुहा तयार करण्यात आली होती. फर्शी



छान तुळतुळीत होती आणि छपरातून खाली उजेड येत होता. अलीबाबाने देवाचे नाव घेऊन आत पाऊल टाकले. भिंतीला टेकून किंवा टांगून पुष्कळ मूल्यवान वस्तू ठेवलेल्या होत्या. रेशमी, मखमली जरीचे कपडे. सोन्या व चांदीच्या विटांनी आणि सोन्याच्या नाण्यांनी गुहा भरगच्च भरलेली होती. याशिवाय रत्नांचे आणि मोत्यांचे ढीग पडलेले होते. कोठे पाऊल ठेवायला सुद्धां जागा उरली नव्हती.

अलीबाबाने आयुष्य भरात कधी सोन्याचे नाणे डोळचांनी पाहिले नव्हते आणि गुहेत सोन्याच्या नाण्यांचे ढीगच्या ढीग होते. एवढी संपत्ती येथे पिढचान् पिढचा कोणी तरी जमा करून ठेवलेली असावी. ही [illegible] नीच की आणखी कोणी तरी जमा केली असावी. कोणी बरे केली असावी? चोरांच्या किती पिढचा येथे गेल्या असतील कोणास ठाऊक? सर्वच दृश्य चकित, थक्क करून सोडणारे होते.

त्याने मनात विचार केला–"अरे मूर्खा, अलीबाबा! तुझे भाग्य तुझ्यासमोर हात जोडून उभे आहे, जास्त विचार करीत उभा राहू नकोस. आलेली संधी गेली की गेली. पुन्हां परत येणार नाही! नशीब उघडले आहे तर आनंदाने जितके उपभोगता येईल तितके उपभोगून घे."

असा विचार करून अलीबाबाने, बरोबर खाण्या-पिण्याचे सामान ठेवायला आणलेली पिशवी व चोरांच्या गुहेत सापडलेल्या



लहान लहान पिशव्या घेऊन त्यात जेवढी सोन्याची नाणी भरून घेता आली तेवढी भरून घेतली व गाढवांच्या पाठीवर टाकून त्या पिशव्यांवर लाकडे रचून ठेवली. नंतर मंत्र म्हणून खडकाचे दार बंद केले आणि आपल्या घराची वाट धरली.

तो घरी पोचला तेव्हां घराचे दार बंद होते आणि दाराला आतून कडी लावून घेतलेली होती. त्याने आपल्या घराचा दरवाजा मंत्र म्हटल्यावर उघडतो का पाहण्यासाठी "तिळा तिळा दार उघड" असे म्हटले मात्र आणि दार उघडलं की! त्याने घराच्या आवारात गाढवे हाकून नेली आणि "तिळा तिळा दार बंद कर" म्हटल्याबरोबर दार बंद झाले आणि दाराची कडी लागली.

अलीबाबा गाढवांच्या पाठीवरच्या पिशव्या काढून ठेवीत होता तितक्यात त्याची बायको जागी होऊन आली आणि विचारू लागली–"अहो! मी दार आतून बंद करून कडी लावून घेतली होती. मग दार कोणी उघडले?"

-अलीबाबा बायकोच्या प्रश्नाचे उत्तर देत बसला नाही. तिला गप्प बसायला खुणेने सांगून आनंदाच्या भरात त्या पिशव्या दाखवीत म्हणाला–"अल्लाने आपल्याला या पिशव्या दिल्या आहेत. या आपण



आत नेऊन सुरक्षित कोठे तरी लपवून ठेवू या चल, दरवाजा कोणी उघडला हा काय प्रश्न झाला?"

अलीबाबाच्या बायकोने पिशव्यांच्या दोऱ्या सोडून पाहल्या. तिला वाटत होते की तांब्याची नाणी असावीत, पण सर्व सोन्याची नाणी होती. आपला नवरा चोरांच्या टोळीत तर सामील झाला नाही ना? सर्व पिशव्या आत नीट पोचवल्यावर डोके आणि छाती बडवून ती रडू लागली– "तुम्ही हे काय आरंभिले आहे? आपण फांसावर चढलो तर मुलांकडे कोण पाहणार? चोरीचा माल तुम्ही घेऊन आला आहां. आपल्याला नाही पचणार तो! आपल्याला



नकोही पापाची कमाई! आपली ही मीठ भाकर परवडली!"

अलीबाबाला राग आला. म्हणाला—"तुझे डोके फिरले आहे, कोणाला आणि कां फांशी होणार ग? उगीच कां डोकं फोडून घेतेस?"

"हे पापाचे धन आपल्याला नको, कोठे तरी फेकून या, तुम्हांला पुण्य लागेल!" असे म्हणत ती पुन्हां रडू लागली.

"गप्प बसशील का जरा! बायकांचे डोकेच विचित्र! जरा विचार करतील तर ना? तुला काय वाटले, मी हे चोरून आणलं सगळं? आज सकाळी अल्लाने आपल्यावर मेहरबानी केली त्याचे आभार मान आणि पहिल्याने या पिशव्या रिकाम्या करून घेऊन ये. नंतर मी सर्व काही तुला नीट समजावून सांगतो." अलीबाबा बायकोची समजूत घालीत म्हणाला.

नंतर अलीबाबाने एक मोठी चटई घातली आणि तिच्यावर सर्व पिशव्या रिकाम्या केल्या: सोन्याची चमक पाहून डोळे दिपून जात होते दोघांचे. अलीबाबाने नंतर थोडक्यात इतके सोने त्याला कसे मिळाले हे सांगितले.

नंतर कोठे अलीबाबाच्या बायकोची भीती पार उडून गेली. तिने मन:पूर्वक देवाचे आभार मानले आणि दीनार एक एक करून मोजू लागली.

अलीबाबा हसू लागला. म्हणाला—"अग वेडे! तू असे किती वेळ मोजत बसणार? सैपाक घरात एक खड्डा खणून पुरून ठेवू या. शेजारपाजारच्या लोकांना कळले तर त्यांच्या पोटांत वाऊ उभा राहील आणि त्यांच्या तोंडी राजाच्या अधिकाऱ्यांना कळलं तर जीवच धोक्यात पडेल."

अलीबाबाची बायको म्हणाली—"हे आपण तागडीत वजन करून मोजले तरी पाहिजेत नाहीतर मापल्याने मापले तरी पाहिजेत. नाहीतर आपल्याजवळ किती धन आहे हे कसे कळेल? मी शेजारी वहिनींकडे जाऊन माप घेऊन येते व सर्व सोने मापून

ठेवा." असे सांगून ती निघाली.

अलीबाबाला बायकोचा हा सर्व खुळेपणा वाटला. पण त्याचे नशीब उघडले त्या दिवशी बायकोची तेवढी इच्छा पुरी होऊ देण्याचे त्याने मनाशी ठरविले. म्हणून म्हणाला—"लवकर कर काय ते, पण लक्षात ठेव, ही गोष्ट या कानाची त्या कानाला कळता कामा नये!"

अलीबाबाची बायको आपल्या दिराच्या घरी गेली आणि कासिमच्या बायकोला जागी करून म्हणाली—"अहो वहिनी! तुमच्या घरचे ते लाकडी माप आहे ना, ते देता का थोडा वेळ, मी आतां परत घेऊन येते."

कासिमची बायको घमेंडखोर होती. ती कधी आपल्या धाकट्या दिराच्या घरी गेली नाही की त्याच्या बायकोशी तोंड उघडून बोलली देखील नाही. जावेने माप मागितलेले ऐकून तिला फार आश्चर्य वाटले. यांच्या घरात इतके धान्य कोठून व कसे काय आले असेल? पोटभर खायला मिळत नाही आणि इतके धान्य कोठून आलं? तिने जावेला विचारले—"लहान माप देऊ की मोठे?"

"लहानच द्या!" अलीबाबाची बायको म्हणाली.



कासिमची बायको काहीतरी विचार करीत घरात गेली. एका मापाच्या बुडाला तिने थोडा डिंक लावून ठेवला आणि ते माप आणून जावेला दिले.

घरी जाऊन अलीबाबाच्या बायकोनें दीनार मापाने मोजून प्रत्येक मापाला एक याप्रमाणे भिंतीवर उभ्या खुणा करून ठेवल्या. त्याच वेळी अलीबाबा सैपाकघरात खड्डा खणून तेथे आला. तेव्हां त्याची बायको जावेकडून आणलेले माप परत द्यायला गेली. मापाच्या बुडाला एक दीनार चिकटलेला होता, पण तिला ते कळले नाही.

"काम संपल्याबरोबर परत द्यायला आले! कारण पुन्हां कधी लागलं तर

तुमच्याचकडे मागायला यावं लागेल ना ?" भोळसटपणाने अलीबाबाची बायको जावेला म्हणाली.

अलीबाबाची बायको निघून गेल्याबरोबर कासिमच्या बायकोने बुडाला चिकटलेला दीनार पाहिला. तिला वाटले होते तसे धान्याचे दाणे चिकटलेले नव्हते. त्याऐवजी सोन्याचे नाणे चिकटलेले होते. ते पाहून कासिमच्या बायकोच्या सर्व अंगाचा तिळ पापड झाला. आजपर्यंत ती आपल्या श्रीमंती-पुढे अलीबाबा व त्याच्या बायकोला मुळीच मानीत नसे. पदोपदी त्यांचा अपमान करी. परंतु आता अलीबाबा मापाने सोन्याची नाणी मोजतो म्हणजे तो फारच मोठा श्रीमंत झाला असला पाहिजे. त्याच्यासमोर आपण गरीब ठरलो. आतां आपली मान खाली होणार. रागाचे कारण हेच होते. "या भिकारड्यांना मापाने मापण्यालायक सोने कोठून बरे मिळाले असेल ?" ती मनात विचार करू लागली.

तिचा नवरा दुकानातून परत आला नव्हता. तो परत येईपर्यंत, तिला धीर नव्हता. म्हणून तिने दासीला पाठवून त्याला बोलावून घेतले.

कासिम आल्याबरोबर त्याची बायको नागिणीसारखी फूत्कार सोडीत नवऱ्याला तोंडाला आले ते बोलू लागली, जणुकाही त्याने काहीतरी मोठी चूक केली होती. तो घरी आल्यावर दोन मिनिटे टेकलादेखील नव्हता, फणकाऱ्यात ती त्याला सोन्याचे नाणे बोटाने वाजवीत म्हणाली—"पाहिलेत, हा दीनार तुमच्या बंधुराजांच्या घरातला आहे. तुम्हांला आहे कोठे अक्कल? तुम्हांला आपल्याकडे एक दुकान आहे आणि भावाकडे फक्त दोन गाढवं आहेत असे वाटले. लाकडे फोडून पोट भरणाऱ्या माणसाकडे सोन्याची इतकी नाणी कोठून कशी काय आली, कधी विचार तरी आला का मनात तुमच्या? सोन्याची नाणी मोजायला त्यांना वेळ पुरत नाही, म्हणून ते मापाने मोजतात. तुम्ही आयुष्यभर अल्लाच्या नावने डोके फोडून घेतलेत तरी एवढे पैसे तुम्हांला आयुष्यभरात मिळणार नाहीत. (चालू)





# पापाचे वाटेकरी

एका गावी एका श्रीमंत माणसाने एक फार मोठे घर बांधले. त्या गावात परमानंद नावाचे ज्योतिषी होते, त्यांच्या सांगण्याप्रमाणे गृहप्रवेशासाठी मुहूर्त धरला. गृहप्रवेशापूर्वी ज्योतिषीबुवांना मांजर पिल्लां-बरोबर एका ओटयावरून दुसऱ्या ओटयावर उडी मारतांना दिसले. ते पाहून लोभी ज्योतिष्याच्या मनात एक विचार आला. घराच्या मालकाकडून काही पैसे उकळता आले तर पहावे. त्याप्रमाणे तो त्या श्रीमंत माणसाला म्हणाला—"यजमान! पाहिलेत ना ते मांजर? अपशकुन झाला. आतां तुम्ही मुहूर्त पुढे ढकलावा यातच हित आहे. एक शांत केल्याशिवाय मुहूर्त ठरविणेदेखील धोक्याचे आहे."

"नुसती शांत केल्याने भागेल की यज्ञ होम वगैरे काही करावे लागणार?" श्रीमंत मनुष्य विचारू लागला.

"मी सर्व सांगतो, कायकाय करायचे ते." असे सांगून परमानंद ज्योतिष्याने संस्कृत भाषेत लिहिलेला एक मोठा ग्रंथ काढला आणि त्याची पाने उलटून पालटून काही वाचल्यासारखे दाखवून म्हणाला—"मांजर ओलांडून गेले आणि बरोबर पिल्ले होती, याचा अर्थ या घरात अनेक भुते आहेत. त्या भुतांना पळवून लावायला "वज्रशुंठ" नावाचा यज्ञ केला पाहिजे आणि एक सोन्याचे मांजर तयार करवून मंत्रवेत्ता ब्राह्मण पाहून त्याला दान केले पाहिजे."

"ठीक, मग तसेच करू या. तुमच्याहून चांगला दुसरा मंत्रवेत्ता कोठून मिळणार? तुमच्या हातूनच होऊ द्या हा यज्ञ आणि दानपण तुम्हीच घ्या." घराचा मालक म्हणाला.

गृहप्रवेशासाठी मुहूर्त ठरविण्यात आला आणि त्याच दिवशी थोडा आधी "वज्रशुंठ"



यज्ञासाठी मुहूर्त धरण्यात आला. त्यावेळी काही वेदपाठी ब्राह्मण बोलावण्यात आले. त्यात कृष्णंभट नावाचा एक उत्तम मंत्रवेत्ता ब्राह्मणपण होता. त्याने आल्याबरोबर परमानंदाला विचारले–"काय रे, मांजराचा हा अपशकुन आणि भुताखेताबरोबर हा "वज्रशुंठ" यज्ञ ही काय भानगड आहे? आपण कोठे असे काही वाचल्याचे अथवा ऐकल्याचे आठवत नाही बुवा, म्हणून विचारतो."

परमानंद म्हणाला–"तू गप्प बैस! ही सर्व तयारी सर्व गोष्टींचा विचार करूनच करण्यात आली आहे."

कृष्णंभट काही बोलला नाही. शांतपणे सर्व गंमत पहात होता. यज्ञ संपला आणि

मिळाले. गृह प्रवेशाचा सर्व विधी संपला आणि सर्व घरी निघाले तेव्हां कृष्णंभटाने परमानंदाला विचारले–"कायरे, तू माझ्या शंकेचे समाधान केले नाहीस?"

परमानंद म्हणाला–"अरे यात शंका करण्यासारखे काय आहे? यजामानांनी दान केले आणि मी ते घेतले. हे सर्व आमचे आपसांतले आहे. तुला त्याच्याशी काय?"

"पण लक्षात ठेव, यात तुझी लबाडी आहे. तुझी ही फसवेगिरी तुझ्या यजमानांना व राजाला पण कळल्याशिवाय राहणार नाही." कृष्णंभटाने तितक्याच रागात उत्तर दिले.

ते ऐकून परमानंद थोडा चपापला. म्हणाला–"तू रागावलास तर कसं रे चालेल? तुला सुद्धा यातला थोडा वांटा मिळेल!" परमानंदाने त्याला शांत करण्यासाठी त्याली प्रलोभन दिले.

"मी एकट्यासाठी विचारले नाही, आजच्या होमाला दहाजण होतो आम्ही. सर्वांना वांटा मिळाला पाहिजे." कृष्णंभट दम देत म्हणाला.

"बरं तर, कबूल! तू अर्धी रात्र उलटल्यावर ये माझ्या घरी." परमानंद म्हणाला. कृष्णंभट होकार देऊन निघून गेला.

जाऊन म्हणाला–"यजमान! मी सांगायला विसरलो. आम्ही भुतांना पळवून लावले. पण त्यांचा एक नोकर मध्यरात्रीच्या सुमारास आपल्याकडे येऊन आपल्याला त्रास देईल कदाचित. ते पिशाच आज आपल्याकडे आलेल्या ब्राह्मणांपैकी कोणाच्या तरी वेषात येईल. म्हणून ते आल्याबरोबर त्याला काठीने छान बडवून काढा. मी हा मंत्रवलेला दंड देतो. या दांडक्याने तुम्ही त्याला मारलेत तर तुमची सर्व पीडा टळेल." असे सांगून परमानंदाने घरमालकाला ते दांडके दिले.

त्या दिवशी रात्री मध्यरात्रीच्या सुमारास कृष्णंभटाने परमानंदाच्या घरी जाऊन त्याच्या दाराची कडी वाजविली. परमानंदाने दार उघडून विचारले–"ओ हो! तुम्ही का? कशाला आलां आहां?"

"मी त्या सोन्याच्या मांजराविषयी बोलायला आलो आहे." कृष्णंभट म्हणाला.

"मला त्याविषयी कोणाशी काही बोलण्याची गरज नाही. ते सोन्याचे मांजर माझे आहे. मी त्यातला वांटा कोणाला द्यायला तयार नाही." परमानंदाने साफ सांगून टाकले.

"तसं असेल तर मी घरमालकाला सर्व गुपित सांगून टाकतो." कृष्णंभट म्हणाला.



"जा रे, काय वाटेल ते जाऊन सांग! मला कोणाची भीती नाही." असे सांगून परमानंदाने आपल्या घराचे दार बंद करून कडी लावून घेतली.

कृष्णंभट सरळ घर मालकाकडे गेला. तो दाराची कडी वाजवून त्याला उठविणार होता. तितक्यात त्याला घरात कोणीतरी बोलत असल्याचे ऐकू आले. म्हणून तो मागे उभा राहून कोण काय बोलत आहे, ऐकू लागला.

"काय हो हे दांडके घेऊन येथे उभे कां?" घराच्या मालकिणीने विचारले.

"अग, तुला मी सांगितले नाही, परमानंद ज्योतिषी सांगून गेले आहेत की

त्या भुतांचा नोकर कोणत्यातरी ब्राह्मणाचा वेष करून येणार आहे मध्यरात्री! या दांडक्याने त्याचे डोके फोडायला सांगून त्याने हा मंत्रदंड मला दिला आहे. म्हणून मी वाट पाहतो आहे."

"परमानंदाची भामटेगिरी कृष्णंभटाला कळली. त्याचे नशीब बलवत्तर होते म्हणून धोका टळला. अशा दुष्ट माणसाची खोड मोडली पाहिजे असे मनाशी ठरवून तो आपल्या घरी गेला आणि नोकराला बोलावून काही तरी त्याच्या कानात सांगून त्याने त्याच्या हातात चार पैसे ठेवले आणि त्याला पाठवून दिले.

नोकराने परमानंदाच्या घरी जाऊन दाराची कडी वाजविली आणि परमानंदाने दार उघडल्याबरोबर त्याला म्हणाला–मालक! आपले यजमान बेशुद्ध होऊन पडले आहेत आणि यजमानीण बाईंनी ताबडतोब बोलाविले आहे. तेव्हां चला!"

परमानंद चकित होऊन घरमालकाकडे गेला. त्याने दाराची कडी वाजविली. [illegible] उभा होता त्यालाच भुताचा नोकर समजून दांडक्याने बडवीत म्हणाला– "अरे भुता! तू या पुण्यवान माणसाच्या रूपाने मला फसवायला आला आहेस काय?"

परमानंद खूप मार बसल्याने बेशुद्ध होऊन खाली पडला. घर मालकाने दार बंद करून घेतले.

त्या काळोख्या रात्री कृष्णंभट व त्याचा नोकर बाजूला उभे राहून सर्व गंमत पहात होते. त्यांनी परमानंदाला उचलून नेऊन त्याच्या घरी पोचते केले. परमानंदाला शुद्धी आल्यावर कृष्णंभट म्हणाला–"अरे ब्राह्मणा, तुझे लोभाचे भूत उतरले असेल. आतां तरी तें सोन्याचे मांजर सर्वांना वांटून देणार आहेस की नाही?"

"हात टेकले बाबा, तुम्ह्यासमोर! बोलावून घेऊन ये सर्वांना. या पापाचे सर्व वांटेकरी आहेत." दुसऱ्या दिवशी ते सोन्याचे मांजर सर्वांनी वांटून घेतले.






द्वारकेत कृष्णाने राज्यव्यवस्थेची सर्व कामे आपले वडील वसुदेव यांना सोपविली आणि स्वत: राजसूय यज्ञासाठी आवश्यक सर्व वस्तू,–रत्न, धन, धान्य आदि घेऊन इंद्रप्रस्थ नगरी आला.

युधिष्ठिर कृष्णाला म्हणाला–"राजसूय यज्ञ म्हणजे फार मोठ्या जबाबदारीचे काम मी अंगावर घेतले आहे. म्हणून तू मला हा यज्ञ करण्यास अनुज्ञा दे किंवा तूच स्वत: दीक्षा घेऊन यज्ञकार्याला बस."

"युधिष्ठिरा! साम्राज्याचा सर्व भार संभाळण्यास तूच सर्व प्रकारे योग्य आहेस. म्हणून तूच यज्ञाची दीक्षा घे. तुझी इतर कामे मी करतो. तू निश्चिंतपणे यज्ञाला बस." कृष्ण म्हणाला.

कृष्ण म्हणाला ते ऐकून युधिष्ठिराला फार आनंद झाला. त्याने सहदेवाला बोलावून यज्ञाची सर्व तयारी करायला सांगितली आणि म्हणाला–"सर्व चतुर्वर्णियांना या यज्ञाचे बोलावणे कर."

नंतर नकुलाला बोलावून म्हणाला–"तू हस्तिनापूरला जाऊन भीष्माचार्य, विदुर, द्रोणाचार्य, कृपाचार्य, अश्वत्थामा आणि सुयोधन आदिक कौरव बंधूंना बोलावणे करून घे."

सहदेवाने यज्ञाची सर्व तयारी केली. नकुल हस्तिनापूरला जाऊन बोलावणी करून आला. सर्व पाहुणे मंडळी आली. युधिष्ठिर यज्ञ करण्याचे व्रत घेत असल्याचे त्यांना सांगून म्हणाला–"आपल्या पैकी



प्रत्येकाला एक न एक जबाबदारी स्वत:वर घ्यावी लागणार आहे." असे सांगून त्याने दानधर्माचे काम कृपाचार्यांना, भोजनालयाची व्यवस्था दु:शासनाला, ब्राह्मणांचे आतिथ्य करण्याचा भार अश्वत्थाम्याला, राजेरजवाड्यांच्या आतिथ्याचे काम संजयाला, भेट नजराणे सुरक्षित ठेवण्याचा भार दुर्योधनाला, आणि इतर सर्व कामे भीष्माचार्य व द्रोणाचार्य यांना सोपविली.

राजसूय यज्ञ आणि मयसभा पाहण्यासाठीच जास्त लोक आले होते. राजेरजवाडे मोठमोठे नजराणे घेऊन आले होते. यज्ञ चालू असतां पाहुणेमंडळींच्या जेवणाखाण्याची उत्तम व्यवस्था ठेवण्यात आली



... यज्ञ समारंभ थाटात पार पडला.

तेव्हां भीष्माचार्य युधिष्ठिराला म्हणाले– "युधिष्ठिरा! स्नातक, ऋत्विज, सद्‌गुरु, प्रिय व्यक्ति, राजा आणि इंद्रियनिग्रही थोरपुरुष हे सहाजण पूज्य आहेत. म्हणून तू आपल्या समजुतीप्रमाणे व्यक्तींची निवड करून त्यांची पूजा कर."

"अशा व्यक्तींची निवड आपणच करून देण्याची कृपा करावी." युधिष्ठिराने भीष्माचार्यांना विनंती केली.

भीष्माचार्य विचार करून म्हणाले–"या सभेत अग्रपूजेला योग्य कृष्णाहून मोठा कोण आहे. त्याचीच अर्घ्य पूजा सर्व प्रथम कर."

युधिष्ठिराच्या मनात कृष्णाची पूजा करण्याचा विचार होता. परंतु ती गोष्ट भीष्माचार्यांकडून सांगवून त्याने त्यांच्या शब्दाला मान देण्यासाठी म्हणून कृष्णाची अर्घ्य पूजा करण्यास सहदेवाला सांगितले. कृष्णाने आनंदाने अर्घ्य पूजा ग्रहण केली.

ते पाहून शिशुपाल त्या गोष्टीस आक्षेप घेत म्हणाला–"युधिष्ठिरा! इतके क्षत्रिय राजे व थोर पुरुष हजर असतां यादवकुळात जन्मलेल्या कृष्णाची अर्घ्यपूजा कशी काय केलीस? तो वयाने वृद्ध आहे की आचार्य आहे की ऋत्विज आहे? त्याच्यात तुला कोणत्या गोष्टीचा मोठेपणा दिसला? भीष्माचार्यांना तरी औचित्य व अनौचित्य ... विचार थोडे आहे? ... कृष्णाचीच अग्रपूजा करावयाची होती तर या सर्व राजांकडे निमंत्रण पाठविण्याची गरजच काय होती? तू या सर्वांचा अपमान केला आहेस. तू महाप्रतापी आहेस असे समजून आम्ही तुला भेट व नजराणे दिले नसून तू धर्मज्ञ व सत्यव्रती आहेस व साम्राज्याचा कारभार पाहण्यास योग्य आहेस असे समजून दिले होते. तू आपल्या या कर्माने मिळविलेले सर्व यश व कीर्ती घालवून बसला आहेस."

नंतर शिशुपाल कृष्णाला संबोधन करून म्हणाला–"पांडव तुझा पाताळयंत्री स्वभाव ओळखून तुला भ्याले व त्यांनी तुझी अग्रपूजा केली. परंतु ती न करून घेण्याची समजूत किंवा शहाणपणदेखील तुझ्याजवळ नाही. तू क्षत्रिय नाहीस, म्हणून तुझा हा आदर फुकटच गेला. क्षत्रियांचा नाही. युधिष्ठिराची धर्मज्ञता, भीष्माचार्यांचे शहाणपण आणि तुझा विवेक यांची खरी कल्पना आम्हांला आता झाली आतां या सभेत राहणे अकलेचे काम नाही." असे सांगून शिशुपाल आपल्या सहकारी राजांसह निघून गेला.

युधिष्ठिर त्याच्या पाठीमागून धावत गेला व म्हणाला–"शिशुपाला! थांब, माझे म्हणणे जरा ऐकून घे. तू बोललास ते न्यायोचित नाही. भीष्माचार्यांसारख्या वृद्ध पितामहांचा अपमान करणे तुला शोभत नाही. तुझ्याहून जास्त अनुभवी आणि वृद्ध या सभेत हजर आहेत. परंतु





त्यांच्यापैकी एकानेदेखील कृष्णाविषयी आक्षेप घेतला नाही, आणि तुलाच हे काय सुचले ?"

ते ऐकून युधिष्ठिराला भीष्माचार्य म्हणाले–"अरे तू या दुष्ट शिशुपालाची समजूत घालण्याची गरजच काय?" नंतर सभासदांकडे वळून म्हणाले–"शिशुपाल मूर्ख आहे. त्याला कृष्णाचा थोरपणा काय कळणार? कृष्णाला सर्वात प्रथम अर्घ्य देण्यांत आला आहे. आता शिशुपाल काय करतो, हे पाहणार आहो आम्ही."

सहदेव आपला उजवा पाय उचलून म्हणाला–"आम्ही कृष्णाची अर्घ्यपूजा केली आहे. या बद्दल कोणाला आक्षेप असेल त्याने बोलावे, हा पाय मी त्याच्या मस्तकावर ठेवतो."

सभेत उभा राहून बोलण्याची कोणाची छातीच नव्हती. परंतु शिशुपालाचा सेनापती सुनीध उभा राहून म्हणाला–"सर्व राजांजवळ विनंती आहे की त्यांनी सर्वांनी उभे रहावे. यादवांनी व पांडवांनी आमचा अपमान केला आहे. आम्ही त्यांचा गर्व भंग करू." असे सांगून त्याने त्याच्या बाजूच्या राजांना व राजकुमारांना एकत्र यायला सांगितले. शिशुपालाने युद्ध आरम्भ करण्यास अनुज्ञा दिली. ते सर्व पाहून युधिष्ठिर भीष्माचार्यांना म्हणाला–"आजोबा! हे सर्व राजे युद्धास तयार झाले आहेत. म्हणून यज्ञ भंग होऊ नये यासाठी आणि प्रजेचेपण रक्षण व्हावे यासाठी आपण काहीतरी उपाय सुचविण्याची कृपा करावी."

भीष्माचार्य म्हणाले–"युधिष्ठिरा! अरे, स्वतः कृष्ण तुझ्या यज्ञाच्या रक्षणार्थ येथे हजर असता त्यात विघ्न आणण्याची छाती कोणाला होईल का? शिशुपालाच्या भाग्याने त्याला पाठ दाखविलेली दिसते आहे म्हणून तो बरळतो आहे."

भीष्माचार्यांचे ते शब्द ऐकून शिशुपाल संतापला आणि तो भीष्माचार्यांची निंदा करू लागला. ते पाहून भीम स्वतःला आवरू शकला नाही. तो रौद्र रूप धारण [illegible] परंतु भीष्माचार्यांनी त्याला अडविले आणि त्याला शिशुपालाचे पूर्ववृत्त सांगितले. ते म्हणाले–"शिशुपाल जन्मला तेव्हां त्याला तीन डोळे व चार हात होते आणि तो गाढवासारखा रेंकू लागला. ते पाहून त्याचे आईवडील सात्वती व दमघोष त्याला दूर फेकून द्यायला निघाले. तेव्हां त्यांना एक आकाशवाणी ऐकू आली–"तुम्ही या मुलाला फेकून देऊ नका. हा मोठा पराक्रमी योद्धा होईल. त्याला आतां मरण येणार नाही. त्याला ठार करणारी व्यक्तिपण जन्मली आहे."

सात्वतीने त्या आकाशवाणीला विचारले–"त्याला ठार करणारी ती व्यक्ति कोण?"

"ज्याच्या मांडीवर बसतांच शिशुपालाचा एक डोळा व दोन हात जातील त्याच्याच हाती याला मरण येईल." आकाशवाणी म्हणाली.

त्या दिवसापासून सात्वती तिच्या मुलाला पहायला जो कोणी येई त्याला मुलाला मांडीवर घ्यायला सांगे. काही काळ लोटल्यावर बलराम व कृष्ण चेदिपूरला आले. ते दमघोष याच्याशी काही वेळ बोलत राहिल्यावर अंतःपुरात सात्वतीला भेटायला गेले. तिच्या विनंतीवरून बलरामाने व त्यानंतर कृष्णाने सात्वतीच्या मुलाला मांडीवर घेतले. कृष्णाने उचलून



घेतल्याबरोबर मुलाचा एक डोळा व दोन हात अदृश्य झाले. तेव्हां कृष्णाच्या हातीच तिच्या मुलाला मरण आहे हे सात्वतीने ओळखले. ती घाबरून जाऊन थरथर कापत कृष्णाचे पाय धरून म्हणाली–"कृष्णा! याच्या हातून कधी काही चूक घडली तर तू त्याला माफ कर." तेव्हां कृष्णाने सात्वतीला तिच्या मुलाचे शंभर अपराध क्षमा करण्याचे वचन दिले."

भीष्माने शिशुपालाचे पूर्ववृत्त सांगितले ते ऐकून तो रागावला व तोंडाला आले ते भीष्माचार्यांना म्हणाला. नंतर तो कृष्णाला म्हणाला–"कृष्णा! तू माझ्याशी द्वंद्वयुद्धास तयार हो. तुझा वध होईपर्यंत भीष्मा-



चार्यांचा गर्वपरिहार होणार नाही. तुला ठार केल्यावर मी पांडवांचा सामाचार घेईन. त्यांनी तुझी पूजा केली आहे. म्हणून त्यांना त्याचा दंड मिळालाच पाहिजे."

शिशुपाल म्हणाला ते कृष्ण शांतपणे बसून ऐकत होता. नंतर तो सर्व राजांकडे वळून म्हणाला–"सर्व लक्ष देऊन ऐका! शिशुपाल हा माझा आते भाऊ आहे. तरी याने विनाकारण आम्हां यादवांना फार त्रास दिला आहे. आम्ही प्राग्ज्योतिष्पुरावर स्वारी करायला गेलो होतो तेव्हां याने आमच्या द्वारकेवर स्वारी केली आणि द्वारकेला आग लावून निघून गेला. आम्ही रैवतक पर्वतावर विहार करण्यासाठी गेलो असतां याने आमच्या पैकी काही जणांना ठार केले व निरपराध स्त्रियांना कैद केले. माझे वडील वसुदेव यांनी अश्वमेध यज्ञ आरंभिला तेव्हां या यज्ञाचा अश्व अपहरण करून घेऊन गेला. याने रुक्मिणीशी विवाह करण्याचा प्रयत्न केला. परंतु मी याचे एक देखील दुष्कृत्य चालू दिले नाही. याने केलेले सर्व अपराध, मी आतेला दिलेल्या वचनाप्रमाणे माफ केले.

त्यावर शिशुपाल व्यंग्यात्मक हास्य करीत म्हणाला–"कृष्णा! मी ज्या स्त्रीला मनाने वरले होते तिच्याशी तू विवाह करून या भर सभेत त्या गोष्टीचा उल्लेख केलास. तुला त्याची लाज कशीरे वाटत नाही? तुझ्या कृपेनेच जणुकाही मी आज पावेतो जिवंत आहे. मला तुझी कसली रे भीती? तुला जे पाहिजे ते कर."

लगेच कृष्णाने आपले सुदर्शन चक्र शिशुपालावर सोडले. सुदर्शन चक्राने शिशुपालाचा शिरच्छेद केला आणि तो जमिनीवर आदळला. त्याच्या देहातून एक ज्योत निघाली आणि ती कृष्णाच्या शरिरात लुप्त झाली. ते पाहून सर्व चकित झाले. युधिष्ठिराने शिशुपालाची अन्त्येष्टी करण्यास सांगून शिशुपालाच्या मुलाचा राज्याभिषेक करविला.

राजसूय यज्ञ संपला. युधिष्ठिराने दीक्षा समाप्त झाल्याचे घोषित केले. सर्व राजांनी

युधिष्ठिराजवळ जाऊन त्याचे अभिनंदन केले व त्याचा निरोप घेतला. युधिष्ठिराने सर्वांस अत्यंत आदरपूर्वक निरोप दिला आणि आपल्या भावंडांना हस्तिनापुराबाहेरपर्यंत पोचवायला सांगितले. त्यानंतर कृष्णादेखील द्वारकेला परतला. मयसभा पाहण्यासाठी दुर्योधन शकुनी मामांसह मागे राहला.

एकदा युधिष्ठिराच्या सभेत व्यास मुनी आले. तेव्हां युधिष्ठिराने आपल्या मनातली शंका या शब्दात व्यक्त केली–"राजसूय यज्ञासारख्या शुभ प्रसंगी शिशुपालाचा वध झाला. याचा काही दुष्परिणाम होईल का?"

"होय, हे एक अशुभच झाले. याचा दुष्परिणाम तेरा वर्षांनंतर कळेल. तेव्हां क्षत्रियांचा नाश होईल." व्यास ऋषी म्हणाली.

ते ऐकून युधिष्ठिराला फार वाईट वाटले. परंतु अर्जुनाने त्याच्या मनाचे सांत्वन केले.

मयसभा पाहते वेळी दुर्योधनाला अनेकदां अपमान सहन करावा लागला. जेथे पाणी नव्हते तेथे पाणी असेल असे समजून धोतर भिजू नये यासाठी त्याने ते वर उचलून धरले. जेथे पाणी होते तेथे फरशी असेल असे समजून त्याने पाय ठेवला तर सर्व कपडे भिजले. ते पाहून भीम, अर्जुन, नकुल, सहदेव व द्रौपदी हसले. दुर्योधनाला त्या गोष्टीचा भयंकर राग आला. परंतु युधिष्ठिराने नवी वस्त्रे देऊन त्यांच्या मनाचे समाधान करण्याचा प्रयत्न केला.

परंतु दुर्योधनाचा कित्येक वेळां अपमान झाला होता. तो दार समजून पुढे गेला तर त्याचे डोके आपटले. जेथे जमीन सपाट आहे, असे वाटले तेथे ती सपाट होती. दोन्ही ठिकाणी तो पडला. जी मयसभा आनंदाखातर बघण्यासाठी तो थांबला होता त्या यमसभेत त्याला पदोपदी अपमान व दुःख सहन करावे लागले.

युधिष्ठिर एका विशाल साम्राज्याचा अधिकारी झाला होता. त्याला एक लोकोत्तर मयसभा मिळाली होती. त्यामुळे दुर्योधनाचा मत्सराग्नी पेटला. तो त्या दुःखाने कुढत हस्तिनापुरला परतला.





# तीन यक्षिणी

[ ३ ]

सर्व जेवायला बसले असतां यक्षराजाने आपल्या मुलीकडे एका दूतांकरवी निरोप पाठविला. जेवण आटोपल्यावर त्या दूताने मोठ्या मुलीच्या हातात पत्र दिले. ते पत्र वाचून ती मुलगी रडू लागली. दुसरीने व तिसरीने पण ते पत्र वाचले आणि दोघी रडू लागल्या.

यक्षिणी रडू लागलेल्या पाहून मंगलने त्यांना रडण्याचे कारण विचारले म्हणाला–"पत्र वाचून तुम्ही कां रडू लागलात?"

"माझ्या भावाला घेऊन वृषभासुर पळून गेला आहे. त्याला सोडवून आणणे कठीण आहे, असे बाबा म्हणत आहेत." मोठी यक्षिणी म्हणाली.

"ईश्वराची कृपा असेल तर मी तुझ्या भावाला सोडवून आणीन. परंतु माझे चाळीस भाऊ तुरुंगात खितपत आहेत. अशातऱ्हेची आणखी अकरा भांडी मिळाली तरच त्यांना तुरुंगातून सुटका मिळेल." मंगल म्हणाला.

"अहो, तुम्ही विचित्रच दिसतां! असली भांडी तुम्हांला हवी तितकी मिळतील?" यक्षिणी म्हणाल्या.

"तसे असेल तर तुम्ही माझे प्राण वाचविल्यासारखे होईल. मला तुमच्या वडिलांकडे घेऊन चला." मंगल म्हणाला.

यक्षिणी मंगलला घेऊन यक्षराजाकडे गेल्यां. मंगल राजाला नमस्कार करून हात जोडून समोर उभा राहिला. "या माणसाला तुम्ही माझ्याकडे कशाला घेऊन आला आहां?" यक्षराजाने आपल्या मुलींना विचारले.

"हे आमच्या भावाला वृषभासुराच्या हातातून सोडवून आणणार आहेत." यक्षिणी म्हणाल्या.



"खरंच? तू माझ्या मुलाला सोडवू शकशील?" यक्षराजाने मंगलला विचारले.

"मी प्रयत्न करून पाहतो." मंगल म्हणाला.

"तूं त्या वृषभासुराला पाहिले तरी आहेस का?" राजाने मंगलला विचारले.

"नाही महाराज, मी नाही पाहिले." मंगल म्हणाला.

यक्षराजाने मंगलला आपल्या तबेल्यातला एक उत्तम घोडा निवडायला सांगितले. नंतर स्वतःची ढाल तलवार, धनुष्य आणि गदा देखील दिली नंतर आपल्या सेनापतीला बोलावून म्हणाला—"तू या तरुणाला वृषभासुराच्या डोंगरापर्यंत पोचवून ये."

मंगलने एक घोडा निवडून घेतला आणि त्याच्या पाठीवर उडी मारून बसला. त्याला घोड्यावर उडी मारून बसतांना पाहून यक्षराजाला वाटले की हा मुलगा नक्कीच वृषभराजाला ठार करणार.

यक्षराजाचा सेनापती मंगलला वृषभराजाच्या पर्वतापर्यंत घेऊन गेला आणि म्हणाला—"याच डोंगरावर तो राक्षस राहतो. मी परत जातो."

मंगल सेनापतीला निरोप देऊन घोड्यावर बसून डोंगर चढू लागला. घोडा राक्षसाच्या किल्लयाच्या फाटकाजवळ जाऊन थांबला.

"अरे राक्षसा! तुझा कर्दनकाळ बाहेर उभा आहे." मंगल जोराने ओरडून म्हणाला.

दोघां द्वारपालकांनी किल्लयाचे फाटक उघडले आणि बाहेर आले. घोड्याशी बेफिकीरपणाने मंगलकडे पहात त्यांनी त्याला आत जाऊ दिले नाही.

मंगलने तलवार उपसून त्या दोघांची डोकी उडविली आणि त्यांची मुंडकी खिडकीतून आत टाकली.

मुंडकी पडल्याचा आवाज ऐकून वृषभासुर जागा झाला. खिडकीतून मंगलला पाहिल्यावर तो बाहेर आला.

दोघांचे द्वन्द्व-युद्ध सुरू झाले. राक्षसाने गदाप्रहार केला. पण मंगलने त्याचा वार चकविला आणि गदा जमिनीवर आदळली.

[illegible] सर्व पृथ्वी [illegible] मंगलने चटकन ती उचलली आणि राक्षसावर गदा प्रहार करीत म्हणाला—"तू माझ्याशी द्वंद्व-युद्ध कां करीत नाहीस? तुला माझ्याशी युद्ध म्हणजे खेळ वाटला होय?"

वृषभासुराने सात वेळां मंगलवर गदा-प्रहार केला. सात वेळा त्याने त्याच्यावर बाण पण सोडले. परंतु त्या पैकी एक देखील मंगलला लागला नाही.

"थांब, आतां माझी पाळी आहे." असे म्हणत मंगलने तलवारीचा एक जोरदार वार करून राक्षसाचे डोके उडविले. राक्षसाचे डोके जमिनीवर आदळले आणि डोंगरावरून खाली गडगडत गेले. मंगलने आपला घोडा बाहेर बांधून ठेवला आणि आत जाऊन राजकुमाराला सोडविले आणि म्हणाला—"चल, तुझ्या वडिलांकडे जाऊया."

दोघे घोड्यावर बसून यक्षराजाकडे येऊन पोचले. वाटेत राजकुमार मंगलला म्हणाला—"मंगल, माझे वडील तुला काही मागून घ्यायला सांगतील तेव्हां तू माझ्या धाकट्या बहिणीशी विवाह करून द्या असे सांग आणि त्यांच्या हातातली अंगठीपण मागून घे."

आपला मुलगा सुखरूप घरी येऊन पोचलेला पाहून राजा व राणी दोघांना फार आनंद झाला.

राजाने मंगलला काय पाहिजे ते मागून घ्यायला सांगितले. म्हणाला—"तू मागशील ते देईन."



"महाराज, आपण विचारलेत म्हणून मागत आहे. राग मानू नये. माझी इच्छाच विचाराल तर आपल्या सर्वांत धाकट्या मुलीशी माझे लग्न करून द्यावे आणि आपल्या हातातली ती अंगठी देऊन अशा तऱ्हेची अकरा भांडी द्यावी." मंगलने ते भांडे दाखवीत नम्रपणे विनंती केली.

"जरूर देतो. तू ही तीन्ही इनामें मिळण्या योग्यच कार्य केले आहेस." यक्ष राजा म्हणाले.

मंगलचा विवाह शुभ मुहूर्तावर यक्ष राजाच्या तिसऱ्या मुलीशी झाला. सात दिवस राज्यभर आनंद व उत्सव होता. आठव्या दिवशी मंगल आपल्या बायको बरोबर ती अंगठी आणि बारा भांडी घेऊन निघाला.

मंगल आपल्या देशाच्या राजधानीजवळ पोचला तोपर्यंत एक वर्ष होऊन गेले होते. चाळीस चोरांच्या शिरच्छेदाची तयारी होऊ लागली होती.

[illegible] एकदम ओरडून म्हणाला— "थांबा!" नंतर त्याने आपले गाठोडे सोडून ती बारा भांडी एकावर एक रचून ठेवली व राजाला म्हणाला—"महाराज! आपण जी बारा भांडी मागितली होती ती पाहून मोजून घ्यावी."

राजाने व्यापाऱ्याला बोलावून विचारले— "ही जी भांडी ठेवली आहेत त्यातली तू आपली भांडी ओळखू शकशील का?"

ती भांडी पाहून व्यापारी थक्कच झाला. त्याच्या तोंडातून एक शब्ददेखील बाहेर पडला नाही.

राजाने चाळीस चोरांना तुरुंगातून मुक्त केले आणि त्या फसव्या व्यापाऱ्याला शिरच्छेदाची शिक्षा केली. त्यानंतर राजधानीतल्या सर्व व्यापाऱ्यांना बोलावून फसव्या व्यापाऱ्यांचा शोध लावला आणि त्यांना हद्दपारीची शिक्षा दिली.

त्यानंतर राजाने मंगलचा युवराज म्हणून अभिषेक केला. प्रजा सुखी झाली.

(संपूर्ण)



## [illegible] "शांतिदाता"

अंडीज नांवाच्या दक्षिण अमेरिकेतील पर्वत प्रदेशात अर्जेंटिना व चिली देशांच्या मधल्या हद्दीवर येशूख्रिस्ताची ही मूर्त दोन्ही देशांमध्ये शांतीचे एक चिन्ह म्हणून उभी आहे. या उंच कांशाच्या मूर्तीच्या पायथ्यावर असे लिहिले आहे—"हे पर्वत घर्षणाने धुळीसारखे होऊन गेले तरी अर्जेंटिना व चिली देशाच्या प्रजेने मुक्तिदाता येशुख्रिस्ताच्या चरणांची शपथ घेऊन दोन्ही देशात सर्वदा शांति राहील अशी जी प्रतिज्ञा केली होती, ती भंग होणार नाही."





# शत्रूचा शेवट

फार प्राचीन काळांतली गोष्ट आहे, नेपाळ व कामरूप देशांचे परस्परांशी फार मोठे वैर होते. कामरूप देशाचे सैनिक नेपाळ राज्यात मनात येईल तेव्हां शिरत व लूटपाट करून परत येत.

एकदा कामरूपचे शिपाई नेपाळच्या हद्दीत डोंगराळ वाटेने शिरले. नेपाळमधील एका गावी एका श्रीमंताच्या मुलीचे लग्न असल्याचे त्यांना कळले होते. परंतु ते गांव कोठे आहे व तेथे पोचायला वाट कोठून आहे हे त्यांना माहीत नव्हते.

इतक्यात त्यांना एका डोंगराच्या पायथ्याशी एका धनगराची झोपडी दिसली. त्या झोपडीत धनगर एकटा रहात असे. कामरूपच्या शिपायांनी झोपडीजवळ जाऊन त्या धनगराला त्या गावची खूण आणि तिकडे जायची वाट विचारली.

"मला माहीत आहे." धनगर म्हणाला.

"आज त्या गावच्या सरदाराच्या मुलीचे लग्न आहे, म्हणे, तुला माहीत आहे का?" सैनिकांनी पुन्हां विचारले.

ही गोष्टदेखील लुटेऱ्यांना कळली असल्याचे समजल्यावर त्याला वाईट वाटले. तरी तो म्हणाला–"होय, खरे आहे!"

"आम्हांला त्या गावी जायचे आहे. आम्हांला त्या गावची वाट माहीत नाही. तू दाखवितोस का?" सैनिकांनी विचारले.

"मी सांगेन वाट!" धनगर म्हणाला. परंतु त्याचा खरा हेतु त्यांना वाट चुकवून दुसरीकडे नेण्याचा होता.

"हे नाही चालायचे हं, नुसत्या गप्पा मारशील. आमच्या बरोबर आले पाहिजे!" सैनिक म्हणाले.

"मी आलो असतो, पण माझी मेंढरे व्यायची वेळ आहे. त्यांना सोडून जाणे मला शक्य नाही." धनगर म्हणाला.

[illegible] आहे? तुला आमच्या बरोबर आले पाहिजे! हा आमचा हुकूम आहे!" लुटेरे सैनिक म्हणाले.

हे सैनिक आपल्याला असे सोडणार नाहीत, हे धनगराने ओळखले. त्यांना त्या गावची वाट दाखविण्यापेक्षा आपल्याला त्यांच्या हाती मरण आलेले पत्करले. परंतु हे लोक आपला वध केल्यावर मुकाट्याने परत जाणार नाहीत. डोंगरात त्यांना दुसरा कोणी तरी मिळेलच आणि त्याला आपल्या बाजूला वळवून किंवा त्याच्यावर मारहाण करून हे लोक त्या गावी नक्कीच पोचतील. म्हणून त्याने त्या सैनिकांना असे मोकळे सोडणे इष्ट नाही असे मनाशी ठरविले.

तो सैनिकांना म्हणाला–"तुमचा तसा आग्रहच असेल तर मला जावे लागणारच, परंतु लग्न मध्यरात्रीच्या सुमारास आहे. मुहूर्ताच्या आधी पोचल्यास तुम्हांला काही मिळणार नाही. तुम्हांला पाहून लग्नाला येणारी मंडळी येणारच नाहीत. कदाचित लग्न सुद्धा पुढे ढकलतील. म्हणून आपण संध्याकाळी काळोख पडल्यावर निघण्यात शहाणपण आहे! येथून तेथे पोचायला ताशा दीडतासापेक्षा अधिक वेळ लागणार नाही."

धनगराचा सल्ला सैनिकांना पटला. ते काळोख पडेपर्यंत धनगराच्या झोपडीतच थांबले.. त्यांनी सैपाक करून खाणेपिणे उरकून घेतले. काळोख पडू लागला आणि दंव पडू लागले. एक मशाल हातात घेऊन












धनगर पुढे चालू लागला व त्याच्या पाठो-मागून कामरूपचे शिपाई निघाले.

धनगराला त्या डोंगराळ प्रदेशातले सर्व रस्ते व वाटा चांगल्या माहीत होत्या. त्या-तल्या काही पाऊलवाटा फारच धोक्याच्या होत्या. काही वाटा डोंगराच्या कडेकडेने जात होत्या तर काही कोणत्यातरी दरीत एकदम नाहीशा होत होत्या. अशा वाटांनी जातांना निष्काळजीपणाने पाऊल पडले तर खोल दरीत पडून सोक्षमोक्ष व्हायचा अशी स्थिति होती.

धनगर अशाच एका धोक्याच्या पाऊल-वाटेने निघाला. त्याच्या पाठीमागून चाल-णाऱ्या सैनिकांना धनगराच्या हातांतल्या मशालीच्या उजेडाशिवाय एक पाऊल देखील पुढे टाकणे अशक्य होते. धनगर दरीच्या अगदी कडेला येऊन पोचला आणि एका झाडाची फांदी धरून खालच्या दरीत वाकला. त्याने मशाल त्या बाजूला वळविली.

त्याची ती युक्ति यशस्वी ठरली. थंडी वाढत चालली होती. घाईघाईने चालणाऱ्या शिपायांना धुक्यामुळे वाट दिसत नव्हती. म्हणून ते एकामागून एक दरीत पडले आणि पाठीमागून येणाऱ्या दोघांतिघांना धनगराने दरीत ढकलले.

शत्रूच्या सैनिकांचा असा शेवट झाल्या-वर धनगराने लग्नघरी जाऊन घडलेले भयंकर वृत्त सांगितले. प्रथम कोणी त्याच्या बोलण्यावर विश्वासच केला नाही. परंतु दुसऱ्या दिवशी उजाडल्यावर काही लोकांनी त्याच्याबरोबर त्या दरीजवळ जाऊन कामरूपच्या सैनिकांची प्रेते प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिली तेव्हां त्यांना सर्व खरे मानावे लागले.

त्या भयंकर प्रसंगातून धनगराने मोठ्या युक्तीने त्या सर्वांना वाचविल्याबद्दल लग्न घरच्या मंडळींनी धनगराची वाखाणणी केली व त्याला इनाम देऊन त्याचा उचित सत्कार केला.

पुढे काही दिवसांनी नेपाळच्या राजाने धनगराला स्वतःच्या दरबारांत बोलावून त्याचा यथोचित सत्कार केला.





# विवेकाचा व्यापारी

एका गावी एक विद्वान पंडित रहात असे. त्याने एक दुकान काढून विवेक विकण्याचा धंदा सुरु केला. एका श्रीमंत माणसाच्या मुलाने येऊन दुकानांतली पाटी वाचली–"येथे विवेक विकला जातो." त्याने त्या पंडिताजवळ विवेकाच्या विक्री संबंधाने चवकशी केली. पंडिताने एका रुपयापासून हजारो रुपयांपर्यंत किमतीचा विवेक मिळतो असे सांगितले.

एका रुपयाचा विवेक घेतला तर काय होईल?" त्या माणसाने विचारले.

"ते काही सांगता येणार नाही. एका लाखापर्यंत फायदासुद्धा होण्याची शक्यता आहे." पंडित म्हणाला.

त्या श्रीमंत माणसाने एका रुपयाच्या विवेकाची चिठ्ठी विकत घेतली. चिठ्ठीत असे लिहिले होते–"दोन बलिष्ठ किंवा मोठ्यांच्या भांडणात मध्ये पडू नये!"

श्रीमंत माणसाच्या मुलाने बापाला रुपयाचा विवेक खरेदी केल्याची गोष्ट सांगितली. श्रीमंत माणूस म्हणाला–"तू आहेस मूर्ख! हा कागदाचा तुकडा त्या दुकानदाराच्या तोंडावर फेंकून रुपया परत घेऊन ये."

श्रीमंताच्या त्या पंडिताला मुलाने कागदाचा तुकडा देऊन आपला रुपया परत मागितला. त्या मुलाने शपथ घेऊन सांगितले की, त्या कागदावर जे काही लिहिले आहे, त्याप्रमाणे जीव गेला तरी वागणार नाही. पंडिताने ती चिठ्ठी ठेवून घेतली आणि रुपया परत दिला.

त्या गावचा राजा एकदा आपल्या दोघां राण्यांना बरोबर घेऊन राजधानीच्या देख-रेखीसाठी निघाला. त्याला एका जेव्हऱ्याच्या दुकानात एक सुंदर हार दिसला. त्याची किंमत एक लाख रुपये होती. दोघी

श्री. रामचंद्र ग. ढवळे



राण्यांना तो हार आवडला. दोघींनी आपापल्या दासीच्या हाती एकेक लाख रुपये पाठवून तो हार पाठविण्यास जव्हेऱ्या-कडे निरोप पाठविला.

दोघी दासींनी एकाच वेळी दुकानात जाऊन दुकानदाराजवळ हार मागितला.

"अहो! माझ्याकडे एकच एक हार आहे!" दुकानदार म्हणाला.

दोघी दासी, "मी पहिल्याने मागितला!" असे सांगून दुकानदाराशी भांडू लागल्या त्या वेळी त्या श्रीमंत माणसाचा मुलगा तेथेच उभा होता.

"तुम्ही दोघी पहिल्याने आपसात समेट करून घ्या!" दुकानदार म्हणाला.

... दुकानात घडलेली गोष्ट राजाला सांगितली. राजाने चवकशी केली की कोणी साक्षी आहे का. दोघी दासींनी त्या श्रीमंताचा मुलगा त्या वेळी तेथे हजर होता, असे सांगितले. राजाने त्याला बोलावून आणायला शिपायाला पाठविले.

त्या श्रीमंत माणसाचा मुलगा घाबरला. कारण ते मोठ्यांचे भांडण होते. कोणा एकाच्या बाजूने साक्ष दिली तर दुसरा रागावणार! त्याने स्वतः विवेकाच्या दुकान-दारासमोर चिट्ठीत सांगितलेल्या विवेकाचा उपयोग जीव गेला तरी करणार नाही असे शपथ घेऊन कबूल केले होते.

म्हणून बापाने मुलाला त्या विवेकाच्या व्यापाऱ्याकडे जाऊन या संकटातून स्वतःची सुटका करून घ्यायला काही तरी विवेक विकत घेऊन यायला पाठविले.

श्रीमंताच्या मुलाने विवेकाच्या व्यापा-ऱ्याकडे जाऊन त्या संकटातून सुटका मिळायला काही उपाय आहे का विचारले.

"तुतें सुटका व्हायला पांचशे रुपयांचा विवेक मी तुला देतो. परंतु या संकटांतून कायमची सुटका व्हायला विवेकाची किंमत दोन हजार रुपये आहे आणि त्याचा अंमल व्हायला एक लाख रुपये!" पंडित म्हणाला.

श्रीमंत माणसाच्या मुलाने त्या विषयी आपल्या बापाचा सल्ला घेतला आणि परत येऊन व्यापाऱ्याला म्हणाला–"पांचशे रुपयांचा विवेक द्या!"

विवेकाच्या व्यापाऱ्याने पांचशे रुपये ठेवून घेतले आणि एक कागदाची चिट्ठी त्या श्रीमंताच्या हातात दिली. चिट्ठीत लिहिले होते–"वेड्याच्या साक्षीला काही किंमत नसते."

राजाने दासींच्या जबानीविषयी चवकशी केली तेव्हां साक्षीदार म्हणून आलेल्या श्रीमंताच्या मुलाने वेड्यासारखा अभिनय केला. राजाने वेड्याच्या साक्षीला मान्य केले नाही व दासींच्या वतीने आलेले गाऱ्हाणे नामंजूर केले.

त्यामुळे हार दुकानदाराकडे राहून गेला. तो विकत घेणे दोघी राण्यांना शक्य झाले नाही. परंतु दोघां राणींच्या दासींनी त्या श्रीमंताच्या मुलाचा सूड घ्यायचे ठरविले. त्यांनी त्या श्रीमंताच्या मुलाला भीती दाखविली.

म्हणाल्या–"तू वेड्याचा अभिनय करून तो हार कोणालाही विकत घेऊ दिला नाहीस. आम्ही तुला सोडणार नाही. पाहतो आम्ही!"

आतां दोघां राण्यांबरोबरच भांडणांचा प्रसंग येऊन ठेपला. म्हणून तो श्रीमंत मनुष्य व त्याचा मुलगा विवेकाच्या व्यापा-ऱ्याकडे गेले आणि त्या संकटातून सुटका मिळायला विवेक मागितला.

तो व्यापारी म्हणाला–"मी पहिल्यानेच सांगितले होते की तू त्या वेळी दोन हजार रुपयांचा विवेक घेतला असतास तर तुला सुटका मिळाली असती." असे सांगून त्या व्यापाऱ्याने दोन हजार रुपये ठेवून घेऊन कागदाच्या तुकड्यावर काही लिहून दिले. त्या चिट्ठीत असे लिहिले होते–"हा हार तूच विकत घेऊन राजाला दे!"

त्या श्रीमंत मनुष्याने एक लाख रुपये देऊन तो हार विकत घेतला आणि आपल्या मुलाच्या हाती तो राजाला नजराणा म्हणून देऊन टाकला. राजाने आपल्या दोघां राण्यांच्या सल्ल्याने तो हार आपल्या सुनेला प्रेमाची भेट म्हणून दिला.






एते सत्पुरुषा: परार्थघटका: स्वार्थान परित्यज्य ये
सामान्यास्तु परार्थमुद्यमभृत: स्वार्थाविरोधेन ये
तेमी मानुषराक्षसा: परहितं स्वार्थाय निघ्नंति ये
येतु घ्नंति निरर्थकं परहितं ते केन जानीमहे ॥ १ ॥

[आपला स्वार्थ सोडून जे परार्थ साधतात ते सत्पुरुष होत. जे स्वत:चा स्वार्थ सोडल्याशिवाय परार्थ साधण्याचा यत्न करतात ते सामान्य जन होत. जे स्वत:च्या स्वार्थासाठी परार्थ हानि करतात ते नरराक्षस होत आणि जे विनाकारण दुसऱ्याचे अहित करतात, त्यांना (आता) काय म्हणावे?]

पापान्निवारयति, योजयते हिताय, गुह्यं निगूहति, गुणान् प्रकटीकरोति;
आपद्गतं च न जहाति, ददाति काले; सन्मित्रलक्षणमिदं प्रवदंति सन्त: ॥ २ ॥

[पापकर्मापासून निवृत्त करणे, सत्कर्माकडे प्रवृत्त करणे चुका झांकून ठेवणे, गुणांचे प्रगट वर्णन करणे, आपदकाली साथ देणे आणि वेळेवर सहाय्य करणे ही सर्व सन्मित्राची लक्षणे आहेत.]

मनसि वचसि काये पुण्यपीयूषपूर्णा: त्रिभुवनमुपकारश्रेणिभि: प्रीणयंत:,
परगुण[illegible] नित्यं निजहृदि विकसंत: संति सन्त: कियंत: ॥ ३ ॥

[कु[illegible] करून त्रिभुवनाला सुखी करतात, इतरांच्या परमाणुसारख्या थोडयाशा चांगल्या कामाला पर्वताएवढे महत्कार्य मानून स्वत:च्या हृदयात उल्हसित होतात असे सन्त साधु पुरुष फार थोडे आहेत.]




[५]

[खड्गवर्मा व जीवदत्त वृद्ध गुराख्याला भेटले. वाघाला पाहताच बैल बिचकून वाट फुटेल तिकडे जंगलात पळून गेले. खड्गवर्मा व जीवदत्त पायीपायीच चालत सूर्योदयापूर्वी एका लहानशा गावी येऊन पोचले. त्या गावातल्या ग्रामप्रमुखाने आपल्या नोकरांना पाठवून दोघांना बोलावून घेतले. दोघे पाटलाच्या कचेरीकडे निघाले. पुढे–]

खड्गवर्मा व जीवदत्त पाटलाच्या कचेरीत पोचले तेव्हां त्यांना पाहताच गावकरी आपसात हळू हळू काही तरी बोलू लागले. नोकरांनी दोघांना पाटलासमोर उभे केले. पाटलाने त्यांच्याकडे लक्षपूर्वक पाहून दरडावून विचारले–"तुम्हां दोघांपैकी वीरभद्र कोण आणि रामभद्र कोण, बोला!"

"आमच्या पैकी एकाचे ही यांतले एकही नाव नाही." जीवदत्त म्हणाला.

"अस्सं! मग तुमची नावे काय?" पाटलाने विचारले.

जीवदत्त त्याचे उत्तर देणार इतक्यात खड्गवर्मा म्हणाला–"माझे नाव खड्गवर्मा आहे व माझ्या मित्राचे नाव जीवदत्त आहे."

"अरे, नाव बदलायला कितीसा वेळ लागतो आणि त्यात कष्ट तरी काय? दोघे आपापला डावा हात पुढे करा, बघू." पाटील दरडावून म्हणाला.



खड्गवर्मा व जीवदत्त दोघांनी आपापला डावा हात पुढे केला. पाटलाने लक्षपूर्वक दोघांचे हात पाहिले व म्हणाला–"अरे, तुम्हांला तर पांचपांचच बोटे आहेत. उजवा हात दाखवा!"

खड्गवर्मा व जीवदत्त दोघांनी उजवा हात दाखविला. दोघांच्या हातांना पांच पांच बोटे असल्याचे पाहून निराश होऊन तो म्हणाला– "तुम्ही माझ्याकडे, समोर डोळे करून पहा!"

खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना मनातल्या मनात फार राग येत होता. तरी राग आवरून त्यांनी पाटलाच्या डोळ्यांकडे पाहिले. दोघांचे डोळे पाहून पाटील म्हणाला–"तुमच्या पैकी कोणाचाच डोळा [illegible] पाटलाने आपल्या कारकुनाकडे पाहिले. कारकुनाने खड्गवर्मा व जीवदत्तकडे एकदां पाहिले व म्हणाला–"महाराजांनी दवंडी पिटवून एकाचा डोळा फुटका व एकाच्या हाताला सहा बोटे असल्याचे सांगितले होते हे खरे! ती गोष्ट थोडा वेळ बाजूला राहू द्या. मी म्हणतो, प्रथम तुमची मुलगी एकाएकी नाहीशी कशी काय झाली, याचा विचार करा. तिला सरोवरात स्नान करीत असतां पाहून कोणी यक्ष किंवा गंधर्व उचलून घेऊन गेला असेल असे का वाटते तुम्हांला?"

कारकून म्हणाला ते ऐकून पाटलांना आपल्या हरवलेल्या मुलीची आठवण झाली. त्यांना एका आठवड्यापूर्वी त्यांची मुलगी एकाएकी कशी नाहीशी झाली, या चिंतेने घेरले. पाटलांनी मुलीचा अनेक प्रकारे शोध करून पाहिला. पण सर्व प्रयत्न वृथा ठरले.

कारकुनाने तो प्रश्न करून पाटलांना ज्या गोष्टीची सूचना केली होती ती गोष्ट त्यांना कळली. त्यांनी पुन्हां रागाने खड्गवर्मा व जीवदत्त यांच्याकडे संशयी मुद्रेने पहात दरडावून विचारले–"तुम्ही या गावात आलातच कशासाठी?"

"आम्ही देशाटनाला निघालो होतो. वाटेत हे गाव लागले. आजचा दिवस या गावात काढावा असे ठरविले. या गावात आम्हाला काही एक काम नाही." जीवदत्त म्हणाला.

त्यांचे ते उत्तर ऐकून कारकून म्हणाला– "आता काय बोलावे? अहो, या गावच्या चारीबाजूला जे जंगल आहे त्यात चोरांनी व लुटेऱ्यांनी धुमाकूळ माजविला आहे. पण कोणाला विचारले तर देशाटनाला निघालो आहो असे उत्तर देतात. म्हणून या दोघांना आणखी दोन दिवस या गावातच डांबून ठेवावे. तोंपर्यंत महाराजांनी ज्यांना पकडण्यासाठी दवंडी पिटविली आहे त्यांचा शोधपण लागेल. आपल्या मुलीला पळवून नेणारांचा शोधपण लागेल कदाचित!"



कारकून म्हणाला ते सर्व त्याचे बरगळणे होते. अर्थातच खड्गवर्मा व जीवदत्तला त्याचे आश्चर्य वाटले. पाटलाच्या मुलीला असे एकाएकी कोण पळवून नेणार? खड्गवर्माचा पारा चढला. त्याने पाटलाकडे आणि त्याच्या कारकुनाकडे एकदां डोळे वटारून पाहिले आणि तलवारीच्या मुठीवर हात ठेवून जीवदत्तला खूण केली. त्या दोघांची जागच्या जागी कत्तल करावी हे त्याला सुचवयाचे होते. परंतु जीवदत्तने त्याला शांत व्हायला सुचविले. त्याला तसली गर्दी करण्याची संवयच नव्हती.

पाटलाने आपल्या नोकरांना बोलावून दोघांना पिंपळाच्या झाडाखालच्या झोपडीत नजरकैदेत ठेवायला सांगितले. दुसऱ्या दिवशी त्यांना पुन्हां कचेरीत हजर करण्यास पण सांगून ठेवले.

नोकर दोघांना एका झोपडीनजीक घेऊन गेले. त्यांनी त्यांना आत जायला खुणेने सांगितले. त्या झोपडीत आरोपींना बंद करून ठेवण्यात येत असे. गावाच्या चारीबाजूला एक कुंपण होते. त्याला बांबूचे एक दार होते.

जीवदत्त विचार करु लागला की मूर्ख कारकुनाच्या सांगण्यावरून पाटलाने आपणास व्यर्थ नजरकैदेत ठेवण्याची आज्ञा केली आहे. त्याप्रमाणे नजर कैदेत पडून राहिल्यास आपला जीव विनाकारण आणखी



एखाद्या संकटात सापडण्याची शक्यता आहे. दोन तरुण नजर कैदेत बंद आहेत अशी बातमी एका गावाहून दुसऱ्या गावात व त्यानंतर आणखी दूरवर, थेट राजधानी-पर्यंत पोचण्याची शक्यता आहे. नीट विचार करून त्याने खड्गवर्माला सावध करण्याच्या हेतूने म्हटले–"हे बघ खड्ग-वर्मा! घाईत तू काही तरी करून बसशील. तू शांत रहा. रात्री आपण येथून पाय काढूया. पाहरेकऱ्यांच्या हातावर तुरी देऊन पळून जाणे आपल्याला तितकेसे कठीण नाही!"

"तो मूर्ख मुलीला कोणी पळवून नेल्याचे सांगत होता. काय झाले तरी काय?" खड्गवर्मा उघड विचार केल्यासारखे विचारू लागला.

"ते मलादेखील कळले नाही, बुवा!" जीवदत्त म्हणाला.

त्या दिवशी दुपारी खानावळवालीकडून एक तरुण युवक त्यांच्यासाठी जेवण घेऊन आला. त्याच्याजवळ त्यांनी चवकशी केली तेव्हां पाटलाची मुलगी सरोवराच्या काठी उभी असता तिला कोणीतरी उचलून नेल्याचे कळले.

"त्यामुळेच दोघां म्हाताऱ्यांची डोकी ठिकाणावर नाहीत तर!" जीवदत्त म्हणाला.

खड्गवर्मा होकारार्थी मान हलवून विचार करीत स्वस्थ बसून राहला. त्या झोपडीत बसून राहल्याने-सर्व अंगाला कांटे बोचल्यासारखे त्याला झाले. पद्मपूरसारख्या राजधानीच्या शहरातून सुटून आलो आणि या खेडे गावात येऊन अडकलो. याहून जास्त धोक्याची व अपमानाची गोष्ट काय असू शकणार?

कसाबसा तो दिवस गेला. पाहरेकऱ्यां-पैकी एक जण झाडाला टेकून पेंगत बसला होता. त्याच्या बाजूला एक भाला ठेवलेला होता.

"हे गांव मूर्खांचे गांव दिसते आहे. नाही तर हा पेंगत पडलेला मनुष्य आपल्या-वर पाहऱ्यासाठी ठेवण्यात आला असता का? चल, लवकर पाय काढूया आपण या झोपडीतून." खड्गवर्मा जीवदत्तला सूचना करीत म्हणाला.

"खड्गवर्मा! पुन्हां सांगतो अशी घाई करू नकोस. आपण पळून गेल्याचे कळले तर त्यात जास्त धोका आहे. ते आपल्याला खरा गुन्हेगार मानतील. रात्री आपण कोणाला कळू दिल्याशिवाय पाय काढून पळून गेलो तर सकाळी उजाडेपर्यंत आपण पुष्कळ दूर निघून गेलेले असू." जीवदत्त म्हणाला.

संध्याकाळी काळोख पडू लागला. शेतकरी शेतावरून आपले नांगर व बैल घेऊन परतू लागले. त्यांच्यासाठी पाहरे-कऱ्यांनी गांवाच्या चारीबाजूला असलेल्या कुंपणाचे दार उघडले.

थोड्या वेळाने खानावळवालीकडून रात्रीचे जेवण आले. जेवण आणणाऱ्या तरुण युवकाने गावात कोण काय बोलत होता हे बोलता बोलता सांगून टाकले. गावात अशी बातमी पसरली की गावकऱ्यांपैकी दोघां-तिघांनी जंगलातल्या भैरवाच्या भक्तांना पाहिले होते, म्हणे. त्यांच्यापैकी दोघे जण गावात बळी देण्यालायक लहान लहान मुली-च्या शोधार्थ वेष पालटून हिंडत होते, वगैरे.

ती बातमी ऐकून खड्गवर्मा रागाच्या भरात म्हणाला–"आम्हांला भैरवाचे भक्त



मानताहेत का तुमचे पाटील? तरमग आम्ही भैरव भक्त आहोत हे मी खरोखरच सिद्ध करून दाखवीन. येथून जाण्यापूर्वी गावच्या पाटलाला व त्याच्या कारकुनाला भैरवासमोर बळी देऊन टाकू."

"अहो, तुम्ही बिचाऱ्या दोघां म्हाताऱ्यांना ठार का करणार? पाहिजे तर पळून जा. तो कारकून दुष्ट आहे. तो राजाकडून शाबासकी मिळविण्यासाठी काय वाटेल ते करायला तयार होईल." खानावळवालीचा नोकर म्हणाला.

त्याचे ते सहानुभूतिपूर्ण बोलणे ऐकून जीवदत्तला आनंद झाला. त्याला चांदीचे एक नाणे इनाम म्हणून देत म्हणाला–"या



सर्व बातम्या खोट्या आहेत. त्यांच्यावर मुळीच विश्वास करू नकोस. जा आता तू घरी जा."

खानावळवालीचा नोकर निघून गेला. पाहरेकऱ्यांपैकी दुसरा मनुष्य रात्री पाहरा द्यायला आला. एकदां त्याने झोपडीत डोकावून पाहिले, पिंपळाच्या झाडाजवळ जाऊन बुंधापाशी चटई अंथरली आणि पिंपळाला टेकून बसला. त्याने झोपडीचे दार दोरीने घट्ट बांधून ठेवले.

मध्यरात्रीच्या सुमारास गावाच्या चारीबाजूला जे कुंपण होते त्याच्या पलीकडे रानटी जनावरे मोठमोठ्याने ओरडत होती. एक हत्ती कुंपणाजवळ येऊन चित्कार करू लागला. तो हत्ती ओरडला की पाहरेकरी घाबरून दचकून उभा राही आणि झोपडीचे दार तर उघडले नाही ना याची खात्री करून घेऊन पुन्हां झाडाला टेकून बसे.

खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना निसटून पळून जाण्यास तीच चांगली संधी मिळाल्यासारखे वाटले. ते दोघे दाराला बांधलेली दोरी कापून बाहेर आले आणि पाहरेकरी बसला होता तेथें आले. पाहरेकरी त्यांच्याकडे पाहून स्मित करू लागला. त्याला त्या दोघांची मुळीच भीति वाटत नसल्याचे त्याच्या चेहऱ्यावरून दिसले.

खड्गवर्माने तलवार उपसली ती पाहून पाहारेकरी काही बोलणार, इतक्यात जीवदत्त त्याला ऐकू येईल इतक्या बेताच्या आवाजात त्याला म्हणाला—"माझ्या प्रश्नांचे उत्तर जागच्या हलल्याशिवाय शांतपणाने दे. तुझ्या जिवाला धोका नाही. तू ओरडलास तर मात्र तुझे डोके तुझ्या पायावर लोळू लागेल."

ते ऐकून पाहरेकरी थरथर कांपू लागला. तो घाबऱ्या आवाजात म्हणाला—"तुम्ही मला ठार करू नका. तुम्हांला गावच्या पाटलाने विनाकारण कैद करून ठेवले आहे. मी त्यांचा नोकर आहे. ते मला सांगतील ते काम करावे लागते."

"आम्हांला कळते. पण आम्हां दोघांवर नजर ठेवण्यास तुझ्यासारख्या एकट्याला पाटलांनी कसे काय नेमले याचेच आम्हांला आश्चर्य वाटत आहे." जीवदत्त म्हणाला.

"ओहो, अशी शंका तुम्हांला आली होय? ज्यांना स्वतःचा जीव वांचवायचा आहे ते रात्रीच्या या भयंकर वेळी कुंपणाबाहेर पळून जाण्याचे धाडस करणार नाहीत. गावाच्या चारीबाजूला हे जे भयंकर जंगल आहे त्यात क्रूर पशू रात्रभर हिंडत असतात." पाहरेकरी म्हणाला.

"अस्सं! आम्हांला फक्त जीव वांचवायचा नसून शंभर वर्षे जगायचे आहे! आम्ही या कैदेतून पळून जायचे म्हणतो. तो कुंपणापलीकडे कसे तरी जाऊच. पण कोणी पाहिले तर त्यात धोका आहे." जीवदत्त म्हणाला.

"अहो, पण कुंपणापलीकडे वाघ, सिंह व हत्ती आहेत! तो हत्ती कसा मोठमोठ्याने ओरडतो आहे, पाहातच आहां!" पाहरेकरी समजावून सांगण्यासाठी म्हणून म्हणाला.

"अरे, त्यांच्याशी कसे वागायचे ते आम्ही पाहून घेऊ. तू आपली बडबड बंद कर आणि मुकाट्याने दार उघड." खड्गवर्मा दरडावीत म्हणाला.

"बरे तर, मी उघडतो. मी सांगायचे



असे सांगून पाहरेकरी कुंपणाकडे निघाला. त्याच्या पाठीमागून खड्गवर्मा व जीवदत्त निघाले.

पाहरेकरी दारापर्यंत गेला. त्याची दोरी सोडता सोडता थांबला आणि म्हणाला—"हे पहा, मी दोरी सोडली तर माझा जीव धोक्यात पडेल त्याचे काय? पाटील साहेब माझाच गळा धरतील की मी तुम्हांला पळून जायला मदत केली. त्याबद्दल मला फांसावर चढवितील. म्हणून तुम्ही माझ्या पगडीने माझे हात पाय बांधून ठेवा. माझ्या तोंडावर एक पट्टी बांधून ठेवा. आपल्या तलवारीने दोऱ्या कापून टाकून पळून जा.

उंरणार नाही." हात जोडून पाहारेकरी म्हणाला.

पाहारेकरी म्हणाला ते जीवदत्तला बरोबर वाटले. त्याचे म्हणणे बरोबर होते. त्या बिचाऱ्याला संकटात ढकलून पळून जाणे त्याला बरोबर वाटले नाही. खड्गवर्माला पण ती गोष्ट पटली. म्हणून दोघे जास्त वेळ न घालवितां पाहरेकऱ्याला घेऊन पुन्हा झाडाजवळ गेले. त्याची पगडी सोडून त्याला त्यांनी बांधून ठेवले आणि डोक्याच्या मागच्या बाजूला गाठ मारून ठेवू लागले.

तोपर्यंत पाहरेकरी गप्प बसून होता. तितक्यात त्याच्या मनात काहीतरी विचार आला. म्हणाला–"अहो, पण तुम्ही मला असे बांधून ठेवलेत आणि दारातून आत क्रूर जनावरे शिरली तर मला खाऊन टाकतील! म्हणून तुम्ही मला या झाडावर कोठे तरी बसवून बांधून ठेवून निघून जा." रडक्या आवाजात पाहारेकरी म्हणाला.

"अरे, होय की! ती गोष्ट आम्हांला सुद्धां सुचली नाही. नाही तर तू विना- [illegible] घास झाला असतास!" जीवदत्त म्हणाला.

त्यानंतर खड्गवर्मा व जीवदत्त दोघांनी मिळून त्याला एका चटईत गुंडाळून झाडावर उंच जागी नेऊन ठेवले. त्याच्या तोंडावर पट्टी बांधून ठेवू लागले तेव्हां पाहरेकरी म्हणाला–"पहा, तो हत्ती अगदी कुंपणा-जवळ घिरट्या घालतो आहे."

खड्गवर्मा स्मित करून म्हणाला–"तो हत्ती कुंपणाबाहेरच कुंपणाची फिकीर करीत दारावर लक्ष देतो आहे तर तो सामान्य हत्ती नसावा. हत्तीचे रूप घेऊन कोणी मांत्रिक आला असावा. आम्ही त्याच्या समाचाराला जातो."

त्यानंतर खड्गवर्मा व जीवदत्त दोघे कुंप-णाकडे निघाले. पाहरेकरी म्हणत होता त्यात दोघांना काही अतिशयोक्ति दिसली नाही. एक हत्ती कुंपणाबाहेर झाडाखाली उभा राहून चीत्कार करीत होता. कदाचित त्या हत्तीचे पिल्लू धरून गावकऱ्यांनी गावात आणून ठेवले असेल, असे दोघांना वाटले. (क्रमशः)





# अज्ञात नवरदेव

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ परत आला, प्रेत खांद्यावर घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तुझा थोरपणा कोणी ओळख शकणार नाही. काही लोक हयग्रीवासारखे आपला थोरपणा झाकून ठेवतात. मी तुला त्याची गोष्ट सांगणार आहे. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

एका गावी एका शेतकऱ्याला तीन मुलगे होते. दोघे मोठे मेहनती व हुशार होते आणि शेतात काम करून बापाला मदत करीत. तिसरा मुलगा हयग्रीव स्वभावाने थोडा मऊ आणि सरळ होता. म्हणून त्याचे आईवडील त्याला कधी काही काम सांगत नसत. आपला हा मुलगा थोडा मंदबुद्धीचा आहे असे त्यांना वाटे.

**वेताळाच्या गोष्टी**



म्हणून की काय राजाच्या जन्मोत्सव किंवा राज्यारोहण समारंभाची जयंती होई त्या उत्सवांची गंमत पहायला त्याला कोणी नेत नसे. तो आईला म्हणे–"आई मी सुद्धा येतो." तेव्हां आई त्याला समजावून सांगे–"बाळ! लोकांशी कसे बोलायचे व इतरांबरोबर कसे वागायचे हे तुला कळत नाही. लोक तुला पाहून हसतील. म्हणून तू आपला घरीच रहा." हयग्रीव त्याचे उत्तर देई–"तरमग मला कधी जावयाचे झाले तर मी इतरांच्या दृष्टीस पडल्याशिवाय जात जाईन."

त्याच सुमारास राजाने आपल्या मुलीचे स्वयंवर रचण्याचा विचार करून एक अट [illegible] मजल्यात उभी राहील. जो कोणी एक उडी मारून तिच्याजवळ जाऊन पोचेल त्याच्याशी तिचा विवाह करून देण्यात येईल.

ते कळल्यावर पुष्कळ तरुण मंडळी आपापल्या भाग्याची परीक्षा पाहण्यासाठी त्या गावी आले. पण त्यांच्या पैकी एकालाही एका उडीत दुसऱ्या मजल्यावर पोचता आले नाही. एकदा हयग्रीवचे दोघे भाऊपण त्यांच्या नशिबाची परीक्षा पाहण्यासाठी निघाले. हयग्रीवने त्यांच्याबरोबर जाण्याचा हट्ट दर्शविला नाही. तो हातात एक काठी घेऊन रानात फिरायला निघून गेला.

जंगलात एका बाजूला एक फुलांची झाडी होती. हयग्रीवने त्या झाडीवर तीनदा काठी मारली. लगेच एक देवी प्रगट झाली. त्या देवीची व हयग्रीवची बरेच दिवसांपासून ओळख झाली होती. परंतु ती गोष्ट घरात इतर कोणाला माहीत नव्हती.

"काय पाहिजे तुला?" देवीने हयग्रीवला विचारले.

"जोराने पळणारा घोडा, चांदीचा पोषाख आणि रुपये!" हयग्रीव म्हणाला.

दुसऱ्या क्षणाला त्याने मागितलेल्या सर्व वस्तू त्याला मिळाल्या. तो घोड्यावर बसून राजवाड्याकडे निघाला. वाटेत त्याला त्याचे भाऊ पायी चालत राजवाड्याकडे जाताना भेटले. त्याने त्यांना विचारले– "कोठे निघालात तुम्ही?"

दोघां भावांनी हयग्रीवला ओळखले नाही. म्हणून म्हणाले–"आम्ही राजवाड्याकडे निघालो आहो."

"तुम्हांला तुमच्या कामात यश येवो!" असे सांगून हयग्रीव आपल्या भावांना प्रत्येकी तीनतीन रुपये देऊन पुढे निघाला.

हयग्रीव राजवाड्याजवळ पोचला. सर्व चकित होऊन त्याच्याकडे पहात उभे राहले. कारण इतकी सुंदर व मूल्यवान वस्त्रे घालून आलेल्या माणसाला त्यापूर्वी कोणी पाहिले नव्हते. वरच्या मजल्यावरून राजकुमारीने त्याला पाहिले व तीदेखील चकित झाली.

हयग्रीव घोड्यावरून उतरून वरच्या मजल्यावर उडी मारू लागला, पण तो तेथपर्यंत पोचू शकला नाही. म्हणून तो काही बोलल्याशिवाय घोड्यावर बसून फुलझाडांच्या झाडीकडे निघून गेला. आपली वस्त्रे देवीला देऊन घरी परतला. त्याचे दोघे भाऊ फार उशिरा परतले. त्यांच्या मनात एकच एक विचार घोळत होता, ती मूल्यवान वस्त्रे परिधान करून आलेला मनुष्य कोण होता? दोघे ते बोलत होते व हयग्रीव ते ऐकत कोपऱ्यात पडून होता.

दुसऱ्या दिवशी हयग्रीवचे दोघे भाऊ राजवाड्याकडे निघून गेल्यावर हयग्रीव जंगलात



गेला. त्याने देवीकडून या खेपेस एक घोडा, सोन्याचा पोशाख व मोहोरा मागून घेतल्या. वाटेत त्याला त्याचे भाऊ भेटले त्यांना त्याने दहादहा मोहोरा दिल्या व पुढे गेला.

या खेपेस त्याने दुसऱ्या मजल्यावर उडी मारली, परंतु तेथे तो उभा राहू शकला नाही. खाली उडी मारून आपल्या घोड्यावर बसला आणि परत जंगलात निघून गेला. जंगलात त्याने देवीला सर्व वस्तू परत केल्या आणि घरी जाऊन कोपऱ्यात पडून राहला. हयग्रीवचे दोघे भाऊ घरी गेल्यावर आपल्या आईला त्या विचित्र माणसाविषयी सांगू लागले. हयग्रीव पडल्या पडल्या शांतपणे ते ऐकत होता.



तिकडे राजाला फार राग आला की ज्या तरुणाने अट पुरी केली तो असा पळून कां गेला. म्हणून त्याने दवंडी पिटविली की जो कोणी त्याला धरून आणून हजर करील त्याला मोठे इनाम दिले जाईल.

ती दवंडी ऐकून हयग्रीवचे भाऊ त्यांच्या आईला म्हणाले–"त्या माणसाने आमच्या-वर थोडे उपकारच केले आहेत. तरी उद्यां तो आम्हांला दिसेलच तेव्हां त्याला धरून आम्ही राजासमोर हजर करू. राजा आम्हांला मोठे बक्षिस देईल."

"तो असा सहजी तुमच्या हाती येणार नाही!" हयग्रीव आपल्या दोघां मोठ्या भावांना म्हणाला.

दुसऱ्या दिवशी उजाडतांच हयग्रीवचे दोघे भाऊ राजवाड्याकडे निघाले. त्या दिवशी हयग्रीवलादेखील लवकर उठलेला पाहून त्याच्या आईला थोडे आश्चर्यच वाटले. तिने त्याला तसे विचारले पण.

"तसे काही नाही, आई! मी रानात जाऊन लाकडे गोळा करून आणतो." हयग्रीव म्हणाला. आईला तसे उत्तर देऊन तो जंगलात निघाला. या खेपेस त्याने देवीकडून रत्नांनी मढवलेला घोडा, पोशाख व रत्ने मागून घेतली.

हयग्रीवला वाटेत त्याचे भाऊ भेटले. त्याला पाहताच ते मोठमोठ्याने ओरडू लागले–"अरे सापडला रे चोर! चोर!" आणि त्याला घोड्यावरून खाली ओढू लागले. हयग्रीवने त्यांना दूर ढकलले आणि म्हणाला–"तुम्ही दोघे आहां मूर्ख! पण मी तुमच्यासारख्या मूर्खांना दंड देण्याऐवजी बक्षिस देतो." त्यानंतर त्याने मूठ मूठ भरून हिरे दोघांना दिले आणि घोडा भरधाव सोडून राजवाड्यात गेला.

हयग्रीव राजवाड्याजवळ पोचताच शिपायांनी त्याला घेरले. पण तो चलाखीने राजवाड्याजवळ गेला व एका उडीत दुसऱ्या मजल्यावर जाऊन पोचला.

राजकुमारी हयग्रीवला म्हणाली–"तुझी माझ्याशी विवाह करण्याची इच्छा नसेल [illegible] नाही. परंतु माझ्या आठवणी खातर तू माझी ही अंगठी आपल्या बोटात ठेवीत जा." असे सांगून तिने आपल्या बोटातली अंगठी काढून त्याच्या बोटात घातली.

हयग्रीव राजवाड्यातून उडी मारून खाली निघाला तेव्हां राजाच्या शिपायांनी चारीबाजूला गराडा घातला. पण हयग्रीवने सरळ घोड्याच्या पाठीवरच उडी मारली आणि घोडा भरधांव सोडला. त्याला कोणी पकडू शकले नाही. देवीजवळ पोशाख व इतर वस्तू देऊन घरी आला आणि एका कोपऱ्यात पडून राहला.

त्याचे भाऊ घरी आल्यावर आईला म्हणाले–"आपल्या मूर्ख भावाच्या म्हणण्या-प्रमाणे खरोखरच त्या तरुण माणसाला आम्ही पकडू शकलो नाही. परंतु तो राज-कुमार खरोखरच चांगला आहे, आई! त्याने हे पहा, आम्हांला काय दिले आहे." असे सांगून दोघांनी बरोबर आणलेले हिरे आईला दाखविले. त्यांच्या आईने विचार केला, बरे झाले, त्यांना आयुष्यभर आता कसलीच काळजी उरली नाही.

राजकुमारीला जिंकणारा राजकुमार पळून गेल्यामुळे राजा फार काळजीत पडला. त्याचा शोध लावण्यासाठी राजाने एक युक्ति केली. त्याने प्रजेला एक मोठी मेजवानी दिली. पण त्याला वाटले होते तसा तो राजकुमार आपल्या रूपात किंवा वेष पालटून आलेला दिसला नाही.





त्यानंतर राजाने शिपायांना हुकूम सोडला की राज्यभर हिंडा आणि ज्याच्या हातात राजकुमारीने दिलेली खुणेची अंगठी सापडेल त्याला आणून हजर करा. त्याप्रमाणे शिपाई प्रत्येक घरात शिरून तशा माणसाला हुडकू लागले. ते हयग्रीवच्या घरी आले व त्याच्या हातात अंगठी पाहून त्याला धरून घेऊन गेले. जुनेफाटके कपडे अंगात घातलेल्या एका शेतकऱ्याच्या मुलाला पाहून राजाला, त्याने तो पराक्रम दाखविला असेल असे वाटले नाही. तरी राजाने त्याला उत्तमोत्तम वस्त्रे परिधान करायला दिली आणि राजकन्येशी त्याचा विवाह करून दिला.

विवाह झाल्यानंतर थोड्याच दिवसांनी राज्यावर एक संकट आले आणि राजाला शत्रूशी युद्ध करण्यासाठी सैन्य घेऊन जावे लागले. राजाने आपल्या दोघां मुलांना व जांवयाला पण युद्धभूमीवर बरोबर यायला सांगितले. हयग्रीव सर्वांच्या आधी राजवाड्यातून बाहेर पडला आणि गावाबाहेरच्या तळ्याच्या काठी बेडकांशी खेळत बसला.

थोड्या वेळाने दोघे राजकुमार ससैन्य युद्धाला निघाले. त्यांनी आपल्या मेहुण्याला तलावाच्या काठी बेडकांशी खेळतांना पाहिले आणि त्याची थट्टा उडवीत रणांगणावर निघून गेले. सेना पुढे निघून गेल्यावर हयग्रीव उठला आणि फुलझाडांतल्या देवीकडे गेला. त्याने देवीकडून एक उत्तम घोडा, मोठे सैन्य आणि एक उत्तम तलवार मागून घेतली. तो ससैन्य आपल्या मेहुण्यांना जाऊन भेटला. राजकुमारांनी हयग्रीवला ओळखले नाही. त्यांने राजकुमारांना विचारले–"कोठे निघालात तुम्ही?"

"आम्ही युद्धाला निघालो आहो." राजकुमार म्हणाले.

"मी तिकडेच निघालो आहे, चला!" असे सांगून हयग्रीव त्यांच्याबरोबर निघाला. रणांगणावर शत्रु सैन्य दिसतांच तो त्यांची फळी फोडून त्यांच्या गोटात शिरला आणि त्याने कत्तल सुरू केली. त्याच्या समोर शत्रूची गाळण उडून गेली. सहस्रावधी शत्रुसैनिक रणांगणावर पडले.

सायंकाळी राजकुमारांनी राजवाड्यात आल्यावर आपल्या मेहुण्याची थट्टा करीत तो तलावाच्या काठी बेडकांशी कसा खेळत बसला होता, सांगितले.

थोड्या वेळाने हयग्रीव पण तेथे येऊन पोचला. राजा रागाच्या भरात त्याला म्हणाला–"तुझ्यामुळे माझी मान खाली झाली. एका भित्र्याशी माझ्या मुलीचे लग्न झाले.

दुसऱ्या दिवशी राजा स्वतः युद्धासाठी निघाला. त्याने हयग्रीवला बरोबर येण्यास सांगितले. पण तो वाटेत राजाची नजर चुकवून पसार झाला. राजा भितरा, पळपुटा म्हणून त्याची संभावना करीत निघून गेला. त्याला राजवाड्यांत पाऊल टाकू द्यायचे नाही असे त्याने मनाशी ठरविले.

राजा रणांगणावर पोचला तोंपर्यंत शत्रुसैन्याची दाणादाण उडून गेली होती आणि शत्रूचा राजा बंदी झाला होता. तो हयग्रीवच्या सासऱ्याला म्हणाला–"तुमच्या एका वीराने हा पराक्रम दाखविला. तुमच्या हजार सैनिकांची शक्ती त्या एकट्याच्या अंगात आहे."

"पण तो आहे कोठे?" राजाने विचारले.



"जखमी होऊन तो पलीकडच्या झाडाखाली पडला आहे!" शत्रु राजा म्हणाला.

राजा सरळ त्या योद्धयाजवळ गेला. त्याच्या अंगावर चिलखत होते व डोक्याला शिरस्त्राण होते. म्हणून राजा आपल्या जावयाला ओळखू शकला नाही. त्याच्या मांडीला एक जबर जखम झालेली पाहून राजाने आपले उपरणे फाडून त्याची पट्टी त्याच्या पायाला बांधून ठेवली आणि विचारले–"कोण रे तू? शाबास!"

"मी, मीच हो!" हयग्रीवने संक्षिप्त उत्तर दिले. तो उठून उभा राहला आणि घोड्यावर बसून निघून गेला. थोड्या वेळाने आपला सामान्य पोशाख घालून तो राज-

वाड्यात गेला. जखम दुखत होती. म्हणून आपल्या खोलीत जाऊन पडून राहिला.

राजा परत आला तेव्हां राजकुमारांनी त्याला विचारले–"बाबा! हयग्रीवच्या मांडीला तुम्हीच का उपरण्याची पट्टी फाडून बांधलीत?"

राजाला तो प्रश्न ऐकून आश्चर्य वाटले. तो धावतच हयग्रीवच्या खोलीत गेला. त्याच्या जखमेवरची पट्टी ओळखून म्हणाला– "बाळ! तो योद्धा, म्हणजे तूच का होतास? पण तू तसे काहीच बोलला नाहीस!"

"महाराज! 'मी, मीच हो', असे म्हणालो होतो." हयग्रीव म्हणाला.

असा शूरवीर जावई मिळाल्याबद्दल राजाला फार अभिमान वाटला.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने विचारले– "राजा! हयग्रीवने आपला मोठेपणा असा झाकून कां ठेवला? विनम्रता म्हणून? की राजाला चकित करून सोडण्याच्या हेतूने? या शंकेचे समाधान माहीत असून तू करून दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील.

ते ऐकून विक्रमादित्य म्हणाला–"हयग्रीव एक विवेकवान तरुण होता. पोशाख वगैरे वस्तूवर मनुष्याची खरी पारख होऊ शकत नाही. त्याने उत्तम वस्त्रे परिधान केली म्हणून लोक त्याला राजकुमार मानू लागले. राजाने एकदा त्याला भित्रा म्हटले तर दुसऱ्या वेळी योद्धा म्हटले. हा सर्व माणसाचा भ्रम होता. हयग्रीवला देवीच्या कृपेनेच जय मिळाला होता. म्हणून तो राजकन्येशी विवाहास तयार नव्हता. शत्रू हारला तो देखील देवीच्या कृपेनेच. मोठे यश मिळाले असूनही त्याने स्वतःची ओळख–"मी, मीच हो!" या थोडक्या शब्दात नम्रपणे दिली. स्वतःची लायकी पूर्ण ओळखूनच त्याने ते उत्तर दिले होते. म्हणून तो शहाणा होता हेच मानावे लागेल."

राजाचे मौन अशा प्रकारे भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)



आपल्या खोलीत जाऊन पडून राहिला.

राजा परत आला तेव्हां राजकुमारांनी त्याला विचारले–"बाबा! हयग्रीवच्या मांडीला तुम्हीच का उपरण्याची पट्टी फाडून बांधलीत?"

राजाला तो प्रश्न ऐकून आश्चर्य वाटले. तो धावतच हयग्रीवच्या खोलीत गेला. त्याच्या जखमेवरची पट्टी ओळखून म्हणाला– "बाळ! तो योद्धा, म्हणजे तूच का होतास? पण तू तसे काहीच बोलला नाहीस!"

"महाराज! 'मी, मीच हो', असे म्हणालो होतो." हयग्रीव म्हणाला.

असा शूरवीर जावई मिळाल्याबद्दल राजाला फार अभिमान वाटला.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने विचारले– "राजा! हयग्रीवने आपला मोठेपणा असा झाकून कां ठेवला? विनम्रता म्हणून? की राजाला चकित करून सोडण्याच्या हेतूने? या शंकेचे समाधान माहीत असून तू करून दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील.

ते ऐकून विक्रमादित्य म्हणाला–"हयग्रीव एक विवेकवान तरुण होता. पोशाख वगैरे वस्तूवर मनुष्याची खरी पारख होऊ शकत नाही. त्याने उत्तम वस्त्रे परिधान केली म्हणून लोक त्याला राजकुमार मानू लागले. राजाने एकदा त्याला भित्रा म्हटले तर दुसऱ्या वेळी योद्धा म्हटले. हा सर्व माणसाचा भ्रम होता. हयग्रीवला देवीच्या कृपेनेच जय मिळाला होता. म्हणून तो राजकन्येशी विवाहास तयार नव्हता. शत्रू हारला तो देखील देवीच्या कृपेनेच. मोठे यश मिळाले असूनही त्याने स्वतःची ओळख–"मी, मीच हो!" या थोडक्या शब्दात नम्रपणे दिली. स्वतःची लायकी पूर्ण ओळखूनच त्याने ते उत्तर दिले होते. म्हणून तो शहाणा होता हेच मानावे लागेल."

राजाचे मौन अशा प्रकारे भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





विद्वानाची? अशा अकलांचे औषध माझ्याजवळ नाही बुवा!" भिल्लीण म्हणाली.

"सामान्य माणसांच्या उपयोगी पडेल अशी अक्कल पाहिजे. तेवढ्यावर माझे काम भागेल." भोळसट मनुष्य म्हणाला.

"पण त्यासाठी तुला एक काम करावे लागेल." भिल्लीण म्हणाली.

"कोणते काम?" त्याने विचारले.

"या जगात तुला सर्वात जास्त आवडणारी जी वस्तु असेल ती घेऊन ये." भिल्लीण म्हणाली.

"पण ते मला कसे समजणार?" भोळसट माणसाने विचारले.

[illegible] रे? तू तुला आवडणारी वस्तू घेऊन ये. तेव्हां मी तुला एक प्रश्न करीन. त्याचे तू उत्तर दिलेस की तुला सर्वात जास्त आवडणारी वस्तू आणली आहेस की नाही, हे मला कळेल." भिल्लीण म्हणाली.

"भिल्लीण म्हणाली तसे कर मुला! कसेतरी तुला अकलेचे औषध मिळाले की तू इतर लोकांसारखा सुखी होशील." घरी गेल्यावर आई म्हणाली. मला कोंबडीचे मास सर्वात जास्त आवडते. त्याने मनाशी ठरविले आणि दुसऱ्या दिवशी एक कोंबडी घेऊन भिल्लिणीकडे जाऊन म्हणाला—"आजी, सर्वात जास्त आवडणारी वस्तु घेऊन आलो आहे."

"याहून जास्त आवडणारी एकादी वस्तु किंवा मनुष्य नाही का? तरमग मी विचारते त्याचे उत्तर दे. पाया शिवाय पळणारी वस्तु कोणती?" भिल्लिणीने विचारले. पण त्याला काही उत्तर सुचले नाही.

"तुला माझ्या प्रश्नाचे उत्तर देता आले नाही. म्हणजे तू जी वस्तु आणली आहेस ती तुझ्या तेवढी आवडीची नाही. दुसरे काहीतरी जास्त आवडीचे नक्कीच असले पाहिजे." भिल्लीण म्हणाली.

भोळसट मनुष्य निराश होऊन घरी परतला आणि घरी पोचताच मोठ्या दुःखावेगाने आईला म्हणाला—"आई! माझे

[illegible] जगात काहीच आवडत नाही. उद्यां तू माझ्याबरोबर भिल्लिणीकडे चल."

दुसऱ्या दिवशी मायलेक दोघे भिल्लिणीकडे गेले. भोळसट मुलगा भिल्लिणीला म्हणाला—"आजी! आज मी सर्वात जास्त आवडणारी वस्तू घेऊन आलो आहे. ती वस्तू म्हणजे, ही माझी आई!"

"पाहू तर दे तिला!" भिल्लीण म्हणाली. भोळसट मुलाच्या आईला किलकिल्या डोळ्यांनी पाहिल्यावर तिने विचारले—"तरमग हे सांग, सोने नसले तरी त्याच्यासारखे चमकणारे काय आहे?"

भोळसट मुलाने डोके खाजवून विचार करून पाहिला, पण उत्तर सुचले नाही.

"पाहिलेस, या खेपेस देखील तू आपल्या सर्वात जास्त आवडीची वस्तू घेऊन आला नाहीस. तुला खरोखरच अकलेच्या औषधाची गरज आहे." भिल्लीण म्हणाली.

"मी तरी तेच म्हणालो होतो." असे सांगून भोळसट मुलगा आपल्या आईला घेऊन डोंगर उतरून खाली आला. वाटेत त्याला एक तरुण मुलगी दिसली.

"काय हो बोळोपंत! तोंड कां उतरले आहे हो? असे झाले तरी काय?" त्या तरुण मुलीने विचारले. भोळसट माणसाने घडलेली गोष्ट जशीच्या तशी सांगितली. ती ऐकून ती मुलगी म्हणाली—"काय पण बाई! तुला कोणी सल्ला देणारा किंवा देणारी नाही वाटते?"



"को...णी नाही." भोळसट मुलगा म्हणाला.

"तरमग, मी करते तुला मदत! तुझ्याशी लग्न करून तुला काय हवं नको ते सर्व पाहीन." ती मुलगी म्हणाली.

"तरमग छानच झाले. चल, आपण लग्न करून घेऊ." भोळसट मुलगा म्हणाला. दोघांचे लग्न झाले. भोळसट माणसाची बायको हुशार होती. संसार थाटला. संसाराचा गाडा सुरळीत चालू झाला. त्याला सर्व जगच बदलल्यासारखे वाटले. तो एकदां आपल्या बायकोला म्हणाला–"होय ग! मला तूच या जगात सर्वात जास्त आवडीची आहेस. चल, डोंगरातल्या भिल्लिणीला जाऊन भेटू या. कदाचित ती मला अकलेचे औषध देईल." दोघे डोंगर चढून भिल्लिणीकडे गेले.

तो डोंगर चढून गेल्याबरोबर भिल्लिणीला म्हणाला–"आजी! मला सर्वात जास्त आवडणारी वस्तु आणली आहे!"

"ते मी ठरवणार! सांग, पाय नाहीत पण चालणारी वस्तु कोणती?" भिल्लि- [illegible] बायकोने त्याच्या कानात काहीतरी सांगितले. ते ऐकून भोळसट मनुष्य म्हणाला–"पाणी!"

"सोने नाही, पण सोन्यासारखे चमकते ते काय?" भिल्लिणीने विचारले.

भोळसट माणसाच्या बायकोने नवऱ्याच्या कानात काहीतरी सांगितले. ते ऐकून भोळसट मनुष्य म्हणाला–"सूर्य!"

"अरे, मग काय? तुला अकलेचे औषध मिळाले!" भिल्लीण म्हणाली.

"आहे कोठे? मला नाही दिसले!" भोळसट मनुष्य म्हणाला.

स्मित करून भिल्लिणीने त्याच्या बायकोच्या डोक्याकडे खूण करीत म्हटले–"यात आहे. भोळसट माणसाचे औषध समजूतदार बायको असते. समजले!" असे सांगून भिल्लिणीने दोघांना निरोप दिला.

भोळसट मनुष्य व त्याची बायको डोंगर उतरून आनंदाने घरी गेली.






# माकड भूत

**फा**र जुनी गोष्ट आहे. जपान देशात परिभ्रमण करणारा एक धर्मगुरु होता. एकदा तो गुरु भ्रमण करीत डोंगराळ प्रदेशातल्या एका गावी येऊन पोचला. त्या गावात प्रत्येक घरी लाडवासारखी एक वस्तु तयार केलेली त्याला दिसली. त्या गावात काहीतरी उत्सव असावा असे त्याला वाटले.

गुरु गावभर फिरत होता. फिरताफिरता तो एका श्रीमंत माणसाच्या घराजवळ थबकला. आतून रडण्याचा आवाज ऐकू आला. त्याला आश्चर्य वाटले. तो घरात गेला. मधोमध एका मुलीला बसवून तिच्या चारीबाजूला बरीच मंडळी रडत होती. गुरूला कां ते कळेना. तो आश्चर्याने त्यांच्याकडे थोडा वेळ पहात उभा राहला. पण त्या स्थितीत त्याला फार वेळ राहवले नाही.

"कां रडता आहां तुम्ही?" गुरूने विचारले.

घराचा मालक म्हणाला–"एका आठवड्याच्या आत आम्हांला एका मुलीचा बळी द्यावा लागणार आहे. समोरच्या डोंगरावर एक देऊळ आहे. त्यात कोणती तरी देवी आहे, आम्हांला माहीत नाही. परंतु दर वर्षी कापणीच्या पूर्वी देवळात एका मुलीला बळी द्यावे लागते. तसे केले नाही तर एक मोठे वादळ, नाहीतर तुफान येईल आणि सर्व पीक नष्ट होऊन जाईल. म्हणून नाइलाजाने आम्ही मनुष्यबळी दर वर्षी देतो. या खेपेस आमच्या घराची पाळी आहे. मला माझ्या या एकुलत्या एका मुलीचा बळी द्यावा लागत आहे. रडण्याचे हेच कारण आहे!"

गुरू मालक म्हणाला ते लक्षपूर्वक ऐकून घेऊन म्हणाला–"जगात अशा गोष्टी सुद्धा घडतात का? काय पण विचित्र! तुझ्या मुलीऐवजी मी स्वत:चा बळी द्यायला तयार आहे. तू मुलीला पाठवू नकोस! एवढी



मदत माझ्याकडून होऊ शकली तर मी स्वतःला धन्य समजेन!"

त्यानंतर गुरु तो डोंगर चढून गेला. डोंगरावर त्याला एक जुनाट पडके देऊळ दिसले. देवाजवळ एक मोठे देवदाराचे झाड होते. त्यात एक फार मोठी पोकळी होती. त्या दिवशी रात्री गुरु त्या पोकळीत लपून बसून राहला.

मध्य रात्रीच्या सुमारास त्या देवळासमोर मोठी गर्दी आलेली दिसली. त्या गर्दीचा नायक मोठ्याने ओरडून म्हणाला–" अरे, 'शिप्पेय तरो' आला नाही का?"

"'शिप्पेय तरो' आज येणार नाही." दुसरा म्हणाला.

त्यानंतर देवळाचा दरवाजा उघडून सर्व लोक आत गेले. थोड्या वेळाने गुरुला देवळाच्या आत हे गाणे ऐकू आले–

"नगहम निवासी शिप्पेय तरो
नको रे बाबा शिप्पेय तरो!"

ते गीत वारंवार म्हणताना ऐकून धर्म गुरुने विचार केला, ही कोणत्या का जातीची भुते असोत, ही 'शिप्पेय तरो'च्या नावानेच भितात. त्या नावाच्या माणसाच्या हातून या सर्वांचा नाश नक्कीच होईल.

गुरु रात्री त्या मुलीच्या घरी परतला आणि शिप्पेय तरो नावाच्या माणसाच्या शोधार्थ नगहम नावाच्या गावी निघाला. ते एक लहानसे खेडे होते. गुरुने तेथे पोचल्यावर सर्वांना एकच एक प्रश्न विचारला– "तुम्हांला शिप्पेय तरो नावाचा कोणी माहीत आहे का?" परंतु कोणाला त्या नावाचा कोण आहे, हे सांगता येईना. तेव्हां निराश होऊन गुरु एका गल्लीच्या बाजूला एका दगडावर बसून राहला. त्याच वेळी एका वासराएवढे मोठे कुत्रे तिकडे आले आणि त्याचा मालक 'शिप्पेय तरो' अशा हाका मारीत त्याच्या पाठीमागून येत असलेला दिसला.

गुरुचा उत्साह वाढला. त्याने कुत्र्याच्या मालकाला भुतांची व मुलीला बळी देण्याची गोष्ट सांगितली आणि विचारले– "एका मुलीचा जीव वांचविण्यासाठी तुम्ही आपुले कुत्रे दोनतीन दिवसासाठी देऊ शकाल का?" कुत्र्याच्या मालकाने आनंदानें कुत्रे देण्यास मान्य केले. ते कुत्रे घेऊन धर्मगुरु घाई-घाईने त्या डोंगराकडे निघाला.

तिकडे मुलीला बळी देण्याचा दिवस जवळ येऊ लागला होता. पण गुरु कोठे दिसला नाही. म्हणून मुलीच्या आई-वडिलांनी मुलीला बळी देण्याची सर्व तयारी करून ठेवली. त्या मुलीला ठेवण्यासाठी लाकडाची एक मोठी पेटी तयार करण्यात आली. मुलीला स्वच्छ पांढरी वस्त्रे परिधान करवून त्या पेटीत निजविण्यात आले. ती पेटी उचलून घेऊन जाण्यासाठी चार जण पुढे झाले. तेवढ्यात गुरु धापा टाकीत तेथे येऊन पोचला.

दुःखाने घाबरून गेलेल्या मुलीला गुरुच्या सांगण्यावरून पेटीबाहेर काढण्यात आले आणि तिच्याऐवजी गुरुला व कुत्र्याला पेटीत बसविण्यात आले. भोई पेटी उचलून घेऊन निघाले. पेटी देवळाजवळ ठेवून भोई परतले.

नेहमीप्रमाणे मध्य रात्रीच्या सुमारास ती भुतांची टोळी आली. सर्व भुते पेटीच्या चारीबाजूला गराडा करून उभी राहली आणि गाणे म्हणू लागली–"शिप्पेय तरोला सांगू नका!"

काही भुतांनी पेटीचे झांकण उघडले मात्र, कुत्रे जोराने भुंकत भुतांवर तुटून पडले. गुरुदेखील बाहेर येऊन भुतांना बडवू लागला. कित्येक भुते गुरुच्या हाती ठार होऊन जमिनीवर लोळू लागली.

दुसऱ्या दिवशी उजाडल्यावर गावकऱ्यांनी, देवीने आतापर्यंत गुरुला गिळले असावे असा विचार केला. परंतु डोंगरावर जाऊन पाहतात तर देवळाच्या चारीबाजूला माकडांसारखे प्राणी मरून पडलेले दिसले. गुरु त्या कुत्र्याला घेऊन शांतपणे डोंगर उतरून खाली येत होता.

त्या दिवसापासून गावकऱ्यांना नरबळी द्यावा लागला नाही.



# सैंपाकात प्रावीण्य

गौतमी नावाच्या राज्याचा युवराज जेव्हा लग्नास योग्य झाला तेव्हां तो आपल्या योग्य वधूच्या शोधार्थ निघाला. त्याने अनेकानेक राजकन्या पाहिल्या. तो प्रत्येकीला हा प्रश्न विचारी–"तुला कोणते पक्वान्न तयार करता येते ?" प्रत्येक राजकुमारी कोणत्या तरी पक्वान्नाचे नाव सांगे. पण ते उत्तर ऐकून त्याला आनंद होण्याऐवजी राग येई आणि पुढे निघून जाई. शेवटी तो पूर्णिमा नामक नगरी पोचला. त्याने त्या गावच्या राजकन्येला विचारले–"तुला कोणकोणती पक्वान्ने तयार करता येतात ?"

"कोणाला कोणता प्रश्न विचारावा, कदाचित हे आपणांला माहीत नाही ! मी राजकन्या आहे व पुढे कोणत्या तरी देशाची राणी होणार आहे. मी कधी सैंपाक केला नाही व पुढे करण्याची मला गरज नाही." राजकन्या म्हणाली.

राजकुमाराने त्या राजकन्येशी विवाह करून देण्यास आपली संमती दिली.

—रवीन्द्रकुमार भुवालका





# अजर आयु

एका राजाला तीन मुलगे होते. सर्वांत धाकट्या मुलाचे नाव कुशल असे होते. एकदा तो आपल्या बापाला म्हणाला–"बाबा! मी देशाटनाला जावे म्हणतो. मला थोडे पैसे व एक घोडा द्यावा."

राजा त्या विरुद्ध काही एक बोलला नाही. कुशलने त्याच्या प्रवासाला जरूर तेवढे पैसे घेतले व एका घोड्यावर बसून देशाटनाला निघाला. नगराबाहेर पोचल्या-वर एका झाडीत त्याने बरोबर आणलेले बरेचसे धन पुरून ठेवले आणि पुढे निघाला. कुशल अनेक गावे, शहरे व प्रदेश पहात निघाला. परंतु त्याच्या मता-प्रमाणे त्याला हवी होती तशी एकदेखील मुलगी दिसली नाही. आठ वर्षे असाच फिरत राहिल्यावर तो पक्ष्यांच्या राज्यात येऊन पोचला.

पक्ष्यांची राणी तरुण होती व रूपवती पण होती. ती त्याला पाहून म्हणाली–"कोठून आलात, कोठे जायचे ?"

"वार्धक्य कधी येत नाही अशा देशा-तल्या एखाद्या अजर आयु असलेल्या मुलीशी विवाह करण्याच्या हेतूने हिंडत आहे." कुशल म्हणाला.

पक्ष्यांची राणी स्मित करून म्हणाली–"आमच्या देशात कधी वार्धक्य येतच नाही."

"असे कसे होईल?" कुशलने विचारले.

ती म्हणाली–"तुम्हांला हे मोठे अरण्य दिसते आहे ना? हे कापून छाटून जाईपर्यंत या प्रदेशात वार्धक्य येणार नाही."

ते ऐकून कुशल म्हणाला–"तसे असेल तर मी नाही राहणार येथे. कारण केव्हां तरी हे वृक्ष व वनस्पती कापले जातीलच व त्यानंतर वार्धक्य या देशात येईलच." असे

सांगून कुशल पक्ष्यांच्या राणीचा निरोप घेऊन पुढे निघाला.

पुन्हां आठ वर्षे प्रवास केल्यावर तो एका कांशाच्या किल्ल्याजवळ येऊन पोचला. त्या किल्ल्यातून एक सुंदर तरुण मुलगी धावत बाहेर आली आणि तिने कुशलला विचारले–"यावे, मी आपल्यासाठी कित्येक दिवसांपासून वाट पहात आहे."

तिने त्याचा घोडा तबेल्यात नेऊन बांधून ठेवला. कुशल त्या दिवशी रात्रभर त्या तरुण मुलीचा पाहुणा म्हणून तिच्याकडे राहला आणि पहाटे उठून आपल्या घोड्यावर खोगीर घालून पुढे जायला निघाला. ती मुलगी त्याला प्रवासाला तयार झालेला पाहून म्हणाली–"कोठे निघालात?"

[illegible] अजर आयु असले-त्या देशात!" कुशल म्हणाला.

"तसे असेल तर तू येथेच रहा. या देशात वार्धक्य येत नाही." ती म्हणाली.

"तसे कसं होईल?" कुशलने तिला विचारले.

ती म्हणाली–"तुला समोर डोंगर दिसतात ना? ते घासून जमिनीबरोबर सपाट होईपर्यंत या देशात वार्धक्य पाऊल टाकणे शक्य नाही."

"तरमग केव्हांतरी हे डोंगर जमिनीपर्यंत घासून सपाट होतीलच की नाही? तेव्हां वार्धक्य येईल." असे तिला उत्तर देऊन कुशल पुढे निघाला.

[illegible] एक झोपडे दिसले. कुशल त्या झोपडीत गेला. त्याला एक तरुण मुलगा दिसला. त्याने कुशलला विचारले–"काय पाहिजे!"

"अजर आयु ज्या प्रदेशात आहे अशा प्रदेशात जायची इच्छा आहे." कुशल म्हणाला.

"तोच हा प्रदेश,–तुला पाहिजे असलेला. या प्रदेशात वार्धक्याने कधी पाऊल टाकले नाही." तो मुलगा म्हणाला.

"कोण तू?" कुशलने त्याला विचारले.

"मी मारुत आहे. तू मानव लोकाची हद्द ओलांडून फार दूर आला आहेस." मुलगा म्हणाला.

"तुला हरकत नसेल तर कायम येथेच रहावे, म्हणतो." कुशल म्हणाला.

कुशल त्या झोपडीत कित्येक वर्षे राहला त्याच्या वयात काही फरक पडला नाही. झोपडी बाहेर त्याने कधी पाऊल टाकले नाही. परंतु मारुत मात्र दररोज कोठे कोठे फिरून येत असे.

रात्रंदिवस झोपडीत राहल्याने त्याला कंटाळा आला. मारुताने ते ओळखले व म्हणाला–"पाहिजे तर तू हिंडून फिरून ये. पण, तुला सांगून ठेवतो, पश्चात्ताप नावाची एक दरी आहे. त्या दरीत मात्र चुकून देखील पाऊल टाकू नकोस. ती दिसायला फार सुंदर आहे. परंतु त्या दरीत पाऊल टाकणे तुझ्या हिताचे नाही." या शब्दात कुशलला सावध राहायला सांगून मारुत नित्याप्रमाणे हिंडायला निघाला.







ते ऐकून कुशलच्या मनात ती दरी पाहून यायची इच्छा कमी व्हायच्या ऐवजी जास्तच वाढली. तो रहात होता तेथे वार्धक्य नाही, हे त्याला पटले, पण तेथे मन रमेल असे दुसरे काहीच नव्हते. पश्चात्तापाच्या दरीत आकर्षक, मोहक असे काहीतरी बघायला नक्कीच मिळेल. असा विचार करून कुशल त्या दरीकडे निघाला.

परंतु दरीत पाऊल पडतांच कुशलला दुःखाने घेरले. तो रडू लागला. रडल्यावर त्याचे मन थोडे हलके झाले. आजपर्यंत दुःख त्याच्याजवळ फिरकले देखील नाही. एकाएकी त्याला पश्चात्ताप झाला–"मी आपल्या आई-वडिलांना, भावंडांना सोडून आलो. शेवटी माझ्या कपाळी राहील ते हे एकटेपण. माझ्या जीवनाचा खुंट वाळून सुकून गेला आहे."

त्या एकटेपणाचा वीट आल्यावर कुशल झोपडीत येऊन मारुताला म्हणाला–"मी आपल्या घरी जाऊन आईवडिलांना व भावंडांना भेटून यावे म्हणतो."

मारुताने त्याला अनेक प्रकारे समजावून सांगितले की त्याने जाऊ नये आणि गेल्या-वर त्याला फायदा होणार नाही. उलट जास्तच वाईट वाटेल.

परंतु कुशलने मारुताच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले. तो आपल्या घोड्यावर बसून निघाला. तो कांशाच्या किल्लाजवळ आला तेव्हां एक पन्नाशी उलटलेली बाई समोर येऊन त्याला म्हणाली–"तू आज आलास? काय उपयोग? या प्रदेशात आतां वार्धक्य येऊ लागले आहे. पहा, समोरचे डोंगर सपाट झाले आहेत."

"बरोबर आहे तुझे म्हणणे. माझेच चुकले. मी येथेच थांबायला हवे होते. पश्चात्ताप करण्याशिवाय आता काय उरले आहे?" एवढे सांगून कुशल तिचा निरोप घेऊन पुढे निघाला. काही वेळाने तो पक्ष्यांच्या राणीकडे आला. सर्व जंगल कापून छाटून गेले होते व सर्व अरण्य ओसाड दिसत होते. पक्षांच्या राणीचे तारुण्य संपून गेले होते व उतारवय सुरू झाले होते.

तारुण्याचे रक्षण करून तुला काय सुख मिळाले?" राणीने कुशलला विचारले.

"मला मुळीच सुख मिळाले नाही. मी मानवासारखे आयुष्य घालविले नाही हेच माझे दुःख आहे." कुशल एवढे सांगून आपल्या वडिलांच्या राजधानीकडे निघाला. परंतु तो राजधानी समजून ज्या जागी गेला तेथे शहर नव्हते की राजवाडा नव्हता. शेते व उघडी जमीन होती. त्याला एक म्हातारा मनुष्य दिसला. त्याला कुशलने जाऊन विचारले–"माझ्या वडिलांची येथे राजधानी होती व ते एका मोठ्या राजवाड्यात होते. तो राजवाडा कोठे आहे सांगू शकाल का?"

"तुझे वडील? म्हणजे कोण?" म्हाताऱ्याने चकित होऊन विचारले.

कुशलने आपल्या वडिलांचे नाव व इतर वर्णन सांगितले. ते ऐकून म्हातारा रागावल्यासारखा झाला आणि म्हणाला–"तू म्हणतोस त्या राजाच्या विषयी माझ्या आजोबांनी किंवा पंजोबांनी सुद्धा कधी उल्लेख केलेला मला आठवत नाही. तू माझी थट्टा उडवतो आहेस की काय?"

"नाही हो, मी खरे तेच सांगतो आहे. मी स्वतः आपल्या हातांनी आपले थोडे धन येथेच एका जागी पुरून ठेवले होते. मी ते काढून दाखवितो म्हणजे तुम्हांला मी म्हणतो ते खरे वाटेल." असे सांगून कुशलने ती जागा हुडकून खणले आणि पुरून ठेवलेले धन बाहेर काढले. परंतु त्या पैशांच्या आड म्हातारपण लपून बसलेले होते. वार्धक्याने त्याचा हात पकडून त्याला विचारले–"किती वर्षांनी, नव्हे शतकांनी तू माझ्याकडे आलास?" त्यानंतर वार्धक्य त्याला जमिनीत ओढून घेऊन गेले.

खड्ड्याबाहेर बसलेल्या त्या म्हाताऱ्याने लक्षपूर्वक नाणी पाहिली आणि म्हणाला–"ही नाणी प्राचीन काळातली केव्हांची तरी दिसतात." त्याने खड्डा खणणारा कोठे आहे हे पाहिले, पण तो अदृश्य झाला होता.

"कायपण जग विचित्र आहे!" म्हातारा स्वतःशीच बडबडू लागला.





# ब्रह्मराक्षस

एका गावी एक दुष्ट जमिनदार रहात असे. त्या गावाजवळ एक जंगल होते. त्या जंगलातून कोणी परगावचा मनुष्य प्रवास करतांना दिसला की तो जमिनदार त्याचा खून करून त्याचे सर्व धन लुबाडीत असे. म्हणून त्या जंगलातून कोठे जाणे, आणि पैसा अडका स्वत:जवळ ठेवून जाणे फारच धोक्याचे होते.

एकदा एक विद्वान पंडित राजाकडून मोठे इनाम मिळवून आपल्या गावी जात होता. त्याच्या गावाला जायची वाट त्याच जंगलातून होती. जमिनदाराच्या नोकरांनी त्याला ठार केले आणि त्याचे इनाम पळवून नेले. त्यांनी त्या पंडिताचे प्रेत जंगलातच कोठेतरी पुरून टाकले, हेतू हा की ह्या कानाची गोष्ट त्या कानाला कळू नये.

काही वर्षे लोटली. त्या पंडिताच्या मुलाने आपल्या दहा वर्षांच्या मुलाला त्या जमिनदाराच्या गांवच्या एका गुरूकडे शिक्षणासाठी नेऊन ठेवण्याचे ठरविले. तो मुलगा जंगलाच्या वाटेने जात होता. तेव्हां एक म्हातारा ब्राह्मण मुलाजवळ आला आणि म्हणाला—"मुला, तू माझ्याबरोबर चल, मी तुला पाहिजे ते देईन." मुलगा त्या ब्राह्मणाबरोबर दाट रानात गेला.

म्हाताऱ्या ब्राह्मणाने एका खड्यातून एक लोटी काढून मुलाच्या हातात दिली व म्हणाला—"मुला! हा तांब्या भरून सोने आहे. तू हे सावधपणे बाळग! तू हे जंगल पार करून पलीकडे गावात पोचशील तो-पर्यंत चांगला काळोख पडलेला असेल. तू जमिनदाराच्या घरी रात्रभर झोपायला परवानगी मागून घे." असे सांगून ब्राह्मण निघून गेला.

मुलाने लोटीच्या तोंडावर बांधलेले फडके सोडून पाहिले. खरोखरच आत [illegible] स्वत: बोलावून ज्या ब्राह्मणाने त्याला एवढे धन दिले होते त्या ब्राह्मणाचे मनोमन आभार मानून मुलगा पुढे निघाला.

मुलगा त्या जमिनदाराच्या गावी पोचला तोपर्यंत काळोख झाला होता. त्याने जमिन-दाराच्या घरी जाऊन रात्रभर झोपायला परवानगी मागितली. रात्री, मुलगा झोपल्या-वर जमिनदाराने तांब्याच्या तोंडावरचे फडके सोडून पाहिले तर आत सोने दिसले.

त्याला आश्चर्य वाटले, इतक्या लहानशा मुलाला इतके सोने कोठून बरे मिळाले असेल? हा मुलगा इतके सोने घेऊन करणार तरी काय? याला इतके सोने कोणी दिले असेल? या सर्व गोष्टीची चवकशी केली पाहिजे. पण ते सर्व कशाला? आपण सर्व सोने उचलून नेऊन ठेवले की झाले! असा विचार करून त्याने तांब्यातली सर्व नाणी काढून घेतली आणि तांब्याच्या तोंडावर दादरा बांधून ठेवून स्वस्थपणे झोपला.

दुसऱ्या दिवशी मुलाने उठल्यावर तांब्या हातात घेतला तर तो त्याला हलका वाटला. त्याने दादरा सोडून पाहिला तर सोन्याची नाणी आत नव्हती. त्याने जमिनदाराला जाऊन सोन्याची नाणी चोरी गेल्याचे सांगितले.



जमिनदार रागाने म्हणाला—"मूर्ख, मुला! तू माझ्यावर चोरीचा आरोप लावतोस? तुला वाटले काय? तुला मी फांशी देववितो पहा!" जमिनदाराने मुलाला दरडावून सांगितले आणि त्याला एका खोलीत कोंडून ठेवले. त्यानंतर त्याने त्याचो 'हांजी हांजी' करणाऱ्या तिघां चौघां गावकऱ्यांना बोलावून आणले आणि विचा-रले—"माझ्यावर चोरीचा आळ आण-णाऱ्याला फांशीची शिक्षा देणे तुमच्या मते बरोबर आहे की नाही?"

"ते विचारण्याची गरजच काय? त्याला अवश्य फांशीची शिक्षा द्यावी. नाहीतर प्रत्येक लहान मुलगा तुमची फिकीर पर्वा








करणार नाही." गावकरी म्हणाले. गावात दवंडी पिटविण्यात आली की जमिनदारावर चोरीचा आळ आणणाऱ्या मुलाला फांशीची शिक्षा आज होणार आहे. त्या दिवशी फांशीची शिक्षा पाहण्यासाठी लोकांची गर्दी जमली. मुलाला फाशीच्या जागी आणण्यात आले. आपल्या समोर मुलाला फांशी देवविण्यासाठी स्वतः जमिनदार हजर होता.

त्याच वेळी एक ब्राह्मण गर्दीतून बाहेर आला आणि जमिनदाराला त्याने विचारले– "या मुलाला का फांशीची शिक्षा होणार आहे? याने कोणता अपराध केला?"

"विचारणारा तू कोण रे उपटसुंभ्या?" जमिनदाराने ब्राह्मणाला दरडावून विचारले.

"मी त्याचा आजा आहे आणि हा माझा नातू आहे!" ब्राह्मण म्हणाला.

"होय का? तर मग ऐक! तुझ्या नातवाने माझ्यावर चोरीचा आळ लावला आहे. मी त्याला एक दिवशी रात्री आपल्या घरी झोपायला परवानगी दिली. त्या बद्दल आभार मानायचे राहीले बाजूला, मी सोन्याच आरोप लावला माझ्यावर! माझ्या इभ्रतीला त्यामुळे धक्का पोचला. त्याची ही शिक्षा आहे!" जमिनदार म्हणाला.

"तर मग एक काम करा! तुम्ही एक शपथ घ्या, या मुलाने आपल्यावर लावलेला आरोप खरा असेल तर ब्रह्मराक्षसाने आपल्याला उचलून घेऊन जावे. तेव्हां तुम्ही मुलावर काही अत्याचार केला नसून त्याच्याशी केलेले वर्तन न्याय्य होते हे ठरेल." ब्राह्मण म्हणाला.

"मी तयार आहे त्याला. मी शपथ घेऊन सांगतो की या मुलाने माझ्यावर खोटा आरोप लावला आहे. त्याचे म्हणणे खरे असेल तर ब्रह्मराक्षस मला उचलून घेऊन जाईल." जमिनदार म्हणाला.

दुसऱ्या क्षणाला त्या ब्राह्मणाने जमिनदाराला उचलून घेतले आणि वायुवेगाने जंगलाच्या दिशेने धावला. त्यानंतर जमिनदाराचे काय झाले कोणाला काही कळले नाही.





# अलीबाबा आणि चाळीस चोर

[२]

कासिमच्या बायकोने केलेली युक्ति यशस्वी झाली होती. तिने ती गोष्ट नवऱ्याला सांगितली व म्हणाली–"हे सर्व पाहून स्वस्थ बसून कसे चालेल? तुम्ही अलीबाबाच्या घरी जाऊन विचारा, एवढे सोने त्याला कोठून व कसं मिळालं?"

कासिमने, बायकोच्या बोलण्यावरून अलीबाबाला सोन्याचा सांठा कोठे तरी सांपडला असला पाहिजे, हे ओळखले. अलीबाबाचे दारिद्र्य गेल्याबद्दल त्याला आनंद झाला नाही तर त्याला हेवा वाटू लागला. म्हणून खरी गोष्ट काय आहे याची चवकशी करून घेण्यासाठी तो अलीबाबाच्या घरी गेला.

कासिम अलीबाबाच्या घरी पोचला तेव्हां अलीबाबाच्या हातात फावडे होते, ते पाहून त्याने दटावीत अलीबाबाला विचारले–"कायरे, गाढवे पाळणाऱ्या! तुझी ही लबाडी किती दिवस लपेल? आमच्या न कळत सोने मापून पाहतोस आणि आपली गरीबी जगजाहीर करतोस काय?"

अलीबाबाला शांतपणे म्हणाला–"बडे भैया! तू काय म्हणतोस ते मला काही कळले नाही. आज एकाएकी असा रागावून कां बोलतो आहेस? सरळ काय ते विचार नां!"

"आपली लबाडी लपविण्याची गरज नाही. तुझी लपवालपवी मला सर्व कळली आहे." असे सांगून कासिमने, बायकोने दिलेले सोन्याचे नाणे काढून दाखविले आणि विचारले–"अशी सोन्याची नाणी किती लपवून ठेवली आहेस ती मुकाट्याने सांगतोस की नाही? कोठून चोरी करून आणलीस?" त्यानंतर बायकोने केलेली युक्ति कासिमने सांगितले.




त्याचे गुपित बाहेर पडले होते, म्हणून अलीबाबा म्हणाला—"बडे भैया! अल्ला दयाळु रहम दिल आहे. आपल्या भक्ताला जे द्यायचे ते तो देतो. ही सर्व त्याची मेहेरबानी आहे." नंतर त्याने जंगलात जे घडले ते सांगितले. परंतु गुहेचे दार उघण्या बंद करण्याचा मंत्र सांगितला नाही. नंतर तो कासिमला पुन्हा म्हणाला—"बडे भैया! आपण दोघे एका आईची मुले-सख्खी भावंडे आहो. मला मिळालेले हे जे धन आहे. त्याचा तू देखील वाटेकरी आहेस. गुहेतून मी जे धन घेऊन आलो आहे त्यातले अर्धे मी तुला देतो."

परंतु कासिम लोभी होता. तो म्हणाला—"तू हेच सांगणार, मला माहीत आहे. त्या गुहेपर्यंत जाण्याची वाट कोणती हे मला सांग. मला फसविण्याचा व माझ्यापासून काही लपविण्याचा प्रयत्न केलास तर त्याचा परिणाम बरोबर होणार नाही. मी अधिकाऱ्यांच्या कानावर सगळे घालून तू चोरांच्या टोळीत सामील झाला असल्याचे सांगेन."

अलीबाबाने विचार केला की त्याचा भाऊ अधिकाऱ्यांच्या कानावर ही गोष्ट घेऊन गेला तर आपले व बायका मुलांचे हाल होतील. म्हणून त्याने गुहेचे दार उघडायचे बंद करायचे कसे हे देखील सांगून टाकले.

गुहेतले सर्व धन आणण्याचा कासिमने विचार केला. आपल्या धाकट्या भावाला काही सांगितल्याशिवाय तो आपल्या घरी गेला. दुसऱ्या दिवशी उजाडण्यापूर्वीच तो खेचरांच्या पाठीवर रिकाम्या पेट्या बांधून जंगलाकडे निघाला. पहिल्याने जेवढे या पेट्यातून आणता येईल ते घेऊन यावे असा त्याने विचार केला होता. अलीबाबाने विचारले—"मी येऊ का बरोबर? पण कासिमने बरोबर येण्याची गरज नाही असे सांगितले आणि एकटा अलीबाबाने सांगितले-ल्या वाटेने चोरांच्या गुहेपर्यंत गेला.

[illegible] त्याच्या वरच्या बाजूला एक झाड होते. कासिमने दोन्ही हात विनंतीसूचक खडका पुढे करून अलीबाबाने शिकवून ठेवलेला मंत्र म्हटला—"तिळा, तिळा! दार उघड!" त्याबरोबर खडक सरकला आणि दार उघडले. कासिमने आपली दहा खेचरे बाहेर झाडाला बांधून ठेवली आणि आत जाऊन मंत्र म्हटला. दुसऱ्या क्षणाला दार बंद झाले. त्याच्यावर गुजरणाऱ्या प्रसंगाची त्याला थोडीदेखील कल्पना असती तर त्याने तो मंत्र म्हटला नसता.

गुहेत हिऱ्या माणकांच्या व सोन्या चांदीच्या राशीच्या राशी पडलेल्या पाहून कासिमचे डोळेच दिपून गेले. हे सर्व ऐश्वर्य [illegible]ल्याला मिळाले पाहिजे. हे सर्व न्यायला उंटांचा एक तांडा पुरणार नाही, असे त्याला वाटले. तूर्त दहा खेचरांच्या पाठीवर जेवढे नेता येईल तेवढे तर न्यावे असे ठरवून धन एकत्र करून दाराजवळ गेला व म्हणाला—"यवा! यवा! दार उघड!"

हिऱ्या माणकांच्या राशी पाहिल्यापासून तो असा काही भांबावून गेला होता की मूळ-मंत्र विसरून गेला. म्हणून कित्येकदा "यवा! उघड!" त्याने म्हटले. त्याने एकामागून गहू, तांदूळ, बाजरी, जोंधळे सर्वांची नावे घेऊन "उघड!" म्हटले. तरी दार उघडले नाही. त्याचे हृदय धडधड करू लागले. देव तरी कधीकधी दुष्ट माणसाला चांगली





शिक्षा करतो. अगदी तसेच झाले. कासिमची सर्व धडपड फुकट गेली. तेव्हां बाहेर जायला आणखी कोठे वाट आहे का पाहण्यासाठी तो गुहेत हिंडू लागला. परंतु त्याला कोठे वाट दिसली नाही.

ऐन दुपारच्या सुमारास चाळीस चोर गुहेच्या दरवाज्याजवळ येऊन पोचले. त्यांना बाहेर झाडाला बांधलेली खेचरे व त्यांच्या पाठीवर रिकाम्या पेटया दिसल्या. सर्वांनी आपापल्या तलवारी उपसल्या आणि दारा-जवळ जाऊन उभे राहले. चोरांच्या सरदाराने आपली तलवार दाराच्या रोखाने धरून म्हटले—"तिळा, तिळा! दार उघड!" लगेच दार उघडले.

चोरांचा आवाज आणि घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकला तेव्हांपासून कासिम कोपऱ्यात कोठेतरी संधी मिळाली की निसटून पळून जाण्याच्या हेतूने लपून बसला होता. परंतु तो दार उघडल्या बरोबर चोरांच्या हातात सांपडला. चोरांनी कासिमच्या अंगाचे सहा तुकडे करून त्याला ठार केले. नंतर चोर आपापल्या तलवारी घेऊन आत गेले. कासिमने पिशव्या भरून ठेवल्या होत्या त्या पुन्हां त्यांनी जागच्या जागी ओतल्या. परंतु अलीबाबा किती धन घेऊन गेला होता ते त्यांना कळले नाही. त्यांनी परस्परांशी या गोष्टीवर बराच वेळ चर्चा केली. पण त्यांना मुख्य प्रश्नाचे उत्तर मिळाले नाही. म्हणून नंतर पाहू असा विचार करून ते पुन्हां चोरी करायला निघून गेले.

लोभीपणामुळे कासिमला मरण आले. त्याच्या मरणाला खरे कारण म्हणजे त्याची बायकोच होती. तिने मापटाच्या बुडाला डिंक लावून ठेवला त्याचा परिणाम असा झाला. नवरा लवकरच मोठे धन घेऊन येईल असा विचार करून तिने एका मोठ्या मेजवानीची तयारी केली होती. परंतु काळोख पडला तरीदेखील तो न आलेला पाहून मात्र ती घाबरून गेली. ती आपला अहंभाव सोडून धावत अलीबाबाच्या घरी गेली व म्हणाली—"अहो भावजी! तुमचे वडील बंधू अजून आले नाहीत हो! जरा जाऊन पाहून येता का?"

अलीबाबा स्वभावाने दयाळू होता. मोठा भाऊ परत न आलेला पाहून तो घाबरून गेला. तो गहिंवरून जाऊन म्हणाला—"वहिनी! अल्ला भावाचे रक्षण करील! मी त्याला विचारले, येऊ का बरोबर? पण त्याला ते आवडले नाही. कदाचित काळोख पडल्यावर कोणाला कळल्याशिवाय येण्याचा त्याचा विचार असेल. या काळो-खात जाण्यात ही काही अर्थ नाही. सकाळी उजाडल्यावर जाईन. रात्रभर तुम्ही आमच्या घरीच झोपा!"

उजाडताच अलीबाबा आपली तिन्ही गाढवे घेऊन जंगलात गेला. गुहेजवळपास त्याला त्याच्या भावाची खेचरे कोठे दिसली नाहीत. खडकाजवळ रक्ताचे डाग पाहूनच त्याच्या छातीत 'चर्रर' झाले. कांपऱ्या आवाजात तो म्हणाला—"तिळा, तिळा! दार उघड!" दार उघडले गेले. आत पाऊल टाकताच त्याला भावाच्या देहाचे सहा तुकडे दिसले. त्याचे नखशिखान्त शरीर थरारले.

भावाच्या मृतदेहाला मूठमाती देणे आवश्यक होते. म्हणून अलीबाबाने दोन पोती घेऊन त्यांत कासिमच्या देहाचे तुकडे बांधून ठेवले. ती पोती काटक्या व पाचोळ्याखाली झाकून एका गाढवावर





बांधून ठेवली आणि बाकी दोन्ही गाढवांवर आणखी दीनारांची पोती भरून ठेवली आणि घराच्या वाटेने निघाला.

ती आपली गाढवे घराच्या आवारात हांकून घेऊन गेला. पोती उतरायला त्याने त्यांची गुलाम दासी मर्जीना हिला हांक मारली. मर्जीना लहानशी मुलगी होती तेव्हांपासूनच अलीबाबाच्या बायकोने तिला आपल्या घरी ठेवून स्वतःच्या मुली-सारखी लहानाची मोठी केली. ती वयात आली होती. दहा जणांचे काम ती एकटी करीत असे. ती कामात जितकी हुशार होती तितकीच ती चतुर व बुद्धिमान पण होती. कसाही प्रसंग असो, त्या[illegible] हे तिला चांगले माहीत होते.

अलीबाबाने हांक मारताच ती बाहेर आली. अलीबाबा तिला म्हणाला–"बाळ! आज तुझ्या अकलेची परीक्षा आहे बरं का?" असे सांगून तिने आपल्या भावावर गुजरलेल्या प्रसंगाचे थोडक्यात वर्णन करून सांगितले आणि म्हणाला–"दोन गाढवांवर दीनारांची पोती आहेत आणि तिसऱ्यावर भावाच्या देहाचे तुकडे आहेत. मी वहिनीं-कडे जाऊन त्यांना ही शोकवार्ता सांगून त्यांचे सांत्वन करून येतो. मध्यंतरी तू विचार करून काय करायचे ते कर. भावाचा मृत्यु सामान्य परिस्थितीत झाला आहे असे गावकऱ्यांना वाटले पाहिजे त्यानंतर त्या देहाला मूठमाती देण्याची तयारी ठेव."

मर्जीनाने ते मान्य केले आणि अलीबाबा आपल्या भावाच्या घरी गेला. त्याचा चेहरा पाहूनच कासिमच्या बायकोचा धीर खचला. ती हंबरडा फोडून रडू लागली. अलीबाबाने थोडक्यात सर्व सांगितले आणि तिला म्हणाला–"वहिनी! तुम्ही घाबरू नका! माझ्याजवळ आतां पुष्कळ धन आहे. तुम्हांला काही उणे पडू देणार नाही. तुम्हांला तुमचा वांटा देईन. तुम्हांला हरकत नसेल तर आमच्याच घरी रहा. माझी [illegible] तुम्हांला आपली ताई मानून वाग-वील. पुढील आयुष्याची तुम्ही फिकीर करण्याचे कारण नाही."

अलीबाबाच्या सद्व्यवहाराचा कासि-मच्या बायकोच्या मनावर चांगला परिणाम झाला आणि तिने आपला अहंभाव व दुष्ट-पणा सोडून दिला. अलीबाबाने सांगितल्या-प्रमाणे ती वागू लागली. अलीबाबा तिची समजूत घालून आपल्या घरी आला.

इकडे मर्जीनाने एक उपाय योजून त्याप्रमाणे कामाला पण लागली. एका औषधाच्या दुकानात जाऊन तिने गिळलेले विष ओकून पडायला औषध मागून आणले.

"औषध कोणासाठी?" दुकानदाराने मर्जीनाला विचारले.

मर्जीनाने लांबलचक सुस्कारा सोडून म्हटले–"काय सांगू? माझ्या धन्याच्या वडील बंधूना साप चावला आहे हो! त्यांना उचलून आमच्या घरी आणले आहे. विष उतरवता आले तर पहावयाचे आहे. आम्ही इतर औषधे करून पाहिली, पण काही उपयोग झाला नाही. चेहरा कसा पिवळा झाला आहे. डोळे खोल आत गेले आहेत. निश्चेष्ट पडले आहेत ते. तुमच्या औषधाच्या भरंवशावर काय ते व्हायचे आहे.



मर्जीनाची ती युक्ति ऐकून अलीबाबा थक्कच झाला.

दुसऱ्या दिवशी मर्जीना त्या दुकान-दाराकडे जाऊन रडत म्हणाली–"अहो! तुमच्या औषधाचा पण काही फायदा झाला नाही." आणखी औषध घेऊन आली आणि गावभरच्या लोकांना सांगत आली की मालकांचा मोठा भाऊ साप चावून मेला. म्हणून अलीबाबाच्या घरी रडण्याचा आवाज ऐकून कोणाला आश्चर्य वाटले नाही.

कासिमचे मरण साप चावल्याने झाल्याचे जे नाटक मर्जीनाने केले तेवढ्याने तिच्या मनाचे समाधान झाले नाही. कासिमच्या

शरिराचे सहा तुकडे झाले होते ते लोकांना कळता कामा नये यासाठी सुद्धा प्रयत्न करणे आवश्यक होते. म्हणून ती दुसऱ्या एका पेठेत गेली आणि तेथे एका चांभाराच्या हातात एक दीनार ठेवून त्याला म्हणाली– "शेख मुस्तफा! आज तुझ्या हुशारीची परीक्षा आहे बरं का!"

"आज बोवणी चांगली झाली आहे! तू काय वाटेल ते सांग करायला." मुस्तफा म्हणाला.

"चामडे शिवायला लागणाऱ्या सर्व वस्तू घेऊन माझ्याबरोबर चल." मर्जीना म्हणाली. थोडया वेळाने आणखी पुढे म्हणाली–"आणि हे पहा, मी तुझ्या डोळ्यांवर पट्टी बांधून तुला नेईन तिकडे आले पाहिजे."

"अग पोरी! माझ्या हातावर एक सोन्याचे नाणे ठेवून माझ्या हातून तू काय काय करविणार आहेस नकळे?" मुस्तफा म्हणाला.

"[illegible] मग तर झालं? तुला फक्त कातडे शिवायचे आहे." मर्जीना मुस्तफाच्या हातात आणखी एक दीनार ठेवीत म्हणाली.

मुस्तफाला आनंद झाला. मर्जीनाने त्याच्या डोळयांना पट्टी बांधली आणि दोघं निघाले. अलीबाबाच्या घरातल्या तळघरांत पोचल्यावर त्याच्या डोळयाची पट्टी सोडण्यात आली. मुस्तफाला कासिमच्या देहाचे सहा तुकडे दाखवीत व त्याच्या हातात आणखी एक दीनार ठेवीत ती म्हणाली– "या प्रेताचे हे तुकडे शिवून देण्याचे काम करायचें आहे तुला! काम लवकर उरकलेस तर आणखी एक दीनार देईन."

मुस्तफाने आपल्या नशिबाचे आभार मानीत झपाझप काम करून कासिमच्या प्रेताचे तुकडे शिवून दिले. मर्जीनाने चौथा दीनार त्याच्या हातात ठेवून त्याच्या डोळयावर पट्टी बांधली आणि त्याला त्याच्या दुकानात पोचती करून आली. (क्रमशः)





# महाभारत

दुर्योधनाच्या मनात पांडवांविषयी जो द्वेष उत्पन्न झाला त्यामुळे त्याला मुळीच चैन पडेना. हळूहळू त्याची प्रकृती बिघडू लागली. ते पाहून शकुनी मामांनी त्याला विचारले–"काय रे, तू असा दिवसेंदिवस वाळत कां चालला आहेस?"

दुर्योधन म्हणाला–"मामा! अर्जुनाच्या पराक्रमाच्या जोरावर युधिष्ठिराने सर्व जग जिंकून राजसूय यज्ञ केला व एका साम्राज्याची स्थापना केली. भरल्या सभेत कृष्णाने शिशुपालाचा वध केला, कोणाच्या तोंडातून ब्र देखील निघाला नाही. सर्व राजे व रजवाड्यांनी पांडवांच्या पायांवर रत्नांच्या राशी ओतल्या. त्यांच्या ऐश्वर्यासमोर मी कोणत्या कामाचा? तुम्ही सर्व पहात होता आणि मयसभेत माझा पाणउतारा होत होता. मला माझे जिणे व्यर्थ वाटू लागले आहे. तुम्ही जाऊन ही गोष्ट बाबांना सांगून टाका."

दुर्योधन म्हणाला ते ऐकून शकुनी मामा म्हणाले–"पांडवांचे वैभव पाहून हेवा करण्याचे कारणच काय? त्यांनी जे वैभव संपादन केले आहे ते, त्यांच्या पाठीशी देव आणि दैव आहेत म्हणून! तू त्यांचे निर्मूलन करण्याचे जे जे प्रयत्न केलेस ते सर्व फुकट गेले. द्रौपदी त्यांची बायको झाली हे त्यांचे भाग्यच म्हटले पाहिजे. द्रुपद त्यांचा पुरस्कर्ता झाला. कृष्ण पहिल्यापासूनच पांडवांच्या बाजूने आहे व त्यांना मदत करीत आला आहे. खांडववनाचा नाश करून अर्जुनाने



अग्नि नारायणाला प्रसन्न करून त्याच्या-कडून गांडीवधनुष्य, अक्षय भाता आणि अनेक दिव्यास्त्रे मिळविली. त्यामुळे तो सर्व राजांना जिंकू शकला. त्यांना मय राक्षसाने मयसभा बांधून दिली. यात अधर्म कोठेच दिसत नाही. तरी तुझ्याकडे जसे चतुरंग सैन्य आहे तसे पांडवांकडे नाही. तुला नव्याण्णव भाऊ आहेत. द्रोणाचार्यांसारखे अद्वितीय धनुर्धारी, सर्व अस्त्रांचा पारखी अश्वत्थामा, महापराक्रमी कर्ण आणि कृपा-चार्य हे सर्व तुझ्या बाजूला आहेत."

"तरमग पांडवांची मयसभा उध्वस्त करून तिचे सर्व वैभव हस्तिनापूरला घेऊन येऊ या का?" दुर्योधनाने विचारले.

"दुर्योधना! परंतु पांडवांना जिंकणे तितके सोपे नाही. युद्ध करण्याची गरजच काय? याहून सोपी युक्ति मी तुला सांगतो. नीट लक्ष देऊन ऐक! युधिष्ठिराला सोंग-ट्यांचा व द्यूत खेळण्याचा नाद आहे. त्याला द्यूत खेळण्यास आव्हान कर. मी त्यांना हारवून त्यांचे सर्व राज्य जिंकून तुला देईन. परंतु धृतराष्ट्र महाराजांची परवानगी तू काढली पाहिजेस." शकुनी मामांनी सुचविले.

दुर्योधनाबरोबर शकुनी मामा धृतराष्ट्रा-कडे गेले त्या वेळी धृतराष्ट्र पांडवांच्या राजसूय यज्ञाचे वर्णन ऐकून त्यांना शाबासकी देत होता. त्याच वेळी शकुनी मामा तेथे येऊन म्हणाले—"महाराज! दुर्योधन पहा, कसा अशक्त व निस्तेज दिसू लागला आहे." ते ऐकून धृतराष्ट्र दचकून सरळ बसला आणि दुर्योधनाला जवळ बोला-वून त्याच्या अंगाखांद्यावर हात फिरवून म्हणाला—"बाळ, असं काय रे झालं एका-एकी? कोणती गोष्ट लागली तुझ्या मनाला? अगदीच वाळून गेला आहेस!"

दुर्योधन म्हणाला—"बाबा! मला झोप येत नाहीशी झाली आहे. तोंडाची चव गेली आहे. शत्रूचे वैभव पाहून माझ्या मनाची ही स्थिति झाली आहे."

शकुनी मामा दुर्योधनाला म्हणाले—"अरे राजा! तू असल्या गोष्टी मनाला लावून घेऊन स्वस्थ बसलास तर कसे चालेल? तुला माहीतच आहे, युधिष्ठिराला द्यूत खेळण्याचा छंद आहे आणि मी त्या विद्येत निष्णात आहे. मी युक्तीने युधिष्ठिराचा द्यूतात पराभव करून त्याचे सर्व वैभव जिंकून तुझ्या चरणी वाहीन. युद्ध आणि द्यूत यांचे आव्हान ऐकून माघार घेईल तो क्षत्रियच नाही. आपण आव्हान केले तर युधिष्ठिराला मान्य करावेच लागेल."

तेव्हां दुर्योधन आपल्या बाबांचे पाय धरून म्हणाला—"बाबा! मामा म्हणतात तसे द्यूत खेळायला आम्हांला परवानगी द्या."

युधिष्ठिर म्हणाला—"मी विदुराचा सल्ला घेऊन सांगतो. पाहतो, तो काय म्हणतो ते!"

"विदुराचा सल्ला घेतला तर ते कधीही या गोष्टीस अनुकूल सल्ला देणार नाहीत. माझे एवढे मागणे तुम्ही मानायला तयार नसाल तर मी तुमच्या पायासमोर डोके आपटून जीव देईन. त्यानंतर तुम्ही व विदुर काका सर्व राज्यकारभार सांभाळा." दुर्योधन निराश होऊन म्हणाला.

धृतराष्ट्राचे आपल्या मुलावर प्राणा-पेक्षांही जास्त प्रेम होते. म्हणून मुलाच्या इच्छेविरुद्ध काही बोलू शकला नाही. त्याने कारागिरांना बोलावून मयसभेसारखी एक सुंदर सभा बांधून तयार करायला सांगितले. त्या सभेला एक हजार स्तंभ व शंभर



दरवाजे असले पाहिजेत. त्याशिवाय सुंदर सुंदर चित्रे काढलेला असा एक मंडप पण मध्यभागी असला पाहिजे, असे समजावून सांगितले.

त्यानंतर धृतराष्ट्राने विदुराला बोलावून घेतले आणि मनातली खरी गोष्ट न सांगता युधिष्ठिराला द्यूत खेळायला बोलवावे अशी सूचना केली.

विदुर धृतराष्ट्राला म्हणाला—"राजा, हा विचार बरोबर नाही. मला ते मान्य नाही. द्यूतामुळे मुलांमुलांची आपसात भांडणे होतील. तू तो विचार मनातून काढून टाक!"

ते ऐकून धृतराष्ट्र म्हणाला—"विदुरा! यात वाईट जे होईल ते होईल. पण द्यूत












झालेच पाहिजे. आपल्या मुलांचे आपसात भांडण झाले किंवा वैर वाढले तर ते मिटविण्यासाठी मी, तू, भीष्माचार्य आणि द्रोणाचार्य आहोतच. तू इंद्रप्रस्थाला जा आणि युधिष्ठिराला बोलावून घेऊन ये."

विदुर ती गोष्ट भीष्माचार्यांना कळवून त्यांचे मत विचारण्यासाठी निघाला. विदुर निघून गेल्यावर धृतराष्ट्राने आपल्या मुलाला बोलावून द्यूत न खेळण्याविषयी त्याला बोध करण्याचा प्रयत्न करून पाहिला. त्याने असेही सुचविले की तू देखील एक राजसूय यज्ञ पाहिजे तर कर. परंतु दुर्योधन त्या गोष्टीस मुळीच तयार झाला नाही. शकुनी मामा म्हणाले—"द्यूतदेखील युद्धासारखेच आहे, नाही का? त्यात प्रवीण असेल त्यालाच जय मिळेल."

धृतराष्ट्राच्या आज्ञेप्रमाणे हस्तिनापूरला एक सभामंडप बांधून तयार झाला. तेव्हां धृतराष्ट्राने विदुराला बोलावून युधिष्ठिराकडे त्याला प्रेमाने द्यूत खेळायला निमंत्रण द्यायला आज्ञा केली. अगदी नाइलाजाने विदुर रथात बसून इंद्रप्रस्थाकडे निघाला. इंद्रप्रस्थ नगरीत विदुराचा फार आदर सत्कार झाला. युधिष्ठिराने प्रेमपूर्वक त्याला येण्याचे कारण विचारले. म्हणाला—"काका! हस्तिनापूरला सर्व खुशाल आहेत ना? पण तुमचा चेहरा असा उतरलेला कां? धृतराष्ट्र, दुर्योधन वगैरे सर्व सकुशल आहेत ना?"

विदुर म्हणाला—"बाबा रे! सर्व काही ठीक आहे हस्तिनापूरला! तुझ्या मयसभेसारख्या सभेची रचना हस्तिनापूरला झाली आहे. त्यांचे 'तुला तेथे रहायला व द्यूत खेळायला निमंत्रण आहे. वृद्ध राजाने हा निरोप तुझ्याकडे पोचविण्यासाठी मला पाठविले आहे. तुझ्याबरोबर द्यूत खेळल्यास त्यांना व त्यांच्या मुलांस सुख मिळणार आहे. म्हणून तू त्या दुष्टांची इच्छा पुरी करण्यासाठी हस्तिनापूरला यावेस."

ते ऐकूने युधिष्ठिर म्हणाला—"अहो काका! पण मोठे लोक द्यूत खेळतात का? त्यामुळे भांडण होणारच. तुम्हाला काय वाटते? तुम्ही सांगाल तसे मी करतो."

"मी त्या आंधळ्या राजाला समजावून सांगितले की द्यूत म्हणजे जुगार व ती भांडणाला कारण होते. पण त्याला माझे म्हणणे आवडले नाही. त्याने तुला बोलावून आणायला मला पाठविले आहे. तुला जे योग्य दिसेल ते कर." विदुर युधिष्ठिराला म्हणाला.

"तेथे द्यूत खेळायला उत्सुक कोण कोण आहे?" युधिष्ठिराने विचारले.

"शकुनी, विविंशती, चित्रसेन, सत्यव्रत, पुरमित्र व जय आहेत." विदुर म्हणाला.

"अस्सं! म्हणजे सर्व जुगारीच जमले आहेत वाटते? पण त्यात धोका आहे. तरी वडीलधाऱ्या मंडळींनी निमंत्रण दिले आहे तेव्हां गेले हे पाहिजेच. तसे पाहिले तर मला तरी भीतीच वाटते आहे. तरी काय वाटेल ते झाले तरी उद्यां निघायचेच." युधिष्ठिराने आपला निर्णय सांगितला.

प्रवासाची तयारी झाली. युधिष्ठिर आपल्या चौघां भावंडांना व द्रौपदीला घेऊन हस्तिनापूरला आला. धृतराष्ट्र, भीष्म, द्रोण, कृपाचार्य, अश्वत्थामा वगैरे वडीलधाऱ्या मंडळींना युधिष्ठिराने नमस्कार केला. लहानांची विचारपूस केली आणि गांधारीला नमस्कार केला. द्रौपदी महाराणी सारखी नटून आलेली पाहून कौरव स्त्रियांच्या मनात द्वेषाग्नी भडकला.

दुसऱ्या दिवशी सकाळी युधिष्ठिर शकुनीमामा, दुर्योधन, दु:शासन इत्यादींना त्यांच्या त्यांच्या महालात जाऊन भेटला. थोर होते त्यांना नमस्कार केला व लहानांना आशीर्वाद दिला..

तेव्हां शकुनीमामा युधिष्ठिराला म्हणाले—"राजा! आपल्याला भेटण्यासाठी काही लोक या सभामंडपात आले आहेत काही लोक करमणुकीसाठी द्यूत खेळण्यास तयार होऊन आले आहेत. म्हणून आपण त्यासाठी परस्परांच्या सल्ल्याने काही नियम ठरवून घेऊ या आणि हे फासे घेऊन खेळ आरंभ करू या."



युधिष्ठिर म्हणाला–"मामा! द्यूतात फसवेगिरी केल्याने पाप लागते. त्यात क्षत्रियाचे कौशल्य दिसत नाही. म्हणून लबाडीने आम्हांला हरविण्याचा प्रयत्न करू नका. आम्ही मिळवलेले धन व संपत्ति ब्राह्मणांचे रक्षण आणि दुष्टांचे निर्दलन करण्यासाठी आहे. म्हणून तुम्ही ते लबाडीने जिंकण्याचा प्रयत्न करू नये.

"वेदाध्ययन करणारे वेदपाठी पंडित दुसऱ्या पंडितांचा वेदाध्ययनात पराभव करतात. तसेच लबाडी करणाऱ्या जुगाऱ्याला लबाडीने जिंकले पाहिजे. ही अट तुला मान्य नसेल तर तू द्यूत खेळायला येऊच नकोस." शकुनी मामा म्हणाले.

यु [illegible] माघार घेणारा नव्हता. म्हणाला–"द्यूत खेळण्यासाठी मला निमंत्रण देऊन बोलाविलेत आणि मी आलो. परत फिरणे अपमानाची गोष्ट आहे. म्हणून मी खेळणार! बोला, माझ्याबरोबर द्यूत खेळणारा कोण आहे?"

"माझ्या वतीने माझे मामा खेळणार आहेत. ते ज्या वस्तूचा पण लावतील ती द्यायला मी तयार आहे." दुर्योधन म्हणाला.

"कोणाच्या वतीने कोणी खेळतो हे मी कधी ऐकले नाही की पाहिले नाही. हे विचित्र दिसते आहे. तरी तुम्हीं आपल्या इच्छेप्रमाणे खेळा. माझी ना नाही." युधिष्ठिर म्हणाला.

द्यूत पाहण्यासाठी धृतराष्ट्राने भीष्म, द्रोण, कृपाचार्य, विदुर आदिकांना बोलावणे पाठविले होते. त्याप्रमाणे सर्व आपापल्या आसनावर येऊन बसले.

पहिल्या डावाला युधिष्ठिराने आपल्या गळ्यातल्या हाराचा मणी लावला तर दुर्योधनाने आपली सर्व रत्ने लावली. युधिष्ठिर पहिला डाव हारला. त्यानंतर शकुनी मामाच एकामागून एक प्रत्येक डाव जिंकत गेले. युधिष्ठिर जसजसा डाव हारत गेला तसतसा त्याला त्वेष चढत गेला. त्याने सोने, चांदी, हत्ती, घोडे, रथ, दास-

दासी सर्व एकामागून एक पणावर लावले आणि घालवून बसला.

हा अन्याय पाहून विदुराला राहवलें नाही. तो धृतराष्ट्राला म्हणाला–"मरणाराला चांगली औषधे आवडत नाहीत अशी म्हण आहे, तसाच आमचा सल्ला तुम्हांला आवडत नाही. तुमचा मुलगा वंशनाश करण्यास तयार होऊन खेळायला बसला आहे. तुम्ही देखील हे द्यूत रचण्यास परवानगी देऊन पांडवांचे धन अपहरण करण्यास सहकारी झाला आहां. यामुळे तुमचेच नुकसान होणार आहे. अजून माझे ऐका, पांडवांचा क्रोधाग्नी पेटू देऊ नका. तुम्ही पांडवांचे धन लुबाडून खुष होत आहां. उद्यां तुम्हांला त्यांच्या कोपाग्नीत पडावे लागेल. तुमचा सर्वांचा नाश निश्चित आहे. म्हणून यापुढे तरी हे द्यूत बंद करायला सांगा!"

धृतराष्ट्राने विदुराच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष केले. परंतु दुर्योधन तोंडाला आले ते विदुराला म्हणाला.

मध्य [illegible] घालवून बसला होता. आपले राज्य, प्रजा, सामंत आदिकांना घालवून बसला. शकुनी मामांनी फासे युधिष्ठिरासमोर फेकून म्हटले–"युधिष्ठिरा! पण लावायला तुझ्याकडे आता आहेच काय?"

युधिष्ठिराने त्वेषाने सहदेव व नकुलाचा पण लावला व हारला. त्यानंतर भीमार्जुनांना पणावर लावून हारला. शेवटी स्वतःला पणावर लावून स्वतःला देखील हारला.

"आतां तुझी संपत्ति म्हणजे फक्त द्रौपदी उरली आहे. तिला पणावर कां नाही लावीत?" शकुनीमामाने मिस्किलपणाने विचारले. युधिष्ठिराने ते आव्हान ही स्वीकारून द्रौपदीचा पण लावला. ते पाहून सभेत गोंधळ उडून गेला. काही लोक, कौरवांचा नाश जवळ येऊन ठेपला असल्याचे बोलू लागले. भीष्म, द्रोण, कृप मौन धारण करून बसून राहले. विदुराला अपरंपार राग आला. परंतु कर्ण व दुःशासनाला मात्र परमावधीचा आनंद झाला.





# शिवपुराण

सृष्टीच्या प्रारंभापूर्वी सर्व विश्व जलमय होते. पदार्थरहित शून्य असल्यामुळे सर्वत्र अंधःकार असतांना पाण्यातून एक महान ज्योति उद्भवली आणि हळूहळू ती ज्योतिलिंगात परिवर्तित झाली. तोच तेजःपुंज परमेश्वर शिव होय. त्या ज्योतिलिंगाच्या अर्ध्या भागातून महाशक्ति जन्मली. त्या महाशक्तीलाच 'प्रकृति' किंवा 'महामाया' म्हणतात.

कालक्रमाने परमेश्वर व परमेश्वरी दोघांनी विष्णूची सृष्टी केली. विष्णूच्या नाभीतून एक मोठे कमळ उद्भवले ते अनेक योजने वाढत गेले. त्या कमळातून पंचमुखी ब्रह्मदेव जन्मला. ब्रह्मदेवाबरोबरच सरस्वतीपण जन्मली.

ब्रह्मदेवाला सर्व विश्व जलमय दिसले. म्हणून त्याच्या मनात, त्याचा जन्म ज्या कमळातून झाला त्या महापद्माचा शोध लावण्याची इच्छा उत्पन्न झाली. तेव्हां ब्रह्मदेव उर्ध्व व अधः लोकांचे भ्रमण करीत महापद्माच्या गर्भस्थानी पोचला. त्याने ओंकाराचा जप केला आणि त्यामुळे विष्णु प्रगट झाला. ब्रह्मदेवाने विष्णूला विचारले–"आपण कोण? आणि येथे येण्याचे कारण काय?"

"सृष्टी प्रारंभ करण्यासाठी मी आपल्या नाभिकमळातून तुझी सृष्टी केली. माझे नाव विष्णु!" विष्णु म्हणाला.

ब्रह्मदेवाचा अहंकार जागृत झाला. तो म्हणाला–"तुझा हा गर्व तू सोड, नाहीतर माझ्याशी युद्धास तयार हो! मी स्वयंभू आहे. या सृष्टीचा कर्त्ता आहे!"

ते ऐकून विष्णु ध्यानमग्न झाला. शंकर ज्वालालिंग रूप घेऊन ब्रह्मदेव व विष्णु यांच्या मध्ये प्रगट झाला. विष्णु ब्रह्मदेवाला म्हणाला–"या ज्वालालिंगाचा आदि अंत जो सांगू शकेल तोच मोठा

शेवटच्या मलपृष्ठावरील चित्र



ठरेल." ब्रह्मदेवाने ती अट मान्य केली. परंतु दोघे हार मानून आपापल्या स्थानी निघून गेले आणि शंकराचे ध्यान करू लागले.

शंकर प्रगट होऊन ब्रह्मदेवाला म्हणाला— "तू पंच महाभूतांनी युक्त विश्वाची सृष्टी करण्यासाठी विष्णूच्या नाभिकमलातून जन्मला आहेस. तू सृष्टीचा प्रारंभ कर."

ब्रह्मदेवाने शंकराला पाहून विचारले— "तू कोण? माझ्या सारखीच तुला पाच मुखे आहेत, ही कशी काय? मी सृष्टिकर्त्ता आहे, म्हणून मला पांच मुखे आहेत ही गोष्ट सहज लक्षात येते."

ब्रह्मदेवाची ती गर्वोक्ती ऐकून शंकराने रुद्रावतार धारण केला आणि आपल्या डाव्या हाताच्या करंगळीच्या नखाचा तलवारीसारखा उपयोग करून ब्रह्मदेवाचे एक डोके छाटून टाकले. तेव्हां ब्रह्मदेवाचा गर्वपरिहार झाला. त्याने हात जोडून स्वतःच्या रक्षणासाठी प्रार्थना केली.

शंकर शांत रूप धारण करून म्हणाला— "ब्रह्मदेवा! सृष्टी करण्यासाठी तू आणि तुझ्या सृष्टीचे रक्षण करण्यासाठी विष्णू निर्मिले गेले आहां. मी लय करणारा शिव, रुद्र आणि ईश नावाने ओळखला जाईन. तुम्ही ज्वालालिंगाची पार्थिव लिंग किंवा शिवलिंग या नावाने पूजा करा." असे सांगून शंकर ज्वालालिंगांत विलीन झाला.

त्यानंतर ब्रह्मदेव व विष्णू वेद इत्यादि घेऊन पद्मासन घालून बसले आणि ओंकाराचा जप करू लागले. तेव्हां पाण्यावर पडून एक अंडे ब्रह्मदेवाकडे वाहात आले. त्याच वेळी अंड्यातून 'ओम' स्वर प्रस्फुटित झाला. तो स्वर ज्या मार्गाने आला होता त्याच मार्गाने ब्रह्मदेवाने त्या अंड्यात प्रवेश केला. आत घनांधकार होता. ब्रह्मदेव तेथे आपला देह सोडून चतुर्मुख रूपे पुन्हा जन्मला. ब्रह्मदेव त्या अंड्यातून बाहेर आला तेव्हां ते अंडे दोन भागात विभक्त झाले. त्यातला खालचा भाग पृथ्वी रूपे व वरचा भाग आकाश रूपे बदलला. सर्व पाणी वाळून गेले.

ते दृश्य पाहून ब्रह्मदेवाला फार आनंद झाला. त्याने या पृथ्वीवर चराचर सृष्टीचा निर्माण सुरू केला. ब्रह्मदेवाने सर्वात प्रथम सनकसनंदन इत्यादींची सृष्टी केली. त्यांच्या मनात पुढे सृष्टी चालू ठेवण्याची इच्छा नव्हती, म्हणून ते शंकराचे ध्यान करून तपश्चर्या करू लागले. ते पाहून ब्रह्मदेवाला रडू कोसळले. त्याच्या डोळ्यातून जी टिपे पृथ्वीवर पडली त्या अश्रूंतून तेजःपुंज शिवाचा जन्म झाला. शिवाचा गौर वर्ण होता. त्याच्या तेजाचा प्रकाश चतुर्दिक पसरला. तेव्हां ब्रह्मदेवाने त्याला विचारले— "कोण तू?"

शंकर म्हणाला— "मी शिव, रुद्र आहे!" तेव्हां विष्णू प्रगट होऊन म्हणाला— "हे ब्रह्मदेवा! तू सृष्टी करतोस, मी त्याचे पोषण भरण करतो आणि त्या सृष्टीचा लय करणारा हा परमेश्वर शिव रूपे अवतरला आहे."

त्यानंतर ब्रह्मदेवासाठी सत्यलोक, विष्णू-साठी वैकुंठ आणि शिवासाठी कैलास निवासस्थाने ठरली. म्हणून ब्रह्मदेव सत्य-लोकी गेला. आपल्या मदतीसाठी त्याने मरीचि, कश्यप, दक्ष, गौतम, वसिष्ठ, कर्दम इत्यादिक नऊ उपब्रह्मदेवांची सृष्टी केली. त्यात दक्षाला चौसष्ट मुली झाल्या. त्यां-पैकी दहा कन्यांबरोबर कश्यपाने विवाह



केला आणि त्यांची अपत्ये वाढली. अदितीच्या पोटी इंद्रादिक देव जन्मले. दितीच्या पोटी दैत्य जन्मले. विनताला गरुड व अनूर झाले. कद्रूच्या पोटी सर्प आणि स्वसच्या पोटी यक्षादि राक्षस जन्मले.

शंकराशी विवाह करण्याच्या हेतूने महेश्वरी दक्षाच्या पोटी सती नामक कन्येच्या रूपाने जन्मली. त्यांच्या विवाह प्रसंगी ब्रह्मदेव, विष्णु, इंद्रादिक देव उपस्थित होण्यासाठी आले आणि त्यांनी शिव व सती यांचे स्तोत्रगान सुरू केले. अतिथि सत्कार करण्यासाठी नंदी व कालभैरव यांची नेमणूक करण्यात आली. ते सतीबरोबर कैलासात जाऊन सुखपूर्वक राहू लागले.

असाच आणखी काही काळ लोटला. कित्येक थोरांमोठ्यांनी प्रयाग येथे मोठा यज्ञ करण्याचे ठरविले. ब्रह्मा, विष्णु व इंद्रादिक देव व इतर लोकांचे निवासी सर्वांना निमंत्रण करून यज्ञारंभ करण्यात आला.

यज्ञासाठी येणाऱ्या अतिथींच्या राहण्याची यथोचित व्यवस्था करण्यात आली आणि त्यांना त्यांच्या दर्जाप्रमाणे बसण्यास आसने देण्यात आली. सर्व यथास्थान बसून यज्ञ पहात होते. त्याच वेळी दक्ष आपल्या शिष्यांसह आला. सर्व उपस्थितांनी उभे राहून दक्षाचे स्वागत केले. दक्षाने चारी बाजूला नजर फिरविली व ब्रह्मदेव आणि विष्णूचे सादर वंदन केले. परंतु शिव उठून उभा राहिला नाही किंवा काही विचारपूस केली नाही. त्यावर दक्ष म्हणाला–"तुम्ही सर्वांनी सामोरे येऊन माझा सत्कार केलात. पण शंकराने जांवई असून विचारपूस सुद्धा केली नाही. जाणून बुजून माझा अपमान केला. मोठ्यांचा आदर [illegible] कळत [illegible] शिष्य मंडळींसह यज्ञ मंडपांतून निघून जाऊ लागला.

तेव्हां ब्रह्मदेव, विष्णु इत्यादिकांनी दक्षाला थांबवून त्याला समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. म्हणाले–"शिव हा परमेश्वराचा अवतार आहे. त्याचा आदर तू केला पाहिजेस, त्याचा निरादार किंवा निंदा करता कामा नये." परंतु दक्षाने तिकडे दुर्लक्ष केले.

तेव्हां नंदीने दक्षाला शाप दिला–"हे दक्षा! तू शंकराची निंदा करीत आहेस तर तुझे डोके यज्ञकुंडात पडो!"

त्यावर दक्षाने क्रुद्ध होऊन शाप दिला–"तुम्ही रुद्राचे अनुयायी वेदांपासून दूर रहाल आणि अंगाला भस्म लावून पाखंडी म्हणून गणले जाल."

त्यानंतर शंकर यज्ञसमाप्तीपर्यंत तेथेच राहला आणि त्याने आपल्या शिवगणासह कैलासला प्रस्थान केले.



# १११. रोटीच्या थरांचे शिलाखंड

सुमारे पन्न कोटी वर्षांपूर्वी समुद्राच्या तळाला चुन्याची पुड सांठत सांठत कालांतराने समुद्राच्या पातळीवर त्याचा खडक आला. पावसाच्या पाण्याने त्यातील सत्वहीन भाग विरघळून गेला आणि त्याचे घड्यां घड्यांसारखे थर दिसू लागले. या चित्रात दर्शविलेले रोट्यांच्या घड्यांसारखे शिलाखंड न्यूझीलंडच्या दक्षिणेकडील बेटात आहेत. अशा तऱ्हेच्या शिलाखंडांचे थर जगात इतरत्र पण आहेत. या थरांच्या मध्ये समुद्राच्या पाण्यामुळे गुहा झाल्या आहेत.













# अमरवाणी

उत्साहः, साहसं, धैर्यं, बुद्धिः, शक्तिः पराक्रमः
षड़ते यत्र तिष्ठंति तत्र देवोपि तिष्ठति ॥ १ ॥

[ जेथे उत्साह, साहस, धैर्य, बुद्धि, शक्ति आणि पराक्रम हे गुण असतात तेथे परमेश्वराचे वास्तव्यपण असते. ]

रत्नैः महाब्धेस्तुतुषुर्न देवा, न भेजिरे भीमविषेणभीतिम्
सुधां विना न प्रययुर्विरामं; न निश्चितार्थात् विरमंति धीराः ॥ २ ॥

[ महा सागरातली रत्ने प्राप्त झाली तरी देवांच्या मनाचे समाधान झाले नाही आणि कालकूट विष पाहून ही त्यांचा धीर खचला नाही. अमृत मिळेपर्यंत ते निर्विराम प्रयत्न करीत राहिले. अशाच तऱ्हेने शूर व साहसी पुरुष निश्चित ध्येय प्राप्त होईपर्यंत प्रयत्न करणे सोडीत नाहीत. ]

प्रारभ्यते न खलु विघ्न भयेन नीचैः;
प्रारभ्य विघ्ननिहता विरमंति मध्याः;
विघ्नैः मुहुर्मुहु रपि प्रतिहन्यमानाः
प्रारब्धमुत्तमगुणाः न परित्यजंति ॥ ३ ॥

[ नीच व अधम पुरुष विघ्ने व संकटे यांच्या भीतीने प्रयत्नच करीत नाही. मध्यम प्रकृतीची माणसे काम सुरू करतात, पण विघ्ने आली की मध्येच सोडून देतात. परंतु उत्तम प्रकृतीचा मनुष्य कितीही विघ्ने आली तरी आपला प्रयत्न सोडीत नाही. ]





# राक्षसी माळरान

मणिपूरच्या राज्यावर फार मोठा प्रदेश ओसाड किंवा पडित भूमीचा होता. त्याला राक्षसी माळरान म्हणत. त्या माळरानात एक मोठे विवर होते. त्या विवरात एक राक्षसीण राहते व त्या माळरानात पाऊल टाकणारांस खाऊन टाकते असे त्या प्रदेशातील लोक सांगत.

मणिपूरचा राजा निवर्तल्यावर त्याचा मुलगा सुदर्शन गादीवर बसला. त्या माळरानातल्या राक्षसिणीला ठार करून सर्व माळरान शेतीभातीच्या कामाला उपयोगी पडेल या विचाराने नव्या राजाने लोकांच्या मनातले त्या राक्षसिणीचे भय काढून टाकावे असे ठरविले. सुदर्शनला सुमंत नावाचा एक हुशार मित्र होता. म्हणून त्याने आपला विचार सुमंत समोर मांडला.

"अरे तुझ्या वाडवडिलांच्या काळापासून तुझ्या प्रजेच्या मनात त्या माळराना विषयी जो अंधविश्वास आहे तो दूर करणे तितके सोपे नाही. त्या विवरात राक्षसीण नाही, असे आपण सांगितले तरी कोणी आपल्यावर विश्वास करणार नाही. म्हणून आपण प्रजेला खरे वाटण्यासारखी परिस्थिति डोळ्यांनी पाहिली पाहिजे."

असा विचार करून दोघे त्या माळरानात गेले. कोणाला काही कळू दिले नाही. ते माळरान कित्येक हजार एकरांवर पसरलेले होते. त्याच्या मध्यभागी ते विवर होते. दोघे त्या विवरात काही अंतर चालून गेले. परंतु ते आत जाऊ लागले तसतसे ते विवर चिंचोळे होते गेले. त्यात राक्षसीण असणेच शक्य नव्हते. परंतु ती गोष्ट प्रजेच्या लक्षात आणून देऊन त्या गोष्टीवर प्रजेच्या मनात विश्वास उत्पन्न करावयाचा होता.

सुमंतने दोन हिरे त्या विवरात टाकले आणि दोघे राजवाड्यात परत आले.

श्री श्री. आ. कामत



राजधानीत पतल्यावर सुदर्शनने दवंडी पिटविली—"राक्षसिणीच्या विवरात प्रवेश करून त्यात ज्या वस्तू आहेत त्या आणून देणारास मोठे पारितोषिक देण्यात येईल."

परंतु दवंडी ऐकून कोणी पुढे आला नाही. राजाने पोरकटपणाने असली दवंडी पिटविली असेल, असे प्रत्येकाला वाटत होते. म्हणून कोणी विवरात प्रवेश करण्याचे साहस करायला तयारच झाला नाही.

मणिपुरं राज्यातच रामदास व भीमसेन नावाचे दोघे भाऊ रहात असत. भीमसेनने आपल्या कुटुंबाचा सर्व भार आपल्या मोठ्या भावावर टाकला होता व तो स्वतः पाळलेली कबूतरे उडवीत असे.

एकदा रामदासला भीमसेनाचा भयंकर राग आला. म्हणाला—"तू असला उडाणटप्पूपणा करीत बसण्यापेक्षा त्या राक्षसिणीच्या विवरात उडी टाकून जीव का नाही देत?" त्याच दिवशी भीमसेनने राजाची दवंडी ऐकली होती.

भावाच्या रागवण्याचा त्याला फार मनस्ताप वाटला व त्याचे पौरुष जागे झाले. राक्षसिणीच्या बिळात उडी टाकायचे त्याने मनाशी ठरविले. भाग्याने साथ दिली तर राजाकडून पारितोषिक मिळेल आणि स्वतंत्रपणे पुढील आयुष्य घालवीन. नाहीतर राक्षसीण मोक्ष देईल. असे मनाशी ठरवून बरोबर थोडेसे काहीतरी खायला घेऊन आणि आपल्या पाळलेल्या कबूतराला खांद्यावर बसवून घेऊन माळरानात आपल्या तो राक्षसिणीच्या विवरापर्यंत येऊन पोचला. राक्षसीण कोठून तरी येऊन आपल्याला खाईल अशी धाकधूक मनात होती. तरी त्याला विवरात पाऊल टाकायची हिंमत होईना.

भीमसेनने खाऊन पिऊन घेऊन पुढे काय करायचे ते करण्या असे मनाशी ठरविले. त्याने भाकरीचा एक तुकडा त्या विवरात टाकला. आतून काही बाहेर येत आहे असे दिसले तर पळून जायचे त्याने मनाशी ठरविले होते. पण अचानक त्याच्या खांद्यावरचे कबूतर उडून बिळात गेले. हे कबूतर जिवंत परत आले तर [illegible] बिळात प्रवेश करायला हरकत नाही आणि राजाकडून जे पारितोषिक मिळेल ते घेऊन पुढील आयुष्य मजेत घालविता येईल असा त्याने विचार केला

थोड्या वेळाने कबूतर परत आले. पण त्याच्या तोंडात भाकरीच्या तुकड्या ऐवजी एक हिरा होता. भीमसेनला आश्चर्याबरोबर परमावधीचा आनंद झाला. तो हिरा आपल्या भावाला दाखवून म्हणाला—"दादा! पहा. हा हिरा, मी राक्षसिणीच्या विवरातून घेऊन आलो आहे. मी हा विकून पुढे आरामाने आयुष्य घालवावे, म्हणतो."

तो हिरा पाहून रामदासला दुर्बुद्धी झाली. तो भावाला म्हणाला—"अरे खुळ्या! तू हा विकणार? काही दिवसांनी आपण याच्या विषयी काही तरी मार्ग काढू." दुसऱ्याच दिवशी रामदास तो हिरा घेऊन राजवाड्यात गेला आणि राजाला भेटून म्हणाला—"महाराज! राक्षसिणीच्या बिळातून हा हिरा आणला आहे. आपण जाहीर केलेले पारितोषिक देण्याची कृपा करावी."

सुदर्शनने सुमंतला बोलविले. दोघांनी तो हिरा लक्षपूर्वक तपासून पाहिला. सुमंतने राक्षसिणीच्या बिळात टाकलेल्या दोन हिऱ्यांपैकीच तो एक होता.

"आणखी एक हिरा या हिऱ्याबरोबर होता, तो तू गडप केलास वाटते? म्हणून तुला तुरुंगात पाठवितो." सुमंत म्हणाला.



रामदास घाबरला. हात जोडून विनंती करीत म्हणाला–"मला पारितोषिक नको, तुरुंगात मात्र पाठवू नका."

तो स्वतः हिरा घेऊन आला असता तर पारितोषिक इतक्या सहजी सोडायला तयार झाला नसता असा विचार करून सुमंतने रामदासला विचारले–"खरे बोल, तुला हा हिरा कोठे मिळाला?"

रामदासला वाटले की त्याचा भाऊ खोटे बोलला असेल. त्याने हा हिरा कोठून तरी चोरी करून आणला असेल. तो आरोप त्याच्यावरच आलेला बरा, असा विचार करून म्हणाला–"महाराज! हा हिरा माझा मोठा भाऊ घेऊन आला. त्याला हा राक्षसिणीच्या विवरात मिळाला असा तो मला म्हणाला. मला या पलीकडे जास्त काहीच माहीत नाही."

"तरमग तू जाऊन आपल्या धाकट्या भावाला बोलावून घेऊन ये." सुदर्शन म्हणाला.

भीमसेनने येतांच खरेखरे ते राजासमोर निवेदन केले. राजाला पण, भीमसेन म्हणाला ते खरे वाटले. राजाने त्याला रात्रभर आपला अतिथि म्हणून राजवाड्यातच रहायला सांगितले आणि दुसऱ्या दिवशी दरबारात मोठ्या समारंभाने त्याचा सत्कार केला. म्हणाला–"भीमसेन साहस करून राक्षसिणीच्या विवरातून हा हिरा घेऊन आला आहे. लोकांना हे कळावे म्हणून आम्ही स्वतः त्या विवरात प्रवेश करून आपला हा हिरा त्या विवरात टाकला होता. त्यात राक्षसीण नाही हे आता सिद्ध झाले आहे. भीमसेनच्या साहसाबद्दल आम्हांला आनंद होत आहे व हे माळरान त्याने दाखविलेल्या साहसाबद्दल त्याला बक्षिस देण्यात येत आहे. कोणाला या माळरानात शेती करावयाची असेल तर त्यांनी भीमसेनाकडून जमीन खंडावर घ्यावी." राजाने सभेत जाहीर केले.

लोकांच्या मनांतून राक्षसिणीच्या माळरानाची भीती नाहीशी झाली. सर्वांनी भीमसेनकडून खंडाने जमीन घेतली.

भीमसेन एक मोठा जमीनदार झाला.





# मोठा कोण

एकदा एक शेतकरी शहरात जात होता. वाटेत एक व्यापारी आणि एक शिक्षक त्याला भेटले. दोघे परस्परांशी बोलत पायी पुढे निघाले. चालत असतां दुपार झाली. तिघांना भूक लागली होती. त्यांना एक बाग दिसली. बागेत फणसाचे झाड होते. पिकलेल्या फणसाचा गोडवास सुटला होता.

तिघांनी बागेत जाऊन माळ्याला भूक लागली असल्याचे सांगून एक पिकलेला फणस मागितला. माळ्याने एक पिकलेला फणस तोडून दिला.

शेतकरी फणस कापू लागला. इतर दोघांपेक्षा आपल्याला जास्त मिळाला तर बरं होईल असे त्याच्या मनात आले. तो उघड म्हणाला–"आपल्या तिघांचा निरनिराळा धंदा आहे. मी शेती करतो, व्यापारी व्यापार करतो आणि शिक्षक शिकवितो. या तिघांच्या धंद्यात ज्याचा धंदा मोठा आहे त्याला एक भाग जास्त मिळाला पाहिजे. तुम्हांला काय वाटते?" व्यापारापेक्षां किंवा शिक्षणापेक्षां अन्न मनुष्याला जास्त आवश्यक व उपयोगी आहे, म्हणजे अन्न उत्पन्न करणारा जो शेतकरी तो श्रेष्ठ आहे. त्याला मोठा वांटा मिळाला पाहिजे. उपाशी व्यापारी आणि शिक्षक आपण मागितलेला वांटा देण्यास नकार देणार नाहीत असे त्याला वाटले.

शेतकरी म्हणाला ते ऐकून अध्यापक म्हणाला–"तू दिलास तो तर्क मी ऐकला. त्याला उत्तर म्हणून मी एक गोष्ट सांगतो. एका गावी एक श्रीमंत मनुष्य रहात असे. त्याला तीन मुलगे होते. ते तिघे उडाणटप्पू निघाले आणि दिवसभर गावात भटकत असत. मुलांचा तो उडाणटप्पूपणा पाहून व्यापाऱ्याला फार वाईट वाटले.

श्रीमती सुशीला माने









तो श्रीमंत मनुष्य दिवसे दिवस म्हातारा होत गेला होता. आपल्या पाठीमागे मुले आपली सर्व इस्टेट उडवून टाकतील, म्हणून त्याने एक उपाय करण्याचे ठरविले.

त्या श्रीमंताने आपल्या मुलांना एक एक करून बोलाविले आणि त्यांना आपले मृत्युपत्र दाखविले. त्यात, पित्याच्या मृत्यूनंतर पित्याच्या इस्टेटीचे चार वांटे करावे आणि ज्या मुलाला अंगठी मिळेल त्याला आणखी एक वांटा देण्यात यावा असे लिहिले होते. श्रीमंताने प्रत्येक मुलाला ते दाखवून म्हटले–"पहा बाळ! तू आपली जबाबदारी ओळखून इमाने इतबारे राहशील तर मी तुलाच ती अंगठी देईन."

काही काळ लोटल्यावर तो श्रीमंत मनुष्य वारला. पंचांनी एका जागी बसून मृत्युपत्र वाचले. त्या श्रीमंताच्या इस्टेटीचे चार वांटे केले आणि त्याच्या तिघां मुलांना बोलावून त्यांनी विचारले–"तुमच्या पैकी कोणाला वडिलांची अंगठी मिळाली?"

[illegible] व म्हणाला–"मला अंगठी मिळाली. दुसऱ्याने पण तशीच अंगठी काढून दाखविली. बापाने इतर मुलांना कळल्या शिवाय प्रत्येकाला अंगठी दिली होती. तिन्ही अंगठ्या सारख्या सारख्या होत्या.

पंचांनी नाइलाजाने सर्व इस्टेटीचेसारखे सारखे तीन वांटे करून तिघांना दिले."

अशी गोष्ट सांगून शिक्षक म्हणाला–"आपल्या तिघांचे धंदे आपापल्या स्थानी श्रेष्ठ आहेत. यावर तर्क करण्याला जागाच नाही. तसेच आपली सर्वांची भूक पण सारखीच आहे. एक धंदा करणाऱ्याला कमी भूक व दुसरा धंदा करणाऱ्याला जास्त भूक लागत असण्याची शक्यता नाही. म्हणून आपण हा फणस सारखे वाटे करूनच घेतला पाहिजे.

शेतकऱ्याला, त्याला जो लोभ झाला त्या बद्दल फार लाज वाटली. त्याने फणसाचे तीन सारखे सारखे वांटे केले आणि तिघांनी त्या फणसावर आपली भूक भागविली.






# शिलारथ

[ ६ ]

[ गावाच्या पाटलाच्या मुलीला कोणीतरी उचलून नेले. पाटलाने खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना संशयावर अटक करून कैदेत ठेवले. रात्री पाहरेकऱ्याला धमक्या देऊन ते कुंपणाच्या दारापर्यंत आले. कुंपणापलीकडे एक रानटी हत्ती चीत्कार करीत हिंडत होता. पुढे–]

खड्गवर्मा कुंपणाच्या दाराला बांधलेली दोरी आपल्या तलवारीने कापू लागला. त्यावेळी झोपडीच्या बाजूने अचानक एक काळी आकृती त्याच्या समोर येऊन उभी राहली. खड्गवर्मा दचकून त्या आकृतीकडे क्षणार्धात पाहून पळण्याच्या प्रयत्नात असता तो काळ्या आकृतीतील मनुष्य ओरडून म्हणाला–"अरे कोणी नाही का तिकडे? ए पाहरेकरी! आपले कैदी पळत आहेत, पहा! कोठे आहेस तू? लवकर येऊन यांना कैद कर!"

तो कर्कश आवाज आणखी कोणाचा नसून कारकुनाचा होता. दोऱ्या कापल्या गेल्याबरोबर खड्गवर्मा व जीवदत्त दोघांनी दार उघडून पळून जायचा प्रयत्न केला. त्याच वेळी कारकून पळत आला आणि दरडावून म्हणाला–"थांबा! पळण्याचा प्रयत्न केलात तर मराल. फसवून पळून




जाण्याचा प्रयत्न करू नका. मी सांगतो ते ऐकलेत तर त्यात तुमचे हित आहे, बजावून ठेवतो."

कारकुनाच्या कर्कश आवाजाने हत्ती जास्तच बिथरला. हत्ती आपले पुढले पाय जमिनीवर घट्ट दाबून ठेवून आणि सोंड वर करून जोराने चीत्कार करीत ओरडत अर्धवट उघडलेल्या कुंपणाच्या दाराकडे वळला. खड्गवर्मा व जीवदत्त उडी मारून पलीकडे जाण्याचा प्रयत्न करू लागले. त्यांना धरण्यासाठी कारकून धावला आणि कुंपणाच्या दारात येताच त्याला समोर हत्ती दिसला. हत्ती इतकाजवळ आलेला पाहून कारकून क्षणभर किंकर्तव्यविमूढ स्थितीत जागच्या जागी थबकला. त्याच्या सर्वांगाचा थरकाप उडून गेला. त्या परिस्थितीत त्या बिचाऱ्या कारकुनावर जो प्रसंग गुजरला असेल त्याची नुसती कल्पना करूनच जीवदत्त आपले तोंड दुसरीकडे वळवून उभा राहिला. पण खड्गवर्मा मात्र टाळ्या वाजवून हर्षोल्हासाने व्यंग्योक्ति करीत ओरडला—"हा कोणीतरी कारकुनाच्या वेषात आलेला गावातला भीम दिसतो आहे आणि हत्तीशी मल्लयुद्ध करणार आहे!"

इतक्यात कारकून आणखी मोठ्याने ओरडला. हत्तीला वाटले की कारकून त्याच्यावर प्रहार करायला येतो आहे. त्याने कारकुनाला सोंडेत धरून दूर फेंकून दिले. कारकून एका झाडाच्या फांदीत जाऊन अडकला, त्याच झाडावर पाहरेकऱ्याला बांधून ठेवलेले होते. कारकुनाचे नशीब बलवत्तर होते, म्हणून त्याच्या जिवाला काही अपाय झाला नाही.

थोडा दम घेऊन कारकून पुन्हा मोठमोठ्याने ओरडू लागला—"वीरभद्र आणि रामभद्र पळून जात आहेत हो! रानटी हत्ती गावात शिरला आहे. पळा, हत्तीला ठार करा! चोरांना पकडा!" तोंडाला आले ते म्हणत ओरडत होता.

हत्तीने पहिल्याने झोपडी मोडून पायाखाली तुडवून टाकली. हत्तीचे ओरडणे आणि कारकुनाच्या मोठमोठ्या आरोळ्या ऐकून सर्व गाव जागे झाले. सर्व गावकरी मशाली घेऊन, भाले बरच्या, तलवारी, जे हाती आले ते घेऊन त्याबाजूला धावले.

"पळून जाणाऱ्या कैद्यांना प्रथम अटक करा. नंतर हत्तीचा समाचार घेऊ!" कारकून ओरडून गावकऱ्यांना सांगत होता. गावकरी चारआठ जणांच्या टोळ्या करून काही हत्तीच्या बाजूला आणि काही कुंपणाच्या दाराकडे धावले. तोंपर्यंत कुंपणावर चढून खड्गवर्मा व जीवदत्त गंमत पहात उभे होते. आतां फार वेळ गंमत पाहण्यात शहाणपण नाही असा विचार करून दोघे कुंपणापलीकडे उडी मारून गेले. त्याच वेळी एक वाघ झाडीतून डरकाळ्या फोडू लागलेला त्यांना ऐकू आला.

"काय पण हे गांव आणि काय पण हे जंगल! या जंगलांत हत्ती व वाघ भरले आहेत से दिसते!" खड्गवर्मा जरा त्रासल्यासारखा होऊन म्हणाला.

"अरे, म्हणूनच तर आपल्याला शिपाई आणि गावकरी यांच्या हातातून निसटून पळून जायला ही चांगली संधी मिळाली ना! नाहीतर या सर्वांनी मिळून हरणांसशांसारखी आपली दोघांची शिकार केली असती! म्हणून आपण देवाचे आभार मानले पाहिजेत!" जीवदत्त म्हणाला.



दोघे परस्परांशी बोलत असतां अचानक झाडीतून वाघ बाहेर धावत आला. त्यांच्यावर उडी मारून एका क्षणात दोघांना ठार करणे त्याला कठीण नव्हते. म्हणून खड्गवर्मा मागे सरला आणि म्हणाला—"जीवदत्त! बोल याला ठार करू या की या दाराने गावात शिरायला पिटाळू या? लवकर बोल काय ते!"

"तुला वाटेल ते कर!" जीवदत्त स्मित करून म्हणाला.

त्यांना हत्तीचे ओरडणे, गांवकऱ्यांच्या आरोळ्या आणि कारकुनाचा कर्कश आवाज सर्व स्पष्ट ऐकू येत होते. कुंपणाच्या दाराकडे येण्याची कोणाची देखील हिंमत होत नव्हती.



हत्तीला गराडा घालून त्यालाच ठार कर-ण्याच्या प्रयत्नात सर्व होते.

वाघ डरकाळ्या फोडीत खड्गवर्माच्या बाजूला वळला. तेव्हां त्याने आपल्या भाल्याची एक खोच वाघाच्या कमरेवर मारली. वाघ त्यामुळे चवताळला आणि खड्गवर्मावर उडी मारायला धावला. त्याच वेळी जीवदत्तने आपली कुबडी वाघाच्या तोंडात घालून त्याला ढकलले. म्हणून वाघ पिसाळला आणि खड्गवर्मा किंवा जीवदत्त यांच्या अंगावर न धांवता कुंपणाच्या दारा-तून गावात शिरला.

गावात पळापळ सुरू झाली. हत्ती आल्या मुळे गावकरी पहिल्यानेच घाबरून गेले होते. आतां वाघच शिरला म्हणून जास्तच घाबरून गेले. कारकून झाडावरूनच ओरडत होता– "अरे! आपले कैदी पळाले. ते दोघे मांत्रिक होते असे दिसते. ते आपल्या गावात आणखी कोण कोणत्या क्रूर जनावराला सोडतात, कोण जाणे. दरवाजा बंद करा रे कोणी-तरी!"

कारकुनाचे ते ओरडणे ऐकून खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना खूप हंसू कोसळले. खड्गवर्मा आपला भाला कारकुनाच्या बाजूला रोखून म्हणाला–"हा लुच्चा झाडा-वर बसूनच ओरडतो आहे, खाली उतरून लोकांना मदत कां नाही करीत? माझ्या-जवळ यावेळी धनुष्य बाण असते तर या थेरड्याचे डोके ताडफळासारखे खाली पाडले असते."

"धनुष्यबाण मिळविणे तितकेसे कठीण नाही. जंगलात त्याची आपल्याला गरज पडेलच. त्या म्हाताऱ्याचे डोके उडविण्याची गोष्ट नंतर पाहून घेऊ. पहिल्याने येथून पळून जाण्याचा विचार कर." जीवदत्त म्हणाला.

दोघे तेथून निघाले. अंधुक चांदण्यात सावधपणे वाट काढीत दोघे जंगलाच्या बाजूने झपाझप पावले टाकीत चालू लागले. वाटेत त्यांना निरनिराळी श्वापदे दिसली, परंतु निर्भयपणे पुढे जाणाऱ्या दोघांकड

बाजूला निघून गेली.

सूर्योदयापूर्वी दोघे बरेच दूर निघाले. जंगलाच्या मध्यभागी येऊन पोचले. तो सर्व प्रदेश दाट रानामुळे आणि डोंगराळ असल्या-मुळे रात्रीच्या वेळी जास्तच भयंकर दिसत होता.

"खड्गवर्मा! मला वाटते, आपण दहा-बारा कोस तरी दूर निघून आलो असणार. सूर्योदयाला फार वेळ उरला नाही. या झाडांवर चढून कोठेतरी थोडा आराम करू या गड्या! तुला काय वाटते?" जीवदत्त म्हणाला.

खड्गवर्माने होकार दिला. दोघे एका झाडावर चढून फांद्यांच्या आधारे टेकून बसले. दोघे फार दमले होते. रात्रभर झोप नव्हती. शिवाय बरेच चालून आले होते. म्हणून त्यांना चटकन झोप लागली.

बऱ्याच वेळानंतर त्यांना कुजबुज ऐकू आली. जीवदत्त जागा झाला. खड्गवर्माने पण डोळे उघडून प्रश्नसूचक जीवदत्तकडे पाहिले. त्याने खड्गवर्माला गप्प बसायला खूण केली. नंतर त्यांना ज्या बाजूने बोलणे ऐकू येत होते त्या बाजूला त्यांनी वळून पाहिले. सुरवातीला जी कुजबुज वाटली, ती आवाज चढत गेला तसा भांडण असल्या-सारखे स्पष्ट झाले.

दोघे ज्या झाडावर बसले होते त्या जागे पासून थोड्या अंतरावर एका झाडाखाली काही लोक उभे होते आणि आपसांत काही





तरी बोलत होते. सर्वांना लांबलांब दाढ्या होत्या आणि कपाळाला भस्म व कुंकवाचा टिळा होता. त्यांच्या हातात त्रिशूल होते. ते दिसायला भयंकर होते. त्यांच्या गळ्यात रुद्राक्षाच्या माळा होत्या. एकाच्या डोक्यावर सुद्धा रुद्राक्षमाळा होती. त्याची दाढी सर्वांत मोठी व लांब होती. तो आपला त्रिशूल उचलून धरून दुसऱ्या एकाला धमकावीत होता. काहीजण मध्यस्थी करीत होते. त्यांचे बोलणे स्पष्टपणे ऐकू येत नव्हते.

ते आपसात भांडणारे भैरव भक्त होते. त्यांचा प्रमुख गणलिंगेश्वर नांवाचा एक मनुष्य होता व त्याच्या मुख्य शिष्याचे नाव श्वेतभैरव होते. नवे भैरव मंदिर कोठे स्थापन करावे, या गोष्टीवर दोघांचा वाद-विवाद चालू होता.

ते सर्व भैरवभक्त पाचसहा महिन्यापूर्वी-पर्यंत विंध्य पर्वतातल्या एका जुन्या भैरव मंदिरात राहात होते. त्या मंदिरात एक म्हातारी भैरवपुजारीण होती. एका सणाच्या वेळी भैरवासमोर बळी देण्यासाठी एका मुलाला आणण्यात आले. परंतु त्या पुजा-रिणीने त्या मुलीला बळी देण्यास नकार दिला. त्या दिवशी रात्री एक मोठे वादळ आले आणि भैरव मंदिरावर वीज पडली आणि ते देऊळ पडून गेले. त्या भैरव पुजारिणीने मुलाचा बळी देण्यास नकार दिल्यामुळेच तो अपघात घडला असे गण-लिंगेश्वराने सर्व भैरवभक्तास सांगितले आणि त्या पुजारिणीचाच बळी देण्याचा घाट घातला. श्वेतभैरवला ते कळले व त्याने पुजारिणीला कोठे तरी लपवून ठेवले आणि आपल्या गुरूला सांगितले की ती कोठे तरी पळून गेली असावी.

पुजारीण एकाएकी नाहीशी झालेली पाहून गणलिंगेश्वरला श्वेतभैरवाचीच यात काहीतरी लबाडी असल्याचा संशय आला. परंतु पुरावा नसल्यामुळे तो त्याला काही शिक्षा करू शकला नाही. त्यानंतर सर्व जण पुजारिणीचे काम करू शकणाऱ्या एका मुलीच्या शोधार्थ गावात गेले. तेव्हां गणलिंगेश्वरने आपल्या त्या शिष्यावर कडक नजर ठेवली.

श्वेतभैरवाला नरवध पसंत नव्हता. परंतु आपले ते विचार सर्वांसमक्ष व्यक्त करायला तो धजत नव्हता. म्हणून तो आपल्या गुरूलाच पदच्युत करण्यासाठी गुप्तपणे प्रयत्न करू लागला.

गणलिंगेश्वरला त्याच्या शिष्याच्या प्रयत्नाची पुरी कल्पना होती. त्याला त्याच्या काही विश्वासपात्र शिष्यांकडून श्वेतभैरव त्याला पदच्युत करण्याच्या प्रयत्नात असल्याचे कळले होते. त्यासाठी तो आपला गट कायम करीत असल्याचे पण त्याला कळले. म्हणून त्याने श्वेतभैरववर एक भयंकर आरोप लावून त्याचा काटा दूर करण्याचे ठरविले. त्यासाठी त्याने काही साक्षीदार पण जमा केले. त्या दिवशी रात्री तलावाच्या काठावरून ज्या मुलीला पळवून आणण्यात आले होते त्या मुलीला पळून जायला श्वेतभैरव मदत करण्याच्या प्रयत्नात होता असा त्याच्यावर आरोप लावला.

श्वेतभैरवने तो आरोप खोटा असल्याचे सांगितले. म्हणून गणलिंगेश्वरला जास्तच राग आला आणि तो आपल्या त्रिशूलाने आपल्या शिष्याचा वध करायला तयार झाला. काही शिष्यांनी दोघांमध्ये मध्यस्थी करण्याचा प्रयत्न केला. त्या मुलीला



बोलावून तिलाच काय ते विचारून घ्यावे असे त्यांचे म्हणणे होते.

ते मान्य करून की काय गणलिंगेश्वरने टाळी वाजविली. ती टाळी ऐकून त्रिशूल घेऊन एक तरुण भैरव झाडांच्या आडून पुढे येऊन उभा राहला. पळवून आणलेल्या मुलीला आणून समोर हजर करण्यास गणलिंगेश्वरने आज्ञा केली. तो तरुण भैरव आठ दहा मिनिटांनी सोळा सतरा वर्षे वयाच्या एका मुलीला घेऊन आला.

गणलिंगेश्वरने त्या मुलीला विचारले— "रात्री तू पळून जाण्याचा प्रयत्न केला होतास की नाही? तुला कोणी मदत केली?" श्वेतभैरवकडे बोट दाखवून त्याने

पुढे विचारले–"याने पळून जायला मदत केली होती की नाही? खरे बोल, खोटे बोलू नकोस. तुला भिण्याचे कारण नाही. पण जर का तू खोटे बोललीस तर महाकाळभैरव तुझे डोके उडवील लक्षात ठेव!"

त्या मुलीने खरे तेच सांगितले. म्हणाली–"मी पळण्याचा प्रयत्न केला होता. पण मला कोणी मदत केली नाही की पळून जाण्यास प्रोत्साहन पण दिले नाही." तिच्या त्या उत्तराने सर्वांच्या मनाचे समाधान झाले. समाधान झाले नाही ते एकट्या गणलिंगेश्वराचे.

गणलिंगेश्वराने मुलीला घेऊन जायला त्या तरुण भैरवाला सांगितले. नंतर श्वेत भैरवाकडे करड्या नजरेने पहात आणि त्याच्या कंबरेपर्यंत लोंबत असलेली रुद्राक्ष माला आपल्या हातात धरून म्हणाला–"माझ्यानंतर तू या भैरव भक्तांचा गुरु होणे शक्य नाही. तू लुच्चा, लबाड आहेस! तुला भैरवासमोर बळी का देऊ नये असा मी विचार करतो आहे. परंतु तुझ्यावर वि[illegible] आहेत. म्हणून मी तुला आतां सोडतो आहे."

श्वेत भैरवाच्या डोक्यात एकाएकी काय आले कोणास ठाऊक, त्याने आपला त्रिशूल उचलून आपल्या गुरूवर रोखून धरला. तेव्हां त्याच्या एका मित्राने त्याच्या खांद्यावर हात ठेवून, अशी घाई करु नकोस म्हणून खूण केली.

झाडावर बसून खड्गवर्मा व जीवदत्त हे सर्व दृश्य लक्षपूर्वक पहात होते. परंतु त्यांचे बोलणे त्यांना स्पष्टपणे ऐकू येत नव्हते. एका भैरवाला, त्या मुलीला झाडीत घेऊन जातांना त्यांनी पाहिले आणि गांवच्या पाटलाची तीच मुलगी असावी, असे त्यांना वाटले.

"खड्गवर्मा, त्या बिचारीला या नर राक्षसांच्या हातांतून वांचविले पाहिजे." जीवदत्त म्हणाला.

"बरोबर आहे, तुझे म्हणणे! आपण तिला वांचविलेच पाहिजे. शक्य झाले तर या भैरवांपैकी काही जणांना वाघासिंहाच्या तोंडी देऊन ही ते केले पाहिजे!" खड्गवर्मा म्हणाला.

(क्रमशः)



# लक्ष्मी आणि सरस्वती

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ परत आला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि स्मशानाच्या दिशेने चालू लागला तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, मला एका गोष्टीची शंका वाटते. तुला तुझ्या प्रयत्नात यश मिळाले तर तू त्यांचा उपयोग करशील की विजयश्री नावाच्या स्त्रीसारखा प्राप्त यश देखील सोडून देशील, न कळे! मी ती गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

उज्जैन नगरीत एक गरीब विद्वान पंडित रहात असे. त्याला विजयश्री नांवाची एक मुलगी होती व तिला दोन भाऊपण होते. त्या विद्वान पंडिताच्या घरी ज्या ज्या गोष्टीची चर्चा होई ती विजयश्री लक्षपूर्वक ऐकत असे. एकदा ऐकलेली गोष्ट तिच्या लक्षात राही. कधी विसरत नसे. ती मोठी होत

पुढे विचारले–"याने पळून जायला मदत केली होती की नाही? खरे बोल, खोटे बोलू नकोस. तुला भिण्याचे कारण नाही. पण जर का तू खोटे बोललीस तर महाकाळभैरव तुझे डोके उडवील लक्षात ठेव!"

त्या मुलीने खरे तेच सांगितले. म्हणाली–"मी पळण्याचा प्रयत्न केला होता. पण मला कोणी मदत केली नाही की पळून जाण्यास प्रोत्साहन पण दिले नाही." तिच्या त्या उत्तराने सर्वांच्या मनाचे समाधान झाले. समाधान झाले नाही ते एकट्या गणलिंगेश्वराचे.

गणलिंगेश्वराने मुलीला घेऊन जायला त्या तरुण भैरवाला सांगितले. नंतर श्वेत भैरवाकडे करड्या नजरेने पहात आणि त्याच्या कंबरेपर्यंत लोंबत असलेली रुद्राक्ष माला आपल्या हातात धरून म्हणाला–"माझ्यानंतर तू या भैरव भक्तांचा गुरु होणे शक्य नाही. तू लुच्चा, लबाड आहेस! तुला भैरवासमोर बळी कां देऊ नये असा मी विचार करतो आहे. परंतु तुझ्यावर वि[illegible] आहेत. म्हणून मी तुला आतां सोडतो आहे."

श्वेत भैरवाच्या डोक्यात एकाएकी काय आले कोणास ठाऊक, त्याने आपला त्रिशूल उचलून आपल्या गुरूवर रोखून धरला. तेव्हां त्याच्या एका मित्राने त्याच्या खांद्यावर हात ठेवून, अशी घाई करू नकोस म्हणून खूण केली.

झाडावर बसून खड्गवर्मा व जीवदत्त हे सर्व दृश्य लक्षपूर्वक पहात होते. परंतु त्यांचे बोलणे त्यांना स्पष्टपणे ऐकू येत नव्हते. एका भैरवाला, त्या मुलीला झाडीत घेऊन जातांना त्यांनी पाहिले आणि गांवच्या पाटलाची तीच मुलगी असावी, असे त्यांना वाटले.

"खड्गवर्मा, त्या बिचारीला या नर राक्षसांच्या हातांतून वांचविले पाहिजे." जीवदत्त म्हणाला.

"बरोबर आहे, तुझे म्हणणे! आपण तिला वांचविलेच पाहिजे. शक्य झाले तर या भैरवांपैकी काही जणांना वाघासिंहाच्या तोंडी देऊन ही ते केले पाहिजे!" खड्गवर्मा म्हणाला.

(क्रमशः)



# लक्ष्मी आणि सरस्वती

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ परत आला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि स्मशानाच्या दिशेने चालू लागला तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, मला एका गोष्टीची शंका वाटते. तुला तुझ्या प्रयत्नात यश मिळाले तर तू त्याचा उपयोग करशील की विजयश्री नावाच्या स्त्रीसारखा प्राप्त यश देखील सोडून देशील, न कळे! मी ती गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

उज्जैन नगरीत एक गरीब विद्वान पंडित रहात असे. त्याला विजयश्री नांवाची एक मुलगी होती व तिला दोन भाऊपण होते. त्या विद्वान पंडिताच्या घरी ज्या ज्या गोष्टीची चर्चा होई ती विजयश्री लक्षपूर्वक ऐकत असे. एकदा ऐकलेली गोष्ट तिच्या लक्षात राही. कधी विसरत नसे. ती मोठी होत

**वेताळाच्या गोष्टी**



गेली तसतशी तिची काव्यशक्तिपण विकसित होत गेली. आशुकवित्वापासून मोठमोठी काव्ये रचण्याची शक्तिपण तिला प्राप्त झाली. तिचे काव्य जो कोणी वाची तो, विजयश्रीची काव्य प्रतिभा खरोखरच अद्‌भुत आहे, असेच म्हणे.

विजयश्री आपल्या वडिलांबरोबर पंडितांच्या सभेत जाऊ लागली. अज्ञातऱ्हेने तिच्या काव्यप्रतिभेची ख्याती वाढतच गेली. त्याचप्रमाणे तिच्या वयाबरोबर तिच्या सौंदर्यात कमालीचा फरक पडत गेला आणि तिला पाहून वाटू लागले की ती देवलोकातील कोणी देवी असावी. तिची काव्यकला व सौंदर्य पाहून तिला मागणी घालणारांची संख्या वाढू लागली. परंतु तिने चंद्रशेखर नांवाच्या एका तरुण युवकाला मनाने वरले होते. दुर्दैवाने चंद्रशेखरची पण घरची स्थिति गरिबीची होती. पण विजयश्रीच्या कवितेवर तो आपले सर्वस्व वाहायला तयार होता. म्हणून विजयश्रीने कवियत्री म्हणून तिला चांगली प्राप्ती होऊ लागली म्हणजे चंद्रशेखरशी विवाह करून सुखाने संसार थाटायचा, असे मनात ठरविले.

मध्यंतरी उज्जैनच्या राजाच्या कानापर्यंत विजयश्रीच्या काव्यप्रतिभेची व सौंदर्याची गोष्ट जाऊन पोचली. म्हणून राजा दरवर्षी त्याच्या दरबारात ज्या पंडितांच्या सभा होत त्या सभांत उपस्थित राहण्यासाठी विजयश्रीला देखील आदरपूर्वक निमंत्रण पाठवू लागला.

राजाने तिची कविता ऐकून आपला उचित सत्कार केला तर आपल्याला धन प्राप्ती होईल व आपल्या इच्छेप्रमाणे विवाह करून घेता येईल असा विचार विजयश्रीने केला. म्हणून ती पंडित सभेत उपस्थित राहून काव्यवाचन करू लागली. तिची कविता व विचार ऐकून पंडितांच्या सभेत तिचा आदर वाढतच गेला.

नंतर एका सभेत काव्यप्रतिभेची प्रतिद्वंद्विताच झाली व विजयश्रीने काव्यवाचन करून कविमंडळीस मुग्ध करून सोडले.



स्वतः महाराज इतके खूष झाले की त्यांनी तिला बहुमोल पारितोषिके देऊन तिचा सत्कार केला व तिला राजअतिथि म्हणून राजवाड्यातच काही काळ राहण्याचा आग्रह केला. आपले प्रयत्न सार्थक झाल्याबद्दल तिला फार आनंद झाला व तिने राजाचे आतिथ्य स्वीकारले.

राजवाड्यात पाऊल टाकतांच तिच्या जीवनात बदल झाला. गरिबी कशी असते हेदेखील ती विसरून गेली. अंत:पुरात सेवेस नित्य दासींचा घोळका असे. तिला उत्तमोत्तम वस्त्रे परिधान करण्यासाठी देण्यात येत. ती जिकडे जाई, पालखीत बसून जाई. दररोज नृत्य, गायन इत्यादी करमणुकींची व्यवस्था राजाने करून दिली होती. स्वर्गसुख ते याहून जास्त काय असू शकणार, असा विचार तिच्या मनात आला. दररोज युवराज तिला भेटायला येत व शिकार आणि युद्ध यासंबंधी तिला आपले अनुभव सांगत.

या नवीन जीवनात विजयश्रीला पुनर्जन्म मिळाल्यासारखे वाटू लागले. परंतु त्या जीवनात काव्य आणि पांडित्य याला स्थान नव्हते. तिला आपला पूर्वजीवनाची आठवण होईल अशी एकही गोष्ट घडत नव्हती. म्हणून तिची काव्य-प्रतिभा आणि आशुकवित्व जणुंकाही लयासच गेले.



ते जीवन आणखी जास्त सुखकर व्हायला आणखी एक गोष्ट घडली. एक दिवशी युवराजांनी विजयश्री जवळ तिच्याशी विवाह करण्याची इच्छा असल्याचे प्रगट केले आणि महाराज व महाराणीची त्या गोष्टीस संमती असल्याचे पण सांगितले. ते ऐकून विजयश्री आश्चर्यचकित झाली. परंतु लगेच उत्तर न देता, दुसऱ्या दिवशी आपले मत देण्याचे कबूल केले.

ती रात्रभर विचार करीत राहिली आणि उजाडल्यावर महाराणीला भेटून म्हणाली–"महाराणी! युवराजांबरोबर मला विवाह करता येणार नाही. राजवाड्यात माझा जो आदर सत्कार झाला त्याबद्दल

मी आपले फार फार आभार मानते आणि अगदी नम्रपणे मला माझ्या घरी पोचविण्याची व्यवस्था करावी अशी विनंती करते."

त्याच दिवशी राजाने तिला तिच्या घरी आदरपूर्वक पोचविले. त्यानंतर काही दिवसांनी चंद्रशेखरशी तिचा विवाह झाला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा! विजयश्रीचा हा कसा काय विवेक म्हणावयाचा? थोडे दिवस राजवाड्यात तिचा जो आदर झाला त्यामुळे तिच्या जीवनात किती बदल झाला होता? आपल्या गरिबीची तिला आठवणदेखील राहिली नव्हती. गरीबीत तिला कसे दिवस काढावे लागत होते हे देखील ती विसरली नव्हती का? किंवा युवराजाने विवाहाची इच्छा प्रगट केल्यावर, तिला ती त्यांच्याहून कांकणभर मोठीच आहे असे वाटले की काय? याशिवाय रात्रभर तिने असा मोठा विचार तो काय केला? या सर्व प्रश्नांचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस [illegible] डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

त्यावर विक्रमादित्य म्हणाला–"विजयश्रीचा विवेकच आपल्याला दिसतो. युवराज तिच्या सौंदर्यावर भाळले होते हे जरी खरे असले तरी राजवाड्यात अतिथि म्हणून तिला प्रवेश मिळण्याचे मुख्य कारण तिची काव्यप्रतिभा होती. राजवाड्यात काव्य प्रतिभेच्या प्रदर्शनाला वाव दिसला नाही. याशिवाय युवराजांनी आपले मनोगत प्रगट केल्यावर तिला चंद्रशेखरची आठवण झाली असावी. नंतर युवराजांशी विवाह झाल्यास सरस्वतीला कायमची पाठ दाखविण्यासारखे झाले असते. लक्ष्मीची कृपा झाल्यावर सरस्वतीचा विसर पडतोच. म्हणून रात्रभर तिला विचार करावा लागला व झोप आली नाही, यात नवल नाही."

अशा तऱ्हेने राजाचे मौनभंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# चलाख चोर

रुमानियाच्या राजधानीत एक अट्टल चोर रहात असे. एक दिवशी तो चोरी करायला निघाला. वाटेत खेडेगावातला चोर त्याला भेटला. परस्परांशी बोलणे झाल्यावर दोघांची मैत्री जमली.

राजधानीतला चोरा खेडेगावच्या चोराला म्हणाला–"तुझे कौशल्य पाहतो. तू कावळ्याचा डोळा चुकवून त्याच्या घरट्यातली अंडी चोरून घेऊन ये." खेडेगावातला चोर झाडावर चढला. घरट्यात मादी अंडी उबवीत बसली होती. चोराने तिला चकवून अंडी चोरली आणि खाली उतरून आला. परंतु खाली उतरून आल्यावर खिशात हात घालून पाहतो तर अंडी नव्हती. राजधानीतला चोर ती अंडी दाखवीत म्हणाला– "तू चोरी करण्यात पटाईत आहेस पण चोरलेला माल वाचविण्यात हुशार नाहीस. तू माझा साथी झालास तर आपण दोघे मिळून चोरलेला माल अर्धा अर्धा वांटून घेऊ." खेडेगावांतल्या चोराने ते मान्य केले.

दोघांनी त्या रात्री राजाचा खजिना लुटण्याचे ठरविले. मध्यरात्रीच्या सुमारास दोघे राजवाड्यात चढून गेले. छपरावरच्या गवाक्षातून पाहून खजिना कोठे आहे याची माहिती काढली. त्यात पिपे भरून सोन्याची नाणी होती. राजधानीतल्या चोराने खेडेगावातल्या चोराला खजिन्यात दोरीच्या सहाय्याने उतरविले. त्याने एक पिशवी भरून सोन्याची नाणी आणली. आणि दोघे राजवाड्यातून निघून गेले.

दुसऱ्या दिवशी राजाने नित्याप्रमाणे खजिन्याची तपासणी केली आणि विचारले– "रात्री खजिन्यात कोण आला होता?"

"कोणी आला नव्हता महाराज!" पहारेकरी म्हणाला.



राजाने सरळ जाऊन तुरुंगातल्या एका म्हाताऱ्या कैद्याला विचारले–"कोणीतरी खजिन्यात शिरून दोन हजार सोन्याची नाणी चोरली आहेत. परंतु भिंतीला कोठे भोंक नाही. यातले गुपित काय असू शकेल ?"

कैदी म्हणाला–"महाराज खजिन्याला नक्कीच भोंक पाडले गेले असणार. खजिन्यात जाळ करून धूर कोठून निघतो हे पहावे. गुप्तद्वार कोठे आहे हे कळेल!"

राजाने म्हाताऱ्या कैद्याच्या सल्ल्या-प्रमाणे खजिन्यात जाळ केला. छपरात कांचेची जी गवाक्षे होती त्यापैकी एकातून धूर बाहेर निघत असलेला दिसून आला. राजाने ती गोष्ट म्हाताऱ्या कैद्याला जाऊन सांगितली तेव्हां तो कैदी म्हणाला–"तो चोर पुन्हा येईल. आपण त्या गवाक्षाची दुरुस्ती करू नये आणि खिडकीच्या खाली दाट घट्ट दारु पिपात भरून ठेवावी."

म्हाताऱ्या कैद्याचा अंदाज बरोबर निघाला. राजाला चोरीचा संशय येण्यापूर्वी आणखी थोडे सोने चोरून आणले पाहिजे असे ठरवून त्या दिवशी रात्री दोघे चोर खजिन्याच्या छपरावर आले. खेडेगावातला चोर पहिल्या दिवसासारखा खजिन्यात उतरला आणि चिकट दारूच्या पिपात जाऊन पडला आणि आतून ओरडला–"अरे, आपण फसलो रे! मी दारूच्या पिपात अडकलो आहे. मला वर ओढून काढणे तुला शक्य नाही. मी राजाच्या हातात जिवंत सापडलो तर त्यात तुला धोका आहे. म्हणून तू मला विष दे आणि पळून जा."

"भिऊ नकोस मित्रा! माझ्याजवळ एक औषध आहे. ते घेतलेस की तू मेल्या-सारखा होऊन जाशील. उद्या येऊन मी तुझे रक्षण करीन." राजधानीतल्या चोराने सुचविले व दोरीच्या सहाय्याने आपल्या मित्राला ते औषध दिले. ते औषध घेतल्या बरोबर खेडेगावातला चोर प्रेतासारखा दारूच्या पिपात ताठ उभा झाला.

दुसऱ्या दिवशी राजाने खजिन्यात येऊन पाहिले आणि पिपात उभा असलेला एक मनुष्य पाहून म्हणाला–"अरे लबाडा! आता तू कोठे जातोस, पाहतोच मी!" परंतु राजाने जवळ जाऊन पाहिले तर चोर मेलेला. परंतु त्याने पुन्हां तुरुंगात जाऊन म्हाताऱ्या कैद्याचा सल्ला घेतला. म्हातारा कैदी सर्व ऐकून घेऊन म्हणाला–"महाराज! हे चोर अट्टल चोर दिसत आहेत."

"म्हणजे या चोरा शिवाय आणखी एक चोर आहे वाटते?" राजाने विचारले.

"दुसरा चोर असल्या शिवाय हा मेला कसा? आत्महत्या करणे त्याला शक्य नाही. दारूच्या पिपात अडकल्याने जीव जाण्याचे कारणच काय? दुसऱ्या चोराला पकडायला पण एक युक्ति आहे. मेलेल्या चोराचे प्रेत घेऊन जायला तो नक्कीच येईल. राजधानीच्या प्रवेश द्वाराजवळ एका सुळीवर त्या चोराचे प्रेत आणून ठेवावे आणि पाहरेकरी जवळच नेमून ठेवावेत." म्हाताऱ्या कैद्याने सल्ला दिला.

म्हाताऱ्या कैद्याने सांगितल्याप्रमाणे राजधानीतला चोर आपल्या मित्राला सोड-विण्याचा प्रयत्न करू लागला. त्याने एक पांढरा घोडा, एक गाडी व चार दारूच्या झाऱ्या विकत घेतल्या आणि एका म्हाता-ऱ्याचा वेष करून गाडीत बसून नगराच्या



दारापर्यंत आला. तेथून सुमारे पन्नास पावलावर आपली गाडी एकदम उलटी पाडून मोठ्याने ओरडू लागला–"माझी गाडी उलटली हो! दारूच्या झाऱ्या पण खाली पडल्या हो, आम्हांला वाचवा!"

पाहरेकरी म्हणाले–"म्हाताऱ्या! तू एक झारी भरून दारू देशील तर आम्ही तुझी गाडी सरळ उभी करून देऊ."

"मालक! मी नाही केव्हां म्हटले? आनंदाने देईन. मला मदत करायला या!" राजधानीतला चोर म्हणाला.

पाहेरकऱ्यांनी गाडी सरळ उभी करून दिली. दारूच्या झाऱ्या गाडीत ठेवून एकीतली दारू मनसोक्त पिऊ लागले. राज-



धानीतल्या चोराने त्या दारूत झोपेचे औषध घातले होते, हे त्यांना माहीत नव्हते. पाहरेकरी झोपेत पेंगत होते तेव्हां राजधानीतल्या चोराने खेडेगावातल्या चोराकडे बोट दाखवून पाहरेकऱ्यांच्या नायकाला विचारले–"नाईक साहेब! आपण कोण?"

"अरे हा एक अट्टल चोर आहे." नाईक म्हणाला.

"तरमग हा आमचा घोडा पळवून नेईल म्हणता?" राजधानीतला चोर भोळ्या भावड्या माणसासारखा विचारू लागला.

"अरे, तुझे डोके तर फिरले नाही ना? मेलेला माणूस तुझा घोडा कसा चोरून नेईल?" नायकाने विचारले.

"नाही हो, तो नक्कीच चोरून पळवून नेईल. चोराचा काय विश्वास?" राजधानीतला चोर म्हणाला.

"अरे म्हाताऱ्या! तो चोर तुझा घोडा चोरून घेऊन गेला तर मी त्या घोड्याची किंमत तुला देईन, झाले?" नाईक म्हणाला.

हळूहळू पाहरेकऱ्यांना दारू चढू लागली. तेव्हां राजधानीतला चोर खेडेगावतल्या चोराजवळ गेला आणि त्याच्या तोंडात कसले तरी औषध घातले. थोड्या वेळाने खेडेगावातला चोर शुद्धीवर आला.

"मित्रा! हे पाहरेकरी फार वेळ गुंगीत राहणार नाहीत. तू घोड्यावर बसून येथून पाय काढ. मी तुला सकाळी येऊन भेटेन." असे सांगून राजधानीच्या चोराने त्याला पळून जायला सांगितले आणि तो निघून गेल्यावर म्हातारा चोर झोप लागल्याचे सोंग करून गाडीतच पडून राहिला.

हळूहळू सर्व पाहरेकरी शुद्धीवर आले. चोराबरोबर घोडादेखीलपळून गेलेला पाहून सर्व पाहरेकरी चकित झाले. नायक डोळे चोळून चहूकडे पाहात म्हणाला–"तो म्हातारा चोर म्हणाला ते खरे ठरले!"

झोपेचे सोंग करून पडून राहलेल्या चोराला तो म्हणाला–"अरे म्हाताऱ्या! तू म्हणालास तसेच झाले, बघ! पण कसे, हे [illegible] कळले नाही. आता महाराजांना ही गोष्ट कळली तर आमची चामडी लोळविली जाईल! मी कबूल केल्याप्रमाणे घोड्याची किंमत द्यायला तयार आहे, एवढेच नव्हे तर दुप्पट किंमत द्यायला तयार आहे. पण एका अटीवर, तू ही गोष्ट कोणाला सांगता कामा नये!"

राजधानीच्या चोराचा डाव साधला होता आणि वर त्याला पांचशे मोहरा मिळाल्या होत्या. तो आनंदाने निघून गेला.

राजाला जेव्हां ही गोष्ट कळली तेव्हां त्याने तुरुंगात जाऊन म्हाताऱ्या कैद्याला पुढे काय करायचे हे विचारले, तेव्हां तो म्हणाला–"महाराज! ते चोर मोठे वस्ताद आहेत, हे सांगितले नव्हते का?" आपण एक मोठे बक्षिस देण्याचे जाहीर करा म्हणजे तो नक्कीच आपल्याकडे येईल!"

म्हातारा कैदी म्हणाला त्याप्रमाणे राजाने एक मोठे पारितोषिक जाहीर केले. राजधानीतल्या चोराने राजाजवळ जाऊन तोच खरा चोर असल्याचे सांगून पारितोषिक घेण्यास आल्याचे सांगितले.

"तूच तो चोर आहेस, याचे तरी काय प्रमाण?" राजाने चोराला विचारले.

चोर, दूर एक मनुष्य बैलाला हाकीत नेत होता, त्याच्याकडे बोट दाखवून म्हणाला–"पाहिजे तर मी तो बैल चोरून आणून दाखवितो." बैलाला हांकून नेणारा मनुष्य खेडेगावातला चोर होता.

"तू त्या बैलाला चोरून घेऊन आलास तर मी तू म्हणतोस ते मान्य करीन." राजा म्हणाला.

राजधानीतल्या चोराने बैलाला हाकून नेणाऱ्याला जाऊन काहीतरी सांगितले तेव्हां तो आपले डोके बडवीत पळून गेला. तेव्हां राजधानीतला चोर बैलाला घेऊन राजाकडे आला. राजा चोराची चलाखी पाहून खरोखरच खूष झाला आणि त्याला जाहीर केल्याप्रमाणे पारितोषिक देऊन निरोप दिला.

दोघां चोरांनी ते पारितोषिक आपसांत अर्धे अर्धे वांटून घेतले.







# तीन तऱ्हेची शिक्षा

एका गावी एक तुपाचा व्यापारी रहात असे. तो फार लोभी होता. तो कसले तरी तेल मिसळून तूप विकीत असे. म्हणून तुपाला वास येई. शेवटी तो एकदां अधिकाऱ्याच्या जाळ्यात सापडला. त्यांनी त्याच्यावर तुपात तेल मिसळून विकल्याचा आरोप ठेवून न्यायाधिशसमोर उभे केले. न्यायाधिशाने व्यापाऱ्याचा आरोप सिद्ध झाल्यावर त्याला तीन तऱ्हेची शिक्षा केली आणि म्हणाला–"तुला यातली हवी असेल ती शिक्षा भोगतां येईल. त्या शिक्षा अनुक्रमे अशा होत्या–(१) व्यापाऱ्याने एक पेलाभर ते वासेळे तूप खावे. शंभर फटके ध्यायची शिक्षा मान्य करावी किंवा शंभर रुपये दंड सोसावा.

तुपाच्या व्यापाऱ्याला दंड भरणे किंवा फटके खाणे दोन्ही गोष्टी मान्य नव्हत्या. म्हणून त्याने पेलाभर तूप प्यायचे कबूल केले. परंतु अर्धा पेला प्याल्याबरोबर त्याला ओकारी आली. म्हणून फटके खायला तो तयार झाला. परंतु चार फटके पडतांच ते असह्य झाले म्हणून त्याने शंभर रुपये दंड भरून आपली सुटका करून घेतली.

—सदाशिव शिंके





# राजाची युक्ती

एका गावी एक सराफ रहात असे. तो सोन्याच्या दागिन्यांच्या व्यापारबरोबर दागिने गहाण ठेवून घेऊन व्याजाने कर्जाऊ रुपये सुद्धा देत असे. म्हणजे सराफी-बरोबर तो सावकारीपण करीत असे. गरीब व भोळ्या भाबड्या गिऱ्हाइकांना तो फसवीत असे. जे दागिने गहाण ठेवलेले असत त्या सोन्याच्या दागिन्यां ऐवजी तो पितळेचे दागिने कर्ज दिलेले रुपये परत मिळाल्यावर देत असे. परंतु भोळ्या भाबड्या लोकांना ते कळत नसे.

एकदा जयंत नावाच्या तरुण माणसाने त्या सावकाराकडे एक मोत्यांची माळ गहाण ठेवून काही कर्ज घेतले. तो तरुण मनुष्य भोळा असेल असे समजून त्याला आपण फसविले तर त्यात धोका नाही असा विचार करून त्या सावकाराने एक नकली हार खऱ्या हारा ऐवजी ठेवून दिला.

त्या तरुण माणसाने कर्जाची रक्कम व्याजा-सकट परत केली तेव्हां सावकाराने तो नकली हार त्याला परत दिला.

परंतु जयंतने हार नीट तपासून पाहिला आणि म्हणाला–"मी ठेवलेला हार हा नव्हे. माझ्या हारावर माझ्या आजोबांचे नाव आहे. म्हणून माझा हार मला परत द्यावा." परंतु सावकाराने ते मान्य केले नाही. जयंतने तो हार नेऊन एका सोनाराला दाखविला. सोनाराने तो हार नकली असल्याचे, म्हणजे सोने नसल्याचे व मोती खोटे असल्याचे सांगितले. म्हणून जयंतने राजाच्या दरबारात आपले गाऱ्हाण नेले.

राजाने सावकाराला बोलावून विचारले.

सावकार म्हणाला–"महाराज! माझ्या-कडे अनेक लोक दागिने गहाण ठेवून कर्ज घेऊन जातात. ठरल्या वेळी कर्जाची रक्कम

परत करून दागिने परत घेऊन जातात. मी या तरुण माणसाला मी ओळखत नव्हतो. तरी मी याला कर्ज दिले. त्याला फसवून मला काय मिळणार?"

"हा तरुण मनुष्य म्हणतो की त्याने तुमच्याकडे जो मोत्यांचा हार गहाण ठेवला होता त्याच्यावर त्याच्या आजाचे नाव होते. तो असे ही म्हणतो की हा हार खऱ्या सोन्याचा आणि खऱ्या मोत्याचा नाही. त्यावर नाव देखील नाही. त्याला तुमचे काय उत्तर आहे?" राजाने सावकाराला विचारले.

"याचा अर्थ असा की त्याने माझ्याकडे नकली हारच गहाण ठेवला होता. काय पण लबाडी ही? या जगात न्याय अन्याय, [illegible]" सावकार म्हणाला.

"तरमग ह्यात तुमची काही चूक नाही. तुम्ही दोघे आता गेलात तरी चालेल." राजाने सावकाराला व जयंतला सांगितले. व्यापारी आनंदाने घरी परतला आणि जयंत हताश होऊन निघून गेला.

दोघे निघून गेल्यावर राजा आपल्या मंत्र्याला म्हणाला—"हा सावकार वस्ताद दिसतो. याला मुद्देमालासकट पकडले पाहिजे." मंत्र्याने चकित होऊन विचारले—"महाराज! आपणांस हे कसे काय कळले?"

"अहो, ही सरळ गोष्ट आहे! सावकार सराफीचा धंदा पण करतो आहे. नकली सोने व मोती खरे मानून तो ठेवूनच घेणार नाही. या शिवाय बिचारा तो तरुण मनुष्य फसवायचे ठरवूनच नकली हार ठेवून गेला होता तर तो परत येऊन रुपये तरी कां परत करील? सावकार त्या तरुण माणसाची ओळखपण नव्हती असे म्हणाला. यावरून या सावकाराने या पूर्वीदेखील कित्येक गोरगरिबांना असेच फसविले असणार. म्हणून चककशी केलीच पाहिजे. मी एक युक्ति करावी म्हणतो." असे सांगून राजाने एक उपाय सुचविला.

दुसऱ्या दिवशी मंत्र्याने आपल्या एका नोकराला बोलावून त्याच्या हातात हिऱ्याची एक बांगडी दिली. आणि काय करायचे ते समजावून सांगितले आणि त्या सावकाराकडे पाठविले.

नोकर सावकाराकडे जाऊन म्हणाला—"शेटजी! मी एक परदेशी आहे. येथे व्यापार करायला आलो आहे. माझ्याजवळ आहे ती ही एक हिऱ्याची बांगडी. याची किंमत काही नाही तरी दहा हजार रुपये असेल. आपण घेता का ही?"

सावकाराने त्या मनुष्याकडे वर पासून खालपर्यंत दोनदां तीनदां पाहिले. हिऱ्याची बांगडी पाहून चोरीचा माल असावा असे त्याला वाटले. म्हणाला—"तू म्हणतोस ती किंमत फारच जास्त आहे. मी दोन हजार द्यायला तयार आहे."

"अहो, पण तसे कसे चालेल? कमीत कमी पांच हजार तरी!" नोकर म्हणाला. सावकाराला आतां तो चोरीचाच माल





असला पाहिजे, यात शंका उरली नाही. कारण त्या बांगडीची किंमत कमीत कमी बारा हजार तरी होतीच. म्हणून सावकार म्हणाला–"तू म्हणतो आहेस तर पाचशे आणखी देईन. पाहिजे तर दे नाहीतर परत घेऊन जा."

"बरं तर द्या, तुम्हांला द्यायचे असतील तेवढे!" असे सांगून नोकर अडीच हजार रुपये घेऊन गेला. त्याच वेळी राजधानीच्या कोतवालाने झडतीचे वारंट आणले आणि म्हणाला–"राजवाड्यात चोरी झाली आहे. चोरीचा माल कोठे आहे हे पाहण्यासाठी सर्व सराफ्यांच्या दुकानांची झडती घेण्यासाठी सरकार आज्ञा झाली आहे. कोणी चोरीचा माल आपल्यासारख्या सराफ्याला विकला नसेल कशावरून?"

"या, घ्या तपासून सर्व माल! माझ्याकडे आहे ती हीच एक तिजोरी!" सावकार म्हणाला.

तिजोरी उघडताच वरच ती हिऱ्याची बांगडी दिसली. "ही हिऱ्याची बांगडी राजवाड्यातलीच आहे. हिऱ्याबरोबर चवकशी साठी तिजोरीच घेऊन जातो आणि आपण देखील बरोबर चलावे!" कोतवाल म्हणाला. नाइलाजाने सावकाराला कोतवाला बरोबर जावे लागले. राजवाड्यात सावकाराला एका खोलीत बसण्यास सांगण्यात आले.

त्यानंतर राजधानीभर दवंडी पिटविण्यात आली की अमुक सावकाराकडे कोणी दागिना गहाण ठेवून कर्ज घेतले असेल आणि कर्ज परत देते वेळी जो दागिना मिळाला असेल तो घेऊन सर्वांनी राजवाड्यात हजर व्हावे." दवंडी ऐकून पुष्कळ लोक आले. आलेल्या लोकांपैकी जवळजवळ सर्व लोकांजवळ खोटे नकली दागिनेच निघाले. त्यांच्या जोडीचे खरे दागिने तिजोरीतून निघाले. त्या तिजोरीत जयंतची मोत्यांची माळपण निघाली.

राजाने जयंत आणि इतर लोकांना त्यांचे खरे दागिने परत देऊन टाकले आणि सावकाराला सक्त मजुरीची शिक्षा ठोठावून तुरुंगात पाठविले.





# अलीबाबा आणि चाळीस चोर

[ ३ ]

मर्जीना तळघरात परत आली. तिने प्रेताला स्नान घातले आणि धूप देऊन सर्वांगाला सुवासिक तेल लावले. नंतर अलीबाबाच्या मदतीने प्रेतावर पांढरी चादर टाकून प्रेते नेण्याची पेटी विकत घेऊन यायला निघाली.

पेटी आणल्यावर तिच्यात प्रेत ठेवून त्यावर जाडजाड चादरी पांघरून ठेवल्या. मशीदीतून इमाम व इतर वृद्ध मंडळींना बोलावण्यात आले. शेजारपाजारची पुरुष मंडळी प्रेतयात्रेस निघाली. त्यांनी पेटीला खांदा दिला. अलीबाबा व त्याची मित्रमंडळी प्रेतामागून चालत होती. अलीबाबाची बायको व शेजारपाजारची बायका मंडळी घरीच शोक करायला राहून गेली. अशातऱ्हेने कासिमची अन्त्येष्टी क्रिया संपली आणि कोणाला आतां संशय करायला जागा उरली नाही.

एका महिन्यानंतर चोरांनी परत आल्यावर गुहेत कासिमच्या शरिराचे सहा तुकडे नाहीसे झालेले पाहिले. चोरांचा सरदार आपल्या साथी चोरांना म्हणाला–"मित्रहो! आपली ही गुहा आता गुप्त राहलेली नाही. आपण ज्या माणसाला ठार करून गुहेत टांगून ठेवले होते त्याचा साथीदार नक्कीच कोणीतरी आहे. त्याचा शेवट झाला पाहिजे. नाहीतर आपल्या जिवाला धोका राहील तो राहील. म्हणून आपल्या पैकी एकाने फकिराचा वेष करून हुशारीने ते प्रेत कोठे आहे हे शोधून काढावे. जो कोणी या प्रयत्नात अयशस्वी ठरेल त्याला मृत्यदंड सोसावा लागेल. हे सर्वांच्या हितासाठी मला सांगावे लागत आहे."

सरदार म्हणाला ते ऐकून एक जण प्रेताचा शोध लावण्यास तयार झाला.



सर्वांनी त्याच्या साहसाची वाखाणणी केली. तो फकिराचा वेष करून एके दिवशी उजाडताच गावात गेला. दुकाने उघडली नव्हती, पण मुस्तफा आपल्या घरासमोर बसून पादत्राणे शिवीत होता. त्याने मान वर करून पाहिले तर एक फकीर त्याच्याचकडे येत असलेला दिसला.

"अरे, या वयांतदेखील तुला चांगले दिसते की रे आणि तुझे हात कांपत नाहीत. आश्चर्य आहे!" फकिराचा वेष करून आलेला चोर म्हणाला.

"ही सर्व त्या परवरदिगार अल्लाची मेहेरबानी आहे. मला अजून चांगले दिसते. कोणाच्या मदतीशिवाय सुईत दोरा ओंवता येतो.. दाट काळोखांत शरिराचे सहा तुकडे शिवता येतात." मुस्तफा स्वतःची प्रशंसा ऐकून फुलून जाऊन म्हणाला.

फकिराला अनायास त्याला पाहिजे असलेला माणूसच भेटल्याबद्दल फार आनंद झाला. त्याने मनातल्या मनात अल्लाचे आभार मानले, पण उघड आश्चर्य वाटलेले दर्शवीत म्हणाला–"प्रेताचे सहा तुकडे, म्हणजे? या देशातला तसा काही रिवाज आहे वाटते? प्रेताचे सहा तुकडे करून पुन्हां शिवतात का? असे कशासाठी करतात?"

मुस्तफा स्मित करून म्हणाला–"वा:! असा कोठे रिवाज असतो का? त्यात एक गुपित आहे, पण ते मी सांगू शकणार नाही. शिवाय झोपून उठल्यावर सकाळी मला सर्व गोष्टी बरोबर आठवतपण नाहीत!"

फकीर मोठ्याने हसला व म्हणाला–"वा रे! तू तरी विचित्रच मनुष्य दिसतोस की! मला काय करायचे आहे परक्यांच्या गुपिताशी? पण तू रागावणार नसशील तर मी विनंती करावी म्हणतो. प्रेताचे सहा तुकडे तू ज्या घरात शिवून दिलेस ते घर तेवढे दाखव."

असे सांगून फकिराने मुस्तफाच्या हातात एक सोन्याचे नाणे ठेवले.

"फकीर साहेब! मला ते घर कसे कळणार हो? कोणती तरी पोरगी मला डोळ्यावर पट्टी बांधून त्या घरापर्यंत घेऊन गेली होती. त्या मुलीविषयी मला विशेष काही माहीत नाही. पण तुम्ही मला डोळ्यांवर पट्टी बांधून घेऊन गेलात तर कदाचित मी तुम्हांला त्या जागेच्या जवळपास घेऊन जाऊ शकेन." मुस्तफा म्हणाला.

"असे बोल ना, मग काय, थोड्या वेळात ती जागा सुद्धा सांपडेल." फकीर म्हणाला.

आपली स्तुती ऐकून मुस्तफा खूष झाला होता, आणि आता एक दीनार त्याच्या खिशात पोचला होता. तो डोळ्यावर पट्टी बांधून घेऊन हळूहळू चाचपत अलीबाबाच्या घरापर्यंत फकीराला घेऊन गेला आणि म्हणाला–"हेच घर असले पाहिजे. या गाढवांचा वास पण मी ओळखला. याच खुंटयाला ठेच लागली होती मला."

फकिराला परमानंद झाला. त्याने मुस्तफाच्या डोळ्यावरची पट्टी सोडली, त्याच्या हातात आणखी एक दीनार दिला आणि अलीबाबाच्या घरावर चुन्याने एक खूण करून ठेवून तो आपल्या गुहेकडे निघाला आणि मुस्तफा आपल्या घरी निघून गेला.

थोड्या वेळाने मर्जीना बाजारात जायला घराबाहेर आली तेव्हां तिला दारावर चुन्याने केलेली खूण दिसली. तिने बराच वेळ विचार केला. ही खूण आली कोठून? मी केली नव्हती. शत्रूचेच हे काम असले पाहिजे. त्याला चकविले पाहिजे. असा





विचार करून त्या गल्लीतल्या प्रत्येक घरावर तिने तशीच खूण करून ठेवली आणि म्हणाली—"बस हुडकत आता!"

दुसऱ्या दिवशी ते सर्व चोर दोन दोन तीन तीन असे गावात आले आणि त्यांच्या साथीदाराने ज्या घरावर खूण करून ठेवली होती त्या घराचा शोध करू लागले. परंतु गल्लीतल्या प्रत्येक घरावर ती खूण पाहून ते चकित झाले. गल्लीत प्रत्येक घरात ते चवकशी करू लागले तर लोकांना संशय येईल. म्हणून चोरांच्या सरदाराने सर्व साथीदारांना जंगलातल्या गुहेत पाठवून दिले. तेथे ज्या साथीदाराने अलीबाबाच्या घरावर खूण करून ठेवल्याचे सांगितले होते त्याला पूर्वी ठरल्याप्रमाणे ठार करण्यात आले. त्यांच्या गुप्त गुहेचा शोध परक्या माणसाला लागला व तो कोण हे न कळल्यामुळे चोरांचा राग जास्तच वाढला. दुसऱ्या दिवशी चोरांचा आणखी एक साथीदार निघाला. त्याने देखील मुस्तफाच्या मदतीने अलीबाबाचे घर शोधून काढले. त्याने त्या घरावर एक तांबड्या रंगाची खूण करून ठेवली. परंतु मर्जीनाच्या नजरेआड ती गोष्ट कशी घडणार? तिने त्या गल्लीतल्या सर्व घरांवर तशीच खूण करून ठेवली. म्हणून चोरांना अलीबाबाच्या घराचा शोध लागला नाही. जंगलात परतल्यावर दुसऱ्या साथीदाराला पण ठार करण्यात आले.

आपण स्वत: गेल्याशिवाय काम भागणार नाही, असे चोरांच्या सरदाराला वाटले. त्याने देखील मुस्तफाच्या मदतीने अलीबाबाच्या घराचा शोध काढला. परंतु त्याने घरावर काही खूण केली नाही. फक्त ते घर चांगले लक्षपूर्वक पाहून निघून गेला. तो गुहेत आल्यावर साथीदारांना म्हणाला—"मला आपल्या शत्रूचे घर चांगले कळले आहे. त्याला याबद्दल चांगली शिक्षा द्यायचे मी योजले आहे. तुम्ही रुंद तोंडाचे अडतीस बुदले घेऊन या. त्यां पैकी एकात तेल भरून घेऊन या आणि बाकी सदतीस रिकामेच राहू द्या."

चोरांनी बाजारात जाऊन बुदले विकत घेतले. सरदाराच्या सांगण्याप्रमाणे सदतीस जण त्या बुदल्यात शिरून बसले. सरदाराने प्रत्येकाला एक लहानशी तलवार व एक काठी देऊन ठेवली. सर्व बुदल्यांवर तेल सांडल्यासारखे वाटावे म्हणून तेल शिंपडून ठेवण्यात आले. सर्व बुदल्यांची तोंडे खजूरीच्या चटयांचा दाबरा करून बांधून ठेवण्यात आली. नंतर एकेका घोड्याच्या पाठीवर दोन दोन बुदले बांधून त्या घोड्यांना हाकीत चोरांचा सरदार गावात आला.

संध्याकाळच्या सुमारास तो आपल्या घोड्यांसह अलीबाबाच्या घरासमोर येऊन पोचला आणि अलीबाबाला म्हणाला—"मालक! मी आपला गुलाम दास आहे, तेलाचा एक व्यापारी आहे. मला हे गाव नवे आहे. मला ही रात्रभर आपल्या आवारात उतरायला परवानगी द्याल का?"

अलीबाबाला आपली गरीबी आठवत होती. विसर पडेल इतके दिवस पण झाले नव्हते. तो चोरांच्या सरदाराला म्हणाला—"अहो, या, घरात या. रात्रभर आमच्या घरी आराम करा." असे सांगून तो सरदाराला आपल्या घरातल्या अंगणात घेऊन गेला आणि मर्जीना व अब्दुल्ला एका गुलामाला बोलावून म्हणाला—"तेलाचे



बुदले उतरवून ठेवायला यांना मदत करा. घोड्यांना दाणा द्या."

सर्व बुदले घराच्या पिछाडीला रांगेत ठेवण्यात आले. घोड्यांना भितीशेजारी बांधण्यात आले आणि त्यांना दाण्याचे तोबरे देण्यात आले. चोरांच्या सरदाराला अलीबाबा मुळीच ओळखू शकला नाही. म्हणून त्याला घरात प्रेमादराने बोलावून घेऊन गेला आणि आपल्याबरोबर जेवायला बसायला सांगितले. नंतर आपल्या पाहुण्याला म्हणाला—"हे आपलेच घर आहे. परकेपणा वाटून घेऊ नका." नंतर अलीबाबा जाऊन झोपला.

चोरांचा सरदार काहीतरी कारण काढून पिछाडीला बुदले ठेवले होते तिकडे गेला

आणि प्रत्येक बुदल्याजवळ जाऊन म्हणाला– "मी खडा टाकून खूण केल्याबरोबर बाहेर या. आज रात्री सर्वांची डोकी छाटून टाकायची आहेत." असे गुप्तपणे सांगून तो घरात निघून गेला. मर्जीना दिवा घेऊन झोपायच्या खोलीत आली. चोरांचा सरदार घोरू लागला होता.

मर्जीना ताटवाटचा घाशीत होती. मध्येच तेल संपल्यामुळे दिवा विझला. ती त्या दिवशी बाजारातून तेल आणायला विसरली होती. ती घरातल्या गुलामाला विचारू लागली–"कायरे अब्दुल्ला! तेल संपले, हे सर्व काम कसे संपणार?"

अब्दुल्ला स्मित करून म्हणाला– "पिछाडीला अडतीस बुदले भरून तेल आहे आणि तुला तेलाची फिकीर पडली आहे. तू स्वत:ला मोठी अक्कलवान, हुशार मानतेस ना! मर्जीनाची थट्टा करीत अब्दुल्ला झोपायला निघून गेला.

मर्जीना एक भांडे घेऊन पिछाडीला गेली व खजुराच्या चटईचा दादरा सोडून [illegible] पण तेला ऐवजी काहीतरी कडक हाताला लागले. आत बसलेला मनुष्य "किती वाजले?" म्हणत उठून उभा राहिला.

रात्रीच्या वेळी बुदल्यातून एकाएकी एक लांब दाढीवाला मनुष्य उठून उभा राहिलेला पाहून आणखी दुसरा कोणी असता तर घाबरूनच गेला असता. पण मर्जीनाने स्वत:ला सावरून शांतपणे उत्तर दिले. तुझा मालक अजून छान घोरतो आहे. म्हणून आणखी थोडया वेळाने. थांब काही वेळ?"

मर्जीनाला तत्काळ सर्व कट कळला. ती प्रत्येक बुदल्याजवळ जाऊन म्हणाली– "अजून वेळ झाला नाही. आणखी थोडा वेळ थांबा!" नंतर तिने बुदल्यात बसलेल्या सदतीस जणांना मोजून पाहिले. आणि शेवटी तेलाच्या बुदल्याजवळ थांबून त्यातले तेल काढून घेतले आणि घरात जाऊन दिव्यात तेल घातले. नंतर त्या धोक्यातून सुटका शोधण्यासंबंधी विचार करू लागली.

(पुढल्या अंकात संपूर्ण)





# खरे ज्योतिष

एका गावी एक ज्योतिषी होता. तो भविष्य सांगून पैसे मिळवी व त्यावर त्याचा उदरनिर्वाह उत्तम प्रकारे चाले. लग्न, गृहप्रवेश, प्रवास व शुभकार्य असले की गावातले लोक त्याच्याकडे मुहूर्त विचारायला येत. खरोखरी त्याला ज्योतिष माहीत नव्हते. परंतु तो भविष्य वर्तवी ते केव्हांकेव्हां खरेदेखील निघे. म्हणून त्याच्या भविष्यावर गावकऱ्यांचा विश्वास होता.

एक दिवशी सोमशास्त्री नामक ब्राह्मणाने ज्योतिषीबुवांना येऊन त्यांना त्या दिवसाचे आपले भाग्य सांगायला सांगितले.

ज्योतिष्याने त्याला दिवसभर थोडे सावध रहायला सांगितले. म्हणाला– "इतरांच्या तोंडी काही ऐकून तुम्हांला नुकसान होण्याची शक्यता आहे."

सोमशास्त्री ते ऐकून घरी परतला. थोडया वेळाने रामशास्त्री नामक एक ब्राह्मण त्याच्या घरी येऊन म्हणाला–"अरे ऊठ! निघायला हवे, शेजारच्या गावी मोठे जेवण आणि मोठी दक्षिणा आहे."

सोमशास्त्रीला ज्योतिष्याची भविष्यवाणी आठवली. दुसऱ्याचे म्हणणे ऐकले की नुकसान होण्याची शक्यता आहे. त्या दिवशी गावच्या कुळकर्ण्यांकडेच कसले तरी व्रत अनुष्ठान होते. रामशास्त्रीच्या सांगण्याप्रमाणे शेजारच्या गावी गेलो तर व्रत अनुष्ठानाचा पुण्यलाभ चुकेल आणि शेजारच्या गावी काही मिळणार नाही कारण ज्योतिष्याने सांगितल्याप्रमाणे नुकसान होईल. असा विचार करून तो रामशास्त्र्याला म्हणाला–"आज येत नाही बुवा!"

सोमशास्त्री कुळकर्ण्यांच्या घरी गेले, व्रत अनुष्ठान संपवून चार आणे दक्षिणा घेऊन घरी परत आले.

श्रीमती निर्मला घाटे








संध्याकाळी शेजारच्या गावाहून परतल्यावर रामशास्त्री त्याला म्हणाले–"मी बोलाविले तरी तू आला नाहीस. त्या गावच्या श्रीमंताच्या घरी केवढे मोठे जेवण होते. त्यांनी सर्व ब्राह्मणांना एक एक रुपया दक्षिणा देऊन धोतर उपरणे पण दिले."

सोमशास्त्रीला ते ऐकून पश्चात्ताप होऊ लागला. आपण ज्योतिष्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून गेलो असतो तर दक्षिणा व धोतर उपरणेपण मिळाले असते. सोमशास्त्रीने गावच्या पाटलाकडे जाऊन फिर्याद केली–"ज्योतिषी लोकांना फसवितो आहे. त्याने कित्येकांना असेच फसविले आहे. त्याला गावाबाहेर हाकलून लावावे. माझे फार मोठे नुकसान झाले." नंतर सकाळी ज्योतिष्याकडून त्या दिवसाचे भविष्य विचारून घेतल्याचे व पुढे जे घडले त्याचे वृत्त सांगितले.

पाटलांनी ज्योतिष्याला बोलावून विचारले–"काय हो, तुम्ही सांगितलेल्या भविष्य वाणीमुळे सोमशास्त्रीचे फार मोठे नुकसान झाले."

ज्योतिषी प्रथम थोडा घाबरला. पण थोड्या वेळाने स्वतःला सावरून व सकाळी सांगितलेले भविष्य आठवून म्हणाला–"पाटील साहेब! मी खोटे भविष्य सांगितले नव्हते. दुसऱ्याचे म्हणणे ऐकल्यास नुकसान होईल असे मी सांगितले होते. आज या ब्राह्मणाच्या भाग्यात तेच होते व तेच खरे ठरले. त्यात माझा दोष काय?"

"तुझे म्हणणे ऐकून सोमशास्त्री रामशास्त्रीच्या बोलवण्यावर शेजारच्या गावी गेला नाही. मग तुझे म्हणणे खरे कसे काय निघाले?" पाटलाने विचारले.

दुसऱ्यांचे म्हणणे, याचा अर्थ फक्त रामशास्त्र्याचे म्हणणे असा नव्हे. मी सांगितले ते देखील दुसऱ्याचेच म्हणणे होते नाही का? भाग्य कोण बदलू शकेल? स्वतः ब्रह्मदेवाला तरी शक्य आहे का?" ज्योतिष्याने विचारले.

ते ऐकल्यावर सोमशास्त्री निरुत्तर झाला. काही बोलल्याशिवाय खाली मान करून घरी निघून गेला.





# थोरा मोठ्यांकडची मेजवानी

एका गावी एक जमिनदार रहात असे. तो फार श्रीमंत होता. त्याला आपल्या श्रीमंतीची घमेंड देखील होती. त्या गावी श्रीमंत माणसांची घरे मोजकीच होती. सर्व सामान्य लोक शेतकरी होते. जमिनदार सर्वांवर आपला राग काढी. त्यांच्यापैकी कोणी नुसता जरा जवळून गेला की म्हणे, 'काय पण ओंगळ आणि घामट माणसे आहेत.' म्हणून जमिनदारापासून शंभर पावलावर देखील उभे राहायची कोणाची छाती नव्हती.

एकदा शेतात शेतकरी असे घमेंडीत सांगू लागले–"आज मी जमिनदाराला इतक्या अंतरावरून पाहिले आणि मी इतक्या अंतरावरून!" तेव्हां एक गरीब शेतकरी म्हणाला–"अरे एखाद्या झाडावरून किंवा भिंतीच्या आडून जमिनदाराला पाहण्यात कोणते मोठेपण आहे? माझ्या मनात आले तर मी त्याच्याकडून मेजवानीचे जेवण जेवून येईन. पाहिजे तर पैज मारून पहा."

ते ऐकून इतर शेतकऱ्यांना राग आला. त्यांच्यापैकी एकजण म्हणाला–"चेहरा पहा, स्वारीचा, जमिनदाराच्या घरी मेजवानीला जाण्यासारखाच आहे की नाही? जमिनदार तुला फाटकाच्या दारात पाऊल तरी ठेवू देईल का? काय गप्पा मारतो आहेस. तुला उचलून एखाद्या घाणेरड्या डबक्यात फेकून दिले तर मला आश्चर्य वाटणार नाही. आपली वटवट बंद कर. आम्ही मूर्ख आहो असे वाटले होय तुला?"

"मला उगाच घमेंड करण्याची गरजच काय? खरे ते मी सांगून टाकले. मी वाटेल तेव्हां जमिनदाराच्या घरी जाऊन जेवून येऊन दाखवीन." गरीब शेतकरी म्हणाला.

"तू हे करून दाखविलेस तर तुला दीडमण धान्य आणि बैलाची एक जोडी








बक्षिस देऊ. पण जर का तू जमिनदाराच्या घरी जाऊन आला नाहीस तर आम्ही तुला देऊ ते काम करावे लागेल. विचार करून काय ते उत्तर दे.'' शेतकऱ्यांनी जणुकाही त्याला आव्हानच दिले.

“मी ही पैज मान्य करायला तयार आहे.'' गरीब शेतकरी म्हणाला.

त्याच दिवशी तो गरीब शेतकरी जमिनदाराच्या घरी गेला. पाहरेकऱ्यांनी त्याला हाकलून लावण्याचा प्रयत्न करून पाहिला.

“थोडे थांबा! मालकांना एक शुभवार्ता द्यावयाची आहे.'' गरीब शेतकरी म्हणाला.

“अरे, ती वार्ता आम्हांला सांग. आम्ही मालकांकडे पोचती करू.'' पाहरेकरी म्हणाला.

“ही शुभवार्ता मीच मालकांना कळविणे आवश्यक आहे. मी तुम्हांला नाही सांगणार.'' शेतकऱ्याने चोख उत्तर दिले.

पाहरेकऱ्यांनी शेतकरी म्हणाला ते जमिनदाराला जाऊन सांगितले. जमिनदाराच्या मनात ती शुभवार्ता ऐकण्याची उत्सुकता वाढली. हा शेतकरी काहीतरी फायद्याची वार्ता घेऊन आला असला पाहिजे. इतरांसारखा भीक मागायला आलेला दिसत नाही. म्हणून जमिनदाराने त्या शेतकऱ्याला बोलावून घेऊन यायला पाहरेकऱ्यांना सांगितले.

पाहरेकऱ्यांनी शेतकऱ्याला जमिनदारासमोर हजर केले. “कोणती शुभवार्ता घेऊन आला आहेस बाबा?'' जमिनदाराने शेतकऱ्याला प्रेमाने विचारले.



“ती गोष्ट मी एकांतात आपल्याला सांगू शकेन.'' शेतकरी म्हणाला.

जमिनदाराची उत्सुकता जास्तच वाढली. त्याने आपल्या पाहरेकऱ्यांना बाहेर जायला सांगितले.

शेतकरी गुप्तपणे म्हणाला–“मालक! घोड्याच्या डोक्याइतक्या सोन्याची किंमत किती असू शकेल?''

“अरे पण हा प्रश्न तू कशासाठी विचारीत आहेस!'' जमिनदाराने विचारले.

“आपल्याला माहीत नसेल तर सांगतो.'' शेतकरी म्हणाला.

“अरे तेच कशाला ते सांग ना!'' जमिनदार म्हणाला.

शेतकरी दीर्घ श्वास घेत म्हणाला– “आपल्याला सांगायचे नसेल तर मी तरी काय करू? आपली आज्ञा असेल तर घरी जाऊन खाऊन पिऊन येतो. भूक लागली आहे.''

जमिनदाराला त्याला परत पाठविणे आवडले नाही. घोड्याच्या डोक्याच्या एवढे सोने हातातून निसटून गेलेले त्याला पसंत नव्हते. म्हणून नोकराला बोलावून त्या शेतकऱ्याला पोटभर जेवायला वाढायला निरोप पाठविला.

शेतकरी पोटभर जेवून आल्यावर जमिनदाराने विचारले–“तू सोने म्हणालास, ते घेऊन ये. सोन्याविषयी मला तुझ्यापेक्षा जास्त कळते. तुला मी मोठे बक्षिस पण देईन.''

“सोने? माझ्याकडे कोठे आहे एवढे सोने! साठ शेर धान्य व बैलाच्या जोडीची किंमत घोड्याच्या डोक्या एवढे सोने विकत घ्यायला पुरेल का, हे मी विचारीत होतो.'' शेतकरी म्हणाला.

ते ऐकून जमिनदाराला भयंकर राग आला. म्हणाला–“लुच्चा! तू एक मिनिटभर देखील समोर उभा राहलास तर तुला जागच्याजागी उभा चिरून खाईन!''

शेतकरी निघून गेला आणि त्याने पैज जिंकली. त्याला दीडमण धान्य व एक बैलांची जोडी मिळाली.



# सर्वांनाच ते कसे जमणार ?

शेतांची कापणी होऊन गेली होती आणि झोडपणीचे काम सुरू होणार होते. एका गावी दोन योगी आले. एका श्रीमंताला पाहून म्हणाले–"काय हो, आज रात्री आपल्याकडे जेवायला झोपायला मिळेल का ?"

"मी आळशी लोकांना दान करीत नाही. रात्री आपल्या घरी मी जेवायला वाढीन व झोपायला पण जागा देईन. परंतु उजाडल्यावर तुम्ही माझ्या खळयातल्या एका गंजीतले धान्य झोडपून दिले पाहिजे." श्रीमंत माणसाने अट घातली. दोघां योग्यांनी ती अट मान्य केली.

चांगले उजाडले तरी योगी न उठलेले पाहून श्रीमंत माणसाने त्यांना जागे केले आणि म्हणाला–"मोठे आळशी दिसता की रे ! लोळत पडला आहां !"

"झोडपणीचे कामच ना ? ते काय मोठे से ?" असे म्हणत दोन्ही योगी हातात एक चूड घेऊन खळयात गेले. तो श्रीमंत मनुष्य त्यांना अडवू लागला. परंतु त्या योग्यांनी पुढे जाऊन ती चूड गंजीला लावल्याबरोबर गंजीने पेट घेतला आणि काय आश्चर्य एकदम ती विझली आणि पेंढा व धान्य निरनिराळे झालेले दिसले. योगी काही बोलल्या शिवाय निघून गेले.

"ओ हो ! असे होय ?" असे म्हणत त्या श्रीमंत माणसाने तीच चूड घेऊन गंजींना आग लावली. पण झाले उलटे, राखेचे ढीगच काय ते उरले.





# बुद्धिमान माणसे

एका गरीब माणसाला तीन मुलगे होते.

तो आपल्या मुलांना म्हणाला–"मुलांनो आपल्या जवळ जमीनजुमला किंवा गाई म्हशी नाहीत. म्हणून देवाने जी बुद्धी दिली आहे तिच्या जोरावर आपला उदरनिर्वाह चालविला पाहिजे."

मुलांनी बापाची शिकवण लक्षात ठेवून आपले बौद्धिक सामर्थ्य वाढविण्याचा प्रयत्न केला. वडील वारल्यावर तिघे आपले गाव सोडून देशाटनाला निघाले.

अनेक दिवस प्रवास केल्यावर ते एका शहराजवळ येऊन पोचले. मोठा भाऊ काहीतरी पहात थांबून म्हणाला–"थोडया वेळापूर्वी इकडून एक उंट गेलेला दिसतो."

दुसरा भाऊ रस्त्याच्या दोन्ही बाजूंना पाहून म्हणाला–"आणि त्या उंटाला एकच डोळा आहे."

आणखी थोडे अंतर चालून गेल्यावर तिसरा भाऊ म्हणाला–"आणखी एक गोष्ट दिसली, त्या उंटावर एक बाई व तिचे लहान मूल आहेत."

तिघे पुढे निघाले. पाठीमागून एक मनुष्य घोडयावर बसून आला. तिघां भावंडांनी त्याला तो काहीतरी शोधत असल्या-सारखे पाहून विचारले–"तुम्ही उंट शोधत आहां का ?"

"होय, कां ?" घोडेस्वाराने विचारले.

"तो मोठा उंट आहे, नाही का ?" मोठ्या भावाने उत्तरादाखल प्रश्न केला.

"होय !" घोडेस्वार म्हणाला.

"त्याच्या डाव्या डोळ्याला दिसत नाही, होय ना ?" दुसऱ्या भावाने माहीत असल्या-सारखे विचारले.

"अगदी बरोबर !" उंटाचा मालक म्हणाला.



"त्या उंटावर बसून, एक बाई व एक मूल जात आहेत, होय ना?" तिसऱ्या भावाने विचारले.

घोडेस्वाराने संशयी नजरेने तिघांकडे पाहून विचारले–"म्हणजे तुम्हीच माझा उंट चोरलेला दिसतो आहे?"

"अहो, आम्ही तुमचा उंट पाहिला सुद्धा नाही." तिघे म्हणाला.

"तरमग काय हो तुम्हांला उंटाच्या सर्व खाणाखुणा कशा काय कळल्या?" घोडेस्वाराने विचारले.

"मनुष्याने आपल्या डोळ्यांचा व अकलेचा उपयोग केला तर पुष्कळ गोष्टी आपोआप कळतात. तुम्ही या वाटेने सरळ गेलात तर तुम्हांला तुमचा उंट नक्कीच सापडेल." तिघे भाऊ म्हणाले.

"आम्ही नाही कोठे जात! तुम्हीच माझा उंट चोरून कोठे तरी लपवून ठेवला आहे! देता की नाही माझा उंट?" घोडेस्वाराने त्यांना दटावून विचारले.

"अहो आम्ही सांगितले नाही का की आम्ही तुमचा उंट पाहिला देखील नाही." तिघे एक स्वरात म्हणाले.

घोडेस्वार तलवार उपसून तिघांना दरडावून धमकावून त्या देशाच्या राजाकडे घेऊन गेला. त्या घोडेस्वाराने तिघांनी त्याचा उंट चोरून नेल्याची फिर्याद राजाकडे केली. म्हणाला–"महाराज! मी आपले उंट हाकून घेऊन जात होतो. माझी बायको व मुलगा एका उंटावर बसून बरोबर निघाले. वाटेत एका जागी आमची चुकामूक झाली. मी त्यांना हुडकत येत असता हे तिघे भेटले. या तिघांनी मिळून माझा उंट चोरून नेला असावा असा मला संशय आहे. यांनी माझ्या बायकोला व मुलाला ठार करून उंट चोरला असल्यास नवल नाही."

"तसा संशय यायला कारण किंवा काही पुरावा?" राजाने विचारले.

"मी काही विचारल्याशिवायच यांनी माझ्या उंटाचे वर्णन केले–'तो मोठा आहे, त्याला एका डोळ्याने दिसत नाही व [illegible] वगैरे." घोडेस्वार म्हणाला.

"तरमग हे तिघे चोर असलेच पाहिजेत!" राजा म्हणाला. नंतर त्या तिघांकडे वळून राजाने विचारले–"काय रे कोठे आहे उंट?"

तिघे म्हणाले–"महाराज! आम्ही चोर नाही. आम्ही उंट पाहिलादेखील नाही."

"तुम्ही उंटाचे इतके सविस्तर वर्णन केलेत ते कसे? आणि म्हणता आम्ही चोर नाही!" राजाने दटावून विचारले.

"महाराज! त्यात आश्चर्याची गोष्ट कोणती? आम्ही तिघे लहानपणापासूनच आपल्या डोळ्यांचा नीट उपयोग करीत आलो आहो. त्यामुळे आम्हांला अनेक गोष्टी नुसत्या पाहून कळू लागल्या आहेत" तिघे भाऊ म्हणाले.

राजा व्यंग्यपूर्ण स्मित करून म्हणाला–"तुम्ही उंट पाहिला देखील नाही, अन् हुबेहूब वर्णन कसे करता आले?"

"कां नाही, शक्य आहे महाराज!" तिघे म्हणाले.

"तरमग मी तुमच्या त्या शक्तीची आताच परीक्षा करवून पाहातो." असे सांगून राजाने आपल्या मंत्र्याला बोलाविले आणि त्याच्या कानात काहीतरी सांगितले. मंत्री बाहेर निघून गेला. आणि थोड्या वेळाने परत आला. आणखी थोड्या वेळाने दोन नोकर एक पेटी उचलून घेऊन आले आणि ती राजासमोर ठेवून निघून गेले.





त्या पेटीकडे बोट दाखवीत राजाने तिघां भावांना विचारले–"बोला, चोरांनो, या पेटीत काय आहे ?"

मोठा भाऊ म्हणाला–"महाराज, आम्ही पहिल्यानेच, आम्ही चोर नाही हे आपणांला निवेदन करून सांगितले. आतां आपण विचारलेच आहे म्हणून सांगतो, या पेटीत कोणती तरी गोल वस्तू दिसते आहे."

"ते एक डाळिंब आहे." दुसरा म्हणाला.

"ते डाळिंब देखील कच्चे आहे, पिकलेले नाही !" तिसरा म्हणाला.

तिघांनी सांगितले ते बरोबर आहे की नाही हे पाहण्यासाठी राजाने आंतली वस्तु बाहेर काढायला सांगितली. ते डाळिंब होतं. ते पाहून सर्व दरबारी चकित झाले.

ते पाहून राजा घोडेस्वाराला म्हणाला–"हे तिघे चोर नाहीत. फार हुशार व बुद्धिमान माणसे दिसतात ही ! तू आपला उंट कोठे गेला. हे जाऊन शोध !"

त्यानंतर राजाने तिघांचा सत्कार केला आणि त्यांच्या जेवणाखाण्याची उत्तम व्यवस्था करून नंतर विचारले–"आता तुमच्यावर कोणताही आरोप नाही व कोणते ही बंधनपण नाही. परंतु तुम्ही हे सांगा, त्या उंटाविषयी तुम्हांला इतकी बरोबर माहिती कशी काय कळली ?"

मोठा भाऊ म्हणाला–"आम्हांला वाटेत उंटाच्या पावलांच्या मोठ्या खुणा स्पष्ट दिसल्या, म्हणून मोठा उंट त्या बाजूने गेल्याचे आम्हांला कळले. थोड्या वेळाने घोडेस्वार काहीतरी शोधत तिकडे आला तेव्हां आम्हांला वाटले की तो उंटाच्या शोधार्थ असावा."

"ते सर्व ठीक. पण त्या उंटाला एका डोळ्याने दिसत नाही, हे तुम्हांला कसे कळले ?" राजाने विचारले.

ते ऐकून दुसरा भाऊ म्हणाला–"तो उंट रस्त्याच्या फक्त डाव्या बाजूलाच चरत गेल्याची स्पष्ट चिन्हे दिसत होती."

नंतर राजाने विचारले–"हे सर्व ठीक ! पण त्या उंटावर एक बाई व एक मूल आहे, हे तुम्हांला कसे काय कळले ?"

[illegible] भाऊ [illegible] "[illegible] जागी उंट आपले पुढले पाय टेकून बसल्याची चिन्हे आम्हांला दिसली. जवळच एका बाईच्या व लहान मुलाच्या पावलांच्या खुणा दिसल्या."

"वा: ! याला म्हणतात बुद्धि ! पण काय हो, पेटीत डाळिंब आहे आणि ते कच्चे आहे हे कसे काय कळले तुम्हांला ? येथे तर काही चिन्हे किंवा खाणाखुणा नव्हत्या !" राजाने विचारले.

मोठा भाऊ म्हणाला–"महाराज ! नोकर जेव्हां पेटी उचलून घेऊन आले तेव्हां त्यांच्या चालण्यावरून पेटी वजनी नसल्याचे व रिकामी असल्याचे आम्हांला कळले. नंतर त्यांनी पेटी खाली ठेवली तेव्हां आत एक वस्तु गडगडत एका बाजूला गेलेली ऐकू आली. त्यावरून ती वस्तु लहान व गोल असल्याचे आम्हांला कळले."

"आणि ती पेटी डाळिंबांच्या बागेतून आणतांना आम्हांला दिसली. तेव्हां मला वाटले ते डाळिंबच असावे आणि डाळिंब देखील कच्चेच." दुसरा भाऊ म्हणाला.

"डाळिंब असावे हे वाटणे साहजिक आहे, पण ते कच्चेच असावे, हे कसे काय कळले ? हे थोडे विचित्र दिसते !" राजाने प्रश्नार्थी तिघांकडे पाहिले.

तेव्हां तिसरा भाऊ म्हणाला–"त्यात विचित्र असे काहीच नाही महाराज ! फळं पिकायला अजून पुष्कळ दिवस लागतील. डाळिंबे पिकायचा मोसम सुरू सुद्धा झाला नाही, हे माहीत असल्यावरून आम्ही सांगितले. पाहिजे तर डाळिंबांच्या बागेत जाऊन पाहून यावे. सर्व झाडांवर कच्ची डाळिंबेच दिसतील." खिडकीतून दिसणाऱ्या डाळिंबांच्या झाडांकडे बोट दाखवीत तिसरा भाऊ म्हणाला.

राजा तिघांची हुशारी पाहून खूष झाला व म्हणाला–"खरोखरच तुम्ही सर्वच हुशार दिसतां. तुमच्यासारख्या हुशार व बुद्धिमान लोकांची किती आवश्यता आहे आम्हांला !" असे सांगून राजाने तिघांना आपल्या पदरी नोकरी दिली.



# सोने करण्याची रीत

गुप्त राजांच्या कारकीर्दीत चोरी करण्याला फार कडक शिक्षा होत असे.

पाहरेकऱ्यांनी एका चोराला चोरी करतांना पकडले आणि राजासमोर आणून उभे केले. राजाने चोराला हात कापून टाकायची शिक्षा सांगितली.

शिपाई चोराला शिक्षा देण्याच्या जागेवर उभा करून राजा येण्याची वाट पाहू लागले. महाराज आल्याबरोबर चोर राजाला म्हणाला–"महाराज ! सोने कसे करायचे हे मला माहीत आहे. माझ्या या हाताबरोबर माझी ही विद्या नष्ट होईल."

"कायरे, तुला सोने तयार करण्याची रीत माहीत असून तू चोरी केलीसच कां ?" राजाने चोराला विचारले.

"महाराज ! ते माझे दुर्दैव ! कारण ज्या माणसाने आयुष्यात कधी चोरी केली नाही त्यालाच ही विद्या लाभते. ही विद्या अवगत करण्या पूर्वी मी चोरी केली होती. म्हणून आपल्यासारख्या सत्पुरुषाला ही विद्या शिकवून द्यावी, म्हणतो." चोर म्हणाला.

राजाने विचार केला. त्याने लहानपणी चोरून काही खाल्ले होते. म्हणून त्याने आपल्या मंत्र्याला बोलवून ती विद्या शिकून घ्यायला सुचविले. तेव्हां मंत्री म्हणाले–"महाराज ! मी लहानपणी आपल्या वडिलांच्या खिशातून कधी एखादी मोहोर किंवा असेच काहीतरी चोरल्याचे मला आठवते."

त्यानंतर राजाने एकेक करून आपल्या सर्व दरबाऱ्यांना विचारले. परंतु सर्वांनी लहानपणी लहान मोठी चोरी केली असल्याचे सांगितले. तेव्हां राजाचे डोळे उघडले. राजाने त्या चोराला एक सामान्यशी शिक्षा करून सोडून दिले.






युधिष्ठिर द्यूतात द्रौपदीला पणावर लावून हारला. आता त्याच्याजवळ काहीच उरले नव्हते. दुर्योधन मोठ्याने ओरडून म्हणाला–"द्रौपदीला बोलवा !"

विदुराला त्याचा भयंकर राग आला. तो दुर्योधनाला म्हणाला–"मूर्खा ! तू शुद्धी-वर आहेस का ? पांडवांना क्रुध करणे म्हणजे सिंहाला चिथवण्यासारखे आहे. द्रौपदी तुझी दासी कशी काय रे ? युधिष्ठिर स्वत:ला हारून बसल्यावर द्रौपदीचा पण लावायला त्याला काय अधिकार ?" नंतर सर्व सभासदांकडे वळून म्हणाला–"हा दुर्योधन मूर्ख आहे. मी म्हणतो ते हा ऐकणार नाही. लवकरच कौरवांचा सर्वनाश निश्चित होणार !"

दुर्योधनाने विदुराच्या म्हणण्याकडे मुळीच लक्ष दिले नाही. त्याने प्रतिकामीला अंत:-पुरात जाऊन द्रौपदीला बोलावून घेऊन येण्यास आज्ञा केली.

प्रतिकामी अंत:पुरात जाऊन द्रौपदीला म्हणाला–"हे द्रौपदी ! युधिष्ठिर तुला द्यूतात पणावर लावून हारला आहे. धृतराष्ट्र महाराजांनी तुला बोलावून घेऊन यायला पाठविले आहे."

"अरे ! उगाच बडबड काय करतोस ? कोणी क्षत्रिय आपल्या पत्नीला कधी द्यूतात पणावर लावतो का ? तुला मतिभ्रम तर झाला नाही ?" द्रौपदी म्हणाली.

"युधिष्ठिर महाराज सर्व राज्य पणावर लावून हारल्यावर त्यांच्याजवळ पण लावा-



मला काही उरले नाही. तेव्हां एकामागून एका स्वत:चे बंधूंना व स्वत:ला पणावर लावून हारले." प्रतिकामी म्हणाला.

"बरे तर तू सभेत जाऊन हे विचारून ये की युधिष्ठिर महाराजांनी प्रथम स्वत:ला पणावर लावले की मला लावले. हारल्यानंतर लावले की आधी." द्रौपदी म्हणाली.

प्रतिकामी सभेत परतला आणि त्याने द्रौपदीने विचारलेली शंका विचारली. ते ऐकून युधिष्ठिराला फार वाईट वाटले. तो मौन बसून राहला. ते पाहून दुर्योधन प्रतिकामीला म्हणाला–"तू द्रौपदीला हा प्रश्न सभेत येऊन विचारायला सांग!"

म्हणून प्रतिकामी पुन्हा द्रौपदीला जाऊन म्हणाला–"सभासदांनी, आपल्याला स्वत: सभेत येऊन तो प्रश्न विचारावा व शंका-निरसन करून घ्यावे असे सांगितले आहे."

"द्रौपदी म्हणाली–"प्रतिकामी! मी सभेत येणे बरोबर नाही. ह्यामुळे कौरवांनाच कलंक लागेल. माझ्या प्रश्नाचे उत्तर हजर असलेल्या वडीलधाऱ्या मंडळींना विचारून ये. ते सांगतील तशी मी वागेन."

प्रतिकामीने परत जाऊन द्रौपदीने विचारलेला प्रश्न सभेत पुन्हा जाऊन विचारला. दुर्योधनाविरुद्ध तो काही बोलू शकला नाही. ते पाहून युधिष्ठिराने प्रतिकामी बरोबर एक दूत द्रौपदीला बोलावून आणण्यासाठी पाठविला. दूताकरवी युधिष्ठिराचा निरोप ऐकून द्रौपदी मासिकधर्मबंधन असूनही सभेत गेली आणि धृतराष्ट्रासमोर जाऊन उभी राहली. पांडवांना मान वर करून द्रौपदीकडे पाहण्याची हिंमत होईना.

पांडवांना त्या मन:स्थितीत पाहून दुर्योधनाचे धाडस वाढले. तो प्रतिकामीला म्हणाला–"तू जाऊन द्रौपदीला माझ्यासमोर ओढून घेऊन ये."

द्रौपदीच्या अंगाला स्पर्श करण्याची प्रतिकामीला भीती वाटत होती. त्याने सभेत उपस्थित असलेल्या वडीलधाऱ्या [illegible] मी [illegible] जाऊन काय सांगू?"

दुर्योधनाला वाटले की प्रतिकामी भीमाला पाहून भयभीत झाला असावा. म्हणून तो दु:शासनाला म्हणाला–"दु:शासना! तू द्रौपदीला धरून ओढून घेऊन ये. हे आपले शत्रू दास झाले आहेत. त्यांना 'ब्र' देखील काढतां येणार नाही."

दु:शासन आपल्या घमेंडीत गेला आणि म्हणाला–"ए द्रौपदी! चल माझ्याबरोबर! तुझे सर्व पति आमच्या हाती हारले आहेत. तुला आतां लाज वाटण्याचे कारण नाही. दुर्योधनावर प्रेम करून कौरवांचे वरण कर!" असे म्हणत तो निर्लज्ज द्रौपदीच्या आणखी जवळ गेला. द्रौपदीचा चेहरा या अकल्पित घटनेमुळे पांढरा फट्ट पडला. ती आपले तोंड दोन्ही हातांनी झांकून गांधारीकडे जाऊ लागली.

दु:शासन तिच्या पाठोपाठ गेला व तिला म्हणाला–"आतां कोठे निघालीस?" असे म्हणत त्याने द्रौपदीच्या केसांनाच हात घातला. पांच महा पराक्रमी वीरांची पत्नी असूनही द्रौपदीच्या सर्वांगाचा थर काप उडाला. ती म्हणाली–"अरे मूर्खा! मी या वेळी बाहेरची आहे. मला सभेत घेऊन जाऊ नकोस."

ते ऐकून दु:शासन म्हणाला–"तू बाहेरची आहेस की विवस्त्र आहेस आम्हांला काय? तुझा नवरा द्यूतात तुला हारवून बसला आहे. आजपासून तू आमच्या अन्य





दासींसारखीच एक आहेस!" असे सांगत तो द्रौपदीला केस धरून ओढीत सभेत आला.

तिची वेणी सुटली होती. पदर सरकला होता. त्या स्थितीत लज्जा व क्रोध यांमुळे तिच्या सर्वांगाचा जणुंकाही भडका उडून गेला. ती म्हणाली–"दुष्टा! तुझ्या पित्या-च्या समक्ष, या सर्व वडील धाऱ्यांसमक्ष मी या स्थितीत उभे राहणे बरोबर नाही. याचा भयंकर परिणाम तुला भोगावा लागेल. या सभेत हजर असलेली सर्व मंडळी धर्मज्ञानी आहेत. पण या दुष्टाला कोणीच कसे बोलत नाहीत? कदाचित भीष्माचार्य, द्रोणाचार्य, विदुरकाका व धृतराष्ट्र काका यांना काही करणे अशक्य झाले असेल!

असे बोलत तिने एकदा केविलवाण्या परंतु तीक्ष्ण नजरेने पांडवांकडे पाहिले.

दुःशासन व्यंग्य करून म्हणाला–"ए दासी! बटबट बंद कर!" ते ऐकून कर्ण, शकुनी व दुर्योधन खदखदां हसले. इतर लोक फार दुःखी झाले. तेव्हां भीष्म द्रौपदीला म्हणाला–"मुली! धर्माच्या गोष्टी आम्ही काय बोलणार? तू पांच जणांची पत्नी! म्हणून युधिष्ठिराला एकट्याला तुला पणावर लावण्याचा अधिकार नव्हता. युधिष्ठिर आपले सर्वस्व सोडायला तयार झाला, परंतु धर्म सोडील असे नाही वाटत आम्हांला. द्यूतांत तुला घालवून त्याने तुझी फसवणूक केली असे कसे म्हणता येईल?"

त्याला उत्तर म्हणून द्रौपदी म्हणाली–"युधिष्ठिराने अनिच्छेने द्यूत खेळून सर्वस्व घालवून बसल्यावर का मला पणावर लावले? पुत्र व सुना यांच्या योगक्षेमाची न्यायाप्रमाणे व्यवस्था करणारे जे कौरव प्रमुख आहेत त्यांनी या गोष्टीचा काय तो न्याय करावा." असे सांगून द्रौपदी रडू लागली. भीम युधिष्ठिराला म्हणाला–"जुगारी आपल्या ठेवलेल्या बायांनादेखील पणावर लावीत नाहीत आणि तू पतिव्रतेला पणावर लावून केवढे मोठे पापकर्म केले आहेस? ज्या हातांनी आपले सर्वस्व व आम्हांला तू घालवून बसला त्याबद्दल आम्हांला काही बोलावयाचे नाही. परंतु द्रौपदीला पणावर लावणारे हे हात जाळून टाकले पाहिजेत. सहदेव! जा जाऊन विस्तव घेऊन ये."

अर्जुनाने भीमाला अडविले व त्याची समजूत घालीत म्हणाला–"भीमदादा! तू इतका वेळ शांत राहलास आणि आता युधिष्ठिर दादाला असे उलटे काय बोलतो आहेस? या जुगाऱ्यांच्या मध्ये बसून तुझी बुद्धी सुद्धा भ्रष्ट झाली आहे की काय? युधिष्ठिर दादा स्वतः होऊन हौशीखातर द्यूत खेळायला आला नाही. कौरवांनी त्याला निमंत्रण केले होते आणि क्षत्रिय धर्माचे पालन करण्यासाठीच त्याने द्यूतात भाग घेतला."

द्रौपदीच्या प्रश्नाचे उत्तर सभेत कोणी देऊ शकला नाही. तेव्हां सभेत उभा राहून धृतराष्ट्राच्या मुलांपैकी विकर्ण म्हणाला–"द्रौपदीच्या प्रश्नाचे उत्तर कुरु वंशातली थोर वडील मंडळी कां देत नाहीत? पक्षपात रहित होऊन काय तो न्याय करा!"

तरी सभेत कोणी तोंड उघडले नाही. तेव्हां विकर्ण पुन्हा म्हणाला–"तुमच्यापैकी कोणी न्याय करण्यास तयार नसेल तर मी न्याय करतो. एका तर, जो राजा स्त्री, शिकार, जुगार किंवा मद्यपान यांचा गुलाम



असतो तो धर्माचा पक्ष कसा घेणार? युधिष्ठिर द्यूताच्या व्यसनात पडून आपले सर्वस्व, भाऊ, घालवून बसला आहे आणि शेवटी स्वतःला व द्रौपदीला पण पणावर लावून हारला आहे. द्रौपदी ही पांच ही पांडवांची पत्नी, एकट्या युधिष्ठिराची नव्हे. तिला या सभेत असे ओढून आणणे अन्याय पूर्ण आहे, असे माझे मत आहे."

कर्ण, विकर्ण म्हणाला त्याचे उत्तर देण्यासाठी म्हणाला–"या सभेत जी वडीलधारी मंडळी बसली आहेत त्यांना जो धर्म कळत नाही तो तुला कळला होय? युधिष्ठिर आपल्या सर्वस्वाबरोबर द्रौपदीला पण हारला. म्हणून पांडव मौन बसून



राहले. द्रौपदीला सभेत आणणे अन्याय-पूर्ण आहे असे तू म्हणतोस? पांच पतींना जी मानते ती पतिव्रता कसली? ती कुलटा व्यभिचारिणीच आहे. तिला सभेत ओढून आणणे मुळीच गैर नाही. दु:शासना! तू या विकर्णाच्या बटबटीकडे लक्ष देण्याचे कारणच नाही. तू पांडव व द्रौपदी यांची वस्त्रे काढून घेऊन ये."

कर्णाच्या तोंडातून ते शब्द बाहेर पडताच पांडवांनी आपापली उपरणी व मुकुट काढून ठेवले. दु:शासनाने द्रौपदीच्या पदराला हात घातला तेव्हां असहाय द्रौपदीने श्रीकृष्णाचा धावा केला. श्री-कृष्णाने अदृश्य रूपे द्रौपदीला वस्त्र पुरविले आणि मानभंग होऊ दिला नाही. दु:शासन वस्त्र ओढत राहला आणि द्रौपदीच्या अंगावरील वस्त्र कमीच होईना. वस्त्राचा एक ढीग जमिनीवर पडला व दु:शासन घामाघूम होऊन गेला.

भीमाला अनावर राग आला, पण स्वत:ला आवरून त्याने सर्व सभेला उद्देश्यून प्रतिज्ञा केली. म्हणाला–"सर्व ऐका! द्रौपदीचा मानभंग करण्याचा प्रयत्न करणाऱ्या या दु:शासनाचा युद्धांत वध करून त्याच्या छातीचे उष्ण रक्त पिऊन त्या रक्ताने द्रौपदीची वेणी घालीन."

तेव्हां विदुर उठून उभा राहला व म्हणाला–"सभासद हो द्रौपदीच्या प्रश्नाचे-बरोबर उत्तर न देणे हे अन्यायपूर्ण ठरेल. एकट्या विकर्णाने आपले मत प्रगट केले. दीन अनाथ अशा मानवाने न्याय धर्म मागितला असता न देणे याचा अर्थ त्या अन्यायपूर्ण अधर्माचे अर्धे पातक मौन धारण करणाराला लागते. आपण सर्व या पापाचे वांटेकरी आहो."

तरी सर्व मौन धारण करून बसून राहले. त्यानंतर दुर्योधनाने अग्नीत तेल ओतले. "त्याने आपली मांडी दाखवून त्यावर येऊन बसायला द्रौपदीला सांगितले. ते पाहून भीमाने प्रतिज्ञा केली की ती मांडीच गदा प्रहार करून फोडीन.

नंतर दुर्योधन द्रौपदीला व्यंगोक्ति करून म्हणाला–"भीम, अर्जुन, नकुल व सहदेव हे युधिष्ठिर त्यांचा राजा नाही असे म्हणाले तर मी तुला या गुलामीतून मुक्त करीन."

अर्जुन म्हणाला–"युधिष्ठिरदादा आमचे प्रभु व महाराज आहेत. परंतु स्वतः हारल्यावर ते कोणाचे प्रभू राहले हे कौरवांनीच सांगावे."

त्या वेळी सभा उधळल्यासारखे झाले. धृतराष्ट्र घाबरून जाऊन म्हणाला–"दुष्ट दुर्योधना! तू द्रौपदीला सभेत ओढून कां आणलेस? पांडवांशी तुझे वैर कां? हा सर्व अन्याय कां?" नंतर धृतराष्ट्राने द्रौपदीलाजवळ बोलावून म्हटले–"मुली! माझ्या सुनांत तूच सर्व श्रेष्ठ आहेस. माग, तुला काय पाहिजे ते मागून घे!"

धृतराष्ट्राने विचारलेच तेव्हां द्रौपदी म्हणाली–"पांडवांना गुलामीतून मुक्त करून त्यांना त्यांची आयुधे परत करावीं!"

कर्ण व्यंग्यहास्य करीत म्हणाला–"आज शूर पांडवांचा उद्धार एका नारीच्या हातून होत आहे!"

भीमाने रुद्ररूप धारण करून सर्वशत्रूंचे जागच्या जागी निर्दालन करण्याची घोषणा केली. पण युधिष्ठिर व अर्जुन दोघांनी मिळून प्रयत्नपूर्वक त्याला शांत केले आणि धृतराष्ट्राला विचारले–"महाराज! आम्ही काय करावे असे आपले मत आहे?"

धृतराष्ट्र म्हणाला–"बाळ! तू व तुझे भाऊ परत इंद्रप्रस्थाला जाऊन सुखपूर्वक राज्य करा. दुर्योधनाने प्रेमाने तुम्हांला द्यूत खेळण्याची इच्छा केली, म्हणून मी तुम्हांला निमंत्रण पाठवून बोलाविले. मध्यंतरी मी द्यूत थांबविले नाही, ही माझी चूक आहे. माझ्याकडे व गांधारीकडे पाहून आमच्या मुलांची दुष्कृत्ये विसर! तुझे व तुझ्या भावंडांचे कल्याण होवो."

त्यानंतर पांडव द्रौपदीला घेऊन इंद्रप्रस्थला परतले.





# शिवपुराण

[ २ ]

दक्ष आपल्या भृगु आदिक शिष्यवर्गाबरोबर आपल्या आश्रमात परतला आणि त्याने वाजपेय नामक यज्ञ आरंभिला. त्याला शंकरावर राग होता. म्हणून त्याने त्या यज्ञात शंकराला हविर्भाग दिला नाही.

तरी देखील दक्षाचा शंकरावरचा राग कमी झाला नाही. म्हणून त्याने बृहस्पति नामक एक महायज्ञ करण्याचा संकल्प केला आणि त्यासाठी आवश्यक सर्व यज्ञसामुग्री एकत्र करून देव व ऋषींना निमंत्रण केले. अतिथि सत्काराची जबाबदारी त्याने आपल्या शिष्य मंडळींवर व नातेवाइकांवर टाकली. या यज्ञात ही त्याने शंकराला निमंत्रण पाठविले नाही, अगर त्याला भाग दिला नाही.

या यज्ञाला विश्वदेव, मरुत, पितृगण, गंधर्व, अप्सरा, सिद्ध, विद्याधर, किन्नर, यक्ष आणि कश्यप, अगस्त्य, अत्रि, भृगु, मरीची, नारद, पराशर इत्यादि मुनी उपस्थित होते. ब्रह्मदेव व विष्णुशिवाय इतर सर्व देव दक्षाच्या भीतीने उपस्थित होते. त्या सर्वांच्या उतरण्याची व्यवस्था करण्याचे काम दक्षाने विश्वकर्म्याला सांगितले होते.

दक्षाने यज्ञदीक्षा घेऊन यज्ञशालेत पत्नीसह प्रवेश केला. सर्व सभासदांना नमस्कार केला. निमंत्रण न मिळाल्यामुळे शंकर उपस्थित नव्हता. ब्रह्मदेव व विष्णु दोघांनी बोलावले तरी तो आला नाही. अनेक देव आणि मोठमोठे ऋषी सभेत उपस्थित होते. दधीचि, भृगु, मरीचि इत्यादि शिवभक्त पण उपस्थित होते. त्यांनी सभेत चहूंकडे एकदां नजर फिरवून दक्षाला विचारले–"दक्षा! तू शंकराला



निमंत्रण पाठविले नव्हतेस का? ते येथे उपस्थित नसण्याचे कारण काय?"

दक्ष म्हणाला—"शंकर कर्मभ्रष्ट झाला आहे. म्हणून मी त्याला निमंत्रण पाठविले नाही. तो अपवित्र, कपालधारी, स्मशान वासी व प्रेतांचा प्रभु आहे."

शंकराची निंदा ऐकून दधीचि म्हणाला—"दक्षा! तुझा हा यज्ञ यशस्वी होणार नाही. शंकराशिवाय तू हा यज्ञ आरंभ करून स्वत: संकटाला आव्हान केले आहेस." दधीचीच्या तोंडचे ते शब्द ऐकून वामदेव, मरीचि, गौतम, शिलाद वगैरे अनेक ऋषी यज्ञशालेतून निघून गेले. ऋषी निघालेले पाहून दक्ष म्हणाला—"हे लोक मूर्ख व पाखंडी आहेत. म्हणून इतरांनी त्यांच्याकडे लक्ष न देता माझा यज्ञ पुरा होईपर्यंत उपस्थित रहावे."

सती कैलास पर्वतावर आपल्या पतीच्या सेवेला हजर होती. एकदा ती आपल्या सखींबरोबर विहार करीत असतां तिला विमाने दिसलीं. सतीने ती विमाने कोठे चालली आहेत याची चवकशी करून यायला आपल्या सखींना सांगितले. सखींनी चवकशी करून, विमाने दक्षाने आरंभिलेल्या यज्ञासाठी जात असलेल्या देवादिकांची आहेत असे येऊन सांगितले.

आपल्या पित्याने आरंभिलेल्या यज्ञप्रसंगी आपण देखील पतीसह जावे असे सतीला वाटले. ती शंकराजवळ जाऊन म्हणाली—"माझे वडील यज्ञ करीत आहेत. आपणदेखील रुद्रगणाला बरोबर घेऊन यज्ञाला जाऊ या."

ते ऐकून शंकर म्हणाला—"सती! तुझे वडील माझ्यावर रागावले आहेत. त्यांनी आपल्याला निमंत्रण पाठविले नाही. आगंतुकासारखे जाण्यात शहाणपण नाही. आपण गेलो तर आपला अपमान होईल आणि परिणाम सुखाचा होणार नाही."

"तर मग आपण जाऊ नये, मी एकटीच जाते. माझे वडील माझा अपमान कां करतील? मी त्यांना समजावून सांगून आपल्याला निमंत्रण पाठवतील. नंदी वगैरेंना माझ्याबरोबर पाठवून मला वडिलांकडे पोंचविण्याची व्यवस्था करावी." सती म्हणाली.

"सती! तुझ्याशिवाय मला मुळीच करमणार नाही. तू मला एकटा सोडून पित्याच्या यज्ञाला जात आहेस. तुझा नक्कीच अपमान होणार. म्हणून जरा विचार कर." शंकराने पुन्हा सतीची समजूत घालण्याचा प्रयत्न करून पाहिला.

परंतु शंकराने केलेली सूचना सतीच्या लक्षात आली नाही. तिचे आईवडील तिचा अपमान करतील हे तिला खरेच वाटेना.

शंकराने विचार केला व्हायचे असेल ते होईलच. त्याने रुद्रगणालाबरोबर सोबत पाठवून सतीला दक्षयज्ञ पहावयास पाठविले. ती नंदीला घेऊन यज्ञशालेजवळ पोंचली. तेव्हां तिच्या आईने व भावांनी पुढे येऊन तिची विचारपूस केली. आईने मुलीला एका बाजूला बोलावून नेऊन समजावून सांगितले, मुली, तुझे वडील वृद्ध झाले आहेत. म्हणून तापटपणाने तुझ्या पतीची निंदा करतात. पण तू तिकडे दुर्लक्ष कर.

मुलीला पाहताच दक्षाला शंकराची आठवण झाली. रागाने तो सतीला



म्हणाला—"काय! तुझा नवरा स्मशानात राहतो. भूतपिशाच त्याचे अनुयायी. तो कपाल धारण करतो, म्हणून अपवित्र झाला आहे. यज्ञयागादि पवित्र कार्यांस निमंत्रण करण्यालायक पण राहला नाही. तू कशाला आलीस येथे, आमच्या या यज्ञशालेला अपवित्र करायला?"

ते ऐकून सती आपल्या वडिलांना म्हणाली—"तू यज्ञकर्त्ता असून शंकराला हविर्भाग दिल्याशिवाय यज्ञ करीत आहेस आणि उलट त्यांची निंदा करतो आहेस? अजून सांगते, त्यांना आदरपूर्वक निमंत्रण पाठवून यज्ञभाग देऊन त्यांचा उचित सत्कार कर. नाहीतर तुझा यज्ञ अपूर्ण

राहील व तुझा सर्वनाश होईल." सतीने पित्याला [illegible] ल्ला दिल्यावर सभेत उपस्थित [illegible]लेल्या भृगु आदि मुनींनी दक्षाला तस करण्यास सुचविले. परंतु दक्ष जास्तच संतापला आणि म्हणाला–"तू चालती हो येथून, तू आल्याने माझा यज्ञ अपवित्र झाला. तू स्वत: होऊन येथून निघून गेली नाहीस तर धक्के मारून तुला बाहेर काढावे लागेल."

आता मात्र सतीला राहवले नाही. तिला देखील भयंकर राग आला. पतीने जाऊ नकोस असा सल्ला दिला असून ही ती यज्ञाला आली होती. अशा तऱ्हेने अपमानित होऊन परत पतिगृही जाणे तिला मुळीच आवडले नाही. पुढल्या जन्मी आपल्याला हाच पति लाभावा, अशी प्रार्थना करून तिने योगबलाने आपल्या देहातच अग्निज्वाला निर्माण करून त्यात स्वत:चा बळी दिला.

ते दृश्य पाहून नंदी वगैरे हाहाकार करीत यज्ञशालेत शिरले. तेव्हां भृगु [illegible] त्यांना मंडपा बाहेर काढले.

नारदाकडून शंकराला सतीच्या आत्म-बलिदानाची गोष्ट कळली. त्याला [illegible]कर राग आला. त्याने क्रुद्ध होऊन आ[illegible]त्या डोक्यातली एक जटा उपटली व ती पर्वता-वर आपटली. त्या जटेतून भद्रकाली व वीरभद्र उत्पन्न झाले. वीरभद्राला सहस्र-बाहु, व लांब लांब दात होते. तो कोटी सूर्या एवढा तेजस्वी होता. अशा रौद्र रूपे त्याने शंकराला प्रणाम करून म्हटले–"प्रभो! आज्ञा करावी!"

"तुम्ही दोघे, तू व भद्रकाली आपल्या गणांसह जाऊन दक्षाचा यज्ञ ध्वंस करा व या यज्ञात भाग घेणारास उचित दंड द्या." शंकर म्हणाला.

वीरभद्र सिंह जुंपलेल्या रथात बसून नंदी, भैरव आदि गणांना बरोबर घेऊन निघाला. भद्रकाली सिंहावर बसून महा-काली, गौरी, कात्यायनी, चामुंडा इत्यादि गणांना बरोबर घेऊन निघाली.



# ११२. दश सहस्र धुराच्या गुहा

अलास्का (उत्तर अमेरिका) देशातील कट्माय पर्वतात एक ज्वालामुखी पर्वत इ. स. १९१२ साली फुटला. हा विस्फोट इतिहासातील एका फार मोठ्या विस्फोटापैकी एक आहे. परिणामी सात घन मैल धूर व खडक, कांच व कोळसा यांचा चूर भूगर्भातून आकाशात उडाला आणि १५०० मैल दूरवर जाऊन पसरला. या भयंकर धुळीचा आणि कांच व कोळसा आदिकांच्या चुराचा पृथ्वीवरील वायुमंडलावर परिणाम झाला.

स. १९१५ आणि १९१६ मध्ये विस्फोट झालेल्या प्रदेशाची तज्ञांनी पाहणी केली. तो सर्व प्रदेश निर्जीव होता. जिकडे पहावे तिकडे धूम्रकणाने भूप्रदेश आच्छादित होता. कट्माय समुद्र-किनाऱ्यावर गवताची एक काडी देखील दृष्टीस पडली नाही. जिकडे पहावे तिकडे खड्डेच खड्डे होते. डोंगरावरून लहानथोर शिलाखंड गडगडत खाली घसरत होते. ज्वालामुखीच्या जवळपासच्या दऱ्याखोऱ्यातली घरेदारे धूम्रकणाखाली झाकलेली होती. धूम्रकणाने निर्मिले गेलेले शिलाखंड दिसत होते व पाण्यावर तरंगत होते.

या विस्फोटामुळे कित्येक अरण्ये भस्म होऊन गेली. झाडे भुतांप्रेतांसारखी उभी होती. पण या सर्व दृश्यात 'दश सहस्र धुराच्या गुहा' अपूर्व होत्या. या दरीत असंख्य लहानथोर ज्वालामुखी पर्वत होते ज्यांच्या मधून वाफ गळत बाहेर येत होती. ती वाफ सहस्रावधी विवरांतून बाहेर येऊन ५०० फूटापर्यंत वर उडत होती.





# अमरवाणी

क्वचित् पृथ्वीशय्य:, क्वचिदपि च पर्यंकशयन:
क्वचित् शाकाहार:, क्वचिदपि च शाल्योदन रुचि:,
क्वचित् कंथाधारी, क्वचिदपि च दिव्यांबर धर:,
मनस्वी कार्यार्थी न गणयति दु:खं न च सुखं ॥ १ ॥

[जो मनुष्य कार्यसिद्धीसाठी निश्चय करून कार्य करू लागतो त्याला जमिनीवर झोपावे लागले काय किंवा पलंगावर झोपला काय, त्याला नुसता शाकाहार मिळाला काय किंवा उत्तम पक्वान्ने खायला मिळाली काय, फाटके कपडे घालावे लागले काय किंवा रेशमी वस्त्रे परिधान करायला मिळाली काय, त्यात तो दु:ख किंवा सुख मानीत नाही.]

निंदंतु नीति निपुणा, यदि वास्तुवंतु,
लक्ष्मी: समाविशतु, गच्छतु वा यथेष्टं,
अद्यैव वा मरणमन्तु युगांतरे वा,
न्यायात् पथ: प्रविचलंति पदं न धीरा: ॥ २ ॥

[जो धीर पुरुष आहे तो, कोणी निंदा करो की स्तुति करो, संपत्तीची प्राप्ती होवो की ती घालवावी लागो, मरण तत्काल येवो किंवा युग पालटल्यावर येवो, न्यायाचा मार्ग सोडीत नाही.]

कदर्थितस्यापि हि धैर्यवृत्ते: न शक्यते धैर्यगुण: प्रमार्ष्टुं,
अधोमुखस्यापि कृतस्य वह्ने नाध: शिखा याति कदाचिदेव ॥ ३ ॥

[जो धैर्यवान आहे तो कोणत्या ही स्थितीत राहो, आपले धैर्य सोडीत नाही. अग्नि उपडा ठेवला तरी अग्नि शिखा खाली जात नाही, वरच असते.]





# धोक्यात जीव

उज्जट नावाच्या देशात घोड्यांच्या चोऱ्या फार होत. म्हणून त्या देशाच्या राजाने घोड्याची चोरी करणाराला फाशीची शिक्षा देण्याचा कायदा केला.

त्या गावच्या एका गृहस्थाकडे रात्री एक ज्योतिषी देशाटन करीत आला. त्याच दिवशी त्या माणसाच्या घरी एक घोडी व्यायची वेळ झाली होती. म्हणून घोडीचा मालक व त्याचा मुलगा पाळीपाळीने जागत होते. घोडी मध्यरात्रीच्या सुमारास विणार असे ज्योतिष्याला कळले. म्हणून तो घरा-बाहेर आला आणि आकाशात नक्षत्रे पाहू लागला. थोड्या वेळाने तबेल्यात येऊन घर मालकाला म्हणाला–"ही घोडी अर्ध्या एका तासाने व्यायली तर?" "हे कसे काय शक्य होईल हो?" घोडीचा मालक म्हणाला.

"ही घोडी आतांच व्यायली तर दोघांच्या जिवाला धोका आहे." ज्योतिषी म्हणाला.

परंतु त्याच कुमुहूर्तावर घोडी व्यायली.

"आता काय करायचे? यातून काही सुटका?" त्या गृहस्थाने विचारले.

"आहे! मी एक तांब्याचा तुकडा मंत्रवून देतो. तो तुकडा घोड्याच्या कपाळावरचे कातडे काढून आत ठेवून कातडे शिवून टाका." ज्योतिषी म्हणाला.

त्या गृहस्थाने ज्योतिष्याने दिलेला तांब्याचा तुकडा शिंगराच्या कपाळातले कातडे काढून शिवून टाकला.

शिंगरू वाचले व वाढत गेले. मोठेपणी ती एक सुंदर घोडी झाला. एक दिवशी रात्री कोणीतरी ती घोडी चोरून नेली. घोडी कोणी चोरून नेली हे कळले नाही. म्हणून तो गृहस्थ आपल्या मुलाला म्हणाला–"मी घोडीच्या शोधार्थ निघतो."

मुलगा म्हणाला–"बाबा! तुम्ही एकटे नका जाऊ, मीदेखील बरोबर येतो!"

श्री ल. ह. गोकाक



"अरे, दोघे कशाला? घोडीला शोधीत कोठेकोठे फिरावे लागेल आणि किती दिवस लागतील, कोण जाणे!" बाप म्हणाला. पण मुलाने ऐकले नाही.

दोघे घोडीचा शोध काढीत एका जागीं पावसामुळे ओले चिंब भिजून गेले. थंडीमुळे कापत ते एका गावात पोचले तेव्हां त्यांना दुरून एक मनुष्य घोड्यावर बसून एका घोड्याला ओढीत नेत असलेला दिसला.

मुलगा आपल्या बापाला म्हणाला— "बाबा! ती पहा, आपली घोडी! मी आपल्या घोडीला बरोबर ओळखतो, बाबा!"

बापलेक आपल्या घोडीविषयी बोलत होते, त्याच वेळी तो घोडेस्वार एका जागी [illegible] दुकानात शिरला.

"चला आपण तिकडेच जाऊन जवळून पाहू या." बाप मुलाला म्हणाला. दोघे लोहाराच्या दुकानाजवळ उभे राहिले.

"अरे असे बाहेर कां उभे? आत या, भट्टीजवळ उभे रहा. तुम्ही भिजला आहां. भट्टीजवळ उभे राहिलात तर अंगावरचे कपडे वाळून जातील आणि अंगात ऊबपण येईल." लोहार म्हणाला.

बापलेक भट्टीजवळ गेले आणि जवळून त्यांनी आपली घोडी पाहून तिला ओळखले. "होयरे, खरंच ही आपलीच घोडी आहे!" बाप म्हणाला.

"बाबा! मी नव्हते का म्हटले?" मुलगा म्हणाला.

घोडेस्वार दोघांचे बोलणे ऐकून म्हणाला— "काय म्हणालात?"

"ही आमची घोडी आहे, कोणी तरी ती आमच्या तबेल्यातून चोरून नेली होती!" बाप म्हणाला.

"माझ्यावर चोरीचा आळ लावतां काय? पहा, फासांवर लटकावे लागेल! ही घोडी आमची आमच्या घोडीची आहे." घोडेस्वार म्हणाला.

बापलेकांनी त्या गावच्या न्यायाधिशाकडे फिर्याद केली, न्यायाधिशाने घोडेस्वाराला घोडीबरोबर न्यायालयात यायला सांगितले.

[illegible] त्यांची असल्याचे व त्यांच्या घोडीला सहा वर्षांपूर्वी झाल्याचे सांगितले. परंतु त्यांच्या तर्फे कोणी साक्षीदार नव्हता. म्हणून न्यायाधीश त्यांना म्हणाला— "तुम्ही दोघे लबाड दिसतां आहां. ही घोडी तुमची आहे याला काही प्रमाण? फुकटात दुसऱ्याची घोडी लुबाडण्याचा तुमचा घाट होता. म्हणून तुम्हांला फांशीची शिक्षा देतो." दुसऱ्या दिवशी न्यायाधिशाच्या आज्ञेने शिपाई दोघां बापलेकांना पकडून फाशी द्यायच्या जागी घेऊन गेले. फाशी देण्याची तयारी चालू होती.

त्याच वेळी दोघांना घोडी जन्मली त्या वेळची गोष्ट आठवली. बाप म्हणाला— "काय रे, ती घोडी जन्मली त्या वेळी ज्योतिष्याने सांगितले ते खरे होणार तर. त्या कुमुहूर्तावर जन्मलेल्या घोड्यामुळे आपला दोघांचा जीव धोक्यात पडला!"

"ज्योतिष्याने मंत्रवून ठेवलेला पत्रासुद्धा उपयोगी पडला नाही, म्हणावयाचा!" मुलगा म्हणाला.

"अरे हो, तो पत्रा घोड्याच्या कपाळातच असणार!" बाप म्हणाला.

फाशी द्यायची वेळ झाली. न्यायाधीश स्वतः हजर होता. कायद्याप्रमाणे त्याच्या समक्ष शिक्षेची अंमलबजावणी होणार होती.

बाप साहस करून न्यायाधिशाला म्हणाला— "सरकार, एक गोष्ट सांगायला विसरलो. घोडीच्या कपाळात एक पत्र्याचा तुकडा शिवून ठेवलेला आहे. तो काढवून पहावा. तो मंत्रवलेला पत्रा तेथे नसेल तर आपण द्याल ती शिक्षा मंजूर आहे!"

शिपायांनी न्यायाधिशाच्या आज्ञेने घोडीच्या कपाळावर पाहिले. एका जागी शिवल्याचे चिन्ह होते. त्या जागेवरचे कातडे काढल्यावर मंत्रवलेला पत्र्याचा तुकडा मिळाला.

आतां न्यायाधिशाला ती घोडी कोणाची आहे याबद्दल शंका उरली नाही. त्याने दोघां बापलेकांना ती घोडी दिली आणि घोडीची चोरी करणाऱ्या घोडेस्वार चोराला फाशीची शिक्षा दिली.





# विश्वासपात्र नोकर

एका गावी रामू व सोमू नावाचे दोघे मित्र रहात असत. दोघे गरीब होते. लहान मोठी कामे करून ते आपला उदर निर्वाह चालवीत.

एकदा दोघे शेजारच्या एका श्रीमंत शेतकऱ्याकडे गेले. शेतकऱ्याच्या नोकराने घरात जाऊन दोघे आल्याचे सांगितले. त्या शेतकऱ्याने त्याच नोकराकरवी दोघांना सोमवारी सकाळी यायला सांगितले.

दोघे निराश होऊन आपल्या गावी निघून गेले. "कायरे, त्यांना विचारायचे होते तर आजच कां नाही बोलावून विचारले? सोमवारी कशाला बोलाविले आहे?" सोमू थोडा चिडल्यासारखा होऊन म्हणाला.

सोमवारी पहाटे रामू सोमूला उठवून म्हणाला–"अरे चल! आपल्याला सोमवारी सकाळी बोलाविले आहे ना?"

परंतु सोमू लोळत म्हणाला–"होय रे, तू हो पुढे, मी येतो मागाहून!"

"बरं बुवा! तू काय वाटेल ते कर. मी आपला पुढे जातो." रामू निघून गेला.

रामू निघून गेल्यावर तासा दीडतासाने सोमू उठला आणि सावकाश त्या शेतकऱ्याच्या गावी निघाला. त्याने विचार केला, तो शेतकरी घरात बसून राहील आणि काही तरी सांगून पाठवून देईल. उगाच जायचे आणि यायचे. रामू तरी उगाच इतका पहाटे उठून गेला आहे.

रामूला आलेला पाहून त्या श्रीमंत शेतकऱ्याच्या नोकराने आत जाऊन मालकाला कळविले.

मालकाने एकटाच मजूर आला आहे हे कळल्यावर दुसरा केव्हा येणार आहे हे विचारून यायला सांगितले. रामूने, थोड्या वेळाने येणार असल्याचे सांगितले.

मालकाने ती गोष्ट कळल्यावर दुसरा येईपर्यंत थांबायला सांगून पाठविले.

थोड्या वेळाने सोमू आला आणि म्हणाला–"रामू, मी तुला नव्हते का सांगितले, पण तू ऐकशील तर ना? आधी येऊन तू काय केलेस?"

दोघे आल्याचे कळल्यावर शेतकरी स्वत: बाहेर येऊन म्हणाला–"अस्सं! तुम्ही दोघं आलां आहांत का? बरं, आज जा, बुधवारी उजाडताच येऊन मला भेटा!" दोघे परत घरी निघाले.

"हा शेतकरी उगाच आपल्याला पिदवतो आहे, काम नाही अन् पगार नाही. बुधवारी गेल्यावर शुक्रवारी यायला सांगेल. उगाच जायचे आहे." सोमू म्हणाला.

"अरे आपण तरी घरी स्वस्थ बसून काय करणार? आपल्याला गरज आहे, तो बोलवील तितक्या वेळा गेले पाहिजे. त्यात आपले काय गेले?" रामूने मित्राला विचारले. बुधवारी रामू एकटाच त्या गावी गेला. सोमू दुपारी केव्हां तरी घरातून बाहेर पडला.

शेतकरी सकाळी बाहेर आलाच नाही. दुपारी सावकाश येऊन त्याने रामूला वाट पहात असलेला पाहिले. त्याने त्याला जेवायला सांगितले आणि म्हणाला–"तू उद्यां संध्याकाळी येऊन मला भेट!"



रामू घरी परत जात असता वाटेत त्याला सोमू भेटला. त्याने त्याला शेतकऱ्याने दुसऱ्या दिवशी संध्याकाळी यायला सांगितल्याचे आणि भेटल्यावर जेवायला वाढल्याचे सांगितले.

"अरे, भिकाऱ्यासारखा तू रोज त्याच्याकडे गेलास म्हणून त्याने आज जेवायला वाढले. उद्या याचसाठी तू जाणार आहेस वाटते?" सोमूने त्या शेतकऱ्याकडे आता जायचेच नाही असे मनाशी ठरवून टाकल्यासारखे दिसले.

"अरे आपले काय गेले जायला? तुला सुद्धा बोलाविले आहे! आपल्याला कामाची गरज आहे, तो बोलावील तेव्हां गेले पाहिजे." रामू म्हणाला.

"उद्यां संध्याकाळी अगदी शेवटचे म्हणून मी जाईन. पुन्हां त्याने बोलाविले तर जाणार नाही." सोमू म्हणाला.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी दोघे शेतकऱ्याच्या घरी गेले. नोकराने घरात जाऊन दोघे आल्याची वर्दी दिली आणि परत येऊन, मालकाने कामाविषयी उद्या सकाळी काय ते बोलू. आज रात्रभर तुम्ही येथेच रहा, असा मालकाचा निरोप सांगितला.

सोमूला राग आला. म्हणाला–"आपण नाही रहात, वाट पहात रात्रभर येथे! तो असेल श्रीमंत तर आपल्या घरचा. काम नाही, असे सरळ सरळ कां नाही सांगत? नुसता झुलवितो आहे आपल्याला रामू! तू सुद्धा चल. आपण घरी जाऊ या." पण सोमू एकटाच गेला.

शेतकऱ्याचा नोकर घरात गेला आणि थोड्या वेळाने येऊन रामूला म्हणाला–"तू रात्री येथेच राहतो आहेस ना? मालकाने हे पांच रुपये दिले आहेत, बाजारात जाऊन चादर वगैरे घेऊन ये." असे सांगून नोकराने रामूला पांच रुपये दिले.

[illegible] खरेदी केली आणि आणि उरलेले पैसे परत आणून दिले. त्या दिवशी त्याला तेथे जेवायला वाढले आणि रामू खाऊन पिऊन झोपला.

दुसऱ्या दिवशी श्रीमंत शेतकऱ्याने रामूला बोलावून घेतले व म्हणाला–"मी तुझी परीक्षा घेत होतो. मला वक्तशीरपणाने काम करणारा व विश्वासपात्र नोकर हवा होता. तुला मी सोमवारी बोलाविले होते. म्हणून सोमवारपासूनच तुला पगार मिळेल. तुला मी तीस रुपये पगार देईन. तुझे काम वसूली करण्याचे आहे. काही लोक कर्ज घेऊन गेले आहेत, त्यांच्याकडून मारहाण केल्याशिवाय कर्जाचे किंवा व्याजाचे पैसे वसूल करून आणावे लागतील. हळूहळू मी तुला काम पाहून पगारवाढ देईन."

रामूला चांगले काम मिळालेले ऐकून सोमू आपल्या घाईबद्दल पश्चात्ताप करू लागला.





# शिलारथ

[ ७ ]

[ खड्गवर्मा आणि जीवदत्त पाटलाच्या कैदेतून स्वतःची सुटका करून घेऊन जंगलात पळून गेले. त्यांना एका जागी भैरवभक्तांचे एक टोळके दिसले. त्यांचा नायक एका मुलीला पळवून घेऊन आला होता. त्याला त्याचाच एक शिष्य त्रिशूल भोसकायला निघाला. खड्गवर्मा आणि जीवदत्त झाडावरून ते दृश्य पहात होते. पुढे– ]

भैरवभक्तांपैकी काहीजण चुली पेटवून सैंपाकाला लागले. त्यांना जेवणाखाण्याच्या कामात गुंतलेले पाहून जीवदत्त आपल्या मित्राला म्हणाला–"खड्गवर्मा! ही मंडळी स्वस्थ चित्त होऊन कामाला लागली आहेत. आता येथून हलणार नाहीत. आपण देखील कोठेतरी जाऊन आंघोळ करून घेऊया आणि जंगलातली फळेबिळे खाऊन घेऊ या."

नंतर दोघे झाडावरून काही बोलल्याशिवाय खाली उतरले आणि पाणी कोठे मिळते का पहायला निघाले. थोड्याच वेळाने त्यांना एका जागी एक ओढा दिसला. प्रातर्विधि उरकून त्या बाजूला जी फळे मिळाली ती काढून खाल्ली आणि पुन्हा रात्र ज्या झाडावर काढली होती त्या झाडाजवळ दोघे आले.

त्याच सुमारास भैरवांची टोळी खाणेपिणे आटपून पुढल्या मुक्कामाला जाण्याच्या



तयारीस लागली. पद्मपूर राज्याबाहेरच्या डोंगराच्या बाजूला ते बैरागी भैरवभक्त जात असल्याचे कळल्यावर खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना आनंदच झाला. त्यांना देखील ह्या राज्याच्या हद्दीबाहेर शक्य तितक्या लवकर जायचे होते.

तो दिवसभर खड्गवर्मा व जीवदत्त बैराग्यांच्या पाठीमागून त्यांना कळू दिल्या-शिवाय चालत राहले. बैराग्यांची संख्या तशी कमी नव्हती. इतक्या लोकांच्या हातातून त्या मुलीला सुरक्षितपणे सोडवून आणणे सोपे नाही हे दोघांना कळत होते. त्यात धोकाच आहे हे त्यांना माहीत होते.

सूर्यास्त झाल्यावर त्या अरण्यात हळूहळू काळोख पडू लागला. बैराग्यांनी सोयीची एक जागा पाहून तेथे ती रात्र काढण्यापुरेशा लहानलहान राहुट्या बांधून तयार केल्या. सैपाक तयार झाल्यावर जेवणे करून घेऊन त्यांनी झोपायची तयारी सुरू केली. बैरागी उतरले होते त्या जागेजवळच्या एका झाडा-वर चढून खड्गवर्मा व जीवदत्त दोघे अनुकूल संधीची वाट पहात बसले.

दोन प्रहर रात्र उलटल्यावर बैराग्यांचा नायक आपल्या तंबूबाहेर येऊन आणखी एका बैराग्याला बरोबर घेऊन खड्गवर्मा व जीवदत्त ज्या झाडावर चढून बसले होते त्या झाडाखाली आला.

आतां बैराग्यांचा नायक आपल्या शिष्याला काय सांगत होता हे दोघांना चांगले स्पष्ट ऐकू येऊ लागले. नायक म्हणाला—"भैरवी करण्यासाठी आपण ज्या मुलीला आणले आहे ती ज्या सागवान वृक्षाजवळ आहे त्या झाडाजवळ वाघाचे गुरगुरणे आतांच ऐकू आले. तो वाघ राहुटीत शिरण्याच्या प्रयत्नात असणार. ती घाबरते का पाहिले पाहिजे. भैरवी होण्याची तिच्यात कितपत लायकी आहे हे कळेल."

नंतर दोघे तेथून निघून गेले. जीवदत्त खड्गवर्माला हळूच म्हणाला—"ऐकलेस का रे बैराग्यांचा नायक काय म्हणाला ते! त्या विचारीला वाघाच्या कृपेवर सोडून देण्यात त्याचा काय हेतु असावा, कळत नाही."

"आपण कारण काय याचा विचार करीत बसलो तर तेवढ्या वेळात ती बिचारी वाघाच्या पोटात पोचलेली असणार. त्या सर्वांचा विचार आपण मागाहून करू. तू येथेच थांब!" असे सांगून खड्गवर्मा एकटा झाडाच्या फांदीवरून लोंबत दुसऱ्या झाडावर व वरच्यावरच ती मुलगी होती त्या तंबू जवळ जाऊन पोचला.

बैराग्यांचा गुरु म्हणाला तसा खरोखरच एक वाघ त्या मुलीला ठेवले होते त्या बाजूला मधून मधून पहात व मध्येच थांबत होता.

"ओहो, प्रसंग मोठा भयंकर येऊन ठेपला आहेसे दिसते!" असे त्या बाजूला पाहताच खड्गवर्माला वाटले. पहिल्याने वाघावरच हल्ला करून त्याला ठार करावे असा त्याने विचार केला. परंतु त्या वेळी सर्व भैरवभक्त जागे होण्याची शक्यता होती. म्हणून वाघावर हल्ला करण्याऐवजी त्या मुलीला बाहेर आणण्याचा प्रयत्न केला तर एका बाजूने वाघ आणि दुसऱ्या बाजूने भैरव पाहरेकरी दोघांवर तुटून पडण्याची शक्यता आहे.

खड्गवर्मा असा विचार करीत पाहरेकरी काय करतो आहे हे पाहण्यासाठी झाडा-



आडून बाहेर आला वाकून हळूच ती मुलगी होती त्या राहुटीच्या बाजूला गेला. आपल्या गुरूच्या सल्ल्याप्रमाणे पाहरा देणारा भैरव दुसऱ्या राहुटीकडे गेला आणि काटक्या गोळा करून शेकोटी तयार करू लागला. भैरवी कन्येचे काय वाटेल ते होवो, वाघाने आपल्यावर झडप मारली नाही की पुरे, एवढाच त्याचा हेतू होता.

तो पाहरेकरी जे करायला निघाला ते खड्गवर्माच्या फायद्याचे झाले. कारण आतां त्याचे लक्ष या बाजूला नसणार व म्हणून तो इकडे येणेच शक्य नाही, मग ओरडून दुसऱ्या भैरवांना इकडे बोलावण्याचा प्रश्नच नाही. असा विचार करून खड्गवर्मा आपली



चाहूल दिल्याशिवाय भैरवी कन्या होती त्या राहुटीकडे गेला. ती अस्वलाच्या कातड्यावर बसली होती. खड्गवर्माला पाहून ती घाबरून थरथर कापूं लागली. पण ती ओरडली नाही.

खड्गवर्मा हळूच तिच्याजवळ गेला व म्हणाला—"ताई, तू कोण हे मला माहीत आहे. तुझे बाबा ज्या गावचे पाटील आहेत त्या गावाहूनच मी आलो आहे. हे भैरव तुला तुमच्या गावाच्या तलावावरून पळवून घेऊन आले, होय की नाही ?"

"होय, पण तुम्हांला मी कधी आपल्या गावात पाहिले नाही ?" भैरवी कन्येने विचारले.

"मी तुमच्या गावाहून आलो असे मी सांगितले होते. तुमच्या गावचा राहणारा आहे, असे नव्हते सांगितले. पण मी कोण आणि कोठून आलो हे तेवढे महत्वाचे नाही. आता तू हे सांग की तुला आपल्या गावी आपल्या वडिलांकडे जावयाचे आहे की या लोकांबरोबर ते नेतील तिकडे जाऊन भैरवी होऊन या सर्वांवर आपला अधिकार गाजवांयचा आहे." खड्गवर्माने विचारले.

"हे भैरव माणसे का आहेत, जनावरे आहेत, जनावरे! एकटा श्वेतभैरव मनुष्य आहे. शक्य झाले तर तुम्ही मला यांच्या हातून सोडवून माझ्या बाबांकडे पोचती करा." भैरवी कन्या म्हणाली.

"तू मुळीच घाबरू नकोस, तुला तुझ्या आईवडिलांकडे मी नक्कीच पोचती करीन. तिकडे झाडीत एक वाघ हिंडतो आहे. आपण राहुटीच्याबाहेर पडल्यावरोबर तो आपल्यावर झडप मारणार. पण तू घाबरू नकोस, त्याला मी ठार करीन. तू घाबरून ओरडलीस तर ते भैरवभक्त जागे होतील व आपला बेत फसेल." खड्गवर्मा म्हणाला.

दोघे हलक्या पावलांनी राहुटीच्या पाठीमागून बाहेर आले. त्यांना पाहून झाडीत बसलेला वाघ पुढे आला आणि मागच्या पावलावर बसून राहिला. वाघावर पुढे जाऊन तलवारीने वार करावा असे खड्ग-



वर्माला एकदा वाटले. परंतु तसे केले तर जो आरडाओरडा होईल त्यामुळे सर्व भैरवभक्त जागे होतील की काय अशी भीति पण वाटली.

वाघाला समोर पाहून भैरवी कन्या थरथर कांपू लागली. खड्गवर्मा तिच्या व वाघाच्या मध्यभागी उभा राहून एकेक पाऊल मागे सरकू लागला. आपण असेच एकेक पाऊल मागे टाकीत, जीवदत्त बसला आहे त्या झाडापर्यंत पोचू आणि त्या मुलीला झाडावर चढवून तिला वांचवू असा त्याचा विचार होता.

परंतु वाघसुद्धा त्यांच्याबरोबर एकेक पाऊल पुढे सरकू लागला. खड्गवर्माला क्रूर वाघाचा स्वभाव माहीत होता. ते वाटेल त्या वेळी उडी मारू शकतात. आपली तलवार उपसून तो वाघाची केव्हां ही झडप आली तरी त्याला तयार होता. त्याच्या कल्पनेप्रमाणे वाघाने त्याच्या अंगावर उडी मारली देखील आणि खड्गवर्माने तलवारीचा एक वर्मी वार वाघावर केला.

तो वर्मी वार लागताच वाघ जोराने ओरडला आणि मागे जाऊन पडला. तसाच लोळत तो बराच दूर खोल झाडीत निघून गेला. वाघाचे ते ओरडणे ऐकून भैरव जागे झाले. भैरवांचा गुरु गणलिंगेश्वर आपल्या राहुटीतून बाहेर येऊन मोठ्याने ओरडून म्हणाला–"वाहवा! भैरव कन्या निशस्त्र असून पहा, वाघाशी कशी झुंज देत आहे. कोणी मध्ये पडण्याचे कारण नाही. गंमत पहात रहा. ती वाघाला ठार करून त्याच्या आंतड्या गळ्यात घालून आतां येईल पहा."

सर्व भैरवभक्त आपल्या गुरूच्या चारी-बाजूला जमा झाले आणि झाडीत काही दिसते का पाहू लागले. त्यापूर्वीच खड्गवर्मा भैरवीकन्येला घेऊन जीवदत्त बसला होता त्या झाडाजवळ येऊन पोचला होता. जीवदत्त उतरून खाली आला. पळून जायला तीच चांगली संधी आहे असा विचार करून ते भैरवीकन्येला घेऊन [illegible] आणि झाडांत दृष्टीआड झाले.

भैरवीकन्येला वाघाने गट्ट केले असावे असे गणलिंगेश्वरला वाटले व आपल्या बंडखोर शिष्याचा डाव आपण उलटवून लावल्याचा त्याला मानसिक आनंद झाला. श्वेतभैरवने त्या कन्येविषयी सहानुभूति दर्शविली होती, हे गुरूला खपले नाही. अशी भैरवकन्या जर भैरवी झाली तर पुढे भैरव संघटनेला धोका आहे, असे त्याला वाटत होते. म्हणून त्याने भैरवीकन्या वाघाशी लढत देते आहे असे जरी वर-करणी सांगितले असले तरी वाघाने तिला ठार केले असेल असे समजून मनातल्या मनात त्याला गुदगुल्याच होत होत्या.

पण श्वेतभैरव तितका भोळा नव्हता. त्याला त्याच्या गुरूचा संशय येत होता. तो पळत भैरवीकन्येच्या राहुटीपर्यंत गेला. आत कोणी नव्हते. तेव्हां त्याला गुरूचा कावे-बाजपणा कळला. परत येऊन तो आपल्या गुरूला म्हणाला–"गुरु गणलिंगेश्वर! भैरवी कन्या राहुटीत नाही. कोठे गेली ती, सांगा लवकर!"

गणलिंगेश्वरने चकित होऊन त्याच्याकडे एकदां पाहिले व म्हणाला–"स्वारी कोण-त्या लोकात विहार करीत होती? मी काय म्हणालो होतो, ऐकले नाहीत वाटते? डोके




बिघडले आहे की काय? वाघाशी तिची लढत चालू आहे."

"ती मुलगी साहसी आहे, पण वाघाशी लढत देण्याइतकी शक्ति तिच्या अंगात नाही." श्वेतभैरव म्हणाला.

"तिच्यात इतकी शक्ति नसेल तर ती भैरवी होण्यालायकपण नाही. अशा अशक्त, भित्र्या पोरीला वाघाने खाऊन टाकले तर त्यात आपले काय बिघडले? आपण पुन्हां गावात शिरून दुसऱ्या मुलीला पळवून घेऊन येऊ." गणलिंगेश्वर म्हणाला.

गुरूचे उत्तर ऐकून श्वेतभैरवला जास्तच राग आला. पण आपला राग आवरून तो झाडीत पहात म्हणाला–"पानेसुद्धा हलतांना

कोठे दिसत नाहीत! वाघाचे किंवा त्या मुलीचे ओरडणे किंवा किंकाळ्या ऐकू येत नाही? म्हणून कोणी कोणाला ठार केले हे आपण जाऊन पाहिले पाहिजे." असे म्हणत तो एक चूड घेऊन निघाला आणि त्याच्या पाठोपाठ काही भैरव शिष्यपण निघाले.

सर्वांनी दाट झाडीत दगड फेंकून काही हालचाल होते का पाहिले. पण कोठूनही हालचाल झालेली त्यांना दिसली नाही. वाघाने त्या मुलीला नक्कीच ठार करून खाल्ले असावे, यात त्यांना आता शंका उरली नाही. ते झाडीत आणखी आत शिरले.

त्यांना आत वाघ किंवा ती मुलगी कोणीच दिसले नाही. झाडांचा चेंदामेंदा झालेला व झाडावर रक्ताचे डाग पडलेले त्यांना स्पष्ट दिसले. वाघ मुलीला उचलून दूर निघून गेला असावा, असे श्वेतभैरवला वाटले. तो आपल्या साथी शिष्यांना म्हणाला—"त्या मुलीच्या हत्येचे पाप आपल्या गुरूच्या डोक्यावर आहे. त्याने हे काम सहन होणार!"

गणलिंगेश्वर दुरून हे सर्व पहात उभा होता. वाघ श्वेतभैरवावर एकाएक झडप घालून त्याला ठार करील असे गुरूला वाटत होते. पण त्या बाजूला सर्व शांत होते. म्हणून तो थोडा चकितच झाला. पुढे येऊन म्हणाला—"श्वेतभैरव! काय रे वाघ आणि ती कन्या दोघे मेले वाटते ?"

"येथे तर कोणाचेच प्रेत नाही. फक्त रक्त दिसते आहे. वाघाला भैरवीकन्या किंवा तिला वाघ उचलून घेऊन गेला असावा!" असे म्हणत त्याने एक व्यंग्य हास्य केले,

"महाभैरवाने आपले सर्वांचे रक्षण करून स्वतःचे पण रक्षण केले आहे. एका अशक्त भितऱ्या पोरीला आपली पुजारीण होऊ देण्यापेक्षा त्याने तिलाच मुक्त केले. आता राहुट्या व तंबू काढा व चला पुढल्या मुक्कामाला! या खेपेस आपण जास्त सावधपणे कन्येची निवड करून तिला आणले पाहिजे!" गणलिंगेश्वर म्हणाला. (क्रमशः)





# मृत्यु देव

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ येऊन पोचला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तुझे साहस वाखाणण्यासारखे आहे, पण लक्षात ठेव, मृत्यूशी असा खेळ केल्याचा परिणाम भोगावा लागतो. मृदुला नावाच्या एका सुंदर तरुण स्त्रीवर कसे कसे प्रसंग गुजरले हे तुला माहीत नसेल. मी तिची गोष्ट तुला सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

एका दूर कोणत्या तरी देशात एका श्रीमंत कुटुंबात मृदुला नावाची एक मुलगी जन्मली. लहानपणापासूनच तिचे सौंदर्य पाहून शेजारपाजारची मंडळी, तिच्या वडिलांना म्हणत—'तुमची मुलगी सामान्य माणसाला देऊ नका, बरं का! अहो











स्वर्गातले देव तिला मागणी घालायला येतील.' वयाबरोबर तिच्या सौंदर्यात वाढ होत गेली आणि तिच्याशी विवाह करण्याच्या हेतूने थोर घराण्यातल्या तरुण मुलांच्या मागण्या येऊ लागल्या.

परंतु इतरांच्या तोंडी आपल्या सौंदर्याची वाखाणणी ऐकून मृदुलाचा गर्व वाढत गेला. म्हणून तिने थोरांमोठ्यांच्या शब्दाला कधी मान दिला नाही. चांगली चांगली सांगून आलेली स्थळे नाकारली. तिच्या आईवडिलांनी कित्येक थोर कुटुंबातील मुलांना मुलगी दाखविली. त्यांनी मुलीला पसंत केले. पण मुलीसमोर आईबापांनी हात टेकले. पूर्वी तिच्या सौंदर्याची लोक

पणाची निंदा होऊ लागली. आतां कोणी मागणी घालायला येत नव्हता. मृदुलाचे घराबाहेर जाणे येणे देखील बंद पडले.

आईवडिलांना मुलीचे लग्न न झाल्यामुळे क्षणभर देखील चैन पडेनासे झाले. मुलीचे लग्न होऊ नये ही किती शरमेची गोष्ट आहे असे त्यांना वाटू लागले. एक दिवशी तिच्या आईने तिला प्रेमाने जवळ बोलावून विचारले–"काय ग, आता कसं? कोणी तुझ्याशी लग्नालाच तयार नाही!"

"आई! कोणी आलं नाही तर मृत्यु देवाशी तरी माझं लग्न होईलच. तो स्वत: चालून येईल आपल्या दारी. तू मुळीच काळजी करू नकोस." मृदुला म्हणाली.

त्याच दिवशी रात्री मृदुलाला झोप लागली नाही. ती अंथरुणावर तळमळत पडली होती. जरा गुंगी लागली असेल, तिला कोणीतरी तिचा हात धरल्याचा व 'मृदुला' म्हटल्याचा भास झाला. तिने डोळे उघडून पाहिले तर एक अप्रतिम सुंदर तरुण पुरुष समोर उभा होता. तो म्हणाला–"मी तुझ्याशी लग्नाच्या हेतूने आलो आहे."

मृदुलाला आश्चर्य वाटले. हा मनुष्य कोण बरे असेल, दार बंद होते तरी हा आत कसा काय आला? त्याला माझे नाव कसे कळले. हा मृत्युदेव तर नसेल? तो

पासून वरपर्यंत हादरल. सर्वांगाला घाम सुटला. तिच्या तोंडातून शब्दच उमटेना

थोड्या वेळाने तो तरुण मनुष्य 'पुन्हां येईन' एवढेच सांगून निघून गेला. तो कोठे जातो हे पाहण्यासाठी मृदुला त्याच्या पाठोपाठ जाऊ लागली. तो मनुष्य गल्लीतल्या एका घरात शिरला. थोड्या वेळाने तो घराच्या बाहेर येऊन निघून गेला. तो गेल्यानंतर थोड्या वेळाने त्या घरातून रडण्याचा आवाज ऐकू आला.

तो मृत्युदेवच होता याबद्दल मृदुलाला शंका उरली नाही. ती आपल्या घरी परतली. आपण मूर्खपणाने मृत्युदेवाचे वरण केले, याबद्दल तिला आतां पश्चात्ताप होऊ लागला. मृत्युदेव वाटेल तेव्हां येऊन निश्चितच आपल्याशी विवाह करणार. परंतु ती गोष्ट आईवडिलांना तिने सांगितली नाही. जो प्रसंग येईल त्याला तोंड देण्याव्यतिरिक्त दुसरा मार्ग नाही, असे तिने ठरविले.

एका आठवड्याने मध्यरात्रीच्या सुमारास तिच्या खोलीच्या खिडकीबाहेरून तिला कोणीतरी हाक मारली. तिने अंथरुणावरून उठून खिडकीत जाऊन पाहिले, तोच तरुण होता. त्याने तिला विचारले–"तू त्या दिवशी माझ्या पाठीमागून काय पाहिलेस?"

"मी काही नाही पाहिले!" मृदुला म्हणाली.





"खरे बोलली नाहीस तर एका आठवड्यात तुझ्या वडिलांना मरण येईल." तो तरुण मनुष्य म्हणाला.

"मी खरेच काही पाहिले नाही." मृदुलाने तेच उत्तर पुन्हां दिले.

तो तरुण मनुष्य निघून गेला. त्याने सांगितल्याप्रमाणे बरोबर एका आठवड्याने खरोखरच मृदुलाचे वडील निवर्तले. तिच्या बापाला तिच्यामुळेच मरण आले हे ओळखून ती खूप रडली.

पुन्हां एक दिवशी तो तरुण आला आणि मृदुलाला हाक मारुन खिडकीजवळ उभा राहिला. मृदुलासमोर येऊन उभी राहिल्यावर त्याने तिला तोच प्रश्न केला–"तू त्या

काय पाहिलेस ?"

काय उत्तर द्यावे हे तिला सुचेना. तो मृत्युदेवच आहे की आणखी कोणी हे कसे ठरवायचे? तिला कळेना. म्हणून ती म्हणाली–"खरोखरच काही नाही पाहिले."

बरोबर एका आठवड्याने मृदुलाची आई मेली. मृदुलाला आपला असा आता कोणी उरला नाही. ती आईवडील गेल्याचे दुःख करीत पडली असतां एक दिवशी रात्री त्याच मनुष्याने खिडकीतून तोच प्रश्न विचारला. म्हणाला–"आता तरी खरे सांग, तू त्या रात्री काय पाहिलेस ?"

या वेळी मृदुला गप्प बसून राहली. काही बोलली नाही. दुसऱ्या दिवशी ती मरण पावली. शेजार पाजारच्या मंडळींनी तिचा देहसंस्कार केला आणि तिची चिता होती त्या जागी एक समाधी बांधली. त्या समाधीवर एक झेंडूचे झाड उगवले. त्याला एक सुंदर फूल लागले. त्याच दिवशी एक राजकुमार आपल्या मित्रमंडळीबरोबर त्या बाजूने जात असतां त्याची नजर त्या फुलांवर गेली. ते त्याने फूल तोडून आणून आपल्या झोपण्याच्या खोलीत फुलदाणीत ठेवले.

त्या दिवशी रात्री झोपायच्या वेळी नित्याप्रमाणे दूध पिण्यासाठी त्याने दुधाचा पेला हातात घेतला. पण तो रिकामा पाहून

समजले. आपल्या खोलीत शिरुन दूध पिण्याची हिंमत कोणी बरे केली असावी? दोन दिवस लागोपाठ असेच कोणीतरी दूध पिऊन जात असे. पण चोर सापडला नाही. सैंपाकघरात देखील कोणी खाऊन पिऊन गेल्याचे दिसून आले.

तिसऱ्या दिवशी राजकुमाराने नित्यापेक्षा थोडे आधी दूध मागवून आपल्या झोपायच्या खोलीत ठेवायला सांगितले. पण तो दूध प्याला नाही आणि टेबलावर तसेच राहून देऊन त्याने झोपेचे सोंग केले. थोड्या वेळाने बांगड्यांचा व चालतांना पाताळाचा आवाज होतो तसा आवाज ऐकून राजकुमाराने डोळे उघडून पाहिले तर ज्या जागी झेंडूचे फूल होते त्या जागेवरून उठून एक सुंदर स्त्री दूध प्यायला जात असल्याचे दिसले. ती दूध पिऊन सैंपाकघराच्या बाजूला जाऊ लागलेली पाहून राजकुमाराने तिचा हात धरला आणि गोड आवाजात विचारले–"कोण तू आणि झेंडूच्या फुलाच्या रूपाने तू किती दिवसांपासून आहेस ?" तेव्हां मृदुलाने आपली जन्मकथा थोडक्यात सांगितली.

"मृत्युदेवाशी तुझे लग्न झाले नाही ना? मग मी तुझ्याशी विवाह करून घेण्यास तयार आहे." राजकुमार मृदुलाला म्हणाला.

राजकुमाराने, आपल्या आईवडिलांना व आपल्या इतर नातेवाइकांना मृदुलाशी लग्न करण्याचे ठरविले असल्याचे सांगितले.



मृदुलाचे रूपलावण्य पाहून राजकुमाराच्या नशिबाची सर्वांनी वाखाणणी केली. दोघांचा विवाह थाटामाटाने पार पडला. यथासमयी राजकुमार राजा झाला व मृदुला राणी झाली. त्यांच्या कारकीर्दीत त्यांची प्रजा सुखी झाली.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा! मृदुलाला इतके कष्ट देऊन शेवटी मृत्यु देवतेने तिला योग्य पति कसा काय दाखविला आणि तिला सुखपूर्वक कां जगू दिले? या प्रश्नाचे उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

ते ऐकून राजा विक्रमादित्य म्हणाला– "मृत्यु देवतेचे मृदुलाशी वैर होते असे सांगतां येत नाही. उलट त्याने मृदुलाचे हितच केले असे नाही का वाटत? तिच्या आईवडिलांच्या मृत्युमुळे ती दुःखी झाली ही गोष्ट खरी आहे. परंतु तिच्याशी विवाह करण्यास मृत्युदेव येईल हे ती म्हणाली [illegible] देव मृदुलाला घेऊन गेला. परंतु ठरलेल्या पेक्षा आधी आयुष्य संपविण्याची शक्ती प्रत्यक्ष मृत्यु देवतेला सुद्धां नाही, हे सिद्ध झाले. आईवडिलांचे जेवढे आयुष्य होते तेवढे उपभोगणे त्यांना शक्य झाले आणि त्यांना जो मृत्यु आला तो त्यांचे आयुष्य संपुष्टात आल्यावरच आला असे मानावे लागते. तरी मृदुलाला पश्चात्ताप करावा लागावा, तिचा घमेंडखोरपणा कमी करावा या हेतूने मृत्यूने तिच्या आईवडिलांना अकाली ओढून नेल्यासारखे दर्शविले. वस्तुतः मृदुलाचा मृत्यूच अकाली झाला होता. म्हणून तिला पुन्हां जिवंत होण्यासारखी परिस्थिति मृत्यु देवतेने निर्माण केली होती. त्याच्याच प्रयत्नाने तिला योग्य पती मिळाला आणि त्याच्याच इच्छेने तिचे विवाहित जीवन सुखी झाले."

अशाप्रकारे राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# शेरास सव्वा शेर

एका राज्यात फार चोऱ्या होत होत्या. म्हणून त्या देशाच्या राजाने चोरी करणाऱ्याला कडक शिक्षा द्यायला सुरवात केली. त्याने चोरी करणाऱ्याला फांशीची शिक्षा द्यायला सुरवात केली, तेव्हां चोऱ्यांची संख्या कमी होऊ लागली.

त्या राज्यातल्या एका गावी शिव्या आणि गंग्या नावाचे दोन अट्टल चोर होते. त्यांनी फांशीची कडक शिक्षा होऊ लागल्याचे पाहून विचार करून पुढे चोरीचा धंदा सोडून दुसरा काहीतरी कामधंदा किंवा मजुरी करण्याचे ठरविले. त्याप्रमाणे दोघे शेजारच्या एका गावी गेले आणि तेथे एका शेतकऱ्याकडे कामाला लागले.

त्या शेतकऱ्याने दोघांना मळ्यातल्या झाडाला पाणी घालायचे आणि गुरांना चरायला घेऊन जायचे काम दिले. शिव्याने गुरांना चरायला न्यायचे काम मागून घेतले आणि गंग्याने झाडाला पाणी घालायचे काम घेतले. शेतकऱ्याने दोघांना आलटून पालटून दोन्ही कामे करायला सांगून ठेवले होते.

पहिल्या दिवशी शिव्या गुरांना चरायला घेऊन गेला. त्याला वाटत होते की गुरांना चरायला सोडून दिले की आपल्याला आराम करता येईल. परंतु त्याला फार त्रास झाला. कारण गुरे कधी कोणाच्या शेतात शिरत कधी बैलांची झुंज लागे ती सोडवावी लागे. कधी बैल कोणाला मारायला धावत. एकूण त्याला आराम मुळीच मिळाला नाही.

गंग्याला वाटले होते की दहावीस घागरी पाणी काढून झाडांना घातले की आपण मोकळे होऊ. पण एका झाडाला दहादहा घागरी पाणी घातले तरी ते आत जमिनीत कोठे जाऊन नाहीसे झाले न कळे. म्हणून तो दमून भागून घरी परतला.

शिव्या व गंग्या रात्री परस्पराला भेटले आणि परस्पराचे काम किती सोपे व हलके आहे याचे वर्णन करून सांगू लागले. शिव्या म्हणाला–"मित्रा! काय सांगू? अरे आपल्या धन्याची गुरे समजूतदार आहेत. त्यांना चरायला सोडू दिल्यावर मी अशी ताणून दिली की सूर्य केव्हां मावळला ते कळलेच नाही. काळोख पडायच्या आधी गुरांना घेऊन घरी परत आलो."

गंग्याने शिव्याला आपल्या कामाचे वर्णन सांगितले. म्हणाला–"मित्रा! काम असावे तर असे. अरे सर्व मिळून वीस घागरीसुद्धा पाणी काढावे लागले नसेल. मी नऊ वाजता कामावर गेलो आणि तासा भरात सर्व काम आटोपून बागेत कोठे काय काय आहे, पाहू [illegible] पडीचे दोन आवेपण मिळाले. त्यानंतर आपण छान झोप काढली."

दोघे शेरास शेर होते. आपण आपले काम सोपे असल्याचे सांगून दुसऱ्याच्या गळयात बांधता आले तर पहावे, या प्रयत्नात दोघे होते. शिव्या आपल्या मित्राला म्हणाला–"गड्या! आपण आपापली कामे आज बदलू या."

गंग्या तत्काळ कबूल झाला.

दुसऱ्या दिवशी दोघांनी कामाची अदला-बदल करून घेतली. शिव्या बागेत कामाला गेला आणि गंग्या गुरे चरायला घेऊन गेला. पण प्रत्यक्ष काम करतांना परस्परांना फसविल्याचे दोघांच्या लक्षात आले. शिव्याला [illegible] कळली. आंब्याच्या झाडाला कित्येक घागरी पाणी घातले तरी क्षणार्धात मुरून जात होते. तसे कां होते हे रात्री गुप्तपणे येऊन पाहून घेण्याचे त्याने मनाशी ठरविले.

त्या दिवशी रात्री जेव्हां दोघे परस्परांना भेटले तेव्हां कोणी आपल्या कामाच्या चांगल्यावाईटाबाबत काही बोलला नाही. दोघे झोपण्याचे सोंग करून पडून राहले. गंग्या झोपला असावा असे समजून शिव्या हळूच उठला आणि कुदळ फावडे घेऊन मळयात गेला. तो आंब्याच्या बुंधाजवळ आत असे मोठे भगदाड कसले आहे, म्हणुन खणून पाहू लागला. खणता खणतां एका जागी हंडयाला कुदळ लागून आवाज होतो तसा आवाज झाला. शिव्या चकित होऊन कोणी नाहींना जवळपास, हे पाहू लागला. गंग्या त्याच्या पाठीमागे काळोखांत उभा होता. त्याने त्याला विचारले–"काय रे खणतो आहेस?"

शिव्या म्हणाला–"अरे काही नाही, झाडाला चांगले आळे करीत होतो." असे सांगून तो परत निघाला. गंग्या मनातल्या मनात त्याची लबाडी समजून हंसला.

दोघे परत येऊन झोपले. गंग्याला झोप लागल्यावर पुन्हां बागेत जाऊन खणून काय आहे ते पाहण्याचा शिव्याचा विचार होता. पण त्याचा डोळा केव्हां लागला, हे त्याचे त्याला कळले नाही.

शिव्या घोरू लागताच गंग्या उठला आणि शिव्याला चाहूल लागू दिल्याशिवाय कुदळ





 Fullscreen  127     32 / 76 



फावडे घेऊन मळयात गेला. थोडेसे खणल्या-वर त्याला आत मोहोरा भरलेला एक हंडा सापडला. तो कोठेतरी लपवून ठेवायचे त्याने योजले. त्याला जवळच एक तळे असल्याचे आठवले व त्याने तो हंडा तळयात उथळ पाण्यात पुष्कळ चिखल होता त्या जागी पुरून ठेवून दिला आणि परत आपल्या जागी जाऊन झोंपला.

गंग्या झोपल्यावर पहाटेच्या सुमारास शिव्याची झोप मोडली. त्याला गंग्याच्या पायाला खूप चिखल लागलेला दिसला. तो कुदळ फावडे घेऊन त्या आंब्यांच्या झाडा-जवळ जाऊन पाहू लागला. पण तेथे हंडा नव्हता. गंग्याच्या पायाला चिखल लागला

[illegible]

निघाला. तळयाच्या काठीच त्याला माण-साची पावले दिसली. अंदाज लावीत तो तळयात गेला आणि त्याला हंडा सापडला. त्याने वेळ न घालवितां हंडा उचलून घेतला आणि झपाझप पावले टाकीत आपल्या गावची वाट धरली.

शिव्या निघून गेल्यावर गंग्याची झोप मोडली आणि गंग्या तेथे नाही हे पाहून तो धावत तळयावर गेला. पण तेथे हंडा नव्हता. शिव्याच्या पाठोपाठ गावाकडे निघाला.

थोडे अंतर चालून गेल्यावर गंग्याला शिव्या हंडा उचलून घेऊन जात असलेला दिसला. तो मधल्या वाटेने धावत शिव्याच्या पुढे गेला आणि एका जागी रस्त्यावर त्याने आपली एक वहाण टाकून दिली आणि दुसरी वहाण दोन एक फर्लांगावर त्याच वाटेने जाऊन टाकून ठेवली. नंतर तो मधल्याच एका झाडावर बसून काय काय होते ते पहात बसला.

गंग्या हळूहळू चालत येत होता त्याला एक वहाण रस्त्यात दिसली. असेल कोणाची तरी असा विचार करून तो पुढे गेला. पुढे गेल्यावर त्याला दुसरी वहाण दिसली. तेव्हां आपण ती वहाण उचलून आणली असती तर फुकटात एक वहाणेचा जोड मिळाला असता असे त्याला वाटले. त्याने

[illegible]

झाडाखाली हंडा ठेवला आणि ती वहाण आणण्यासाठी घाईघाईने निघून गेला. इकडे शिव्याने झाडावरून उतरून हंडा लांबविला.

गंग्या वहाण घेऊन परत येऊन पाहतो तर तेथे हंडा नव्हता. शिव्याचे ते काम असले पाहिजे, असे मनाशी ठरवून तो धांवतच सरळ शिव्याच्या घरी गेला. आंतून रडण्याचा आवाज ऐकून त्याने घरच्या लोकांना कारण विचारले तेव्हां शिव्याच्या बायकोने व मुलाने शिव्या मेल्याचे सांगितले. शिव्याला एका पांढऱ्या चादरीत प्रेतासारखे बांधून ठेवण्यात आले होते. गंग्या शिव्याच्या बायकोजवळ सांत्वनेचे दोन शब्द बोलून मित्रविरहाचे दुःख व्यक्त करीत रडू लागला. म्हणाला–"मैत्री असावी तर अशी. आतां मित्राच्या मनातली शेवटची इच्छा पुरी करण्याची जबाबदारी माझ्यावर आली आहे. त्याने मला सांगून ठेवले होते, मित्रा! मी सर्व आयुष्यभर इतकी पापे केली आहेत की काटयांची चिता रचून मला अग्नि दिला तरच माझा उद्धार होईल. ती शेवटची इच्छा पुरी केलीच पाहिजे."

असे सांगून त्याने कांटेरी झाडे तोडून त्यांची चिता तयार करविली आणि आपल्या मित्राचे प्रेत खांद्यावर घेऊन स्मशानाकडे निघाला. सर्वांनी त्याला अडविण्याचा किती प्रयत्न करून पाहिला. पण त्याने तिकडे दुर्लक्ष केले.

आतां आपल्याला हा दुष्ट खरोखरच कांटयांच्या चितेवर निजवून आपल्या देहाला अग्नी देणार असे वाटून गंग्या शिव्याच्या खांद्यावरून खाली सरकून खाली पडला व म्हणाला–"अरे शिव्या! आपले भांडण कशासाठी रे! या हंडयातल्या मोहरांसाठीच ना? आपण या वांटून घेऊ आणि सुखाने पुढील आयुष्य काढू. आपण चोरी करायची सोडली पण चोरीची वृत्ती सोडली नव्हती. ती यापुढे सोडू या."

दोघांनी आपसांत अशाप्रकारे समेट करून घेतला. मोहोरांचा हंडा मिळाला होता, म्हणून त्यांचे पुढील आयुष्य सुखाचे झाले.







# आळशी तरुण

एका गावी एक श्रीमंत मनुष्य रहात असे. तो गरीबांना मदत करीत असे. त्याने कित्येकांच्या पोटा पाण्याची व्यवस्था करून दिली होती.

एक दिवशी एक तरुण मनुष्य त्याच्याकडे आला व म्हणाला–"दादा ! मी एक गरीब मनुष्य आहे. मला आई व बहीण आहेत. दोघांचा भार माझ्यावर आहे. आपण काही काम दिल्यास आपले माझ्यावर फार उपकार होतील."

तो श्रीमंत सहानुभूति दाखवीत म्हणाला–"हे पहा, माझ्याकडे काही काम नाही. परंतु तू शोध कोठे तरी काम. तुला काम मिळेपर्यंत थोडी मदत म्हणून मी दोन रुपये देतो. ते ठेवून घे." तो मनुष्य पैसे घेऊन निघून गेला.

त्या दिवसापासून तो मनुष्य त्या श्रीमंताकडे रोज येऊ लागला आणि तो श्रीमंत मनुष्य त्याला दोन रुपये देऊ लागला. पुढे तो मनुष्य लागोपाठ दहा दिवस आला नाही.

परंतु अकराव्या दिवशी आला आणि त्याने काही काम न मिळाल्या बद्दलची आपली रडकथा सांगितली. तेव्हां श्रीमंताने त्याला दोन रुपये दिले आणि म्हणाला–"काम शोधत रहा, मिळेल !"

- पण तो मनुष्य जागचा न हाललेला पाहून त्या श्रीमंत माणसाने त्याला विचारले– आतां काय ?"

"गेल्या दहा दिवसाचे दोन रुपयेप्रमाणे देता का ?" त्या तरुण मुलाने विचारले.

"तू इतके दिवस कां नाही आलास ?" श्रीमंताने विचारले.

"दररोज एक मैल चालून येणे सोपे आहे का हो ?" त्या तरुणाने विचारले.

"पैशासाठी एक मैल चालणे तुझ्या जिवावर येते आहे तर तू काम काय करणार रे ? आळशी ! चालता हो !" त्या श्रीमंत माणसाने त्याला हाकलून लावले.





# किल्ल्यातला कैदी

श्रीकांत व शंकर नावाचे दोघे मित्र एकाच गलबतावर काम करीत असत. श्रीकांत हुशार, मेहनती आणि इमानदार होता. कप्तानाचा त्याच्यावर फार विश्वास होता. परंतु श्रीकांतच्या या लोकप्रियते-मुळेच शंकरच्या मनाचा जळफळाट होई.

एकदां त्यांचे जहाज दूरच्या प्रवासावर जात असतां एका जागी कप्तान एकाएकी आजारी पडला आणि त्या आजारातच त्याला मरण- आले. श्रीकांतने स्वत:वर सर्व जबाबदारी घेऊन गलबत सुरक्षितपणे बंदरात आणले. त्यामुळे खूष होऊन गलबताच्या मालकाने श्रीकांतलाच कप्तान म्हणून नेमले. गलबतावरच्या सर्व लोकांना व फार आनंद झाला. परंतु श्रीकांतला कोणत्याही परिस्थितीत कप्तान होऊ द्यायचे नाही असे शंकरने आपल्या मनाशी पक्के ठरवून टाकले.

श्रीकांत मोठ्या आनंदाने घरी आला. ती बातमी ऐकून बाप म्हणाला–"बाळ! आज वृद्धापकाळी मला मनाची इच्छा पूरी झाल्याचा आनंद होत आहे. आता तूच सुशीलाच्या घरी जाऊन तिच्या वडिलांना सांग, मला चालवत नाही. त्यांनी येऊन भेटून जावे. तुमचे दोघांचे लग्न झाले की तू प्रवासाला जाशील तेव्हां निदान सुनबाई तरी या म्हाताऱ्याची विचारपूस करायला घरी राहील."

सुशीला एक रूपवती मुलगी होती. श्रीकांत तिच्या घरी पोंचला त्यापूर्वीच आणखी एक तरुण युवक तिला मागणी घालायला आला होता. त्याचे नाव रमाकांत असे होते परंतु सुशीलाच्या बापाने त्याला श्रीकांतशी सुशीलाचा विवाह होण्याचे ठरले असल्याचे सांगितले. रमाकांत निराश होऊन घरी परत जात

श्री. म. पं. जाधव



असतां वाटेत त्याला शंकर भेटला. शंकरने रमाकांतला विचारून सुशीलाशी श्रीकांतचा विवाह ठरल्याचे व त्याबद्दल रमाकांतला राग आल्याचे काढून घेतले व म्हणाला– "मित्रा! तू श्रीकांतचा काटा दूर करून आपला मार्ग मोकळा करून घे." शंकरने रमाकांतला आपल्या कटात सामील करण्याच्या हेतूने सुचविले.

"अरे पण श्रीकांतच्या जिवाला काही कारणाने अपाय झाला तर, जीव देईन असे सुशीलाने मला स्पष्ट सांगितले आहे." रमाकांत म्हणाला.

"तर मग मी तुला एक उपाय सुचवितो तसे कर. तो जिवंत राहील व तुझ्या आड येऊ शकणार नाही असा तो उपाय आहे." श्रीकांत म्हणाला.

रमाकांतला ते ऐकून परमानंद झाला. शंकरने त्याला गलबतातून प्रवास करीत असताना घडलेली गोष्ट सांगितली. म्हणाला–"आम्ही गलबतात बसून स्वदेशी परत यायला निघालो तेव्हां श्रीकांत कप्तानाच्या सांगण्यावरून एका बेटावर गेला होता. सरकारने त्या बेटावर आपल्या देशातल्या बंडखोर लोकांना ठेवले आहे. त्या बेटावरून एका बंडखोराने लिहिलेले पत्र कोणाला तरी देण्यासाठी श्रीकांत घेऊन आला आहे. मी सरकारला या गोष्टीची सूचना द्यावी म्हणतो. म्हणजे सरकार त्याला जन्म ठेप. शिक्षा करील."

तिकडे श्रीकांतच्या लग्नचा मुहूर्त ठरला होता. मुहूर्त दुसऱ्याच दिवसाचा होता. श्रीकांत लग्नाच्या तयारीला लागला असतां शिपायांनी त्याला अटक केली. श्रीकांतने मॅजिस्ट्रेटजवळ त्याचा काय अपराध आहे हे सूचित करण्यास विनंती केली.

मॅजिस्ट्रेट म्हणाला–"तुझ्यावर बंडखोरांस सामील झाल्याचा आरोप आहे. म्हणजे तूदेखील राजद्रोही आहेस."

श्रीकांत म्हणाला–"मी त्या बेटावर गेलो होतो ही गोष्ट खरी आहे. पण आपल्या गलबताच्या कप्तानाची मरणापूर्वीची इच्छा पुरी करण्यासाठी गेलो होतो. तेथे पोचल्यावर एक पत्र स्वदेशी पोचवायला म्हणून मला देण्यात आले होते. ते मी घेऊन आलो."

"ते पत्र तुझ्याजवळ असेल तर मला दाखव." मॅजिस्ट्रेट म्हणाला.

श्रीकांतने ते पत्र त्याला दाखविले. ते त्यावेळी त्याच्या खिशातच होते.

मॅजिस्ट्रेट त्या पत्रावरचा पत्ता वाचून दचकला. कारण त्या पत्रावर त्याच्या वडिलांचाच पत्ता होता. सरकारला ती गोष्ट कळली तर त्याची नोकरी जाईल हे मॅजिस्ट्रेटला माहीत होते.

"तू हे पत्र वाचलेस का?" मॅजिस्ट्रेटने श्रीकांतला विचारले.

"नाही, दुसऱ्याची पत्र वाचणे चुकीचे आहे असे मी मानतो." श्रीकांत म्हणाला.

"शाबास! तर मग तू थोडा वेळ शिपायांबरोबर कैदेतल्या खोलीतच रहा. मी हे पत्र जाळून टाकतो आणि तुला सोडून देण्यास शिफारस करतो." मॅजिस्ट्रेटने चतुराईने ते उत्तर देऊन श्रीकांतला घेऊन जायला शिपायांना सांगितले.

श्रीकांतला शिपायांनी एका किल्ल्यातल्या अंधार कोठडीत बंद करून ठेवले.

कित्येक दिवस तेथे राहल्यावर श्रीकांत हताश झाला. त्याने आमरण उपवास



करण्याचे मनाशी ठरविले. हळू हळू तो इतका अशक्त झाला की त्याला डोळे बंद करून पडून राहण्याशिवाय इतर काही करायला त्याच्या अंगात शक्तीच उरली नाही. तो असाच पडून असतां एकदां त्याला भिंतीच्या पलीकडून 'टक टक'चा आवाज ऐकू आला. कोणीतरी भिंतीला भोक पाडीत होता. असे पडून मरण येण्यापेक्षां एका गरीब कैद्याला मदत करता आली तर काय वाईट, असा विचार करून श्रीकांत उठला आणि त्याच्यासाठी म्हणून ठेवलेले अन्न खाऊ लागला. हळू हळू त्याच्या अंगात तकवा आला. पाणी प्यायला म्हणून त्याला जे डबडे देण्यात



आले होते ते फोडून त्याने त्याच्या अणकुचीदार टोकाने भिंतीला ज्या जागी 'टकटक' आवाज येत होता तेथे भोक पाडायला सुरवात केली आणि दोन्हीकडच्या प्रयत्नाला यश येऊन एक दगड काढता आला. पलीकडच्या खोलीत एक म्हातारा रहात होता. त्याच्याशी त्याला छान बोलता येऊं लागले. दोघे परस्परांच्या खोलीत जाऊ येऊं पण लागले. पलीकडच्या खोलीत कोणी म्हातारा पुरोहित होता. त्याला जन्मठेपेची शिक्षा झाली होती. दोघांची मैत्री वाढत गेली. श्रीकांतने आपली गोष्ट त्याला सांगून विचारले—"आतां तुम्हीच सांगा, माझा काय अपराध आणि ही शिक्षा मला कां?"

म्हातारा म्हणाला—"तुला कप्तान नेमण्याचे तुझ्या मालकाने ठरविले होते ना? ते तुझ्या कोणातरी साथीदाराला आवडले नसणार. तुझे लग्न एका सुंदर मुलीशी ठरले होते. तिला मागणी घालणारा दुसरा कोणी असेल, त्याने तुझा कांटा दूर करण्यासाठी हा मार्ग काढला असेल."

श्रीकांतच्या डोक्यात तेव्हां प्रकाश पडला, हे सर्व काम शंकर आणि रमाकांतचे असले पाहिजे. त्याने म्हाताऱ्याला हे देखील विचारले—"त्या मॅजिस्ट्रेटच्या मनांत माझ्याविरुद्ध अढी पडण्याचे कारण काय?"

"अरे तू पत्र घेऊन आला होतास ना? ज्याच्या नावाचे ते पत्र होते त्याला वांचविण्यासाठी त्या मॅजिस्ट्रेटने तुला कैदेत टाकले. त्याने ते पत्र जाळून कां टाकावे?" म्हाताऱ्याने प्रश्नार्थी उत्तर दिले.

ते सर्व ऐकून श्रीकांत दांत ओठ चावीत म्हणाला—"अस्सं! तरमग या मंडळींनी माझ्या विरुद्ध असा कट केला काय?"

म्हाताऱ्याला अनेक गुप्तविद्या व निरनिराळी औषधे पण माहीत होती. त्याने श्रीकांतला ते सर्व शिकवून दिले.

एक दिवशी म्हातारा एकाएकी आजारी पडला. श्रीकांतला जवळ बोलावून म्हणाला—"बाळ! या जगात आतां माझा कोणी उरला नाही. म्हणून माझ्याजवळ [illegible] तुला द्यायचे ठरविले आहे. माझे सर्व धन समुद्रकाठी एका गुहेत मी लपवून ठेवले आहे. येथून तुला सुटका मिळाल्यावर तू ते घे. तूच त्याचा मालक!"

त्याच दिवशी म्हाताऱ्या कैद्याला मरण आले. दुसऱ्या दिवशी कैद्यांनी त्याचे प्रेत एका रिकाम्या पोत्यात घालून ठेवून दिले आणि ते उचलून नेण्यासाठी मजुरांना बोलावून आणण्यासाठी निघून गेले.

श्रीकांतने ते निघून गेल्याचा आवाज ऐकला. आपल्या उपकारकर्त्या म्हाताऱ्याचे शेवटचे दर्शन घेण्याच्या हेतूने तो त्या म्हाताऱ्याच्या खोलीत गेला. तेथे गेल्यावर याला स्वतःच्या सुटकेची गोष्ट सुचली. त्याने त्या म्हाताऱ्याचे प्रेत बाहेर काढले आणि प्रेत आपल्या खोलीत आणून आपल्या अंथरुणावर ठेवून झोपल्यासारखी चादर त्याच्यावर पसरून ठेवली. नंतर पोत्यात शिरून मढ्यासारखा पडून राहिला. त्याने त्या म्हाताऱ्याचा चाकू आपल्या खिशात ठेवून घेतला.

काळोख पडल्यावर मजुरांनी येऊन ते पोते समुद्रात नेऊन टाकले. समुद्रात पोते पडल्याबरोबर श्रीकांतने चाकूने पोते फाडून पोहोत बाहेर निघून आला. किनाऱ्यावर तो खडकाआड लपून बसला. म्हाताऱ्याने सांगितलेल्या खाणाखुणाच्या आधारे त्याने समुद्रकाठची ती गुहा शोधून काढली आणि त्या गुहेत त्याला म्हाताऱ्याची सर्व संपत्ती















एका पेटीत सांपडली. अचानक्हेने श्रीकांत एकाएकी श्रीमंत झाला. त्याने थोडे हिरे व सोने काढून घेतले.

हळू हळू गुहेतले धन आणून श्रीकांतने एक मोठे घर बांधले आणि थाटाने राहू लागला. परंतु त्याच्या मनाला शांति नव्हती. त्याला आपल्या तिघां शत्रूवर सूड उगवायचा होता. सूड उगविल्याशिवाय त्याला शांति कशी मिळणार? त्याने तिघांच्या विषयी सर्व चवकशी केली.

एकदा श्रीकांतने एका मुलाला वांचविले. तो मुलगा रमाकांत व सुशीलाचा होता. एकदा तो मुलगा श्रीकांतला आपल्या आई-वडिलांची ओळख करून द्यायला घेऊन गेला. सुशीलाने श्रीकांतला ओळखले. परंतु रमाकांतने त्याला ओळखले नाही.

श्रीमंतीमुळे गावात श्रीकांतचा लोक फार आदर करीत. मॅजिस्ट्रेटची दुसरी बायको स्वभावाने फार लोभी होती. ती स्त्री पैशासाठी काय वाटेल ते करील हे श्रीकांतने ओळखले. तिच्या मदतीने त्याने मॅजिस्ट्रेटवर सूड उगवायचे ठरविले. त्याने मॅजिट्रेटच्या बायकोचा विश्वास संपादन करून तिला समजावून सांगितले की त्या मूर्खाचा काटा सहजी दूर करता येईल. एक विष आहे ते दिले तर विष खाणारा मनुष्य तत्काळ न मरता. हळू हळू आजारी पडून मरतो. कोणी विष दिल्याचे कळत नाही. ते ऐकून त्या बाईला कसला तरी मोठा आनंद झाल्यासारखे तिच्या चेहऱ्या-वरून दिसले. आपला नेम बरोबर बसला हे श्रीकांतला कळले. त्या बाईने श्रीकांतकडून ते औषध मागून घेतले.

शंकरचा परदेशाशी मोठा व्यापार होता. त्याचा माल गलबतातून परदेशात जात असे. व्यापारी उधारीने त्याला वाटेल तेवढा माल देत. ज्या गलबतातून शंकर आपला माल परदेशात पाठवी. ती गलबते श्रीकांतने त्यांच्या मालकांकडून त्यांनी सांगितलेल्या किमतीवर विकत घेतली. शंकरने ज्या बंदरात पोचविण्यासाठी माल

बंदरात गलबते न नेता दुसरीकडे पोचती करून गलबते बुडाल्याचे जाहीर केले. कर्जदारांनी शंकरकडून आपले पैसे वसूल केले. त्याचे दिवाळे निघाले.

रमाकांत सैन्यात असतां त्याने आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्याची सर्व संपत्ति लुबाडली होती. त्याने पैशाच्या मोहाला बळी पडून त्या अधिकाऱ्याचा गुप्तपणे खून केला होता. श्रीकांतने रमाकांतची ही जीवनकथा वर्तमान पत्रात छापली. चवकशी झाली व सर्व आरोप खरा ठरल्यामुळे त्याचा समाजातला गौरव कायमचा गेला. त्याला तोंड दाखविणे सुद्धा अशक्य झाले. सुशीला व रमाकांत दोघांना आपले घर सोडून जावे लागले. तो अपमान असह्य झाल्याने रमा-कांतने आत्महत्या करून घेतली.

आता मॅजिस्ट्रेटचा सूड घ्यायचे काम उरले होते. मॅजिस्ट्रेटच्या बायकोने आपल्या नवऱ्याला नकळत दिलेल्या विषचा परिणाम होऊ लागला.

मॅजिस्ट्रेटच्या पहिल्या बायकोला एक मुलगी होती. मॅजिस्ट्रेटच्या दुसऱ्या बायकोने तिच्यावर त्या विषाचा प्रयोग केला.

श्रीकांतने त्या मुलीला सांगितले की तिने मेल्याचे सोंग करून पडून रहावे. मॅजिस्ट्रेटला त्याची मुलगी खरीच मेल्या-सारखे वाटले. त्याने आपल्या मुलीला एका शवपेटीत घालून नेले आणि तिला पुरून टाकले. त्यानंतर श्रीकांतने तिला तिच्या थडग्यातून काढून तिच्यावर प्रेम करणाऱ्या एका तरुण मुलाशी तिचे लग्न करून दिले.

त्यानंतर मॅजिस्ट्रेट एके दिवशी त्याच्या बापाच्या खोलीत श्रीकांतला भेटला. त्याला आश्चर्याचा धक्काच बसला. श्रीकांतने स्वतःची खरी ओळख दिली. ते ऐकून मॅजिस्ट्रेटला मानसिक धक्का बसला व त्याचे डोके फिरले आणि तो तेथून निघून गेला. मॅजिस्ट्रेटच्या वडिलांना श्रीकांतने स्वतःच्या वडिलांसारखा मान देऊन पुढील आयुष्य आनंदाने घालविले



# राजाचा धोबी

एका राजाने आपल्यासाठी एका नव्या धोब्याची नेमणूक केली होती. एक दिवशी त्याने आपल्या खास नोकराला बोलावून, धोब्याच्या घरी कपडे घेऊन यायला सांगायला पाठविले. राजाचा नोकर धोब्याच्या घरी पोचला तेव्हां धोबी कपड्यांचे एकेक गाठोडे गाढवाच्या पाठीवर ठेवीत म्हणत होता–"आज हुजूर सरकारावर ज्यास्त ओझे टाकीत आहे, म्हणून स्वारींनी माफ करावे. माझ्यावर रागावू नये. मी आपला स्वामिभक्त नोकर आहे."

नोकर ते ऐकून चकित झाला. त्याने राजाकडे जाऊन जे काही पाहिले वा ऐकले होते ते सांगितले. म्हणाला–"महाराज, आपल्या धोब्याला वेड लागल्यासारखे दिसते आहे."

राजाने धोब्याला बोलावून घेतले. त्याच्याशी बोलला तर तो सरळ बोलला. त्याच्यात कोणत्याही प्रकारचे वेडेपणाचे चिन्ह दिसले नाही. तरी त्याने धोब्याला विचारले–"काय रे, तू आपल्या गाढवाजवळ एवढे नम्रपणे काय बोलत असतोस? मी कोणाकडून तरी ऐकले म्हणून विचारतो आहे."

"महाराज! आम्ही खालच्या जातीची माणसं, आपल्यासारख्या थोरा मोठ्यांशी कसे बोलयचं हे शिकायला फार परिश्रम करावे लागतात. आम्ही आपसात 'अरे तुरेच' करून बोलतो. नम्र होऊन बोलायची संवय करायला मला या गाढवाशिवाय दुसरं कोण आहे? आपणच सांगावे महाराज!" धोबी म्हणाला.






# अलीबाबा आणि चाळीस चोर

[४]

मर्जीनाने त्या बुदल्यातले सर्व तेल काढून घेतले आणि एका मोठ्या कढईत खूप खवळून येईपर्यंत तापविले. नंतर ते तापविलेले तेल एका बालडीत भरून घेऊन ते बुदले ठेवले होते तिकडे गेली आणि प्रत्येक बुदल्यावरचा खजुरीच्या चटईचा दादरा सोडून त्यात ते तेल ओतीत गेली. बुदल्यात बसलेल्या चोरांना ओरडायला सुद्धा वेळ मिळाला नाही ते आंतल्या आत ठार झाले. अशा तऱ्हेने मर्जीनाने सर्व चोरांना एकेक करून ठार केले आणि सर्व बुदल्यांवर पुन्हां दादरा जसाचा तसा बांधून ठेवून दिला. चूल विझवून आपल्या खोलीत आली आणि पुढे काय काय होते हे पाहण्यासाठी वाट पहात बसली.

मध्य रात्रीच्या सुमारास चोरांचा सरदार उठला आणि खिडकीतून त्याने बाहेर पाहिले. कोठे दिवा जवळ नव्हता किंवा उजेड नव्हता. चहूंकडे दाट काळोख पडला होता. माणसांची चाहूलपण पूर्णपणे बंद झाली होती. सर्व जग झोपले आहे. हीच वेळ आपल्याला आपला पुढला कार्यक्रम पार पाडायला सोयीची आहे. असा विचार करून, बरोबर आणलेल्या खड्यातून एकेक काढून तो बुदल्यांवर फेंकू लागला. बुदल्यावर खडे पडल्याचा आवाज झाला, पण कोणी आतून उठल्याचा आवाज झाला नाही. तो मनातल्या मनात म्हणू लागला–"हे सर्व झोपले की काय?" असा विचार करून तो पिछाडीच्या उघड्या आवारात गेला. तेथे त्याला तेलात मासा भाजल्याचा जसा घाण वास येतो तसा वास आला. तो घाबरला. त्याने एका बुदल्यावरचा दादरा सोडून आत पाहिले तर ऊन ऊन वाफ व उबट्ट वास बाहेर आला.

अरबस्तानातील एक लोककथा



त्याने थोडे गवत घेऊन त्याची चूड तयार करून सर्व बुदल्यांजवळ जाऊन पाहिले, त्याचे सर्व अनुयायी मरून गेल्याचे त्याला आढळले.

त्याचे केवढे मोठे नुकसान झाले आहे, तेव्हां सरदाराच्या लक्षात आले. तो आवाराच्या भिंतीवरून पलीकडे उडी मारून पळून गेला आणि सरळ जंगलातल्या आपल्या गुहेत येऊन पोचला. पुढे काय करायचे हे त्याला सुचेना.

मालक व मालकाचे कुटुंब एका मोठ्या संकटातून वांचल्याचे एकट्या मर्जीनाला माहीत होते. रात्रभर तिने कोणाला जागे केले नाही आणि रोजच्या नियमाप्रमाणे जागा झाल्यावर माडीवरून खाली उतरून आला तेव्हां मर्जीनाने त्याला पिछाडीला नेऊन बुदल्यातल्या चोरांची मढी दाखविली. म्हणाली–"धनी! पाहिलेत केवढे मोठे संकट टळले ते?"

अलीबाबा ते पाहून चकित झाला. त्याच्या घरावरचे केवढे मोठे संकट टळले, या एका विचारानेच काही वेळ त्याच्या तोंडातून शब्द फुटला नाही. मर्जीनाने रात्री काय काय घडले हे थोडक्यात सांगितले. अलीबाबाच्या डोळयातून आनंदाश्रु वाहू लागले. तो म्हणाला–"मर्जीना! तुझ्या या उपकाराची फेड मी कधी करू शकेन का? ज्या आईच्या पोटी तू जन्माला आलीस ती खरोखरच धन्य आहे. आजपासून तू आमच्या घरातली गुलाम दासी नसून आमच्याच मुलांपैकी एक आहेस! तूच यापुढे मालकीण पण झाली आहेस!"

त्याने अब्दुल्लाच्या मदतीने आपल्या परसात एक मोठा खड्डा खणला आणि त्यात सर्व चोरांची प्रेते पुरली. त्यानंतर अलीबाबा निश्चितपणे पहिल्यासारखा राहू लागला. अलीबाबाच्या कुटुंबातील सर्व मर्जीनाला एका देवीसारखे मानू लागले.

कासिम वारल्यावर त्याच्या दुकानाचा कामधंदा अलीबाबाचा मोठा मुलगा पाहू

अलीबाबाला त्याच्या दुकानाशेजारी हुसेन नावाच्या एका माणसाने दुकान उघडले असल्याचे सांगितले आणि म्हणाला–"गेले चार पाच दिवस त्याच्या घरून दुपारी खाण्याचा डबा येतो तोच आम्ही दोघे खातो. एक दिवशी त्याला जेवायला आपल्या घरी बोलावू का?"

अलीबाबा म्हणाला–"अरे बोलाव! त्यात विचारायचे काय? इतके दिवस कां नाही बोललास? उद्या जुम्मा (शुक्रवार) आहे ना, उद्याच बोलाव जेवायला, उद्या रात्री बरं का? तो संकोच करू लागला तर आग्रह करून बोलाव. मी सुद्धा आग्रह करून बोलावले आहे म्हणून सांग."

आपल्या घरी एक पाहुणा जेवायला येणार या गोष्टीचा अलीबाबाला फार फार आनंद होता.

अलीबाबाच्या मुलाने आपल्या त्या मित्राला आपल्यावतीने व अलीबाबाच्या वतीने शुक्रवारी रात्री जेवायला बोलाविले आणि त्याला बोलावून घेऊन पण आला. अलीबाबाने पुढे होऊन त्याचे प्रेमाने स्वागत केले आणि म्हणाला–"आज आपण आमच्या घरी आलात, आमचे घर पवित्र झाले."

हुसेनला लांब दाढी होती. तो वांकून सलाम करून म्हणाला–"माफ करा. एक



विनंती आहे. मी एक व्रत ठेवले आहे. मी मीठ खात नाही. तेव्हां जे पदार्थ कराल त्यात मीठ न घालायला सांगून ठेवा, घरात!"

"त्यात काय मोठेसे? आपल्या करिता मीठ घालण्यापूर्वी वरण भाजी व रस्सा बाजूला काढून ठेवायला सांगून ठेवतो, मर्जीनाला." अलीबाबा म्हणाला आणि त्याने घरात जाऊन मर्जीनाला तसे समजावून सांगितले. तिला आश्चर्य पण वाटले. तिने मालकाच्या आज्ञेप्रमाणे मिठाशिवायचे पदार्थ बाजूला काढून ठेवले.

रात्री अलीबाबा व त्याचा मुलगा दोघे आपल्या पाहुण्याला आदरपूर्वक बोलावून घेऊन जेवायला बसले. मर्जीना व अब्दुल्ला



दोघांनी जेवायला वाढले. मर्जीना आपल्या पाहुण्याकडे लक्षपूर्वक पहात होती. तिला त्याचा चेहरा ओळखीचा, कोठेतरी पाहिल्या-सारखा वाटला.

जेवणखाण आटोपल्यावर तिथे गप्पा मारीत बसले असतां मर्जीना नर्तकीचा वेष धारण करून बाहेर बैठकीत आली.

मर्जीनाचा तो वेष आणि ते रूप पाहून अलीबाबा थक्कच झाला. तिच्या कपाळावर सोन्याची झालर चमकत होती. गळयात रत्नहार होता. कंबरेत कंबर पट्टा व पायात पैंजण होते. कंबर पट्टयात खंजीर खोचून ठेवलेला होता. तिच्या पाठीमागे अब्दुल्ला डफ घेऊन उभा होता. तिने आपल्या [illegible] लागली.

मर्जीना बराच वेळ नाचत राहली. दम घ्यायला सुद्धा थांबली नाही. तिने यहूदी, ग्रीक व इराणी पद्धतीचे नृत्य प्रकार दाखविले. तिचे ते नृत्य पाहण्यात सर्व मग्न होऊन गेले होते.

मर्जीनाने शेवटचे नृत्य असे सांगून नृत्य सुरू केले. तिने हातात खंजीर घेतला. मध्येच तो खंजीर, आपल्या छातीजवळ नेई ती मध्येच अब्दुल्लाकडे वळवी, मधून मधून आपल्या दोघां मालकांच्या व पाहुण्याच्या रोखाने नेई, जणुकाही आपल्या शत्रूवरच ती खंजिराचा प्रहार करीत असल्याचे दाखवी. नंतर याचना करण्यासारखा अभिनय करीत तिने अलीबाबासमोर डफ ठेवला. अलीबाबाला तिचा हा अभिनय आवडला नाही. तरी तिने डफ पुढे केला होता म्हणून त्याने त्यात एक मोहोर टाकली. अलीबाबाच्या मुलाने पण एक दीनार टाकला. त्याचा मित्र हुसेन खिशातून दीनार काढू लागलेला पाहताच मर्जिनाने नागिणीसारखी एकदम उडी मारून त्याच्या छातीत खंजीर भोसकला. हुसेन जागच्या जागी ठार झाला.

अलीबाबाला वाटले की मर्जीनाने एका श्रीमंत व्यापाऱ्याचा खून करून अनर्थ केला आहे. त्याच्या मुलाला [illegible] म्हणाली—"मी या घरचे अन्न खाल्ले आहे. आपल्या मालकाला त्याच्या शत्रूपासून वाचविण्यांसाठी मला हे दुष्कृत्य करावे लागले. असे सांगून तिने त्या व्यापाऱ्याची नकली दाढी ओढून काढून फेकून दिली आणि म्हणाली—"हा पहा, कोण आहे तो. हा तेलाचा व्यापारी, तुमचा शत्रु आहे."

अलीबाबाने पण त्या तेलच्या व्यापाऱ्याला ओळखले. मर्जीनाने त्याला व त्याच्या कुटुंबाला दोन वेळां वांचविले होते. म्हणून तो म्हणाला—"मर्जीना! तुझे उपकार मी कसे फेडू हेच मला कळत नाही. तू माझ्या मुलाशी लग्न करून घेऊन माझी सून झालीस तर आम्हांला फार आनंद होईल.

मर्जीनाने मान्य केल्यावर अलीबाबाने तिचा हात आपल्या मुलाच्या हातात देऊन दोघांना आशीर्वाद दिला.

अलीबाबाने रात्री चोरांच्या सरदाराचे प्रेत, त्याच्या साथीदारांना जेथे पुरले होते, त्याच खड्डयात पुरले.

मर्जीनाचे लग्न झाले त्यानंतर सुमारे एक वर्षभर अलीबाबा चोरांच्या गुहेच्या बाजूला गेला नाही. कारण आणखी दोघे चोर कोठे आहेत हे त्यांना माहीत नव्हते. ते जिवंत असतील तर जिवाला धोका आहे असे मर्जीनाने त्याला सांगून ठेवले होते.

परंतु एका वर्षानंतर अलीबाबा मर्जीनाला व आपल्या मुलाला बरोबर घेऊन त्या गुहेजवळ गेला. गवत खूप वाढले होते. घोडयांच्या टापांच्या किंवा माणसाच्या येण्या जाण्याच्या खुणा कोठे दिसल्या नाहीत तेव्हां तेथे आता चोर नसले पाहिजेत या गोष्टीची खात्री झाल्यावर अलीबाबाने "तिळा तिळा, दार उघड" म्हटले. त्याबरोबर दार उघडले आणि सर्व गुहेत गेले.

अलीबाबा त्या सर्व संपत्तीचा मालक झाला. त्याने गुहेतील सर्व संपत्ति हळूहळू आपल्या घरी नेली आणि एक सामान्य लाकूडतोडया आपल्या गावातला सर्वात श्रीमंत मनुष्य म्हणून ओळखला जाऊ लागला.



# नवाब व सांड

एकदा बंगालचा नवाब कृष्णचंद्र नांवाच्या राजाच्या राजधानीत गेला आणि त्याने गावात सोयीची जागा पाहून तंबू उभे करायला सांगितले. थोड्या वेळाने नवाबाचा डेरा ज्या जागी होता बाजूला एक सांड आला. नवाबाने त्याला पकडवून त्याचे मांस शिजवायला सांगितले. नोकरांनी त्याला धरून एका जागी नेऊन उभे केले. थोड्या वेळाने राजाच्या कानावर ती बातमी गेली. राजाने आपल्या वडिलांच्या श्राद्धप्रसंगी तो पोळ सोडला होता.

राजाला काळजीत पडलेला पाहून त्याच्या दरबारातला गोपाळ नावाचा विदूषक नवाबाकडे जाऊन हात जोडून म्हणाला–"हुजूर! मी आपल्या राजधानीच्या नागरिकांतर्फे आपले आभार मानण्यासाठी आलो आहे. आमची एक पीडा कायमची टळेल. अहो हा भाजी बाजारात शिरून धुमाकूळ घालतो. पण एका गोष्टीबद्दल वाईट वाटते. हा आमच्या रस्त्यातली घाण खाऊन रस्ते साफ ठेवीत असे. आता आम्हांला नाकें बंद करून चलावे लागणार! तरी आम्हांला त्याची हरकत नाही. पुढे दुसरा साफ करील."

"काय म्हणतां असा बैल आहे हा? मला नको असला बैल." असे सांगून नवाबाने बैलाला सोडून द्यायला सांगितले.

राजाने गोपाळ विदूषकाच्या चातुर्याबद्दल त्याची पाठ थोपटली.





# पितृभक्ति

चीन देशात टोंग नावाचा एक गरीब तरुण युवक रहात असे. त्याची आई त्याच्या लहानपणीच वारली. त्याला एकोणिसावे वर्ष लागले तेव्हां त्या मुलाचा बाप वारला. त्याच्या बापाजवळ एक फुटकी कवडीसुद्धा नव्हती. म्हणून टोंग अगदी निराधार झाला.

टोंगला आपल्या बापाची अन्त्येष्टी करून एक समाधी बांधावी लागणार हे कळले. पण त्याच्या जवळ पैसेच नव्हते. मग हे काम कसे पुरे होणार? पैसे मिळवायला त्याला काही उपाय सुचेना. पैसे मिळवायला एक उपाय अवश्य होता, त्याने स्वत:ला विकून टाकून कोणाच्या तरी गुलाम होऊन राहणे. पण त्याच्या मित्रमंडळींनी त्याला तसे न करण्याबद्दल त्याला सल्ला दिला. परंतु पैसे मिळवायला दुसरा काही उपाय कोणी सुचविला नाही.

टोंगने एका पुठ्ठ्यावर आपली किंमत लिहून आणि स्वत:ला विकून घ्यायला तयार असल्याचे व खरेदीच्या अटी वगैरे लिहून आपल्या गळ्यात तो पुठ्ठा अडकविला आणि गुलामांच्या बाजारात जाऊन बसला. गुलामांची खरेदी करणारे पुठ्ठ्यावर लिहिलेल्या अटी वगैरे वाचून पुढे निघून गेले. काही लोक त्याला लोभी म्हणत तेथून निघून गेले.

कारण टोंगने जी रक्कम पुठ्ठ्यावर स्वत:ची किंमत म्हणून लिहून ठेवली होती ती फार जास्त होती. परंतु टोंग त्या किंमतीहून कमी किंमतीत स्वत:ला विकायला तयार नव्हता. तेवढी किंमत वडिलांचे श्राद्ध करायला व त्यांची समाधी बांधण्याकरिता आवश्यक होती. त्याला वाटले की कदाचित आपल्याला कोणी विकत घ्यायला तयार होणार नाही. परंतु सुदैवाने त्याच वेळी एक कोणी मोठा अधिकारी पुढे आला व

त्याने सर्व अटी वाचल्या. त्याने विचार करून टोंगाने जी रक्कम मागितली होती ती दिली. त्याने टोंगकडून कबूलीपत्र लिहून घेतले.

टोंगची इच्छा पुरी झाली. त्याने आपल्या वडिलांचे श्राद्ध केले आणि एका चांगल्या कारागिराला बोलावून चांगली समाधी बांधवून घेतली. नंतर तो आपल्या मालकाच्या घरी जाऊन काम करू लागला. त्याच्या मालकाने त्याला एक चांगलीशी झोपडी बांधून दिली.

टोंग आपल्या धन्याकडे तो सांगेल ते काम करी. कित्येक दिवस लोटले. टोंगला कधी सुख नाही की विश्रांती नाही. दिवसभर खपायचे आणि रात्री घरी येऊन जे [illegible] अंगात घालायला धड कपडेदेखील त्याच्याकडे नसत. तरी तो आपल्या बापाचे श्राद्ध नित्य नियमितपणे करीत राहूला.

एकदा पिकाची कापणी सुरू झाली. टोंगचे काम वाढले. एक दिवशी रात्री त्याला ताप आला. त्याला स्वतःची शुद्ध नव्हती. उद्या सकाळी कामावर कसे जायचे याची काळजी पण लागली होती. अशा वेळी तो डोळे मिटून पडला असता कोणीतरी येऊन त्याच्या डोक्यावर थंड हात ठेवला. टोंगला आश्चर्य वाटले. पण त्याने उघिरां डोळे उघडून पाहिले. त्याला ताप कमी होत आल्यासारखा वाटला. अंगात शक्ती येऊ लागल्यासारखे वाटले. [illegible]

"तू कोण?" हे विचारण्याचे साहससुद्धा त्याला झाले नाही.

ती स्त्री म्हणाली–"मी तुझा आजार बरा करून तुझ्याशी लग्न करून तुझ्या बरोबर राहण्यासाठी आले आहे." टोंग उठून बसला आणि चकित होऊन उभा राहिला. त्या स्त्रीशी लग्न केले तर तिला पोटभर जेवायला घालण्याची सुद्धा त्याची स्थिति नाही हे सांगण्याचे मनात असूनही त्याला साहस झाले नाही. परंतु त्याच्या मनातली गोष्ट तिला कळली. ती म्हणाली–"आपल्या दोघांचे पोट भरण्याची जबाबदारी मी घेते!"

टोंगला लाज वाटली. त्याने आपले फाटके मळके कपडे पाहिले. तिच्या अंगावर पण तसेच कपडे होते. तिच्या अंगावर एक देखील दागिना नव्हता दोघे देवासमोर जाऊन वंदन करून पितरांचे स्मरण करून पतिपत्नी झाले.

त्यांचे लग्न विचित्रच होते. ती स्त्री कोणाची मुलगी, कोठून आली हे देखील टोंगने तिला विचारले नाही. तिनेच आपले नाव 'ची' आहे असे सांगितले. त्याहून जास्त काही बोलली नाही. तिलाच तो मालकीण मानू लागला आणि तिचाच गुलाम म्हणूम तिचा फार आदर करू लागला. त्याच्या मित्रांनी ती कोण रे कोठून आली वगैरे अनेक प्रश्न करून तिची







ओळख विचारली, पण टोंग त्यांच्या एका-देखील प्रश्नाचे उत्तर देऊ शकला नाही. ती आली त्या दिवसापासून, आपण एक गुलाम आहो ही गोष्ट तो विसरू लागला. कारण ती आली त्या दिवसापासून त्याच्या जीवनात फार मोठा बदल झाला. त्याचे घर स्वच्छ राहू लागले. त्याचे कपडे स्वच्छ राहू लागले. घरात चहूंकडे टापटीप दिसू लागली. कामावर जाण्यापूर्वी आणि कामा-वरून परत आल्यावर पोटभर खायला मिळू लागले.

टोंगची बायको हात मागावर काम करी. ती फार सुंदर चित्रविचित्र रंगाची वस्त्रे विणू लागली. ती वस्त्रे इतकी सुंदर [illegible] येऊ लागल्या. व्यापारी येऊन तिला त्या रेशमी कापडाची किंमत देऊन कापड विकत घेऊन जात. लोक तिला म्हणत– "आम्हांला तुझ्या हाताची ही कला शिकवून दे. तू मागशील ते देऊ." पण ती त्यांना शिकवीत नसे. ती त्यांना सांगे की मी शिकवायचे ठरविले तरी तुम्हांला ती कला येणार नाही. कारण ती विणू लागली म्हणजे तिची बोटे दिसतच नसत.

दोघांची पोटे भरण्याची जबाबदारी तिने स्वत:वर घेतली होती. ती जबाबदारी तिने पार पाडली. आतां टोंगच्या जीवनात कसलीच उणीव म्हणून उरली नाही. घरातली पैशांची पेटी भरत गेली. एक दिवशी चीने ती पेटी उघडून टोंगला चांदीची नाणी दाखविली व एक कागद काढून दाखविला. त्यात टोंगची किंमत परत मिळाल्याचे व याला दास्यमुक्ती मिळाल्याचे लिहिले होते. पत्नीचे ते उपकार पाहून टोंगच्या डोळ्यातून आनंदाची टिपे गळू लागली.

"दक्षिणेकडचे शेत मी तुझ्यासाठी विकत घेतले आहे आणि रेशमी किड्यांची एक बाग सुद्धा घेऊन ठेवली आहे. या पुढे तुला दुसऱ्याची चाकरी करण्याची गरज उरली नाही. तू स्वत:च्या शेतात व मळ्यात [illegible] आभार म्हणून टोंग चीचे पाय धरून नमस्कार करायला खाली वांकला. पण तिने तसे करू दिले नाही.

टोंगचे नशीब उघडले होते. त्याच्या शेतात चांगले पीक निघू लागले. त्याला प्रत्येक कामात चांगले यश येऊ लागले. त्याच्याकडे कामाला येणारे लोक त्याचा आदर करीत व तो देखील त्यांना प्रेमाने वागवी. टोंगची बायको गरोदर झाली व तिला एक सुंदर गुटगुटीत मुलगा झाला. त्या मुलाला जो पाही तो म्हणे–"हा मुलगा मर्त्यलोकांतला सामान्य मुलगा नसून देव-लोकातून आलेला मुलगा दिसतो आहे."

थंडीचे दिवस होते. टोंग आपल्या बायकोबरोबर बोलत बसला होता. एका-एकी त्याला त्याची बायको एकदम जास्त सुंदर झाल्यासारखी वाटली.

उजाडण्याच्या सुमारास ची जागी झाली व टोंगचा हात धरून ती त्याला पाळण्या जवळ घेऊन गेली. त्या वेळी कां कोणास ठाऊक टोंगला ते सर्व विचित्र वाटू लागले. तो घाबरला. त्याने डोळे मिटून घेतले आणि तिच्या समोर गुडघे टेकून बसला. मान वर करून डोळे उघडून त्याने पाहिले तर चीचे रूप पालटून गेले होते. आता तिच्या नेहमीच्या उंची-पेक्षा ती फारच जास्त उंच दिसू लागली होती. तिच्या चेहऱ्यावर एक अपूर्व तेज दिसत होते.

"आता तुला सोडून मला जावे लागत आहे. मी या मर्त्यलोकातली स्त्री नसून तुझ्यासाठी हे मानव रूप घेऊन काही दिवसांसाठी आले होते. माझी स्मृति म्हणून तुझ्याकडे आपला हा मुलगा आहेच. तुझी पितृभक्ति पाहून स्वर्गाच्या प्रमुखाने मला पाठविले होते. मला आता त्यांच्याकडे परत जावे लागणार. माझे नाव 'ची-नीयू' असे आहे. मी एक अप्सरा आहे.

हळूहळू तिच्या शरिराची कांति कमी होऊ लागली आणि ती अदृश्य झाली.



# अघटित

एका गावी दोघे भाऊ होते. मोठा श्रीमंत होता व धाकटा गरीब. एकदा धाकटा मोठ्या भावाकडे गेला आणि त्याने शेरभर तांदूळ मागितले. मोठ्या भावाने नकार दिला.

त्याच दिवशी रात्री मोठ्या भावाच्या घराच्या दारावर कोणीतरी थाप मारली आणि जवळच्या झाडीत मोठे धन पुरलेले आहे असे सांगितले. मोठ्या भावाने दार उघडून पाहिले नाही. त्याला भीती वाटली. त्याने आपल्या धाकट्या भावाला सकाळी ती गोष्ट सांगितली तेव्हां तो म्हणाला–"आज रात्री पुन्हां असाच कोणी आला तर मला उठव."

दुसऱ्या दिवशी कोणीतरी येऊन धाकट्या भावाच्या दारावर थाप मारली आणि म्हणाली–"झाडीत खजिना आहे, घेऊन जा." धाकट्या भावाने मोठ्या भावाला उठवून ती गोष्ट सांगितली आणि तो जाऊन झोपला. मोठा भाऊ मध्येच रात्री उठला आणि त्याने झाडीत जाऊन पाहिले तर त्याला तेथे एक मेलेला घोडा दिसला. त्याला राग आला त्याने घोड्याचा एक पाय कापून आणला आणि धाकट्याच्या घरांत खिडकी वाटे टाकला.

दुसऱ्या दिवशी मोठ्या भावाने धाकट्याच्या खिडकीतून घरात पाहिले तेव्हां तो मोहरा मोजीत होता. तो उलट पावली झाडीत गेला. पण तेथे मेलेला घोडा नव्हता.

मोठ्या भावाने धाकट्या भावाला विचारले–"का रे तू परवां तांदूळ मागायला आला होतास, देऊ का ?" पण धाकटा म्हणाला–"दादा ! मला आता त्यांची गरज नाही !"





# महाभारत

दुःशासनाच्या सूचनेवरून दुर्योधन आपल्या वडिलांजवळ जाऊन म्हणाला–"बाबा! आम्ही द्यूत खेळून जे जिंकले ते तुमच्या लहरीपणामुळे पुन्हा घालवून बसलो. पांडव आमच्यावर सूड उगविल्याशिवाय राहणार नाहीत. ते नक्कीच युद्ध करतील व सर्व कौरवांचा संहार करतील. कारण त्यांच्याजवळ अपार शक्ति आहे. आतां त्यांना पुन्हां द्यूत खेळायला बोलवा. या खेपेस दुसरी तिसरी अट न ठेवतां, फक्त जो द्यूतात हारेल त्याला तेरा वर्षे वनवास भोगावा लागेल ही एकच एक अट ठेवावी. त्या अवधीत आम्ही इतर राजांना आपल्या बाजूला वळवून घेऊ आणि पांडव युद्धाला आले तर नक्कीच त्यांचा पराभव करू."

धृतराष्ट्र त्या गोष्टीस कबूल झाला. भीष्म, द्रोण, विदुर वगैरे थोरामोठ्यांनी त्या विरुद्ध त्याचे मन वळविण्याचा व्यर्थ प्रयत्न केला. गांधारीलापण ते आवडले नाही. कौरवांचा यामुळे नाश होईल हेदेखील तिने सांगितले. धृतराष्ट्राने गांधारीच्या सूचनेविरुद्ध कौरवांचा नाश झाला तरी चालेल, परंतु द्यूत थांबणे शक्य नाही असे सांगून तिला गप्प केले आणि प्रतिकामीला पांडवांना द्यूत खेळण्यास बोलावून आणायला पाठविले.

पुन्हां द्यूत खेळण्यात धोका आहे आपले हित नाही, हे माहीत असून ही युधिष्ठिर आपल्या भावंडांसह व परिवारासह हस्तिनापूरला द्यूत खेळण्यास आला.

२६. पांडवांचा वनवास



-द्यूत सुरू करण्यापूर्वी शकुनी मामा म्हणाले–"या खेपेस पणावर काही लावण्याचा प्रश्नच नाही. एकाच अटीवर द्यूत खेळावयाचे आहे. या खेपेस द्यूतात जो हारेल त्याने वल्कल वस्त्रे धारण करून बारा वर्षे वनवास व एक वर्ष अज्ञातवास भोगावयाचा आहे. अज्ञात वासाच्या काळात कोणी ओळखले तर पुन्हां बारा वर्ष वनवास व एक वर्ष अज्ञातवास भोगावा लागेल. तेरा वर्षे पुरी झाल्यावर पुन्हां आपले राज्य परत मिळेल."

शकुनी मामाच्या तोंडी द्यूताची अट ऐकून सर्वच थक्क झाले. धृतराष्ट्राला संबोधन करून म्हणाले–"राजा! तू आपला विवेक [illegible] हे काय आरंभिले आहेस? आपल्या मुलाच्या इंगितावर तू नाचतो आहेस!"

परंतु धृतराष्ट्र काहीच बोलला नाही. युधिष्ठिरच म्हणाला–"क्षत्रियधर्माला अनुसरून मी कपटपूर्ण जरी असले तरी हे द्यूत खेळण्याचा निश्चय केला आहे."

झाले! शकुनी मामांनी फासे टाकले व पहिल्याच डावात पांडव आपले सर्वस्व हारले. अटीप्रमाणे युधिष्ठिरासहित पंच पांडव व द्रौपदी वल्कल वस्त्रे धारण करून जटा बांधून व हरणाजिन बांधून वनवासास निघाले. त्यांना त्या वेशात वनवासास निघालेले पाहून दुःशासन म्हणाला–"इतक्या वर्षांनंतर पांडव संकटात व दुःखात पडलेले पाहून आमच्या मनाचे समाधान झाले. आतां दुर्योधनाला कोणी प्रतिद्वंद्वी उरला नाही. ऐश्वर्य मदाने पांडवांनी आजवर आमचा अपमान केला. आज त्यांच्या माना खाली झालेल्या पाहून आमचा अंतरात्मा शांत होत आहे. त्यांना रानटी जनावरांसारखे रानात वणवण फिरावे लागेल. यापुढे आमची बरोबरी करू शकण्याची हिंमत ते दाखविणार नाहीत."

नंतर तो द्रौपदीला म्हणाला–"हे पांचाली! तू या भिकारी पांडवांबरोबर वनवासास जाण्याची गरज नाही. तू राजमहिषी सारखी आमच्या पैकी कोणाशी [illegible] पुढील आयुष्य घालव."

तें अपमानजनक शब्द ऐकून भीम सिंहगर्जना करीत म्हणाला–"दुष्ट पापी माणसा! शकुनी मामाने फसवून द्यूत जिंकले, त्यावर तू हे जे उद्दाम वर्तन करीत आहेस त्याची फळे तुला रणांगणावर भोगावी लागतील. तुझ्या देहाचे तुकडे करून मी गिधाडांना खायला घालीन तेव्हां यांच्या पैकी तुझ्या रक्षणास कोण येतो हे मी पाहणार आहे. एकट्या तुलाच नाही तर तुझ्या आश्रयाला असणाऱ्या सर्वांना यमसदनास पाठवीन तरच मी नावाचा भीम!"

त्यानंतर भीम दुर्योधनाला म्हणाला–"तुला या दुष्कृत्याची फळे रणांगणावर चाखावी लागतील."

पांडव निघाले तेव्हां भीम पुन्हा जाता जाता सभेकडे वळून म्हणाला–"सर्व कान उघडून ऐका! या दुष्ट दुर्योधनाला व दुःशासनाला मी, कर्णाला अर्जुन आणि शकुनीला सहदेव ठार करतील. या दुष्ट चतुष्टयाला यमसदनास पाठवून पृथ्वीचा भार हलका करू."

अर्जुन भीमाला थांबवीत म्हणाला–"भीमदादा! पुढे आपण काय करू हे आतां पासून सांगण्यात काय अर्थ आहे! हा दुष्ट मुकाटयाने तेरा वर्षांनंतर आमचे राज्य



आम्हांला परत द्यायला तयार झाला नाही तर आपण जे करायचे ते करू."

सहदेव शकुनी मामाला म्हणाला–"फासे टाकण्यात तू जे कौशल्य व कपट दाखविलेस ते रणांगणात उपयोगी पडणार नाही. भीमदादाने सांगितले आहे त्याप्रमाणे तुझा वध मी करीन."

नकुल रौद्ररूप धारण करून म्हणाला–"या सभेत द्रौपदीचा अपमान ज्यांनी केला व जे या दुष्कृत्यात सहभागी झाले त्या सर्वांना याची फळे चाखावी लागतील."

अशातऱ्हेने पांडवांनी आपापल्या परीने प्रतिज्ञा केली आणि भीष्म, सोमदत्त, द्रोण, कृपाचार्य, अश्वत्थामा, विदुर, संजय व



स्वतः. धृतराष्ट्र याना नमस्कार करून वनवास गमन केले.

त्या वेळी इतर कोणाची तोंड उघडायची पण छाती झाली नाही. एकटा विदुर म्हणाला—"लबाडी लुच्चेगिरीने जो हारतो त्याला दुःखी कष्टी होण्याचे कारण नाही. युधिष्ठिरा! तुझ्याबरोबर रत्ना हिऱ्यांसारखे चौघे भाऊ आहेत आणि बुद्धिमान व चतुर द्रौपदीसारखी पत्नी आहे. ज्ञानी धौम्य ऋषीपण सल्ला देण्यास आहेत! म्हणून तुला कोणत्याही गोष्टीची उणीव भासणार नाही. तुमच्यात आपसांत कोणी भांडण लावू शकणार नाही. म्हणून तुमचा कधी पराभव होणार नाही. तुमच्या आईचे ... आहे. ती तुमच्याबरोबर वनवासाचे कष्ट सहन करू शकणार नाही. तिला माझ्या घरी ठेवून जा. 'सत्यमेव जयते!' 'शुभास्ते पन्थानं!' सत्याचाच शेवटी विजय होतो. तुमचा मार्ग शुभ होवो!"

युधिष्ठिर विदुराला म्हणाला—"तुम्हीच आम्हांला पितृतुल्य व गुरुतुल्य आहां! मी आपल्या आज्ञेप्रमाणे वागेन!"

द्रौपदीने अंतःपुरातील सर्व वडील स्त्रियांस प्रणाम केला आणि सर्वांचा निरोप घेतला. कुंती द्रौपदीला म्हणाली—"सुनबाई! तू शाहणी आहेस! तुला उपदेश करण्यासारखे काय आहे? पतीबरोबर पत्नी हीच आपल्या समाजाची रीत आहे! तू त्या वेळी क्रुद्ध दृष्टीने एकदांच कौरवांकडे पाहिले असतेस तर तुझ्या पातिव्रत्य बलाने ते सर्व भस्म झाले असते. मी तुला एक गोष्ट लक्षात ठेवायला सांगते. सहदेव हा त्याच्या मोठ्या भावंडांपेक्षा थोडा निराळा आहे. त्याच्यावर जास्त नजर ठेव. आता ये मुली, 'यतो धर्मस्ततो जयः!' जेथे धर्म तेथेच जय निश्चित असतो!"

द्रौपदीचे केस पाठीवर सोडलेले होते. ती तशीच अंतःपुरातून बाहेर निघाली. कुंती सुनेबरोबर आपल्या मुलांना आशीर्वाद द्यायला निघाली. म्हणाली—"तुम्ही सत्य व धर्म सोडला नाही. तरी तुम्हांला वनवासाचे कष्ट सोसावे लागत आहेत. परंतु शेवटी सत्य व धर्म यांचाच विजय होईल! तुमचे वडील व माता माद्री किती भाग्यवान होती ती दोघ! हे सर्व पाहायला ते या जगात राहले नाहीत. ते दुर्दैव माझ्या कपाळी आले. हे सर्व माझ्या पूर्वजन्माचे फळ असावे. आज कृष्णदेखील येथे जवळ नाही."

नंतर कुंती सहदेवाला म्हणाली—"बाळा! तू वनवासास जाऊ नकोस! तू माझ्याजवळ रहा! तू एकटा जरी माझ्याजवळ राहलास तरी माझी सर्व मुले माझ्याजवळच आहेत असे मला वाटेल!" असे बोलतां बोलतांच तिला रडू कोसळले. विदुराने तिची समजूत घालून तिला आपल्या घरी नेले.

पांडवांनी मातेला प्रणाम करून तिचा निरोप घेतला आणि वनवासाला निघाले. द्रौपदी त्यांच्या पाठीमागून निघाली. युधिष्ठिराने आपले तोंड झांकून घेतले. भीम दोन्ही बाहू ताठ करून निघाला. अर्जुन वाळू उडवीत निघाला. नकुलने सर्वांगाला राख फासून घेतली. सहदेवाने सर्व शरीर धुळीने माखून घेतले. धौम्य ऋषी रुद्र म्हणत व सामगानाचा पाठ करीत सर्वांपुढे निघाले. (मुख पृष्ठावरील चित्र)

काही काळ लोटल्यावर धृतराष्ट्राने विदुराला बोलावून विचारले—"पांडव वनवासाला गेले. तेव्हां ते तुला कसे काय वाटले?"



विदुराने धृतराष्ट्राला त्याचे यथोचित उत्तर दिले. म्हणाला—"तुझ्या मुलांनी जो अन्याय केला आहे त्याचा युधिष्ठिराला परमावधीचा राग आला. त्याला वाटले की त्याने आपल्या त्या क्रुद्ध दृष्टीने कौरवांकडे पाहिले तर सर्व कौरव भस्म होऊन जातील. म्हणून त्याने आपले तोंडच झांकून घेतले. भीमाने आपले दंड ठोकून सर्वांना आपल्या शक्तीची जाणीव करून दिली. अर्जुनाने वाळू फेकून त्यांच्यासारखी शरवृष्टी करून कौरवांचा नाश करून टाकण्यासाठी सूचना दिली. नकुलने आपले सौंदर्य लपविण्यासाठी अंगाला राख फासून घेतली आणि सहदेवाने आपले दुःख प्रगट होऊ नये म्हणून अंगाला



माती व धूळ फासून घेतली. द्रौपदी ओले लुगडे नेसून व केस मोकळे सोडून निघाली व तद्वारा तिने तुझ्या सर्व सुनांना चवदा वर्षांनी वैधव्य येईल याची सूचना दिली. धौम्य ऋषींनी रुद्र पाठ व सामवेदाचा पाठ केला आणि शेवटच्या युद्धात सर्वांच्या अन्त्येष्टीची सूचना दिली. राजा, हा सर्व तुझा मूर्खपणा आहे! तू आपल्या कुल-नाशाची बीजे आपल्या हाताने पेरली आहेस. आतां कोणी हे थांबवू शकणार नाही."

पांडव निघून गेल्यावर दुर्योधन, दुःशासन, शकुनी व कर्ण यांचे दुष्ट चतुष्टय द्रोणाचार्यांकडे गेले व म्हणाले—"गुरुवर्य! पांडवांकडून आम्ही हे जे राज्य जिंकले आहे ते आपण उपभोगावे अशी आमची इच्छा आहे. आपणांहून जास्त मोठा आम्हांला कोण आहे?"

ते ऐकून द्रोण म्हणाले—"पांडवांचा पराभव करणे कोणासही शक्य नाही. माझ्यावर दुर्योधन आदिक कौरवांनी जी श्रद्धा व भक्ति दर्शविली त्यामुळे मी त्यांना सोडू शकत नाही. पांडव आपल्या प्रतिज्ञे-प्रमाणे युद्धास तयार होऊन येणारच. माझ्या हाती पराभव झाल्यामुळे द्रुपदाने माझ्यावर सूड उगविण्यासाठी यज्ञ केला आणि माझा वध करणारा पुत्र धृष्टद्युम्न व अर्जुनाची पत्नी होऊ शकणारी पुत्री द्रौपदी मिळविली. द्रौपदीशी पांडवांचा विवाह झाला आहे. अर्थातच धृष्टद्युम्न त्यांचा मेहुणा आहे. या सर्वांबरोबर स्वतः कृष्ण पांडवांच्या बाजूने राहणार. अर्जुनासारखा अतिरथी व महा-रथी दुसरा या जगात नाही. माझा मृत्यु धृष्टद्युम्नाच्या हाती आहे ही गोष्ट जगजाहीर आहे आणि या सर्वाला कारण तुम्ही सर्व जण आहां! याहून जास्त दुःखाची गोष्ट ती काय असू शकणार? आतापर्यंत जे चुकले ते सुधारणे शक्य नाही. निदान यापुढे तरी इतरांच्या हितासाठी धर्माचे पालन करा. तुम्हांला सुखोपभोगच इष्ट आहे तर पुढील तेरा वर्षे काय ती तुमच्या भाग्यात आहे.

ध्या उपभोगून! त्यानंतर कौरवांचा नाश निश्चित आहे!"

ते ऐकून धृतराष्ट्र घाबरून गेला व विदुराला म्हणाला—"विदुरा! द्रोणाचार्य म्हणतात ते खरे आहे! तू रानांत जाऊन पांडवांना सामोपचाराने परत बोलावून घेऊन ये! त्यानी नकार दिला तर त्यांना सांग की, हस्तिनापूरला येऊन आदर सत्कार करवून घेऊन मग पाहिजे तर पुन्हां वन-वासास परत जा!" असे सांगत असतांना त्यांचे मन फार भयभीत व दु:खी झाले.

तेव्हां संजय धृतराष्ट्राला म्हणाला—"राजा! हे सर्व राज्य पांडूने जिंकून तुला दिले आहे. तू त्याच्या मुलांना जंगलात हाकलून लावलेस आणि आता असे दु:खी होण्याचे कारण काय?"

"दु:खी कां होऊ विचारतोस? पांडव अतिरथी नव्हे, युद्धविद्येत अद्वितीय आहेत. अशा शक्तिशाली शूरवीरांशी शत्रुता करावी लागली व युद्ध करावे लागले तर दु:ख होणार नाही का?" धृतराष्ट्र म्हणाला.

... अंगावर ओढून घेतले आहेस! भीष्माचार्य, द्रोणाचार्य व विदुर या सर्वांच्या सांगण्या-विरुद्ध तूच हे पापकर्म केलेस! तुझ्या मुलांला बुद्धी नाही व शरम नाही. प्रतिकामीला पाठवून द्रौपदीला ती बाहेरची असतांना असे बोलावणे शोभते का? त्यानंतर तिचे वस्त्रहरण करण्यासही तो निर्लज्ज तयार झाला. 'विनाशकाले विपरीत बुद्धि!' म्हणजे विनाशकालजवळ आला की माण-साची बुद्धीच त्याला पाठ दाखविते!' सर्व अन्याय होत असतांना तुम्ही सर्व तो न्याय मानीत आलात!" संजयने धृतराष्ट्राची कान उघाडणी केली.

धृतराष्ट्र नम्रपणे म्हणाला—"संजया! तू म्हणतोस ते सर्व खरे आहे! पुत्र प्रेमाने माझी बुद्धी आंधळी झाली होती. मी तुम्हां सर्वांचा सल्ला झिडकारला आणि मुलांना काय वाटेल ते करू दिले. मीच मूळ अपराधी आहे. पण मी आतां काय करू? देवा! तूच आतां आमचे रक्षण कर!"





# शिवपुराण

[२]

दक्षयज्ञ ध्वंस करण्याची शंकराकडून आज्ञा मिळताच वीरभद्र व भद्रकाली आपल्या गणासह निघाले. त्याचवेळी दक्षाचा यज्ञ ज्या जागी होत होता त्याच्या जवळपासच्या प्रदेशात काही अघटित गोष्टी घडल्या. विजा पडल्या, रक्ताची वृष्टी झाली, आकाशातून साप, विंचू व निरनिराळे विषारी जंतु पडू लागले. पळापळ सुरू असता वीरभद्र व भद्रकाली पण येऊन पोचले अडवून त्याना ठार करायला सुरवात केली. वीरभद्राने आपल्या मुख्य मुख्य अनुचरांसह यज्ञशालेत प्रवेश केला. आत बसलेल्या देवांना व ऋषींना त्याने मारहाण सुरू केली. दक्षाला पाहताच त्याला शंकराचा जो अपमान झाला होता तो आठवला. त्याने दक्षाचे डोके छाटून ते होमकुंडात फेकून दिले. नंतर त्यांनी होमकुंडात पाणी ओतले यज्ञाची सर्व सामुग्री नष्ट भ्रष्ट करून टाकली. अशा तऱ्हेने शंकराच्या इच्छेप्रमाणे यज्ञाचा ध्वंस पूर्ण झाला. त्यानंतर वीरभद्र व भद्रकाली कैलास पर्वतावर परतले. तेव्हां शंकराचा क्रोध थोडा शांत झाला.

वीरभद्र वगैरेंनी ज्या ऋषीमुनींना व देवांना बडविले होते ते ब्रह्मदेवाकडे गेले आणि त्यांनी त्यांच्यावर जो अत्याचार झाला होता तो निवेदन केला. ब्रह्मदेव त्यांना घेऊन वैकुंठ लोकी विष्णूकडे गेला आणि दक्षयज्ञ कसा ध्वंस झाला हे सांगितले. नंतर सर्व मंडळी तेथून कैलास पर्वतावर गेली. त्यावेळी शंकर ध्यानमग्न होऊन बसला होता. वीरभद्र व त्याचे अनुचर गण शंकराच्या चारी बाजूला पाहरा देत होते.

शेवटच्या मलपृष्ठावरील चित्र



शंकराने समाधि समाप्त होताच ब्रह्मदेव, विष्णु व इतर मंडळींना बसायला सांगितले.

विष्णूने हात जोडून शंकराजवळ विनंती केली. हे सदाशिवा! आपला क्रोध व दुःख आता विसर! तुझ्याशी द्वेष करून दक्षाने तुझा अपमान केला व त्याची फळे त्याला भोगावी लागली. परंतु एक गोष्ट विसरून चालावयाचे नाही. दक्षाने आरंभिलेला यज्ञ पुरा झाला नाही तर वृष्टि होणार नाही आणि दुष्काळ पडेल. म्हणून तू स्वतः दक्षाला पुन्हां जिवंत करून तो यज्ञ त्याच्याकडूनच पुरा कर."

शंकराने विष्णूची ती विनंती मान्य केली आणि म्हणाला–"आता आपण सर्व मिळून हा यज्ञ पुरा करण्याच्या कामाला लागू या." नंतर त्याने वीरभद्राला बोलावून शंकर म्हणाला–"उत्तरेकडे जा, आणि उत्तरेकडे डोके करून जो कोणी झोपला असेल त्याचे डोके कापून घेऊन ये."

वीरभद्र त्या प्रमाणे उत्तरेकडे गेला. त्याला एका जागी एक बकरा उत्तरेकडे डोके करून झोपत असलेला दिसला. त्याने त्याचेच डोके कापून शंकराला आणून दिले.

शंकर व इतर देव यज्ञमंडपात गेले. शंकराने बकऱ्याचे डोके दक्षाच्या धडावर ठेवून त्याला जिवंत केले. त्याच्या करवी वैदिक रीतीने यज्ञ पुरा करण्यात आला. यावेळी दक्षाने शंकराला यज्ञभाग घेण्यास विनंती केली. त्यानंतर त्याला आपली चूक आठवली. शंकराची क्षमा मागून तो म्हणाला–"मी तुझे महत्व न ओळखून तुला यज्ञात भाग घेण्यासाठी निमंत्रण पाठविले नाही, त्याबद्दल क्षमा कर. मी तुझी निंदा केली, त्याचे फळ मला मिळाले. तुझ्या कृपेने मी जिवंत झालो व यज्ञ पुरा झाला."

शंकराने दक्षाला क्षमा केली व म्हणाला– "दक्षा! विना कारण कोणती ही गोष्ट घडत नसते. मी तुझ्या सर्व अपराधाबद्दल क्षमा केली आहे. आता तू पाहिजे तो वर मागून घे!"

तेव्हां दक्ष व त्याची पत्नी प्रसूती यांनी दोघांनी मिळून एक वर मागितला. म्हणाले– "ज्या जागी हा यज्ञ पूर्ण झाला त्या जागेला दक्षवाटिका हे नाव मिळावे आणि त्या जागी शंकराचे एक देऊळ बांधण्यात यावे."

शंकराने होकार देऊन वीरभद्र व भद्रकाली दोघांना आज्ञा केली की त्यांनी त्या प्रदेशाच्या दक्षिण दिशेला गौतमी नदीच्या काठी आपल्या गणांसह जाऊन निवास करावा. नंतर त्यांनी भद्रकालीसह वीरभद्राला गणाधिपति केले आणि सतीचा देह घेऊन ब्रह्मदेव आणि विष्णूबरोबर कैलासाला प्रस्थान केले. ब्रह्मदेव व विष्णूने आणि इतर देवांनी शंकराचा निरोप घेतला आणि आपापल्या निवासस्थानी परत गेले. सतीचा देह बाजूला ठेवून शंकर तपश्चर्या करू लागला.

दक्षाच्या मुलींपैकी एकीचे नाव स्वधा असे होते. ती पितृदेवांची पत्नी झाली. मेनका, धन्या व कलावती नामक तिला तीन मुली झाल्या. तिघी मुली सुंदर होत्या. त्या तिन्ही लोकात विहार करीत व स्वच्छेने सर्वांची इच्छा पूर्ण करीत.

एकदा त्या तिघी विष्णु व लक्ष्मी यांच्या दर्शनास गेल्या. त्यांनी नृत्य व गान करून त्यांना प्रसन्न केले आणि विष्णु व लक्ष्मी बरोबर बोलत बसल्या असता ब्रह्मदेवाचे मानसपुत्र सनकसनंदन आदिक तेथे आले. त्यांना येत असलेले पाहून विष्णुसहित सर्व त्यांच्या स्वागतार्थ उठून उभे राहले. सर्वांनी



त्यांना नमस्कार करून त्यांना बसण्याची विनंती केली. परंतु मेनका, धन्या व कलावती उठून उभ्या राहल्या नाहीत.

ते पाहून सनत्कुमाराला राग आला आणि त्याने शाप दिला–"तुम्हांला स्वतःच्या सौंदर्याचा गर्व आहे. तर जा, मृत्युलोकात जाऊन भूलोकवासियांशी विवाहादि करून तेथेच निवास करा."

तेव्हां मेनका आदिकांना पश्चात्ताप झाला. त्यांनी सनत्कुमारांचे पाय धरून त्याची क्षमा मागितली व म्हणाल्या–"हे मुनीश्वर अज्ञानाने आमच्या हातून ही चूक घडली. म्हणून आम्हांला माफ करून शापमुक्त करावे."



ते ऐकून सनकसनंदनादिक म्हणाले– "गर्वाचे प्रायश्चित्त गर्वत्याग असते. आता शापमुक्तीची गोष्ट म्हणाल तर या शापाचा परिणाम जगत्कल्याणच आहे."

पुढे या तिघींच्या मुलींचे विवाह अवतार पुरुषांशीच झाले. मेनकेची मुलगी पार्वती हिचा शंकराशी विवाह झाला. राजा व धन्वा यांची मुलगी सीता. तिचा विवाह श्री रामचंद्राशी झाला. वृषभ आणि कलावतीची मुलगी राधा, हिचा विवाह श्रीकृष्णाशी झाला असे.

ते कळल्यावर तिघां बहिणींना आनंद झाला आणि तिघी विष्णूचा निरोप घेऊन निघून गेल्या.

हिमालय प्रदेशाचा राजा हिमवान हा फार सुंदर होता. तो हिमालय पर्वतावर तपश्चर्या करणाऱ्या ऋषी व मुनींच्या आश्रमात जाऊन नित्यनियमित पणे त्यांची विचारपूस करी. म्हणून त्यांनी त्याचा मेनकाशी विवाह करून दिला.

[illegible] आणि इंद्रादिक देव आले. हिमवानाने त्यांचा सर्व प्रकारे स्वागत करून येण्याचे कारण विचारले.

सर्व देवांनी हात जोडून हिमवानाला निवेदन केले–"तारकासुराचा अत्याचार दिवसे दिवस किती वाढत चालला आहे. त्याचा वध करणे आवश्यक आहे. ते सामान्य स्त्रीच्या पोटी जन्मलेल्या मुलाकडून होणे शक्य नाही. आपणांस हे देखील माहीत आहे की महाशक्तीने सतीरूपे दक्षाच्या पोटी जन्म घेतला होता. परंतु दक्षयज्ञाच्या वेळी सतीने देहत्याग केला. आतां शंकर त्या दुःखामुळे विरक्त झाला आहे. महाशक्तीने पुन्हा जन्म घेऊन तिच्या पोटी त्याचा संहार करण्यासाठी पुत्र होईपर्यंत त्या राक्षसाचा वध होणे शक्य नाही. म्हणून आपण व मेनका दोघांनी विवाह बद्ध होऊन तपश्चर्या करावी. म्हणजे महाशक्ति आपल्या पोटी जन्म घेईल."



# आशियाखंडाचे छप्पर

सोविएट रशिया, अफगाणिस्तान, पाकिस्तान व भारत या देशांच्या सीमा पामीरच्या पठारावर येऊन मिळतात. या पठाराला 'आशियाचे छप्पर' किंबहुना पृथ्वीचे छप्पर अशी संज्ञा देण्यात येते. या पर्वतातला 'वखन मार्ग' एका काळी पूर्वेकडील व पश्चिमेकडील देशांना जोडणारा मधला मार्ग होता. ७०० वर्षांपूर्वी मार्कोपोलो याच मार्गाने पूर्वेकडील प्रदेशात आला होता. या मार्गाने येण्यात धोक्याचे व साहसाचे काम आहे. चित्रात दाखविलेला प्रदेश २०,००० फूट उंचीचा आहे.





# अमरवाणी

वरं तुंगाच्छृंगाद्गुरु शिखरिण: क्वापि विषमे
पतित्वायं काय: कठिन दृषदंते विदलित:
वरं न्यस्तो हस्त: फणिपतिमुखे तीक्ष्णदशने,
वरं वह्नौ पात:, तदपि न कृत: शीलविलय: ॥ १ ॥

[ शील सोडणे किंवा घालवून बसणे यापेक्षा डोंगराच्या उंच कड्यावरुन खडकाळ दरीत आपटून देहाचा नाश झाला तर तो श्रेष्ठ आहे; तीक्ष्ण दांत असलेल्या सापाच्या तोंडात हात घालणे बरे आणि अग्नीत उडी टाकणे उत्तम होय.]

ऐश्वर्यस्य विभूषणं सुजनता, शौर्यस्य वाक्संयम:
ज्ञानस्योपशम:, श्रुतस्य विनयो, वित्तस्य पात्रे व्यय:,
अक्रोध स्तपस: क्षमा प्रभवितुर्धर्मस्य निर्व्याजता,
सर्वेषामपि सर्व कारणमिदं शीलं परं भूषणं । ॥ २ ॥

[ ऐश्वर्यवान असेल त्याच्यात सौजन्य, वीराचे कमी बोलणे, ज्ञानी माणसात सहनशीलपणा, धनी माणसात दान करण्याची वृत्ति, तपस्वी माणसात क्रोधाचा अभाव, ज्ञानी माणसात नम्रता, धर्मात्मा सत्पुरुषात दुर्गुण शोधण्याच्या प्रयत्नाचा अभाव, या सर्वात शील हेच सर्व गुणांचे मूळ कारण असे भूषण होय ! ]

शील



# उपकार हाच अपराध

एका देशाचा राजा एकदा शिकारीसाठी जंगलात गेला असता त्याचे शिपाई मागे राहले व तो एकटाच वाट चुकून दाट रानात पोचला. तेव्हां त्याला एक मनुष्य स्वत:चा जीव वांचविण्यासाठी वाघाशी लढत असलेला दिसला. राजाने एक बाण मारून वाघाला तात्काळ ठार केले आणि वाघाशी लढणाऱ्या माणसाला विचारले–"कोण रे बाबा तू?"

"मी आपली ओळख देतो. पण त्या पूर्वी तू आपले हात पुढे कर!" तो मनुष्य म्हणाला. राजाने चकित होऊन हात पुढे केले. त्या माणसाने राजाचे दोन्ही हात घट्ट बांधून अंगावरची सर्व आभूषणे काढून घेतली आणि म्हणाला–"मी चोर आहे!"

चोराची ती विचित्र वागणूक पाहून राजाने विचारले–"मी वाघाला ठार केले नसते तर वाघाने तुला ठार केले असते!"

"मला वांचवायला मी तुला सांगितले होते का? मी आपला धंदा चालू ठेवणे माझे कर्तव्य आहे." असे उत्तर देऊन चोर निघून गेला.

थोड्या वेळाने राजाचे शिपाई त्याला शोधत तेथे आले व त्यांनी राजाला सोडविले.

राजाने आपल्या गांवी पोचतांच एक दवंडी पिटविली–"आजपासून या राज्यात कोणावर उपकार करणे हा एक अपराध मानला जाईल व उपकारकर्त्याला कडक शिक्षा केली जाईल."

ती दवंडी ऐकून प्रजा चकित झाली. राजाचे शिपाई व दरबारीपण चकित झाले.

राजाने परोपकार करणाऱ्याला हुडकून काढण्यासाठी हेर नेमले. हेर कित्येक परोपकारी लोकांना धरून आणीत. राजाने चौकशी करून त्यांना तुरुंगात टाकले.

श्री कृ. स. चव्हाण








राजाचा हा विक्षिप्तपणा त्याच्या मंत्र्याला आवडला नाही. त्याने चौकशी करून राजाच्या या विक्षिप्तपणाच्या मुळाशी यात्रेकरूंना लुटणारा एक चोर आहे ही माहिती काढून घेतली.

मंत्री थोडेसे धन घेऊन व वेष पालटून रानात गेला. त्याच्या कल्पनेप्रमाणे चोराने मंत्र्याला अडविले आणि त्याच्या जवळचे सर्व धन लुटले.

"अरे! मी या देशाच्या राजाच्या विक्षिप्तपणाचा कंटाळा आल्यामुळे हे राज्य सोडून निघालो होतो आणि तू कोठून आलास बाबा, मध्येच विघ्न घालायला?" मंत्र्याने चोराला विचारले.

"तू राजाच्या दरबारी नोकरी करीत होतास वाटते?" चोराने विचारले.

"अरे सामान्य नोकरी नव्हे, मी त्याचा मंत्री होतो. राजाचा खजिना कोठे आहे, हे मला माहीत आहे." मंत्री म्हणाला.

"तू मदत केलीस तर अर्धा वांटा तुझा!" चोर म्हणाला.

"राजाचा खजिना लुटायला मी अगदी खुशीने मदत करीन." मंत्री म्हणाला.

मंत्री, रात्री चोराला घेऊन खजिन्या-जवळ पोंचला आणि चोराला पळायला कोठे वाट नाही अशा जागी पोंचल्यावर जोर-जोराने ओरडला–"चोर...चोर..! पकडा!" पाहरेकऱ्यांनी येऊन चोराला धरले.

दुसऱ्या दिवशी चोराला दरबारात हजर केल्यावर राजाने चोराचा शिरच्छेद करण्याची आज्ञा केली.

ते ऐकून मंत्री एकाएकी रडू लागला.

राजाने चकित होऊन मंत्र्याला रडण्याचे कारण विचारले तेव्हां मंत्री म्हणाला–"महाराज! मी रडू नाही तर काय हंसू? अहो, आपण जो कायदा केला आहे तो आठवा! आपण या चोराचा शिरच्छेद केलात तर प्रजेवर उपकार होतील, नाहीं का?"

तेव्हां कोठे राजाचे डोळे उघडले व त्याने तो कायदा रद्द करून सर्व परोपकारी लोकांना सुटका दिली आणि चोराला फाशीची शिक्षा केली.





# मेलेल्या बाईची मुले

एका खेडेगावातल्या माणसाने आपल्या निवडीने एका तरुण सुंदर स्त्रीशी लग्न केले. एका वर्षाने त्यांना एक सुंदर मुलगा झाला. मुलगा लहान असतानाच त्याची आई एकाएकी आजारी पडून मेली. तिला शवपेटीत ठेवून त्या देशाच्या पद्धतीप्रमाणे पुरण्यात आले. त्या बाईच्या आई वडि-लांनी नातवाला घेऊन जाऊन आजोळीच त्याला ठेवून घेण्याची गोष्ट सुचविली. परंतु मुलाच्या बापाने त्याला आपल्याच घरी ठेवून घेण्याचा हट्ट धरला. त्याने आपल्या मुलाला पाहण्यासाठी एक म्हातारी दाई नेमली. त्या घरात फक्त तीन माणसे होती. रात्रभर म्हातारी पाळण्या शेजारी पडून राही आणि मुलगा उठला की त्याला काय हवं नको ते पाहून निजवी.

असेच दोन महिने गेले. मुलाला चांगले बाळसे आले. बापाने मुलाला उचलून घेतले आणि म्हणाला–"माझं बाळ! किती गोड व छान आहे. बापाचं नांव काढील, होय ना आजी?" तो म्हातारीला म्हणाला.

"इकडे घरात काही गोष्टी होत आहेत, ते मालकांना माहीत आहे का? मी दर रोज पाहाते, रात्री या मुलाची आई येऊन कपाटात ठेवलेले पदार्थ उचलून खाते. मुलाला पाळण्यातून उचलून घेऊन दूध पाजते. त्याचे सर्व अंग स्वच्छ पुसून त्याला चांगले कपडे घालते आणि त्याला पुन्हां पाळण्यात निजवून निघून जाते. मी हे रोज पाहाते, पण तिच्याशी बोलायची हिंमत होत नाही मला." म्हातारी दाई म्हणाली.

"मला हे माहीत असते तर मी नसते तिला जाऊ दिले. तिला अडवून ठेवण्याचा नक्कीच प्रयत्न केला असता." मुलाचा बाप म्हणाला.

“त्यात काय बिघडले? आज सुद्धां ती रात्री येईल, पहा!” म्हातारी म्हणाली.

त्या दिवशी रात्री घरमालक रात्रभर जागा होता. मध्यरात्रीच्या सुमारास दार उघडण्याचा आवाज झाला. ती मेलेली बाई घरात आली. पाळण्यात झोपलेल्या मुलाचा तिने मुका घेतला. कपाटातले उकडलेले बटाटे व दूध वगैरे खाऊन पिऊन घेतले आणि काही वेळ शेकोटीशी शेकत बसली. नंतर पाळण्यातून मुलाला काढून घेतले. त्याला दूध पाजले. त्याचे सर्व अंग स्वच्छ पुसून त्याला स्वच्छ कपडे घातले आणि त्याला पाळण्यात निजवून तिने एकदां नवऱ्यांच्या झोपायच्या खोलीकडे पाहून एक दीर्घ श्वास सोडला.

त्याच वेळी म्हातारीने खोकून सुचविले. पण ती बाई घराबाहेर निघून गेली.

“अहो, तुम्ही जागे आहां की झोपलां आहां?” म्हातारीने मालकाला हाक मारून विचारले.

“कां मी जागा आहे!” असे म्हणत मालक आपल्या खोलीतून बाहेर आला.

“तुम्ही पाहिलेत का आपल्या बायकोला?” तिने मालकाला विचारले.

“पाहिले, पण जवळ जायला धीर होईना.” मालक म्हणाला.

उजाडेपर्यंत त्याला झोप आली नाही. उजाडल्यावर तो आपल्या सासुरवाडी गेला. त्याच्या सासूसासऱ्याने व मेहुण्यांनी मुलाच्या तब्येतीविषयी चौकशी केली. त्याने आपल्या घरात घडलेली गोष्ट त्यांना सांगितली. म्हणाला—“काल रात्री मी स्वतःच्या डोळ्यांनी तिला हे सर्व करतांना पाहिले, पण उठून तिच्याशी बोलण्याची किंवा तिचा हात धरण्याची हिंमत मला झाली नाही.

“अहो, मी असतो तर लगेच तिचा हात धरून तिला विचारले असते, अशी गुपचुप येऊन निघून कां जातेस?” मोठा मेहुणा म्हणाला.

“तर मग तू आज आमच्या घरी येऊन झोप. ती आली म्हणजे तिचा हात धरून विचार काय ते!” मुलाचा बाप म्हणाला.

त्या दिवशी मुलाचा मामा आला आणि दोघे रात्रभर जागत राहिले.

रात्री ठरल्या वेळी ती बाई दार उघडून घरात आली. शेकोटीजवळ उभी राहून तिने हात शेकून घेतले आणि कपाटात जे काही खाण्यालायक पदार्थ दिसले ते खाऊन मुलाला पाळण्यातून उचलून घेतले. त्याचे मुके घेऊन तिने त्याला दूध पाजले आणि अंग स्वच्छ पुसून त्याला धुतलेले कपडे घातले. नंतर मुलाला पाळण्यात निजवून निघून गेली.

“तुम्ही दोघे झोपलां आहांत की जागे आहां?” म्हातारीने विचारले.

“चांगले जागे आहों!” असे म्हणत दोघे खोलीतून बाहेर आले.

“तुमच्या सारख्या भित्र्या माणसांना मी कधी पाहिले नाही.” म्हातारी म्हणाली.





दुसऱ्या दिवशी दुसरा मेहुणा आला. परंतु आपल्या बहिणीला जाऊन धरण्याची हिंमत त्याला सुद्धा झाली नाही. ते कळल्यावर तिसरा म्हणाला–"मी तुमच्या जागी असतो तर तिला जाऊ दिले नसते."

तिसऱ्या दिवशी रात्री मुलाचा बाप आपल्या दोघां मेहुण्यांबरोबर आपल्या झोपायच्या खोलीत मुलाच्या आईची वाट पहात पडून राहिला. तिसरा, घराच्या दाराजवळच झोपला. ठीक वेळेवर नित्याप्रमाणे त्या स्त्रीला आत येताना चौघांनी पाहिले. तिने पहिल्याने शेकोटीजवळ जाऊन आपले हात शेकून घेतले. नंतर उकडलेले बटाटे खाऊन दूध पिऊन घेतले. मुलाला दूध पाजून त्याचे सर्व अंग छान पुसले आणि त्याचे कपडे बदलून त्याला पुन्हां पाळण्यात निजविले आणि नवऱ्याच्या खोलीकडे पाहण्यासाठी जरा उभी राहिली.

त्याच वेळी तिसऱ्या मेहुण्याने उठून आपल्या बहिणीचा हात धरला. "सोड रे, सोड रे माझा हात!" असे म्हणत ती आपला [illegible] पण त्याने आपल्या बहिणीला सोडले नाही. तेवढ्यात दोघे भाऊ आणि मुलाचा बापपण मदतीला आले. "मला सोडा, नाहीतर मला मारून टाकतील!" ती म्हणाली आणि बेशुद्ध होऊन खाली पडली.

दुसऱ्या दिवशी ती शुद्धीवर आली तेव्हां तिने आपली करुण कहाणी सांगितली. ती म्हणाली–"मला मरण आलेच नाही. माझे मरण म्हणजे भुतांच्या जगात वावरण्यासारखे होते. मला पुरल्यानंतर मला भुतांनी आपल्या जगात ओढून नेले. ती भुते क[illegible] काळच जवळपास राहणारी होती. तोपर्यंत मला येथे येणे शक्य होते. आजच ती भुते दूर कोठेतरी जाणार आहेत. म्हणून मी आपल्या मुलाला 'अगदी शेवटचे' म्हणून पहायला आले होते."

ती भुते तिकडून निघून गेली असावी. ती स्त्री त्यानंतर आपल्या पतीबरोबर पूर्ववत संसार करू लागली. तिला त्यानंतर नऊ मुले झाली. गावकरी त्या मुलांना 'मेलेल्या बाईची मुले' म्हणत असत.





# शिलारथ

[ ८ ]

[ गर्णालिंगेश्वराने पाटलाच्या मुलीला वाघाच्या तोंडी दिल्यासारखे सोडून दिले होते. परंतु खड्गवर्मा तिला तिच्या राहुटीतून सोडवून बाहेर घेऊन आला. नंतर तो व जीवदत्त तिला घेऊन भैरवांची नजर चुकवून निघून गेले. गर्णालिंगेश्वराने आणखी एका मुलीला धरून आणण्यासाठी पुढल्या प्रवासास निघण्याची तयारी करण्यास सांगितले. पुढे–]

गर्णालिंगेश्वराच्या आज्ञेप्रमाणे सर्व भैरव पुढल्या प्रवासासाठी तयार झाले. तो आपल्या शिष्यांसह एका डोंगराकडे निघाला. त्या डोंगराच्या पायथ्याशी एखादे खेडे असावे, अशी त्याची कल्पना होती. सूर्योदयाच्या सुमारास गावातल्या मुली शेतात काम करायला येतील. त्यांच्या पैकी एखादीला संधी पाहून नेता येईल असा त्याचा विचार होता.

भैरवांच्या टोळक्यातले दोघे काही धोका असल्यास आपल्या गुरूला त्याची सूचना देण्यासाठी बरेच पुढे चालत होते. त्या दोघां भैरवांना सूर्योदयाच्या सुमारास एक तरुण पुरुष व एक मुलगी दोघं एका झाडाखाली दिसली. त्या तरुण मनुष्याला त्यांनी पूर्वी कधी पाहिले नव्हते. परंतु पळून गेलेली भैरव कन्या तीच होती. तिला वाघाने खाऊन टाकले असेल, असे त्यांना वाटले होते.



"हा कोणीतरी कामरूपी मनुष्य दिसतो आहे. त्याने रात्री वाघाचे रूप घेऊन तिचे अपहरण केले होते." एक भैरव म्हणाला.

"अरे असल्या कामरूपी मांत्रिकांना महा भैरवभक्त आपले गुरु रुद्राक्ष माळेसारखे वदलून आपल्या गळयात घालून हिंडतील. चल, आपण आपल्या गुरुवर्यांना या गोष्टीची सूचना देऊ या." दुसरा म्हणाला.

दोघां भैरवांनी गुरूजवळ जाऊन भैरव कन्येला व तिच्या बरोबरच्या एका तरुणाला पाहिल्याचे सांगितले. गणलिंगेश्वर चकितच झाला. श्वेतभैरवाला पण हे सर्व कसे घडले असावे, कळेना. तो देखील चकित होऊन दोघां भैरवांकडे पहात उभा राहिला.

जण झाडावर चढून जा. तो कोणी मांत्रिक असेल तर वर उडण्याचा प्रयत्न करील. त्याला मध्येच पकडा." गणलिंगेश्वरने आपल्या शिष्यांस समजावून सांगितले.

सर्व भैरवांनी चारी बाजूंनी दोघांना घेरले. काहीजण झाडावर चढून त्या दोघांच्या वरच्या बाजूला जाऊन पोचले.

रात्रभर पायी चालत राहिल्यामुळे पाटलाची मुलगी खूप दमली होती. म्हणून ती झाडाच्या बुंधाला टेकून पेंगत होती. तेथून काही अंतरावर जीवदत्त आपली कुबडी हनुवटीला टेकून, या मुलीला पाटलाकडे सुरक्षितपणे कसे पोचते करावयाचे, हाच विचार करीत होता. त्या वेळी खड्गवर्मा तेथे नव्हता. सूर्योदय होताच एक धनुष्य व काही बाण जवळ असावे म्हणून तो ते तयार करून आणण्यासाठी गेला होता. तो एका ओढयाच्या काठी धनुष्य बाण तयार करीत बसला होता. तो आपल्या कामात गर्क होऊन गेला होता.

जीवदत्त व पाटलाची मुलगी दोघांना त्यांच्यावर येणाऱ्या संकटाची कल्पनादेखील नव्हती. म्हणून भैरवभक्तांनी त्यांना सहज कैद केले. त्यांनी झाडाच्या आडून एकदम दोघांवर छापा मारला. काही जणांनी झाडा-



वरूनच ओरडून म्हणाले—"रात्री वाघाचे रूप घेऊन येणाऱ्या लबाड मांत्रिका! खबरदार! पक्ष्यासारखा वर उडून जाण्याचा प्रयत्न करशील तर तुझे हातपाय छाटून टाकू."

जीवदत्त आपली कुबडी सावरून उभा राहू लागला. परंतु चार पांच जणांनी त्याला पाठीमागून पकडले. पाटलाच्या मुलीने पळून जाण्याचा प्रयत्न केला नाही. ती निर्भीकपणे गणलिंगेश्वराकडे डोळे वटारून पहात उभी राहिली.

गणलिंगेश्वर एक आरोळी ठोकून तिच्या जवळ जाऊन उभा राहिला आणि म्हणाला—"बालभैरवी! रात्री वाघाचे रूप घेऊन हाच तुला घेऊन जायला आला होता का?"

"हे वाघाचे रूप घेऊन आले नव्हते. याच रूपात माझ्या डेऱ्यापर्यंत आले होते. वाघाला ठार करून ह्यांनीच मला वांच-विले. मीच यांच्याबरोबर आपल्या गावाला परत जात आहे." पाटलाची मुलगी म्हणाली.

"अग वेडे पोरी! तुझे गाव येथे कोठे जवळपास आहे असे वाटले होय तुला? ते तर नष्ट भ्रष्ट होऊन गेले आहे. दरोडे-खोरांनी गावात शिरून गाव लुटले व जाळपोळ करून ते पळून गेले." गणलिंगेश्वर म्हणाला.



"मी भैरवी नाही! माझे नाव भवानी आहे! मला व यांना येथेच सोडून तुम्ही आपल्या वाटेने चालते व्हा." पाटलाची मुलगी रागाच्या आवेशात बोलत होती.

"तुझे नाव भवानी आहे हे कळले म्हणून तर आम्ही तुलाच भैरवीण करण्यासाठी योग्य समजून धरून घेऊन आलो होतो." असे सांगून गणलिंगेश्वर जीवदत्तकडे वळून दातओठ चावीत म्हणाला—"त्या डोंगरावर आम्ही भैरवाचे देऊळ बांधणार आहो. तेथे भैरवी तुला बळी देऊन तुझ्या रक्ताने भूमिपूजन करील. देऊळ बांधून तयार झाले की ही कन्या पुजारीण होईल, समजले?"



भैरवभक्तांचा तो वेष आणि त्यांचे ते बोलणे ऐकून जीवदत्ताला त्यांचा किळस आला. परंतु एकटयाने त्या सर्वांचा समाचार घेणे अशक्य आहे हे तो ओळखीत होता. खड्गवर्माला हे सर्व कळले असणार व तो दुरून आपल्याला वांचविण्याच्या प्रयत्नात असणार, असे त्याला वाटले.

जीवदत्तला वाटले ते खरेच ठरले. खड्गवर्माला त्याचा मित्र व पाटलाची मुलगी ज्या जागी होते तेथे काही तरी गडबड चालू असल्याचा संशय आला. सूर्योदय होऊन बराच वेळ झाला होता म्हणून सर्व स्पष्ट दिसत होते. खड्गवर्मा एक धनुष्य व काही बाण तयार करून त्या दिशेला निघाला.

आवाज ऐकू आला. तो एका झाडावर चढून कोठून आवाज येतो आहे हे पाहू लागला. जीवदत्तला धरून भैरव व पाटलाच्या मुलीबरोबर बोलणारा गणलिंगेश्वर सर्व त्याला दिसत होते.

त्या लोकांसमोर जाऊन उभे राहणे व त्यांच्याशी दोन हात करणे अशक्य आहे, असे त्याला वाटले. भैरवभक्त, त्याच्या मित्राला आणि पाटलाच्या मुलीला घेऊन ज्या बाजूला जात होते त्या बाजूला त्याच्या पाठीमागून हळूहळू जाणे बरे होईल असा त्याने विचार केला. संधी पाहून दोघांना सोडविता येईल असे त्याला वाटले.

गणलिंगेश्वर आपल्या शिष्यांबरोबर डोंगर चढू लागलेला खड्गवर्माला दिसला. दोन भैरव हातात त्रिशूल घेऊन पुढे चालत होते. खड्गवर्माने त्यांना पाहिले व त्यांच्या पाठोपाठ निघाला.

खड्गवर्मा झाडावरून सर्व पहात होता, पण भैरवभक्तां मागे जाण्याचे ठरविल्यावर त्यांच्या नजरेआड त्याला चालायचे होते. थोडे अंतर चालून आल्यावर तो डोंगरावर पायथ्याजवळ आला. दोघे भैरव डोंगर चढू लागलेले पाहून तोदेखील डोंगर चढू लागला. परंतु डोंगर उघडा होता. झाडी मुळीच नव्हती. म्हणून त्याला दगड खडका



आडून चालावे लागले. त्यात पुष्कळ धोका होता. भैरवांना तो सहज दिसला असता.

असाच विचार करीत खड्गवर्मा झाडीतून बाहेर आला. त्याच वेळी झाडीतून दहा-बाराजण झाडीबाहेर आले आणि त्याच्यावर भाले रोखून उभे राहले. ज्या गावाहून तो जीवदत्त बरोबर पळ काढून आला होता त्याच गावचे ते लोक होते. खड्गवर्माने क्षणार्धात त्यांना ओळखले. त्यांच्याबरोबर दोन पाहरेकरीपण होते. एका तरुण माणसाच्या हातात अस्वलाची दोरी होती व ते त्याच्या बरोबर गाईसारखे शांतपणे चालले होते. तो खड्गवर्माजवळ येऊन उभा राहला व म्हणाला–"हे बघ, तू पळून जाण्याचा प्रयत्न करशील तर मी या अस्वलाला तुझ्या अंगावर सोडून याच्या करवी तुझ्या डोक्याचे केस उपटवीन!"

"अरे, असे काही वेडचासारखे करू नकोस. यावेळी तुम्ही व मी आपण सर्वच एका फार मोठ्या संकटात सांपडलो आहो. तुमचे पाटील व कुळकर्णी कोठे आहेत?" खड्गवर्माने धीर करून त्या तरुणमाणसाला विचारले.

अस्वलवाला तरुण मनुष्य काही उत्तर देणार इतक्यात पाटील व कुळकर्णी दोघे बाहेर आले. खड्गवर्माकडे भयभीत नजरेने पहात म्हणाले–"अरे, तुम्ही सर्व पाहतां काय? याच्या हातातून त्याची तलवार आणि धनुष्यबाण हिसकावून घ्या!"

"पाटीलसाहेब! माझ्या हातातून तलवार हिसकावून घेणे तितके सोपे नाही. तुम्ही सर्व आरडा ओरडा बंद करून मी सांगतो आहे ते ऐकून घ्या! माझ्या मित्राला व पाटलांच्या मुलीला अटक करून भैरवभक्त घेऊन चालले आहेत. ते पहा! तो डोंगर चढून ते जात आहेत. तुम्ही माझे ऐकलेत तर त्यांना वांचविणे आपल्याला शक्य होईल!" खड्गवर्मा म्हणाला.

"ओहो! माझी मुलगी भवानी! माझे केवढे नशीब! म्हणजे ती अजून जिवंत आहे तर! आम्ही तिच्या शोधार्थच निघालो होतो. तू भेटलास बरं, तुझावर आम्ही विश्वास कसा काय करायचा?" पाटलाने विचारले.

"आमच्या देशात एक म्हण म्हणून सर्व ओळखतात–'खड्गवर्मावर विश्वास करून कधी कोणाचे नुकसान झाले नाही.' तर ऐका! रात्री त्या भैरवभक्तांच्या गुरूने आपल्या मुलीला वाघाच्या तोंडी देण्याचा घाट घातला होता. तेव्हां मी व माझ्या मित्राने तिला वांचविले व तुमच्या गावी तिला घेऊन जाण्यासाठी आम्ही निघालो होतो. मी दुसरीकडे कामानिमित्त गेलो असतां भैरवभक्तांनी त्यांना पकडले. थोडक्यात मी काय ते सांगितले. त्यांना कसे सोडवायचे हे मला माहीत आहे. तुम्ही सर्व माझ्या बरोबर चला." खड्गवर्मा म्हणाला.

खड्गवर्माच्या बोलण्यावर पाटलाचा विश्वास बसला तो खड्गवर्माजवळ गेला. परंतु कुळकर्णी संशयित नजरेने त्याच्याकडे पहात म्हणाला–"तुझा काय विश्वास? तू व तुझ्या मित्राने त्या दिवशी रात्री आमच्या गावात हत्तीला व वाघाला भडकवून सोडले नव्हते का? तुम्हांला मंत्रतंत्र येतात असे दिसते."

"या फुकट गप्पात वेळ घालविण्यापेक्षा माझे ऐका व माझ्या पाठीमागून चला.



पहा, ते सर्व भैरव डोंगर चढून जात आहेत. माझा मित्र आणि तुमची मुलगी तुम्हांला दिसत आहेत ना?" खड्गवर्माने थोड्याशा रागातच विचारले.

पाटलाने व त्याच्या साथीदारांनी डोंगराकडे पाहले आणि पाटील ओरडला–"त्या दुष्टांना पकडून झाडाला बांधून ठेवूया आणि भाल्याने टोचून टोचून त्यांना ठार करू या." असे म्हणत पाटील पुढे निघाला.

खड्गवर्माने त्याचा हात धरून त्याला अडविले व म्हणाला–"ते लोक निःशस्त्र नाहीत. त्यांच्या हातात त्रिशूल आहेत. माझ्या पाठीमागून या. खडकाआडून चला

आणि संधी पाहून त्यांच्यावर हल्ला करा." खड्गवर्माने सल्ला दिला.

खड्गवर्माने सांगितल्याप्रमाणे पाटील व त्याचे अनुयायी दुसऱ्या वाटेने डोंगर चढू लागले. थोड्या वेळाने भैरवांची टोळी एका समतल प्रदेशात येऊन पोचली. त्यांच्या गुरूने सर्वांना थांबायला सांगितले आणि चहूंकडे एकदां नजर फिरवून म्हणाला—"ही जागा भैरवाचे देऊळ बांधण्यालायक आहे. या दगडावर पहिल्याने आपण या बंद्याचा नरबली देऊन भूमिपूजन करू या. नंतर देऊळ बांधायला सुरवात करू या. नरबली देण्याचे शुभकार्य भैरवी कन्येच्या हाताने होणार आहे!" असे म्हणत तो एक तलवार पाटलाच्या मुलीच्या हातात देऊ लागला.

भवानीने रौद्ररूप धारण केले. गणलिंगेश्वरच्या हातातली तलवार घेऊन म्हणाली—"दुष्टा! तू मला ओळखले नाहीस वाटते? माझ्या हातून तू नरबली देवविणार? खबरदार! मला व यांना दोघांना येथे सोडून तुम्ही आपल्या वाटेने चालू लागा, नाहीतर तुमचे काळीज या तलवारीने मी बाहेर काढीन, लक्षात ठेवा!"

"आहे, ही मुलगी शूर आहे. हिला भैरवच्या पुजारिणीचे काम करता येईल! आता शुभ मुहूर्त टळू देतां कामा नये. मीच या बंद्याचे काळीज काढून भूमिपूजन करतो." गणलिंगेश्वर म्हणाला.

त्यानंतर तो हातात एक खंजीर घेऊन व तो हात वर करून काहीतरी मंत्र म्हणू लागला. खडकाआडून खड्गवर्मा हे सर्व दृश्य पहात होता. तो अस्वलवाल्या तरुण माणसाला म्हणाला—"तू आपल्या अस्वलाला त्या दाढीवाल्यावर सोड!"

त्या तरुण माणसाने अस्वलाच्या पाठीवर हात फिरविला आणि गणलिंगेश्वराकडे बोट दाखवून म्हणाला—"जांबुवान! त्याच्यावर उडी मार आणि त्याच्या डोक्याची चटणी कर."

दुसऱ्या क्षणाला ते अस्वल गणलिंगेश्वरावर व त्याच्या अनुयायांवर चवताळून तुटून पडले. (क्रमशः)





# तीन धोके

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो पुन्हा झाडाजवळ गेला प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि स्मशानाच्या दिशेने नेहमीप्रमाणे मौनपणे चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तुझे साहस वाखाणण्यासारखे आहे. परंतु मोठ्यात मोठा साहसीदेखील नशिबावर विजय मिळवू शकत नाही. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला एक गोष्ट सांगतो लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

सोन नदीच्या काठी सोनपुर गावी शांतिवर्मा नावाचा एक राजा राज्य करीत असे. त्याला फार उशिरां एक मुलगा झाला. गादीला वारस झाला म्हणून राजाला फार आनंद झाला. राजाने मुलाच्या बारशासाठी राज्यभर एक मोठा उत्सव केला. मुलाचे नाव सुमंत असे ठेवण्यात



आले. बारशाला कित्येक ज्योतिषी आले होते. त्यांनी मुलाची जन्मकुंडली पाहिली. त्यांच्या चेहऱ्यावर काळजी व चिंता पाहून राजाने त्यांना विचारले–"अघटित असे काही आहे का? वेळीच काय तो उपाय करता येईल."

ज्योतिषी म्हणाले–"महाराज! युवराजांना मगर, सांप व कुत्रा यांचा धोका आहे."

ते ऐकून राजा घाबरून गेला आणि युवराजाला या तिन्ही प्राण्यांपासून सर्वदा दूर ठेवण्याचा उपाय योजू लागला. त्याने राजधानीच्या मध्यभागी असलेल्या एका टेकडीवर एक मजबूत चिरेबंदी राजवाडा बांधला. त्यात कोणत्याही प्राण्याला प्रवेश मिळणार नाही याचा बंदोबस्त करण्यात आला. याशिवाय राजाने राजवाड्याच्या प्रवेशद्वारावर सक्त पाहारा ठेवला. युवराजाच्या सेवेसाठी दासदासी नेमल्या आणि टेकडीच्या चारीबाजूला एक खंदक बांधून टेकडीवर येण्यासाठी एक पूल बांधविला.

सुमंत बारा वर्षाचा झाला. गच्चीत उभा राहून बाहेरची गंमत पहात असता त्याला दूर खंदकाबाहेर एक कुत्र्याचे पिल्लू दिसले. त्याला खेळणी म्हणून जे जे प्राणी देण्यात आले होते त्यात मगर, साप किंवा कुत्रे नव्हते. म्हणून सुमंतच्या मनात तो नवीन प्राणी जवळून पाहण्याची अनावर इच्छा उत्पन्न झाली. त्याने आपल्या नोकराला विचारले–"त्या प्राण्याचे नाव काय रे? छान खेळतो आहे!"

"युवराज! ते कुत्र्याचे पिल्लू आहे." नोकर म्हणाला.

"तू त्याला पकडून घेऊन ये. मी त्याच्या बरोबर खेळणार आहे." युवराज म्हणाला.

नोकराने ती गोष्ट राजाला कळविली व काय करावे, विचारले.

"करायचे काय? आणून दे ते पिल्लू. राजा म्हणाला." म्हणून नोकराने कुत्र्याचे पिल्लू आणून युवराजाला दिले. सुमंत त्याच्या बरोबर खेळू लागला व भूक तहान सर्व विसरून गेला.

अशीच काही वर्षे लोटली. सुमंत आता वयात आला होता. त्याला कित्येक गोष्टी कळू लागल्या होत्या. एक दिवशी त्याने आपल्या बापाकडे निरोप पाठवला–"या महालात मला एकट्या एकट्याने राहणे करमत नाही. बाहेर गेलो तर माझ्या जिवाला धोका आहे, हे मला कळले. परंतु असल्या जगण्यापेक्षा मरण आलेले परवडले. म्हणून मला शस्त्रास्त्रे व एक घोडा द्यावा मी आपल्या कुत्र्याबरोबर देशाटनास जावे म्हणतो."

राजकुमाराचा तो निरोप कळल्यावर बापाने नकार दिला नाही. राजकुमाराला खंदकाबाहेर पोचविण्यासाठी एक नाव पाठविली. खंदकापलीकडे युवराजासाठी राजाने जो घोडा तयार ठेवला होता त्यावर बसून युवराज जग पहायला निघाला. त्याचा कुत्रा त्याच्या पाठीमागून धावत चालत होता.

कित्येक दिवस यात्रा केल्यावर युवराज एका विक्षिप्त राजाच्या राजधानीत पोचला.

राजाला एकुलती एक मुलगी होती. तिचे नाव सीमंतिनी होते. सीमंतिनीच्या रूपलावण्याचे वर्णन ऐकून दूरदूरच्या राज-



कुमारांनी तिला मागण्या घालायला सुरवात केली. पण राजाने आपल्या विक्षिप्त स्वभावाला अनुसरून मुलीला मागणी घालणारांची एक विचित्र परीक्षा ठेवली.

राजाने सत्तर फूट उंचीच्या दगडी भिंती सरळ उभ्या बांधून वर टोकाला एक महाल बांधवून त्यात राजकन्येला ठेवले. त्याने अशी दवंडी पिटविली की या भिंतीवर चढून जो राजकन्येला भेटेल त्याच्याशी राजकन्येचा विवाह करून देण्यात येईल. सीमंतिनीशी विवाहाची इच्छा असलेले राजकुमार आले. सर्वांच्या उतरण्याची व्यवस्था राजाने केली होती. सर्व राजकुमार ज्या राजमहालात उतरले होते त्या



महालाच्या दरवाज्यात सुमंतला घोड्या-वरून उतरतांना पाहून राजकुमारांना तो देखील सीमंतिनीशी विवाहाच्या अपेक्षेने आला असावा असे वाटले.

सुमंतने आपली खरी ओळख त्यांना दिली नाही. त्याचा बाप एका राजाकडे घोड्यांच्या तबेल्यात काम करतो, असे सांगून आईचारल्यावर बापाने दुसरे लग्न केल्यामुळे आणि घरात सावत्र आईची वागणूक त्याच्याशी नीट नसल्यामुळे बेजार होऊन घर सोडावे लागल्याचे सुमंतने सांगितले. राजकुमारांनी राजाने राजकन्येशी विवाह करण्याची इच्छा असणाऱ्यांवर ठेवलेल्या अटीची गोष्ट सांगितली आणि पुष्कळ प्रयत्न करून त्यांच्यापैकी एकालाही यश न मिळाल्याचे पण सांगितले.

म्हणून सुमंतने आपल्या भाग्याची परीक्षा करून पाहण्याचे मनाशी ठरविले. त्याने राजकुमार चढण्याचा प्रयत्न कसा करीत आहेत हे स्वत: जाऊन पाहिले. ते कां अयशस्वी होत आहेत, हेदेखील त्याने विचार करून समजून घेतले. हाताला किंवा पायाला आधार अशी जागाच नव्हती. परंतु थोडी हिंमत करून खालचा भाग चढून गेल्यावर वर चढणे तेवढे कठीण नव्हते. एका बाजूला तशी सोयीची जागा सुमंतला दिसली. सुमंत त्याच बाजूने प्रयत्न करून भिंतीवर चढून थेट राजकन्येच्या महालात जाऊन पोचला.

ते पाहून एक राजकुमार राजाकडे धावत गेला आणि म्हणाला—"महाराज! एक सईसाचा मुलगा परीक्षेत यशस्वी झाला आहे. त्याने राजकन्येला जिंकले."

"सईसाचा मुलगा कसा काय आला या चढाओढीत?" राजाने विचारले.

"म्हणे, त्याची सावत्र आई त्याला छळू लागली म्हणून घर सोडून तो देशाटनाला निघाला आणि भटकत भटकत इकडे आला." राजकुमार म्हणाला.

राजाला फारच राग आला. म्हणाला—"अशा भटक्याशी मी राजकन्येचा विवाह करू होय? त्याला या चढाओढीत भाग घ्यायला परवानगी कशी मिळाली?"

राजकुमार घाबरून आपल्या साथी-दारांकडे आला व त्याने राजा म्हणाला ते सांगितले. राजकन्येला ते वृत्त कळले तेव्हां ती म्हणाली—"तुम्ही माझ्या बाबांना जाऊन सांगा की या तरुणाला येथून काढण्याचा प्रयत्न झाला तर मी अन्न पाणी सोडून जीव देईन."

ते ऐकून राजाला जास्तच राग आला. राजाने चढाओढीत जिंकणाऱ्या तरुणाला पकडून ठार करण्यास आपल्या शिपायांना सांगितले.

सीमंतनीने कळविले की कोणी या तरुणावर वार केला तर मी खिडकी-तून उडी टाकून जीव देईन. म्हणून नोकरांनी सुमंतच्या अंगाला हातदेखील लावला नाही.

ते ऐकून राजाला आश्चर्य वाटले. त्याने राजकन्येला व त्या तरुणाला बोलावून आणायला सांगितल. सुमंतला पाहून राजाला तो कोणीतरी राजपुत्रच असावा असे वाटले. तरी राजाने त्याला विचारले—"कोण रे मुला तू?" सुमंतने राजाला, इतर राज-कुमारांना स्वत:ची जी ओळख दिली होती ती ओळख सांगितली. खरा परिचय दिला नाही. तरी राजाने शांतपणे त्याच्याशी राजकन्येचा विवाह करून दिला.

काही दिवस लोटल्यावर सुमंत आपल्या पत्नीला म्हणाला—"मगर, साप व कुत्र्याचा





धोका माझ्या जिवाला आहे, असे माझ्या लहानपणी ज्योतिष्यांनी सांगितले होते."

"तर मग या कुत्र्याला बरोबर घेऊन कां हिंडता आहां? त्याला ठार करून कां नाही टाकीत?" सीमंतिनीने विचारले.

"हा कुत्रा माझ्या लहानपणापासून माझ्याबरोबर खेळत आला आहे. मी याला कसा ठार करणार?" सुमंत म्हणाला.

"तरमग तुम्ही कोठे जाल तेव्हां बरोबर एक तलवार व एक रक्षक बरोबर घेऊन जात जा." सीमंतिनीने सल्ला दिला

असेच आणखी काही दिवस लोटले. वडील आजारी असल्याचे सुमंतला कळले. आपल्या एकुलत्या एका मुलाची भेट मरण

वाटत होते. एकदां वडिलांना जाऊन भेटून येतो असे सुमंतने सीमंतिनीला सांगितले आणि काही शिपायांना व नोकरांचाकरांना बरोबर घेऊन तो स्वदेशी निघाला. अर्ध्या वाटेवर पोंचता पोंचता त्याला कळले की त्याचा बाप अगदी शेवटच्या घटकेला पोंचला आहे. म्हणून, आपण आपल्या गावी पोंचलो तर लवकर परत येणे शक्य होणार नाही असे सुमंतला वाटले. म्हणून तो एका नदीकाठी थांबला. त्याने एका विश्वासपात्र नोकराला सीमंतनीला बोलावून आणावयास पाठविले.

त्या दिवशी सुमंत आपल्या तंबूत निजला असता एक मगर त्याच्या तंबूत शिरली. तिला पाहून पाहरेकरी मोठ्याने ओरडला. चार पाच शिपाई एकदम आले व त्यांनी त्या मगरीला ठार केले.

सीमंतिनीला यायला बराच वेळ लागला. परंतु तोपर्यंत सुमंतला वाट पहात त्याच तंबूत रहावे लागले. तो ज्या प्रदेशात उतरला होता त्या प्रदेशात मगरीं सुसरींचा फार त्रास होता. म्हणून सुमंत फार सावधगिरी बाळगून राहू लागला.

शेवटी एक दिवशी संध्याकाळी सीमंतिनी येऊन पोंचली. सुमंतने दुसऱ्या दिवशी निघण्याचे ठरविले. परंतु सीमंतिनीला



तंबूत मगर शिरल्याचे तिला कळले होते.

ती रात्रभर जागत राहिली ते फायद्याचेच झाले. कारण मध्यरात्रीच्या सुमारास एक साप त्यांच्या तंबूत शिरला. ती घाबरून गेली. तिला काय करावे, सुचेना. एका कोपऱ्यात दुधाने भरलेली काही भांडी होती. सीमंतिनीने एक भांडे सापाच्या वाटेवर आणून ठेवले. सापाला दुधाचा वास आला आणि तो दूध पिऊ लागला. सर्व दूध पिऊन झाल्यावर त्याला इतकी मस्ती चढली की तो जागचा हालू शकला नाही. तेव्हां सीमंतिनीने पतीची तलवार उचलून त्या सापाला ठार केले. त्यानंतर दोघे सोनपूरला पोचले. तोंपर्यंत शांतिवर्मा मरण पावला होता. सुमंतने आपल्या बापाची अन्त्येष्टी वगैरे आटोपल्यावर स्वतःचा राज्याभिषेक करून घेतला. सुमंत सीमंतिनीच्या राज्यात प्रजा सुखी होती. सुमंत आपल्या कुत्र्याला बरोबर घेऊन रोज फिरायला जात असे. सीमंतिनी पण बहुतेक बरोबर जात असे.

एकदां सुमंत नदीकाठी पक्ष्यांच्या शिकारीस गेला असतां एका झाडीतून अचानक एक जंगली बदक बाहेर आले. त्याला धरण्यासाठी कुत्रा धावला आणि त्या गडबडीत तो मालकाच्या दोन्ही पायां मध्ये अडकला. त्या धक्क्याने सुमंत व



कुत्रा पाण्यात जाऊन पडले. दोघे पडलं तेथे दलदल होती सुमंतचा पाय आत आत जाऊ लागला. तो मोठ्याने ओरडला तेव्हां सीमंतिनी धावत आली आणि तिने आपल्या शालीचे एक टोक सुमंतकडे टाकले. सुमंताने ते टोक घट्ट धरून ठेवले. सीमंतिनीने सुमंतला बाहेर ओढले व वांचविले. परंतु कुत्रा मात्र आत गेला तो बाहेर आला नाही.

ज्योतिष्यांनी तिन्ही धोक्यातून वांचल्या मुळे सुमंतच्या जिवाला पुढे कोणताहि धोका नसल्याचे सांगितले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला— "राजा! आपल्या मुलाला वांचविण्यासाठी राजाने एवढी मोठी तयारी केली होती,

मग त्याने, मुलाने मागितल्याबरोबर कुत्र्याचे पिल्लू आणवून त्याला कां दिले आणि त्याला देशाटनाला कां जाऊ दिले?" सुमंतने आपल्या सासऱ्याला आपली खरी ओळख कां दिली नाही? या प्रश्नांची उत्तरे माहीत असूनही तू दिली नाहीस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

ते ऐकून विक्रमादित्य म्हणाला—"मरण हे प्रत्येक प्राण्याला येणारच. तो निसर्ग नियम आहे. आयुष्यात मनुष्यावर निरनिराळे प्रसंग येतात व तो त्यातून वांचतो. याशिवाय मृत्यूचे आक्रमण प्रत्येक माणसावर या ना त्या रूपाने होतेच. त्याच्यापासून स्वतःला वांचविण्यासाठी आपले आयुष्य नीरस करून टाकणे मूर्खपणाचे होईल. परंतु शांतिवर्माने आपल्या मुलाला वांचविण्यासाठी कृत्रिम वातावरण निर्माण करून ठेवले होते. परंतु मुलाचा आनंद कायमचा हिरावून घेणे शहाणपणाचे झाले [illegible] आणवून द्यायला सांगितल्याबरोबर त्याने आणवून दिले. त्यामुळे मुलाला मृत्यू आला असता तर त्याचा दोष राजावर लावणे रास्त होणार नाही. अगदी अशाच कारणास्तव त्याने आपल्या मुलाला देशाटनाला जाऊ दिले. ज्योतिष्यांनी ज्या ज्या संकटांचे भविष्य सांगितले होते. त्या संकटांतून त्याला वांचविण्याचे मुख्य श्रेय सीमंतिनीलाच आहे. कारण तीच त्याच्या आयुष्यभरची भागीदारीण होती. आतां सुमंत कां खो[illegible] बोलला हा प्रश्न राहला. तो अमुक राजाचा मुलगा आहे हे सीमंतिनीच्या बापाला कळले असते तर त्याने जन्मकुंडली वरून त्याच्या जिवाला धोका असल्याचे कळल्यावर आपल्या मुलीशी लग्न करून द्यायला मान्य केले नसते."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेताबरोबर नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन पुन्हा लोंबकळू लागला.

(कल्पित)





# खाणीतले खुजे

पोलंड देशातल्या खाणीत मनुष्यांसारखीच वावरणारी भुते आहेत असा त्या देशातील रहिवाश्यांचा विश्वास होता. त्या भुतांना ते खाणीतले खुजे म्हणत. त्यांची सर्व कामें पण तशीच विचित्र होती.

हे खुजे खाणी बाहेर कधी येत नसत. खाणीत काम करणाऱ्या मजुरांबरोबर काम करीत व जे मजूर स्वभावाने चांगले असत त्यांना हे खुजे मदत करीत व जे वाईट असत त्यांच्या कामात विघ्ने आणीत. लोखंडाची माती व खडक ते नाहीसे करीत किंवा खाणीतल्या रस्त्यांची उलटा पालट करून काम करणाऱ्या मजुरांना त्रास देत. कधी कधी हे खुजे अदृश्य रूपे मदत करीत किंवा त्रास देत. परंतु ते कोठे तरी काम करीत असल्याचा आवाज मात्र ऐकू येई.

एका मिठाच्या खाणीत एक मजूर काम करीत होता. तो डोक्यावरच माती ढासळून मेला तेव्हां त्याच्या बायकोला नुकसान भरपाई द्यायला त्याच्या वरच्या मुकादमाने नकार दिला. इतर मजुरांनी तिच्या वतीने विनंती केली पण त्या मुकादमाने त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले. त्यानंतर एका आठवड्याच्या आत तो मुकादम खाणीतले छप्पर पडून त्याच्या खाली दबून मेला.

त्या काळातले श्रीमंत नागरिक कधी युद्ध किंवा असाच आणीबाणीचा प्रसंग आला की आपली संपत्ति याच खाणीतून लपवून ठेवीत. अशी पुष्कळशी संपत्ति या खाणीतून राहून गेली होती आणि ती सर्व या खुजांनी बळकावून ठेवली होती.

एकदां एका खुजाने दोघां मजुरांना ते धन दाखवून देण्याचे वचन दिले. त्या खुजांबरोबर जातांना वाटेवर खुणा करून ठेवण्याच्या हेतूने एका मजुराने खाणीच्या

पोलंड देशातली लोककथा



भितीवर खडूने खुणा केल्या आणि दुसऱ्याने वाटेत करवतीने कापलेल्या लाकडाचा चुरा टाकून खुणा केल्या. खुजाबरोबर जाऊन दोघांनी लपलेले धन पाहून घेतले आणि परतले. परंतु परत येत असतां त्यांनी करून ठेवलेल्या खुणा नाहीशा झालेल्या होत्या. म्हणून खुजांच्या नजरेआड ते लपलेले धन पळवून नेण्याचा प्रयत्न करून ही त्यांना त्यात यश मिळाले नाही.

पोलंड देशात एक फार जुनी व प्रसिद्ध खाण होती. त्या खाणीत पुष्कळ खुजे राहात असत. त्यांनी त्या खाणीचे अनेक भाग करून आपसात वांटून घेतले होते. त्या भागात काम करणाऱ्या मजुरांवर तो [illegible] अन्याय केला तर त्या भागातला खुजा त्यांना मदत करील असा त्या खाणीत काम करणाऱ्या मजुरांचा विश्वास होता.

एक गरीब मजूर होता. तो थोडा आळशी होता. बेता बेतानेच काम करी. दिवसभर दारू पिऊन कोठे तरी पडून राही. त्याला कधी चांगल्या खाणीत काम मिळत नसे. एक दिवशी त्याने दिवसभर काम केले पण लोखंडाचा एक तुकडा देखील त्याला मिळाला नाही. तो एका खडकावर बसून आपल्या भाग्याला दोष देत रडत होता.

एका खुजाने जवळ जाऊन त्याला विचारले–"तुला याच जागेवर काम करायला सांगितले आहे का?"

"याहून चांगली जागा मला कोण देणार?" मजूर निराश होऊन म्हणाला.

"तू माझ्याबरोबर चल मी तुला चांदीच्या मातीची जागा दाखवून देतो. तू थोडयाच काळात एक श्रीमंत नागरिक होशील." तो खुजा म्हणाला.

तो मजूर खुजाबरोबर गेला. खुजा त्याला एका जागी घेऊन जाऊन म्हणाला–"तू या जागी खणलेस तर तुला चांदीच चांदी मिळेल. तू जितके दिवस काम करशील तितक्या दिवसांची मजुरी म्हणून तू चांदी काढून घे आणि [illegible] आपण आपसात वांटून घेऊ. तुझे काम आटोपल्यावर आपण पहिल्याने ज्या जागी भेटलो होतो तेथं येऊन भेट."

तो मजूर आपल्या इतर मजूर मित्रांना जाऊन म्हणाला–"मित्र हो, एका जागी पुष्कळशी कच्ची चांदी आहे. तुम्ही माझ्या बरोबर चला, ती खणून काढू या."

"अरे त्या जागी जस्ताशिवाय काय मिळणार? चांदी केव्हाच संपली. पण तरी तुला वाटत असेल तर तूच एकटा जाऊन तुला वाटेल तेवढी चांदी खणून घे." त्यांनी त्या गरीब मजुराची थट्टा उडविली

परंतु त्या मजुराने एक महिनाभर खूप मेहनत करून एक महिन्याची मजुरी म्हणून पुष्कळ चांदी मिळविली. सर्व चांदी एकत्र उचलून नेऊन तो त्या खुजाला वचन दिल्याप्रमाणे भेटला. तो खुजा त्या मजुराची वाट पहातच बसला होता.

त्या खुजाने चांदीची नाणी करून ती सारखी सारखी वांटली. पण शेवटी एक नाणे उरलेच. तेव्हां त्याने मजुराला विचारले–"हे कोणाच्या वांटयाचे?"

"तूच घे!" तो मजूर खुजाला म्हणाला.

"तुला पैशाचा लोभ शिवला देखील नाही. म्हणून तूच तो ठेवून घे आणि हे बघ, पुढे दानधर्म करायला विसरू नकोस!



पुढे कधी खाणीत पाऊल टाकू नकोस." खुजा मजुराला बजावून सांगून निघून गेला.

त्या मजुराने दारू प्यायची सोडलीच होती. पुढील आयुष्य दानधर्म करीत तो सुखासमाधानाने घालवू लागला.

त्याच खाणीत आणखी एक विचित्र गोष्ट घडली. ती गोष्ट एका मजुराचीच होती.

एकदां एका खुजाने एका मजुराला विचारले–"कायरे तू एकटाच काम करतो आहेस. सोबतीला मी येऊ का?"

तो मजूर म्हणाला–"अरे या खाणीत लोखंड आहे कितीसे? एका माणसाचे पोट भरायला देखील पुरेसे नाही. दोघांनी



वाटून घ्यायचे झाले तर दोघांना उपाशी मरावे लागेल!"

"अरे पण मी तुला याहून चांगली जागा दाखवून देतो. चल माझ्या बरोबर!" तो खुजा म्हणाला. तो मजूर त्या खुजा बरोबर निघाला. एका जागी लोखंडाची कच्ची माती पुष्कळ होती. मजुराने उत्साहाने ती माती खणली. खुजाने त्या मजुराला मध्येच थांबायला सांगितले आणि खाणीतल्या एका चिंचोळ्या वाटेने बोलावून नेले. मजूर पुष्कळ दमला होता. तो खुजाला म्हणाला—"मी थोडा वेळ आराम करतो" नंतर आपल्या पिशवीतून रोटी काढून खाल्ली आणि झोपला.

मजुराची झोप मोडली तेव्हां तो खुजा तेथेच बसलेला होता. खुजाने त्याला विचारले—"कायरे तू किती वेळ झोपलास असे तुला वाटते?"

"दोन एक तास झोपलो असेन!" मजूर म्हणाला.

खुजा काहीच बोलला नाही. दुसऱ्या एका वाटेने त्याला, ते दोघे ज्या जागी पहिल्याने भेटले तेथे घेऊन गेला आणि त्याच्या हातात एक चांदीचें नाणे देऊन म्हणाला—"गावात जाऊन एक रोटी घेऊन ये."

मजूर खाणीतून वर जमिनीवर आला तेव्हां खाणीच्या तोंडाशी काम करणाऱ्या चार स्त्रियांनी त्याला पाहिले व घाबरूनच गेल्या आणि हातातले काम सोडून पळून गेल्या. मजूर गावात गेला, पण सर्व गांव बदलून गेलेले त्याला दिसले. त्याला ओळखीची अशी एकही जागा दिसली नाही. स्वत:चे घरदेखील तो ओळखू शकला नाही. एका दुकानात जाऊन त्याने एक रोटी मागितली. त्याने दिलेले नाणे पाहून दुकानदार म्हणाला—"हे नाणे शंभर वर्षापूर्वीचं नाणे आहे."

तेव्हां मजुराला आपण शंभर वर्षे झोपलो होतो असे वाटले. तो खाणीत परत येऊन त्या खुजाला म्हणाला—"मला वाटते की मी शंभर वर्षे झोपलो होतो. आता माझे पुढे कसे चालणार?"

"ते तसे नाही रे बाबा! तू पुन्हा गावात जा. तू जास्तच जास्त दोन वर्षे झोपला असशील आणि हे पहा, तू बरोबर एका वर्षाने येऊन पुन्हां मला भेट. मी येथेच भेटेन." खुजाने या खेपेस थोडे सोने मजुराला दिले आणि त्याला पाठवून दिले.

या खेपेस मजुराला आपले घर ओळखायला त्रास झाला नाही. परंतु त्याने आपले अनुभव सर्वांना सांगितले तेव्हां त्याचे बोलणे त्याच्या बायकोला व मुलांबाळांना खरे वाटले नाही.

एका वर्षानंतर तो मजूर पुन्हां त्या खाणीत उतरला व त्या खुजाला भेटला.

"या खेपेस मी तुला एक खजिनाच दाखवितो. चल माझ्या बरोबर!" खुजा त्याला म्हणाला. त्याप्रमाणे खुजा खाणीत एका जागी घेऊन गेला आणि त्याने म्हट-ल्याप्रमाणे खरोखरच तेथे एक मोठा खजिना होता.

"हा खजिना एका काळी जमिनी पासून जवळच होता. फार खोल नव्हता. मजूर लोक सहज वाटेल तेवढे धन घेऊन जात. पण पुष्कळांना फार गर्व झाला. म्हणून हा खजिना जमिनीत खोल घसला. तू तुला वाटेल तेवढे धन घेऊन जा आणि आरामात पुढील आयुष्य घालव."

"या खजिन्याविषयी मी आपल्या मित्रांना सांगितले तर चालेल का?" मजुराने विचारले.

"तुला वाटले तर सांग आणि कुदळ फावडे घेऊन जाऊन वाटेल तेवढे धन उचलून घेऊन जायला सांग." खुजा म्हणाला.

तो मजूर मोठा श्रीमंत झाला. परंतु त्याने ही गोष्ट आपल्या मित्र मंडळीस सांगितली तेव्हां त्याच्या बोलण्यावर कोणाचाही विश्वास बसला नाही. त्यानंतर त्या खजिन्याचा शोध कोणालाच लागला नाही.



# डोके फिरविणारी चिंच

कुमार विहिरीवर चिंचेचे एक रोपटे पाहून बायकोला म्हणाला–"अग सुशे, हे पहा येथे एक चिंचेचे झाड उगविले आहे. चिंचा लागल्या की काय गंमत होईल नाही?"

"चिंच विकून आपण एक म्हैस विकत घेऊ." सुशीला म्हणाली.

"अग, मग दूध तापवायला, दही विरजायला, लोणी ठेवायला मडकी नकोत का? त कुंभाराकडे जाऊन सांगून ये केवढी मडकी हवीत ती." कुमार म्हणाला.

सुशीलाने कुंभाराकडून एक मडके जास्त आणले.

कुमारने तिला विचारले–"एक जास्त मडके कशाला ग?"

"माझ्या आईला साजूक तूप फार आवडते. तिच्याकडे तूप पाठविण्यासाठी एक मडके जास्त घेऊन आले आहे." सुशिला म्हणाली.

"अग, पण आपल्याला पुरेल की नाही याचीच शंका आहे आणि माहेरी पाठविण्याच्या गप्पा कशाला?" असे म्हणत कुमारने बायकोला एक दिली.

आरडा ओरडा झालेला पाहून चार लोक जमा झाले. एका म्हाताऱ्याने पुढे येऊन विचारले–"काय रे! बायकोला कां मारतो आहेस?" कुमारने घडलेली गोष्ट सांगितली. ते ऐकून त्या म्हाताऱ्याने हातातल्या काठीने कुमारला मारायला सुरवात केली.

"कां हो, मला कां मारता?" कुमारने विचारले.

"तुझी म्हैस माझ्या शेतात शिरून उभे पीक चरू आणि तुडवू लागली तर मी काय करणार रे?" म्हातारा म्हणाला.

ते ऐकून सर्व हंसू लागले आणि कुमार लज्जित होऊन मान खाली करून निघून गेला.





# खलीफा आणि बगळा

बगदादच्या महालात खलीफा एकदा दुपारी वजिराशी बोलत बसला होता. तेव्हां हुजऱ्याने येऊन एक सौदागर आला असल्याची वर्दी दिली. एखादी चांगली वस्तु विकत घेऊन आपल्या वजिराला द्यावी असे खलीफाला वाटले. म्हणून त्याने सौदागराला आत बोलावून आणायला सांगितले.

त्या सौदागराने आपली पेटी उघडून दाखविली. अंगठ्या, रत्नहार, कुंगने व अशाच वस्तू होत्या. खलीफाने एक रत्न-जटित कंगवा विकत घेऊन तो वजिराच्या बेगमेला देण्यासाठी घेतला. पेटीतल्या कप्प्यात काहीतरी वस्तू खलीफाला दिसल्या. खलीफाने "आत काय आहे रे?" विचारले. सौदागराने त्या कप्प्यातून एक डबी व एक कागद काढून दाखविला आणि म्हणाला–"सरकार! या डबीत काय आहे, मला नाही माहीत. एका व्यापाऱ्याने मक्केच्या बाजारात ही डबी विकत घेतल्याचे सांगितले. आपण पाहिजे तर घ्यावी आणि वाटेल ती किमत द्यावी."

त्या डबीत कसले तरी काळे चूर्ण होते. कागदावर काहीतरी लिहिले होते. पण ती भाषा कोणती हे कळले नाही. खलीफाने सौदागराला पैसे देऊन पाठवून दिले आणि वजिराला म्हणाला–"ही भाषा कळणारा कोणी मिळाला तर बोलावून घेऊन या."

वजीर म्हणाला–"सरकार! मोठ्या मशीदीत जो इमाम आहे त्याला जगातल्या कित्येक भाषा येतात. त्याला विचारू या."

झाले, इमाम साहेबांना बोलावण्यात आले. त्यांनी कागद दोनदां तीनदां वर पासून खालपर्यंत वाचून पाहिला आणि म्हणाले–"हुजूर! ही हूण भाषा आहे."



"वाचून सांगा, काय आहे ते!" खलीफा म्हणाला. इमाम साहेबांनी कागदावर लिहिले होते ते सर्व वाचले आणि म्हणाले—"या डबीतले काळे चूर्ण नाकाने ओढावयाचे आहे. 'मुतबोर' असे म्हणून आपल्याला ज्या प्राण्याचे रूप हवे असेल त्याची इच्छा मनात ठेवून चूर्ण नाकाने ओढावे. इच्छिलेले रूप मिळेल. म्हणजे वाटेल त्या प्राण्याचे रुपच नव्हे तर भाषा सुद्धा येऊ लागते. असे रूप बदलल्यावर पुन्हां मानव रूप हवे असेल तर पूर्वेकडे तोंड करून तीनदां डोके जमिनीला टेकून पुन्हां तोच शब्द उच्चारला पाहिजे. पण एक अट आहे, कोणत्याहि प्राण्याचे रूप मिळाल्यावर हसता कामा नये. हसल्यास तो शब्द आठवणार नाही आणि आयुष्यभर तेच रूप कायम राहील."

इमाम साहेबांच्या तोंडून त्या चूर्णाचे ते वर्णन ऐकून खलीफा फार खूष झाला. त्याने इमाम साहेबांना जरीपटका देऊन त्यांची बिदागी केली.

खलीफा आपल्या वजिराला म्हणाला—"आज आपण एक मूल्यवान सौदा केला आहे. माझ्या मनात कोणते तरी जनावर होऊन त्याच्या भाषेत बोलण्याची फार इच्छा आहे. उद्यां सकाळी तुम्ही या. आपण दोघे फिरायला जाऊ त्या वेळी ही डबी घेऊन जाऊ आणि प्रयोग करून पाहू.

दुसऱ्या दिवशी खलीफा आणि वजीर फिरायला निघाले. दोघे राजवाड्याच्या उद्यानात फिरत फिरत राजधानीबाहेरच्या एका सरोवराच्या काठी येऊन पोचले. सरोवराच्या काठी निरनिराळे पशुपक्षी हिंडत होते. त्यांना पाहून खलीफाच्या व वजिराच्या मनांत कोणत्या तरी जनावराच्या रूपात काही दिवस रहावे असे आले.

ते सरोवराजवळ पोचले तेव्हां त्यांच्या समोर सर्वात प्रथम आला तो एक मोठा बगळा होता. तो ऐटीत एकेक पाऊल टाकीत मासे बेडूक खात चालला होता. त्याच वेळी आणखी एक बगळा तिकडे आला आणि काठावर चालू लागला.

वजीर त्याला पाहून खलीफाला म्हणाला—"हुजूर हे दोन्ही बगळे आता आपसात काहीतरी बोलणार. आपण बगळे काय बोलतात ते ऐकू या का?"

खलीफाला ती कल्पना आवडली. त्याने त्या काळ्या चूर्णाची डबी काढून 'मुतबोर' म्हणून ती पूड घेऊन ओढली व वजिराने पण तसेच केले. दोघे बगळे झाले.

तो नवा बगळा मासे खाणाऱ्या बगळ्या-जवळ गेला आणि दोघे परस्परांशी बोलू लागले. मासे खाणाऱ्या बगळ्याने दुसऱ्याला विचारले—"मी तुझ्यासाठी दोन बेडूक धरून देऊ का?"

पण तो दुसरा बगळा म्हणाला—"मला आतां भूक नाही रे. आज मला पाहुण्यां समोर नृत्य करायला आज्ञा झाली आहे. मी येथे थोडा वेळ नृत्याचा अभ्यास करा-यला म्हणून आलो आहे." असे सांगून तो थोडा वेळ सरोवराच्या काठी नृत्य करीत एकाच पायावर बराच वेळ उभा राहिला. त्याला पाहून वजिराला व खलीफाला हंसू आले. त्या दोघांना हंसताना पाहून दोन्ही बगळे उडून गेले.

"याहून जास्त मोठी गंमत ती काय असणार? मी आपल्या आयुष्यभरात याहून



चांगली गंमत पाहिल्याचे मला तरी नाही आठवत." वजीर म्हणाला.

आपण हंसलो म्हणून ते उडून गेले. आपण हंसलो नसतो तर, कदाचित त्यांनी गाणे देखील म्हटले असते. त्याच वेळी त्यांना ते त्या रूपात हसले. याबद्दल वाईटपण वाटले. कारण त्या रूपात हंसल्यास मानव रूप मिळणार नाही हे त्यांना आठवले.

"अरे, मानव रूप हवे असेल तर तो शब्द उच्चारला की झाले. तुला आठवतो का तो शब्द!" खलीफाने विचारले.

"होय, पूर्वेकडे तोंड करून आपण तीनदां डोके टेकून मु...मु...मु..." त्याला देखील तो शब्द पुरा आठवला नाही.



दोघे घाबरून गेले. दोघे 'पुढे काय' तो शब्द आठवला नाहीतर आयुष्यभर बगळ्या-च्या रूपातच रहावे लागेल, ह्याचा विचार करून ते जास्तच घाबरले. राजवाड्यात परतण्यात तरी काय अर्थ होता. त्या रूपात ते गेले असते तर पहारेकऱ्यांनी त्यांना पिटाळून लावले असते. प्रजेचा तरी त्यांचा राजा व वजीर बगळे झाले आहेत या गोष्टीवर कसा काय विश्वास बसला असता? दोघे त्याच रूपात कित्येक दिवस भटकत राहले. भूक लागल्यावर बेडूक किंवा खेकडे खाणे त्यांना शक्यच नव्हते! म्हणून ते मिळतील ती फळे व दाणा खाऊन काळ घालवू लागले. परंतु चोची लांब लांब असल्यामुळे त्यांना फळे किंवा धान्य खाणे कठीण जाऊ लागलं. काही वेळ ते उडत त्यांत थोडा आनंद मिळे तेवढाच आनंद काय तो त्यांना मिळू लागला. एकदा ते उडत उडत बगदाद शहरावर आकाशात पोचले. एका जागी लोकांची गर्दी होती व ते कसला तरी जयजयकार करीत होते. ते कसला जय-जयकार करतात हे कळावे म्हणून दोघे राजवाड्याच्या छपरावर जाऊन गंमत पाहू लागले. ती एक मिरवणूक होती. वाजत गाजत लोक चालले होते. एकजण मखमलीचा जरीदार पोशाख करून घोड्यावर बसून जात होता. त्याच्या चारी बाजूला गुलाम चालत होते. बगदादची प्रजा पाठीमागून चालत होती आणि बगदादच्या मिर्जा सुलतानाचा जयजयकार करीत होती.

खलीफा वजिराला म्हणाला—"असे फसविले या मिर्जाच्या बापाने? या मिर्जाचा बाप एक जादुगार आहे. तो माझा हाडवैरी आहे. कित्येक दिवसापासून तो माझ्यावर सूड उडविण्याच्या प्रयत्नात होता आपण असेच या रूपात आयुष्यभर राहणार काय? छे: हे नाही चालायचे. आपण पैगंबरांच्या कबरीच्या दर्शनास जाऊ. कदाचित आपण विसरून गेलेला शब्द तेथे आठवेल आप-ल्याला."

दोघांना ती गोष्ट पटली व दोघे राजमहालाच्या गच्चीवरून उडाले आणि मदिनेच्या बाजूला निघाले. परंतु त्यांना इतके दूर उडण्याची संवय नव्हती. म्हणून लागोपाठ दोन तास उडत राहल्यावर दोघे दमून गेले. वजीर म्हातारा होता. म्हणाला—"आता नाही आपल्याला उडवत आणि त्याशिवाय काळोख पडू लागला आहे. आज रात्रभर कोठे तरी आराम करू."

त्यांना एका दरीत एक पडके जुनाट घर दिसले. तेथे रात्रभर आराम करावयाचे ठरवून दोघे खाली उतरले. ते घर नव्हते, तो एक पडका किल्ला होता. त्यात काही खोल्या चांगल्या होत्या. दोघे त्या खोल्यातून उडत उडत आत गेले. वजीर एकाएकी थांबला आणि खलीफाला म्हणाला—"हुजूर! हे भुताटकीचे घर दिसते आहे. भुतांचे भय मला वाटत आहे."

खलीफाने पण थांबून काही आवाज येतो का लक्ष देऊन ऐकले. कोठून तरी कण्हल्या-सारखा आवाज ऐकू येत होता. खलीफा हिंमत करून थोडा पुढे गेला. एका काळोख्या खोलीत पाय टाकताच त्याला एका कोपऱ्यात एक घुबड टिपे गाळीत रडत असलेले दिसले.

त्याच्या खोलीत दोघे बगळे आलेले पाहून ते घुबड मोठ्याने ओरडून म्हणाले—"ये बगळ्या, मला मुक्त कर."



खलीफाने त्या घुबडाला विचारले—"घुबडा! तू सुद्धा आमच्यासारखाच कोण-त्या तरी संकटात सापडलेला दिसतोस! परंतु, आमच्या भरंवशावर राहून तुला फायदा नाही. आमच्या स्थितीचे वर्णन तू ऐकलेस तर, तूच बरा असे तुला वाटल्या-शिवाय राहणार नाही." असे सांगून खलीफाने आपली सर्व रडकथा त्या घुबडाला सांगितली.

तेव्हां घुबड म्हणाले—"आता तुम्ही माझी रडकथा ऐका." असे सांगून घुबडाने आपली रडकथा सांगायला सुरवात केली.

"मी एक राजकन्या आहे. माझे वडील एका बेटावरच्या राज्याचे महाराज आहेत.



आपल्याला ज्या मांत्रिकाने फसविले त्यानेच माझी ही गत केली. एकदा तो आमच्या घरी येऊन माझ्या वडिलांना म्हणाला– "त्याच्या मुलाशी माझे लग्न करून द्यावे." ते ऐकून माझ्या बाबांना फार राग आला. त्यांनी नोकराकरवी त्या दुष्टाला राजवाड्याबाहेर हाकलून लावले. पुढे तो वेष पालटून आमच्याच घरात आमचा नोकर म्हणून नोकरी करू लागला. एकदां त्याने मला काहीतरी पेय सरबत म्हणून प्यायला दिले. ते प्याल्याबरोबर माझी ही गत झाली. त्याने मला येथे या पडक्या किल्ल्यात आणून ठेवले आणि म्हणाला, माझ्याशी याच रूपात कोणी लग्न करीपर्यंत मला

पडून रहावे लागेल. माझा बाप म्हणे फार गर्विष्ट आहे, त्याचे फळ मला भोगावे लागणार! असे सांगून तो निघून गेला. कित्येक महिने झाले, मी येथे पडून आहे, रडते आहे. मला बाहेर जाणे शक्य नाही, कारण उजेडाशी माझे वैर आहे. रात्री घराबाहेर पडले तरी सृष्टि सौंदर्य मला काय दिसणार?"

अशा तऱ्हेने आपली ती रडकथा सांगून घुबड जास्तच रडू लागले. खलीफाने तिची समजूत घातली. म्हणाला–"आपले सर्वांचे दुःख सारखेच आहे. आपण सर्व आता या संकटांतून कसे काय सुटणार ते त्या अल्लालाच माहीत."

"आपली सर्वांची सुटका व्हायला एक मार्ग आहे. मी लहान होते तेव्हां एका ज्योतिष्याने मला संकटातून कोणीतरी बगळा वांचवील असे सांगितले होते. पुन्हा आपल्याला मानवरूप मिळायला एक उपाय मला सुचतो आहे." घुबड म्हणाले.

"तो काय बुवा?" खलीफाने आणि वजिराने एका स्वरात विचारले.

"तो मांत्रिक सकुटुंब दर महिन्यात एकदां येथे येऊन मेजवान्या उडवितो. त्या वेळी ते आपापल्या पराक्रमाचे वर्णन करून सांगतात. तुम्ही जो शब्द विसरला आहां

पडेल." घुबड म्हणाले.

"ते लोक केव्हां येणार आहेत? कोणत्या खोलीत ते मेजवान्या उडवितात?" खलीफाने विचारले.

"तुम्हांला आपल्यात मुक्तीची फिकीर दिसते आहे, माझ्या मुक्तीचा विचारच करीत नाही. तुमच्या दोघांपैकी एकाने माझ्याशी लग्न करून मला मुक्त करा. नंतर मी पुढे काय करावयाचे ते सांगेन. नाहीं तर मी सांगणार नाही, क्षमा कर." घुबड म्हणाले.

ते ऐकून दोघे किंकर्तव्यविमूढ होऊन परस्परांच्या तोंडाकडे पाहू लागले. परस्परांचा सल्ला घेण्यासाठी दोघे शेजारच्या खोलीत गेले. खलीफा म्हणाला–"वजीर साहेब! मोठा पेच पडला आहे, बघा! तुम्ही करून घ्या लग्न!"

"अहो, हे काय म्हणता हुजूर? माझ्या बायकोला हे कळले तर ती माझे दोन्ही डोळेच काढील. आतां या म्हातारपणी लग्न शोभते तरी का? हुजूर तर अजून तरुण वयात आहेत. आजपर्यंत लग्न देखील झालेले नाही." वजीर म्हणाला.

"तीच तर अडचण आहे. अहो, ती कशी आहे! तिचे काय वय असेल कोणास ठाऊक?" खलीफा म्हणाला.



दोघांचे बराच वेळ बोलणे झाले. वजीर म्हणाले–"जन्मभर बगळा होऊन रहावे लागले तरी चालेल, पण त्या घुबडाशी आपण नाही लग्न करणार!" म्हणून नाइलाजाने खलीफाला त्या घुबडाशी लग्नाला तयार व्हावे लागले.

खलीफाचा निर्णय ऐकून घुबड खूष झाले. म्हणाले–"आपण आलात ही अगदी वेळेवर! आजच तो जादुगार मेजवानी उडवायला येणार आहे. ते मेजवानीला बसतात ती खोली मी दाखविते." असे सांगून घुबडाने दोघां बगळ्यांना बरोबर बोलावून नेऊन त्यांना ती खोली दाखविली. एका पडक्या भिंतीच्या आडून ती खोली

दिसत होती. त्या खोलीत रंगारंगाच्या बत्त्या जळत होत्या. एका टेबलावर पंचपक्वान्नं सजवून ठेवली होती. त्याच्या चारी बाजूला आठ जण बसले होते. त्यात तो सौदागर पण होता. त्याला खलीफाने व वजिराने ओळखले.

सौदागर काही सांगत होता. एकाने त्याला विचारले– "पण का हो त्यांना पुन्हा मानव रूप हवे असेल तर काही उपाय?"

"आहे! त्यांनी 'मुतबोर' हा हूण भाषेचा शब्द उच्चारला तर त्यांना मानव रूप मिळेल." सौदागर म्हणाला.

तो शब्द ऐकून खलीफा व वजीर दोघांना परमानंद झाला. दोघे एकदम पूर्वेकडे वळून तीनदां डोके टेकून म्हणाले–"मुतबोर!" दुसऱ्या क्षणाला त्यांना मानव रूप मिळाले. त्या आनंदात दोघे परस्परांना कडकडून भेटले.

त्या दोघांनी परत घुबड होते त्या खोलीत येऊन पाहिले तर त्या घुबडाच्या जागी एक अप्रतिम सुंदर स्त्री उभी होती.

... मला ओळखले का दोघांनी?"

तिला पाहून खलीफांना वाटले की त्या जादुगाराचा तो शाप एकाद्या वरदाना सारखाच प्रत्यक्षात निघाला. असे भाग्य भाग्यवानांनाच लाभते. त्यानंतर तिघे बगदादला परत निघाले.

खलीफाला परत आलेले पाहून प्रजा खुष झाली. खलीफा पैगंबरवासी झाले की काय असे प्रजेला वाटू लागले होते. मिर्जावर प्रजेचा फार राग होता. त्यांनी राजवाड्यात शिरून मिर्जा व त्याच्या जादुगार बापाला पकडले. राजकन्येला ज्या काळोख्या खोलीत घुबड करून जादुगाराने ठेवले होते त्याच खोलीत जादुगाराला फाशी देण्यात आली. परंतु मिर्जाला फाशी देण्यात आली नाही. कारण त्याचा काहीच अपराध नव्हता. खलीफाने वजिराला सांगून त्याच्या नाकाला ते काळे चूर्ण लावून त्याला बगळा करून टाकले. त्यानंतर खलीफाचे राज-कन्येशी थाटामाटाने लग्न झाले.





# स्वयंवर

प्राचीन काळातली एक गोष्ट आहे. स्कंधपुर नामक राज्याच्या गादीवर नागेंद्र नावाचा राजा राज्य करीत होता. त्याला कुंदनंदिनी नावाची एकुलती एक मुलगी होती. तिच्या रूपलावण्याची कीर्ति दूर-दूरच्या राजकुमारांच्या कानापर्यंत पोचली होती. तिच्या सौंदर्याबद्दल राजाला आनंदच व्हायला पाहिजे होता. परंतु त्यामुळे नेहमी त्याच्या मनावर भीतीची छायाच पसरलेली असे. अनेक देशांच्या महाराजांनी नागेंद्र याच्याकडे त्याच्या मुलीला मागणी घालून दूत पाठविले. शेजारची राज्ये कनकगिरी व उदयगिरी येथील राजांना त्याही पुढे जाऊन त्यांच्याशी मुलीचे लग्न करून दिल्यास राज्यावर चालून येऊ अशा धमक्या द्यायला सुरवात केली. नागेंद्र पेचात पडला. काय करावे, त्याला सुचेना. कारण एकाला खुष करायला जावे तर दुसरा रागावणार. तसे स्कंधपूरचे राज्य लहानच होते. कोणी स्वारी केली तर शत्रूला तोंड द्यायची शक्ति त्याच्यात नव्हती.

राजाला तेव्हां काय करावे हे काही सुचले नाही, तेव्हां राजाने आपल्या मुलीचाच सल्ला घेतला. कुंदनंदिनीने स्वयंवर रचावे अशी सूचना केली आणि स्वयंवराची एक अट पण सुचविली. ती अट म्हणजे एक परीक्षाच होती. हुषार राजकुमाराशिवाय कोणी त्या परीक्षेत पास होणे शक्य नव्हते. म्हणून कोणाला खुष करण्याचा किंवा नाखुष करण्याचा प्रश्नच उद्भवत नव्हता.

राजाने स्वयंवरासाठी इच्छुक राजकुमारांस स्वयंवराच्या अटीचे स्वरूप कळवून स्वयंवरास हजर राहण्यास दूतांकरवी निमंत्रण पाठविले.

श्री ग. मो. नांदोरकर



ठरलेल्या तारखे पूर्वीच दूरदूरच्या देशाचे उमेदवार राजकुमार स्कंधपूरला हजर झाले. स्वयंवर मंडपात तीन पेटघा ठेवण्यात आल्या होत्या. एका पेटीत सोन्याची नाणी, दुसरीत रुप्याची नाणी व तिसरीत सोन्याचांदीची नाणी मिसळून ठेवून त्यांची झांकणे बंद करण्यात आली होती. पेटींवर सोन्याची नाणी, 'रुप्याची नाणी' व 'सोन्याचांदीची नाणी' असे लिहून ठेवले होते. परंतु जी नावे लिहिली होती तीच नाणी पेटीत होती असे मात्र नाही. पेटघांच्या झांकणांची अर्थातच अदलाबदल करण्यात आली होती. म्हणजे सोन्याची नाणी ज्या पेटीत ठेवण्यात आली होती त्या पेटीवर [illegible] नाणी' लिहिलेलें झांकण ठेवलेले होते. इतर पेटघांची झांकणे अर्थातच निराळी होती. ही गोष्ट सर्वांसमक्ष सांगण्यात आली आणि सविस्तर पुन्हा अट समजावून सांगण्यात आली. अटी प्रमाणे कोणत्याहि पेटीत आत डोकावून पाहल्याशिवाय हात घालून एक नाणे काढून फक्त तेच नाणे पहावयाचे व पेटीत कोणती नाणी आहेत हे सांगावयाचे, असे होते फक्त तेवढेच सांगावयाचे नाही तर त्याचे कारण पण सांगावयाचे.

कोणत्याहि राजाला किंवा राजकुमाराला ती परीक्षा थोडी कठीणच वाटली. कोणत्या पेटीत कोणती नाणी आहेत हे कसे कळणार? आणि कळले तर त्याचे प्रमाण काय सांगायचे, हा प्रश्न होता. म्हणून प्रत्येकाला थोडा रागच आला. पुष्कळ विचार करूनही कोणाला काही सांगता आले नाही.

पृथुल देशाच्या मंत्र्याचा मुलगा भालचंद्र एक शूर, साहसी व हुशार तरुण मनुष्य होता. त्याने अनेक कला व शास्त्रे चांगली अवगत करून घेतली होती. त्याने विचार करून पाहिला व त्याला एक उपाय सुचला. तो मांडवात आला. त्याने तिन्ही पेटघा लक्षपूर्वक पाहिल्या. 'सोन्या चांदीची नाणी' असे नाव ज्या झांकणावर होते [illegible] हात घालून त्याने एक नाणे बाहेर काढले. ते नाणे चांदीचे होते. तो ते नाणे पाहून म्हणाला–"या पेटीत सर्व नाणी चांदीची आहेत. 'सोने व फक्त सोने' च असे ज्या झाकणावर लिहिले होते त्या पेटीतून एक नाणे काढून म्हणाला–"यात चांदी सोन्याची नाणी आहेत आणि तिसऱ्या पेटीत सोन्याची नाणी आहेत." असे सांगून त्याने सांगितले ते उत्तर बरोबर आहे की नाही हे पाहून घ्यायला राजाला सांगितले. उत्तर बरोबर होते. सर्वांनी त्याला त्याने ते कसे ओळखले हे सांगायला सांगितले.

तेव्हां भालचंद्र म्हणाला–"मी सोन्या-चांदीची नाणी ज्या पेटीवर लिहिले होते त्या पेटीतले नाणे काढून पाहिले, ते चांदीचे निघाले. त्या पेटीवर लिहिल्या-प्रमाणे पेटीत नाणी ठेवणेच शक्य नाही, याची कल्पना मला होती. नाव लिहिल्या-प्रमाणेच नाणी ठेवली तर विशेष काय व परीक्षा कसली? सोन्याचे नाणे निघाले तर सर्व नाणी सोन्याची व चांदीचे निघाले तर सर्व नाणी चांदीची असणार. तेव्हां हातात चांदीचे नाणे पाहतांच मी चांदीची नाणीच पेटीत असणार हे अनुमान केले. सोन्याची नाणी ज्या पेटीवर लिहिले होते त्यात सोन्याची नाणी असणारच नाहीत आणि चांदीची नाणी पहिल्या पेटीत असल्याचे अनुमान मी पूर्वीच लावले होते. तेव्हां दुसऱ्या पेटीत सोन्या चांदीची नाणीच असणार हे अनुमान लावणे सोपे झाले. उरली ती तिसरी पेटी. तिच्यात सर्व सोन्याचीच नाणी असणार यात शंका करायला जागाच उरली नाही.

भालचंद्राने हे सर्व सांगितल्यावर सर्वांनी त्याच्या हुशारीची प्रशंसा केली. कुंदनं-दिनीने सर्वांसमक्ष भालचंद्राच्या गळघात वरमाला घातली. नागेंद्रावरचे संकट टळले होते. म्हणून त्याने दोघां वरवधूंना आशीर्वाद दिला.













# जशास तसे

राजेश व गोपेश या दोघां शेतकऱ्यांची शेते जवळजवळ होती. दोघांनी कापणी झाल्यावर धान्यांच्या राशी आपापल्या खळ्यात लावून ठेवल्या. राजेश दुपारी खायला निघाला तेव्हां गोपेशला म्हणाला–"गोपेश, मी येईपर्यंत या धान्यांवर थोडी नजर ठेव."

राजेश निघून गेला. राजेशच्या खळ्यातले धान्य पाहून गोपेशला थोडा लोभ झाला. त्याने दहा टोपली धान्य राजेशच्या खळ्यातले काढून आपल्या खळ्यात टाकले.

राजेशने आल्यावर आपल्या खळ्यात पाहिले तेव्हां त्याला धान्य कमी झाल्याचा संशय आला. त्याने गोपेशला विचारले–"काय रे, धान्य कमी झाल्यासारखे दिसते आहे ?"

"चिमण्यांचा एक थवा येऊन उचलून गेला रे !" गोपेश म्हणाला.

"तू उडवून लावू नयेस का ?" राजेशने विचारले.

"अरे, तू धान्यांवर नजर ठेवायला सांगितले होतेस. चिमण्यांना उडवून लावायला कोठे सांगितलेस ?" गोपेश म्हणाला.

त्यानंतर गोपेश खायला घरी निघतांना राजेशला म्हणाला–"माझ्या धान्यांवर चिमण्या बसल्या तर उडवून लाव बरं का ?"

गोपेश घरी निघून गेला. राजेशने गोपेशच्या धान्यांतल्या वीस टोपल्या धान्य आपल्या खळ्यात आणून टाकले.

गोपेशने परत आल्यावर विचारले–"काय रे, धान्य कमी कसे काय झाले ?"

"सोसाट्याचा वारा आला, त्याला मी काय करू ?" राजेशने उत्तर दिले.





# पंचकल्याणी घोडा

एका राजाच्या दरबारी वीरदास नावाचा एक दरबारी रहात असे. तो एक स्वामिभक्त व विश्वासपात्र दरबारी होता. एकदा वीरदासच्या तिघां मुलांचे राजकुमारांशी काही तरी कारणावरून भांडण झाले आणि मारामारी झाली. त्यात एक राजकुमार मरण पावला.

ते कळल्यावर राजाने वीरदासला बोलाविले आणि म्हणाला–"माझा मुलगा तुझ्या मुलांच्या हातून ठार झाला, म्हणून तिघांना फाशीची शिक्षा मी केली तरी कोणी काही म्हणणार नाही. परंतु त्यामुळे माझा मुलगा जिवंत होणे शक्य नाही. म्हणून त्याबद्दल मीं तुझ्यावर एक काम सोंपवितो. तू ते काम केले नाहीस तर तुझ्या मुलांचा जीव वांचणे शक्य नाही."

"महाराज! मी आपल्या मुलांच्या प्राणापेक्षा आपल्या आज्ञेचे पालन करणे जास्त श्रेष्ठ मानतो. आपण आज्ञा करावी." वीरदास म्हणाला.

राजा म्हणाला–"श्यामल नगराच्या राजाकडे एक पंचकल्याणी घोडा आहे. तो एक जगप्रसिद्ध घोडा आहे. तू आपल्या मुलांना बरोबर घेऊन जाऊन तो घोडा पळवून आण. तुम्ही मागाल तेवढे धन तुम्हांला मी देईन. तुम्हांला प्रवासासाठी चार घोडे देईन. तुझ्या हातून हे काम नक्कीच पार पडेल.

"जो हुकूम महाराज! मी उद्यां उजाडताच या कामावर निघतो." वीरदास म्हणाला. राजाने त्याच्यावर त्या कामाची जबाबदारी कां टाकली आहे हे वीरदासला माहीत होते. ते काम धोक्याचे होते व अशक्यपण होते. श्यामल देशाच्या राजाला पंचकल्याणी घोडा स्वतःच्या जिवापेक्षा जास्त प्रिय होता. कोणी काय

श्रीमती वेणुताई सावंत



वाटेल ती किंमत दिली तरी राजा तो घोडा देणार नाही हे वीरदासला माहीत होते. त्याला चोरून घेऊन जाणे देखील सामान्य माणसाला शक्य नव्हते. अशा माणसाला राजा पकडून ठार करील हे तिलकेचु खरे होते. परंतु आपल्या मुलांचा जीव वांचविण्यासाठी हा प्रयत्न करून पाहणे वीरदासला आवश्यक वाटले. त्या घोड्याला पकडून नेण्याच्या प्रयत्नात त्याचा किंवा त्याच्या मुलांचा जीव गेला तरी वीरदास त्याला तयार होता. कारण तो घोड्याला पकडून घेऊन गेला नाही तर राजा त्याला व त्याच्या मुलांना फांसावर चढवील. असे मरण्यापेक्षां घोडा पकडण्याच्या प्रयत्नात मरण आले तर ते जास्त गौरवाचे ठरेल, असा विचार करून तो त्या प्रयत्नाला लागला.

दुसऱ्या दिवशी राजाने वीरदासच्या घरी सोन्या नाण्यांनी भरलेली एक मोठी थैली आणि चार घोडे पोचते केले. वीरदास आपल्या मुलांबरोबर घोड्यावर बसून व ती थैली घेऊन श्यामल देशाकडे निघाला.

श्यामल नगर समुद्रकाठी होते. वीरदास आपल्या मुलांबरोबर श्यामल देशाच्या हद्दीवर येऊन पोचला. तोपर्यंत सूर्यास्त झाला होता. तेथे एक फार मोठे देऊळ होते. देवळाच्या चारी बाजूला शेकडो एकर जमीन होती. त्या देवळाच्या जमिनीची व्यवस्था करणारा एक व्यवस्थापक देवळातच राहात असे. बाजूला कोठारे होती आणि अनेक मोठ्या इमारती होत्या. त्यांच्या समोर किंवा बाजूला कडब्याच्या राशी लावलेल्या होत्या.

वीरदास सरळ देवळाच्या व्यवस्थापकाकडे गेला. त्याने आपली व आपल्या मुलांची ओळख सांगून त्याला जे सांगावयाचे होते ते सांगितले. म्हणाला–"आम्ही या गावात नव्याने आलो आहो. आमच्या राजाच्या एका कामासाठी म्हणून आलो आहो. काळोख पडला आहे. म्हणून आज देवळात उतरण्याची व आमच्या खाण्यापिण्याची व्यवस्था करू शकल्यास आमच्यावर आपले फार उपकार होतील."

व्यवस्थापकाने वीरदासाच्या हातात एक मोठी व जड थैली पाहिली. त्यात सोनेच असले पाहिजे हे त्याने ओळखले. म्हणून नम्रपणे म्हणाला–"त्यात काय मोठेसे? तुम्ही फार दुरून कोठून तरी आलां आहां. तुमच्या उतरण्याची व खाण्यापिण्याची सर्व व्यवस्था मी करून देतो."

वीरदास व त्याच्या मुलांनी आंघोळ करून जेवून घेतले. नंतर वीरदासने आपल्या मुलांना जाऊन झोपायला सांगितले आणि स्वत: व्यवस्थापकाकडे गेला आणि त्याने गुप्तपणे त्याला सर्व गोष्टी सांगून त्याचा सल्ला विचारला.

व्यवस्थापक पंचकल्याणीचे नाव ऐकूनच दचकल्यासारखा झाला. तरी स्वत:ला थोडा सावरून तो वीरदासला म्हणाला–"मला वाटते, तुम्ही उगाच इतके कष्ट सहन करून इतके दूर आलात. हे काम तुमच्या हातून होणे शक्यच नाही. म्हणून तुम्ही आलात तसे उद्यां सकाळी परत स्वदेशी निघून जा. आमचे महाराज आपला हा घोडा कोणत्याही किंमतीवर विकायला तयार होणार नाहीत. त्या घोड्याला चोरून नेणे मानवाच्या हातचे काम नाही. चुकून कोणी तो प्रयत्न करू लागला तर त्या प्रयत्नात त्याला स्वत:चा जीव घालवून बसावे लागेल. मी खरेखरे तेच सांगत आहे."













वीरदास दिर्घश्वास सोडून म्हणाला– "आम्हांला आमच्या जिवाची फिकीर करायला वेळच नाही. आम्ही पंचकल्याणी घोडा घेऊन परत गेलो नाही तर आमचा राजा आम्हांला सोडणार नाही. नक्कीच ठार करील. त्या पेक्षा या प्रयत्नात मरण आले तर ते आम्हांला पत्करेल. निदान राजाज्ञेचे पालन करीत असतां मरण आले, या गोष्टीचे मनाला समाधान राहील. म्हणून तुम्ही आम्हांला काही तरी उपाय करून राजाच्या तबेल्यात पोचते करा. आमच्या जवळ ही जी सोन्याची पिशवी आहे ही आम्ही तुम्हांला देऊ. तबेल्यात पोचल्यावर आम्ही आपल्या नशिबाची परीक्षा स्वत:च पाहून घेऊ."

व्यवस्थापक बराच वेळ विचार करून म्हणाला–"आज रात्रीच मी तुम्हांला तबेल्यात पोचविण्याची व्यवस्था करतो. राजाच्या घोड्यासाठी गवत व भुसा रात्रीच पोचवावा लागतो. त्याच्याबरोबर तुम्हांला तबेल्यात पोचविणे आम्हांला कठीण नाही. परंतु तुम्हांला तेथे पोचते करणे म्हणजे मृत्यूच्या जबड्यात टाकण्या सारखेच आहे."

"अहो पण आम्ही आत्महत्येला तयार होऊनच तर आलो आहो. आम्ही पहिल्यानेच नाही का सांगितले तुम्हांला? आम्हांला गवताच्या पेंढ्याबरोबर तुम्ही आंत पोचते केलेत तर त्याचे पाप लागणार नाही, पुण्यच लागेल." वीरदास म्हणाला.

व्यवस्थापकाने चौघांना भुशाच्या पोत्यात बसायला सांगून नोकरांकरवी ती पोती गाड्यात टाकविली. वीरदासने दिलेली सोन्याच्या नाण्यांची थैली परत आल्यावर सुरक्षित परत करीन असे सांगून व्यवस्थापकाने ती ठेवून घेतली.

गवत व भुसा इस्मायल देशाच्या तबेल्यात पोचे पोचेतो मध्यरात्र उलटून गेली होती. तबेल्यातल्या नोकरांनी पोती उतरवून ठेवून दिली आणि पुन्हा जाऊन झोपले.

थोड्या वेळाने वीरदास व त्याचे मुलगे उठले व पोती फाडून बाहेर आले. आपली चाहूल दिल्याशिवाय मांजराच्या पावलांनी ते पंचकल्याणी घोडा बांधला होता तेथे येऊन पोचले. तो घोडा उत्तम जातीचा होता. म्हणून त्याला ओळखणे कठीण गेले नाही. तो घोडा नव्या लोकांना पाहून बिचकला.

पण वीरदासने तिकडे लक्ष दिले नाही. जवळ जाऊन त्याची दोरी सोडू लागला. वीरदासाचा हात लागताच घोडा लाथा झाडून ओरडू लागला. म्हणून वीरदास व त्याचे मुलगे बाजूला सरकले. इतक्यात पाहरेकऱ्यांनी येऊन वीरदास व त्याच्या मुलांना कैद केले आणि राजासमोर नेऊन हजर केले.

"हे लोक पंचकल्याणी घोडा चोरून न्यायला आले होते. यांना उजाडेपर्यंत तबेल्यातच बांधून ठेवा, उजाडल्यावर काय तो निकाल सांगेन." राजाने नोकरांना सांगून वीरदास व त्याच्या मुलांना पाठवून दिले. उजाडल्यावर राजाने चौघां कैद्यांना बोलावून त्यांना मोकळे पणी समोर बसविले आणि विचारले–"कोण तुम्ही? या तऱ्हेने जीव धोक्यात कां घालीत आहां? तुम्ही खरेखरे बोला."

वीरदासने सुरवातीपासून शेवटपर्यंत खरी गोष्ट सांगून टाकली.

राजा ते सर्व ऐकून म्हणाला–"वीरदास! तुझ्या म्हणण्यावरून तुझा स्वार्थ यात काही नाही हे मला दिसते आहे. परंतु तुम्ही सर्व धोक्यात पडला आहां हे स्पष्टच आहे. याहून जास्त मोठ्या धोक्यात तुम्ही कधी पडलात का? पडला असल्यास सांगा. ते ऐकल्यावर माझा त्याच्यावर विश्वास बसला तर मी तुझ्या मुलांपैकी एकाला मी जिवंत मुक्त करीन."

वीरदासने आपले पूर्वीचे आयुष्य थोडे आठवण्याचा प्रयत्न केला व म्हणाला– "होय महाराज! माझ्या आयुष्यात अशीच एक गोष्ट पूर्वी घडली आहे."

"सांग तर ती गोष्ट!" राजा म्हणाला.

(पूर्वी घडलेली गोष्ट पुढल्या अंकात)



# धन - प्राप्ती

एकदां एक शेटजी ज्योतिष्याशी बोलत बसले होते. त्याच वेळी एक मुलगा तेथे कोठून तरी आला. ज्योतिषी त्या शेटजींना त्या मुलाकडे बोट दाखवीत म्हणाला–"हा गरीब मुलगा आहे ना, त्याचा बाप मजुरी करून आपले पोट भरतो. परंतु लवकर त्या मुलाच्या बापाला धनप्राप्ति होणार आहे व पुढच्या आयुष्यात त्याला सुख मिळणार आहे."

शेटजींचा ज्योतिष्यावर विश्वास होता. ते त्या मुलाच्या बापाला भेटून म्हणाले–"तू आपल्या मुलाची जबाबदारी माझ्यावर टाक. मी तुला दोनशे रुपये देतो."

मजुराला शंका आली की शेटजींनी ही सूचना काही तरी स्वार्थ बुद्धीनेच केली असावी. म्हणून त्याने विचारले–"पण काय हो, यात तुमचा हेतू काय ?"

"काही नाही बाबा ! मुलाची ही स्थिति पाहून मला दया आली. माझ्या घरी तो राजबिंड्या सारखा वाढेल ! पाहिजे तर तू आणखी तीनशे रुपये ठेवून घे." शेटजी म्हणाले.

मजुराला पांचशे रुपये मिळाले. त्याचा मुलगा शेटजींच्या घरी राजबिंड्यासारखा वाढू लागला. एक महिना झाला तरी शेटजींना कोठून ही धनप्राप्तीची चिन्हे दिसली नाहीत. तेव्हां शेटजींनी जाऊन ज्योतिष्याला विचारले–"काय हो, ज्योतिषी बुवा ! एक महिना होऊन गेला, पण धनप्राप्ती काही झाली नाही की ?"

"कां नाही ? झाली की मी सांगितल्याप्रमाणे त्याच्या बापाला. तुम्ही दिलेले पैसे नाही का त्याला मिळाले ?" ज्योतिषी म्हणाला.





# महाभारत

पांडव द्यूतात पुन्हा हारले आणि द्रौपदीसह वनवासास हस्तिनापुराहून निघाले. इंद्रसेन वगैरे चवदा सेवक रथ घेऊन त्यांच्या बरोबर निघाले.

वाटेत ते वर्द्धमानपुर नामक गावी पोचले. तेथे त्यांना भेटायला हस्तिनापुरवासी काही लोक आले व म्हणाले–"युधिष्ठिरा ! तुम्ही आम्हांला सोडून असे वनात काय निघालात ? आम्ही सुद्धां तुमच्या बरोबर येतो.

युधिष्ठिर नम्रपणे त्यांना म्हणाला–"मी म्हणतो ते ऐकून घ्या. आम्हांला जंगलात ज्या यातना सहन कराव्या लागतील त्यांच्या कल्पनेनेच आमचे आजोबा भीष्माचार्य, पितृतुल्य धृतराष्ट्र महाराज आणि आमच्या मातोश्री कुंती यांच्यावर डोंगरच कोसळला आहे. तुम्ही परत जाऊन आमच्या वडीलांचे सांत्वन केलेत तर त्यांना सुख होईल व आम्हांला आनंद होईल."

युधिष्ठिराच्या तोंडचे ते नम्र वचन ऐकून सर्व नागरिक पांडवांची स्तुति करीत हस्तिनापूरला परतले.

त्यानंतर पांडव रथात बसून वनवासास पुढे निघाले. सूर्यास्ताच्या सुमारास ते एका विशाल वटवृक्षाजवळ येऊन पोचले आणि रात्रभर तेथेच आराम करण्याचे त्यांनी ठरविले. पांडव गावाबाहेर उतरले आहेत हे ऐकून जवळपासच्या गावांतली ब्राह्मण मंडळी त्यांच्या दर्शनास आली व सूर्योदय झाल्यावर पांडव पुढच्या प्रवासाची तयारी करू लागले तेव्हां सर्व ब्राह्मण त्यांच्याबरोबर निघाले.



तेव्हां युधिष्ठिर त्यांना म्हणाला– "आम्ही आपले सर्वस्व घालवून वनवासास जात आहो. तुमचा सर्वांचा उदरनिर्वाह कसा चालणार? तुमचे कष्ट आम्हांला पाहवणार नाहीत. म्हणून तुम्ही घरी परत जाणेच बरोबर होईल."

"परंतु आम्हांला तर तुमचाच आधार आहे. आम्ही कोणाच्या तोंडाकडे पहायाचे ?" ब्राह्मण मंडळी म्हणाली.

"आम्ही असहाय स्थितीत आहो. अशा परिस्थितीत तुम्हां सर्वांसाठी कंदमुळे व फळे आणायला मी आपल्या भावंडांना कसे काय पाठवू शकेन?" युधिष्ठिराने स्पष्ट सांगून टाकले.

"आम्ही स्वतःचे कष्ट स्वतःच भोगू. आम्ही फक्त तुमच्या संगतीत राहण्यासाठी येत आहो." ब्राह्मण म्हणाले.

युधिष्ठिराने आपले पुरोहित धौम्यमुनि यांस विचारले–"मुनिवर्य! ही ब्राह्मणमंडळी सर्व तऱ्हेचे कष्ट सहन करण्यास तयार होऊन निघत आहेत. आम्ही नकार दिला तरी आग्रह सोडीत नाहीत. मग जंगलात यांचा उदरनिर्वाह कसा काय चालणार? काही उपाय असेल तर सुचवावा!"

"युधिष्ठिरा! अन्न हे आदित्यमय आहे! तू सूर्याची आराधना कर आणि त्याच्या कृपेने ब्राह्मणांच्या उदर निर्वाहाची व्यवस्था कर." असे सांगून धौम्य मुनींनी सूर्योपासनेचा मंत्र दिला.

युधिष्ठिराने धौम्य मुनींच्या सल्लघाप्रमाणे सूर्याची आराधना केली. सूर्याने प्रसन्न होऊन युधिष्ठिराला वर मागण्यास सांगितले, तेव्हां युधिष्ठिराने ब्राह्मणांच्या योगक्षेमाची व्यवस्था करण्यास सहाय्य करण्यास विनंती केली. तेव्हां सूर्याने तांब्याचे एक भांडे युधिष्ठिराला दिले व म्हणाला– "द्रौपदी कंदमुळे व फळे शिजवून या भांड्यात ठेवून देऊ लागली म्हणजे हे पात्र कधीच रिकामे होणार नाही. अशा तऱ्हेने सर्व अतिथी संतुष्ट होतील." असे सांगून सूर्य अंतर्धान पावला.



युधिष्ठिराने ते अक्षयपात्र द्रौपदीच्या हातात दिले. त्या दिवसापासून द्रौपदी दर रोज कंदमुळे व फळे शिजवून त्या अक्षय पात्रात ठेवू लागली. इच्छित अन्न सर्व ब्राह्मणांना व पांडवांना पुरेल इतके त्यात मिळू लागले. युधिष्ठिर दररोज प्रथम अतिथींना वाढायला सांगून नंतर आपल्या भावंडांबरोबर जेवू लागला. सर्वांची जेवणं आटोपल्यावर द्रौपदी जेवू लागली.

पुढे काही काळ लोटल्यावर पांडव गंगाकाठचा निवास सोडून सरस्वती नदी काठच्या काम्यक वनात येऊन राहू लागले. तो एक अत्यंत सुंदर प्रदेश होता. त्यात ऋषी मुनी राहात असत.

पांडव काम्यक वनात राहात असतां एकदां धृतराष्ट्र विदुराला बोलावून म्हणाला– "विदुरा! पांडव वनवासास गेल्यानंतर प्रजा आमच्यावर रागावल्यासारखी झाली आहे. असंतुष्ट प्रजा उलटली तर राज्याचे नुकसान होण्याची शक्यता आहे. काही उपाय असेल तर सांग !"

"राजा! धर्म, अर्थ व काम या सर्वांचा मूळ आधार धर्म आहे. तू धर्माचे पालन करून आपली मुले व पांडव यांचा सांभाळ कर. दुर्योधनाने शकुनी मामाच्या कपटी-पणाने पांडवांचे राज्य जिंकले आहे. तू युधिष्ठिराला त्याचे राज्य देऊन टाक व त्यांच्या अधिकारात काही काळ दुर्योधन, दुःशासन, शकुनी आणि कर्ण यांना राहू दे. सभा बोलावून सर्वांसमक्ष दुःशासना-करवी द्रौपदीची क्षमा मागायला सांग. युधिष्ठिर क्षमा करील. तू माझा सल्ला विचारलास व मला जो उचित वाटला तो मी दिला. या उपर तुझी मर्जी !" असे सांगून विदुर गप्प बसला.

परंतु धृतराष्ट्राला भयंकर राग आला. तो रागाच्या भरात म्हणाला–"तू हा काय सल्ला दिलास? मी, तू माझा भाऊ म्हणून तुझा आदर करीत आलो व तुझा सल्ला विचारला. पण तुझी दुर्बुद्धी कायम आहे. माझ्या मुलांचा उत्कर्ष तुला बघवत नाही.

तू त्यांच्याचकडे जाऊन कां नाही राहात ?"

विदुराने लगेच रथ मागविला आणि काम्यक वनाकडे निघाला.

तो काम्यक वनात पोचला तेव्हां युधिष्ठिर ब्राह्मण मंडळींशी बोलत बसला होता. युधिष्ठिराने विदुराला दुरून येताना पाहिले व पांडवांना म्हणाला–"आता विदुरकाका कशाला येत आहेत? द्यूतात आपण आपले राज्य घालवून बसलो आहो. पण आपली शस्त्रास्त्रे अद्याप आपल्या जवळच आहेत. ती जिंकण्याची इच्छा असेल शकुनी मामांच्या मनात. म्हणून धृतराष्ट्र महाराजांच्या आज्ञेने पुन्हां द्यूत खेळण्यास निमंत्रण घेऊन विदुरकाका आले असतील. पण यापुढे द्यूत खेळायचे नाही असे मी ठरविले आहे. अर्जुनाचे गांडीव व तुझी गदा त्यांनी जिंकली तर आपण आपले राज्य पुन्हां मिळविण्याचा विचार कायमचा सोडलेलाच बरा."

इतक्यात विदुर तिकडे येऊन पोचला. पांडवांनी त्याना सामोरे जाऊन त्यांचे स्वागत केले. धृतराष्ट्राने जसा अपमान केला होता तो सर्व सांगून विदुर म्हणाला–"आतां मी तुमच्या आश्रयास आलो आहे."

ते ऐकून युधिष्ठिर म्हणाला–"विदुर काका! आतां आम्हांला सल्ला द्यायला



तुम्ही आमच्या बरोबर राहाल. यापेक्षां जास्त आनंदाची गोष्ट ती काय असणार ?"

विदुर काम्यक वनात जाऊन पांडवांच्या बरोबर राहू लागल्याचे धृतराष्ट्राला कळले. ते कळल्यावर त्याला फार तोडून बोलल्याचे आठवून धृतराष्ट्राला फार पश्चात्ताप वाटला. आतां विदुराचा सल्ला आपल्या-ऐवजी पांडवांना मिळत राहणार हेदेखील त्याला आवडले नाही. म्हणून त्याने संजयाला, विदुराला बोलावून आणावयास पाठविले. म्हणाला–"संजया! किती झाले तरी विदुर माझा भाऊ आहे. मी त्याला तोडून बोललो म्हणून तो दुःखी मनाने पांडवांकडे गेला



आहे. त्याच्या शिवाय माझी बुद्धी कुच-कामाची आहे. म्हणून तू जाऊन त्याला परत बोलावून घेऊन ये."

संजय काम्यक वनात गेला आणि विदुराला परत बोलावून घेऊन जाण्यासाठी आल्याचे त्याने युधिष्ठिराला सांगितले. नंतर तो विदुराला म्हणाला–"दादा! धृतराष्ट्र महाराजांना फार पश्चात्ताप झाला. त्यांनी मला तुम्हांला परत बोलावून आणण्यासाठी मुद्दाम पाठविले आहे. आपण आला नाही तर धृतराष्ट्र महाराज त्या दु:खानेच या जगाचा निरोप घेतील."

विदुराने युधिष्ठिराचा निरोप घेतला व व हस्तिनापूरला परत आला. धृतराष्ट्र

[illegible]

माझ्या शब्दाला मान देऊन परत आलास. तू गेल्यापासून मला काहीच सुचत नव्हते. मला माझ्या चुकीबद्दल क्षमा कर."

ते ऐकून विदुर म्हणाला–"राजा! तुझी आज्ञा शिरोधार्य आहे. मी तुझ्या हिताचाच सल्ला दिला होता. माझ्या दृष्टीत पांडव व कौरव सारखेच आहेत. परंतु पांडव आज संकटात आहेत व त्याबद्दल ते जबाबदार नाहीत. म्हणून त्यांच्याविषयी साहजिकच माझ्या मनात थोडी सहानुभूति आहे."

दुर्योधना विदुराला परत आलेला पाहून दु:शासन, शकुनी व कर्ण यांना बोलावून म्हणाला–"पाहिलेत, विदुरकाका पुन्हां परत आले! ते नेहमी पांडवांच्या बाजूनेच बाबांना सल्ला देतात आतां पांडव पुन्हां हस्तिनापूरला परतले तर मी आत्महत्या करून मोकळा होऊन जाईन."

शकुनी दुर्योधनाला म्हणाला–"तू तरी काय वेड्यासारखा बोलतो आहेस रे? तुझ्या वडिलांनी बोलाविले तरी ते परत येण्याचे नांव काढणार नाहीत."

परंतु दुर्योधनाचे समाधान झाले नाही. कर्णाने ते ओळखले. तो शकुनी मामांना आणि दु:शासनाला म्हणाला–"आपण



[illegible]

असहाय पांडवांचा वध करून टाकूया. आतां त्यांचा काटा काढला नाही तर पुढे ते अशक्यच समज!"

कर्ण म्हणाला ते सर्वांना पसंत पडले. सर्वांनी ससैन्य काम्यक वनावर स्वारी करून पांडवांचा वध करण्याचे ठरविले.

ठीक त्याच वेळी व्यासमुनी धृतराष्ट्राकडे आले आणि म्हणाले–"धृतराष्ट्रा! अरे पांडवांना द्यूतात फसवून त्यांचे राज्य जिंकून तुला काय मिळाले? मला हे बिलकुल आवडले नाही. आतां तुझा पोरगा काम्यक वनावर स्वारी करून पांडवांचा वध करण्याच्या विचारात आहे. हा विचार नाही अविचार आहे. तो तिकडे गेला तर परतणार नाही. तू त्याला हा मूर्खपणा सोडून द्यायला सांग! हा सर्व अन्याय व अधर्म डोळ्या देखत घडत असता तुम्ही सर्व भीष्म, द्रोण, विदुर वगैरे मौन धारण करून कसे काय बसले आहां?"

ते ऐकून धृतराष्ट्र म्हणाला–"मुनीवर्य! हे जे काही घडले व होत आहे, आमच्या पैकी कोणालाच आवडले नाही. परंतु पुत्र प्रेमामुळे मी हे सर्व काहीच थांबवू शकलो नाही. तो माझी पर्वाच करीत नाही. तुम्हीच त्याची कान उघाडणी करावी."



"मला आवश्यक कामासाठी जावयाचे आहे. येथे मैत्रेय नावाचे मुनी येणार आहेत. तेच तुझ्या मुलाला नीट समजावून सांगतील." असा सल्ला देऊन व्यासमुनि निघून गेले.

महर्षि व्यासांनी सांगितले होते त्या प्रमाणे काही दिवसांनी मैत्रेय मुनि हस्तिनापूरला आले. धृतराष्ट्राने त्याचा यथोचित सत्कार केला आणि हात जोडून म्हणाला–"मुनिवर्य! आपले आतां कोठून येणे झाले?"

मैत्रेय म्हणाले–"धृतराष्ट्रा! मी तीर्थ यात्रा करीत काम्यक वनात गेलो होतो. तेथे पांडवांबरोबर काही काळ राहलो. आतां तुझ्या दर्शनाला आलो आहे. पांडव वल्कल

वस्त्र व जटा धारण करून कंदमुळे व फळे खाऊन राहात आहेत. पण ते आहेत तेथे समाधानाने व आनंदाने रहात आहेत."

"मुनिवर्य पांडव सकुशल आहेत हे ऐकून आनंद झाला. त्यांच्या मनांत क्रोध, द्वेष इत्यादि नाहीत ना? नाही तर ते मध्येच आपला नियम सोडून हस्तिनापुरावर चालून यायचे!" धृतराष्ट्राने विचारले.

"भूकंप झाला, आकाश कोसळले आणि प्रलयकाळ आला तरी पांडव आपल्या व्रता-पासून ढळणार नाहीत. अशा सद्वर्तनी पांडवांशी तुझ्या मुलाने अन्यायच केला." मैत्रेय मुनी म्हणाले.

नंतर मैत्रेय मुनि दुर्योधनाला म्हणाले– "हे वत्स, माझे ऐक, तुझ्या डोक्यात अल्प मात्र बुद्धि उरली असेल तर पांडवांशी मैत्री कर. भीमाने काम्यक वनात किम्मीर नामक राक्षसाचा वध केला आहे. त्याने बकासुराचा, हिडिंबासुराचा आणि जरासंधाचा वध केला हे तुला माहीतच आहे. द्रुपदासारखा बलिष्ठ राजा त्यांचा सासरा आहे. कृष्णासारखा च[illegible] पांडवांशी वैर करणे तुझ्या हिताचे नाही."

ते ऐकून दुर्योधन खद्कन उभा राहला. ते पाहून मैत्रेय मुनींना राग आला. त्यांनी त्याला शाप दिला–"तुझ्या या माजलेल्या मांड्या भीमाच्या गदेने भंग होतील."

धृतराष्ट्र हात जोडून म्हणाला–"मुनि-वर्य! माझ्याकडे पाहून माझ्या मुलाचा अपराध पोटात घ्या!"

"या शापातून मुक्तीचा एकच एक उपाय आहे. तुझ्या मुलाने पांडवांशी मैत्री जोडावी." मैत्रेय म्हणाले.

"मुनिवर्य! आपण आतांच भीमाने किम्मीर राक्षसाचा वध केल्याचे सांगितले. तो वृत्तांत ऐकण्याची इच्छा आहे." धृतराष्ट्र म्हणाला.

"तो वृत्तांत विदुराला विचार!" असे सांगून मैत्रेय मुनी निघून गेले.

"भीमाने किम्मिराचा वध केला का?" असे म्हणत दुःखी मनाने दुर्योधन सभेतून उठून गेला.





# शिवपुराण

[४]

ब्रह्मदेव, विष्णु आदिक विंध्य पर्वतावर निघून गेले आणि त्यांनी मेनका व हिमवान यांना समजावून सांगितले की त्यांनी महादेवीला प्रसन्न करण्यासाठी तपश्चर्या करून तिला आपल्या पोटी जन्म घेण्यास विनंती करावी. नंतर ब्रह्मदेवा-दिकांनी महादेवीचे स्तोत्रगान करून तिला प्रसन्न केले.

त्यांच्या स्तोत्रगानावर संतुष्ट होऊन महादेवीने त्यांना दर्शन दिले. महादेवीच्या मुकुटाचा प्रकाश चतुर्दिक पसरला होता. तिच्या सहस्र हस्तात त्रिशूल आदिक शस्त्रास्त्रे होती. ब्रह्मदेव आदिकांनी हात जोडून निवेदन केले–"हे महादेवी माता! तू दक्षाच्या पोटी सती म्हणून जन्म घेतला होतास. शंकराशी विवाह करून त्याला सुखी केलेस. नंतर दक्ष यज्ञात पतीचा अपमान असह्य झाल्यामुळे तू देहत्याग केलास. तुझ्या विरहामुळे विरक्त होऊन शंकर ध्यानमग्न होऊन बसला आहे. म्हणून तारकासुर आदिक राक्षसांना खूप फावले. ते स्वैर अत्याचार करू लागले आहेत. कोणी अवतारीपुरुष अवतार घेऊन साधु-पुरुषांचे रक्षणकरील व दुष्टांचा नाशकरील अशी आशा मनात बाळगून आम्ही आजवर वाट पाहिली. त्रिलोक त्रस्त होऊन तारका-सुराच्या वधाची वाट पहात आहे. म्हणून तू मेनका व हिमवान यांच्या पोटी जन्म घेऊन तारकासुराचा वध कर व त्रिलोकांत पुन्हां शांतिस्थापना कर."

महादेवीने त्यांची इच्छा पुरी करण्याचे वचन दिले आणि अदृश्य झाली.



तिकडे ब्रह्मदेव आदिकांच्या इच्छेप्रमाणे मेनका व हिमवान तपश्चर्येत लीन झाले. चैत्र शुक्ल प्रतिपदेपासून सत्तावीस आठवडे तपश्चर्या केल्यावर त्यांच्या श्रद्धा भक्तीवर प्रसन्न होऊन महादेवीने त्यांना दर्शन दिले व वर मागण्यास सांगितले.

तेव्हां मेनका व हिमवान दोघांनी हात जोडून विनंती केली–"हे माते! आम्ही तुझ्यादर्शनाने पाप मुक्त झालो. आतां आम्हांला शौर्य, साहस व गुण या सर्वांनी परिपूर्ण असे शंभर पुत्र होतील असा वर दे आणि तू स्वत: पुत्री रूपे आमच्या पोटी जन्म घेऊन आम्हांला कृतार्थ कर. त्यानंतर जगताच्या कल्याणासाठी शंकराशी विवाह करून आम्हांला शाश्वत कीर्ती देण्याची कृपा कर." महादेवी 'तथास्तु' म्हणून अंतर्धान पावली.

काही काळ लोटल्यावर पाच ग्रह उच्च दशेत असतां मेनकेला एक मुलगा झाला. त्याचे नाव मैनाक झाले. त्यानंतर तिला क्रमाने नव्याण्णव पुत्र झाले आणि अगदी शेवटी आर्द्रा नक्षत्र असता चैत्र शुक्ल नवमीला एक सुंदर तेजस्विनी कन्या जन्मली. ती हिमवान पर्वताची मुलगी, म्हणून तिला पार्वती हे नाव ठेवण्यात आले. तिच्या तेजाने दाही दिशा प्रकाशित झाल्या. देवांनी पुष्पवृष्टि केली. ब्रह्मदेव, विष्णु व इंद्रादि देवांनी महादेवीचे स्तोत्रगान केले.

पार्वतीचा जन्म झाला तेव्हां तिच्या देहावर नीलवर्ण कांति झळकत होती. तिला चार हात होते, कपाळावर एक डोळा होता आणि तिची आकृति काली माते सारखी होती. तिचे ते रूप पाहून मेनका भ्याली व तिने प्रार्थना केली की सामान्य बालिकेचे रूप धारण करून सर्वांना सुखी कर. तेव्हां देवी एका सामान्य कन्येसारखी जन्मल्या-बरोबर रडू लागली.

हिमवानाला जेव्हां, महादेवीने त्याच्या पुत्री रूपाने जन्म घेतल्याची शुभवार्ता कळली तेव्हां त्याला अपरंपार आनंद झाला. तो ब्रह्मवृंदाला बरोबर घेऊन प्रसूतिगृहा-जवळ आला. कर्पूरदीप लावून कस्तूरीचा सडा घातला. ब्रह्मवृंदाने मेनका व हिमवानाला आशीर्वाद दिला. हिमवानाने धन, धान्य व वस्त्राभूषणे देऊन ब्राह्मणांचा सत्कार केला.

पार्वती हळूहळू लहानाची मोठी झाली. आपल्या सखींबरोबर ती दऱ्याखोऱ्यात विहार करी. कधी सिंहावर बसून हिंडे फिरे. गुहात व खडकाळ प्रदेशात लपंडाव खेळे. कधी स्वत: आई होऊन आपल्या सखींना मुले मुली करून भातुकलीचा खेळ खेळे. कधी आपल्या सखींना चेंडू दाखवून तो ब्रह्मांड असल्याचे सांगे व चेंडूसारखे ब्रह्मांडाला मी खेळवीन असे सांगे. ब्रह्मदेव, विष्णु व महादेव यांच्या मूर्ती करून मी त्यांना आज जेवायला वाढणार आहे, असे सांगे. एक घरकुल तयार करून म्हणे, हे ब्रह्मदेवाने निर्मिले आणि विष्णु याचे रक्षण करीत आहे आणि शेवटी ते मोडून टाकून सांगे; हे शंकराचे काम आहे.

अशा तऱ्हेने पार्वतीचे बालपण संपल्यावर तिचा विद्याभ्यास सुरू झाला. तिने सर्व विद्या संपन्न केल्या. ती सर्वदा शंकराचे ध्यान करून सामगानाचा पाठ करी. ती ध्यान मग्न असतां कोणी तिला पार्वती म्हणून हाक मारली तर ती मुळीच उत्तर देत नसे. परंतु कोणी तिला 'शिवानी'



म्हणून हाक मारली तर ती उत्तर देई. मनात आले की ती सिंहाला आपले वाहन करून विहार करी. त्यावेळी तिच्या हातात धनुष्य बाण, त्रिशूल आदिक शस्त्रे असत. तिला सिंहाव्यतिरिक्त वाहन किंवा इतर शस्त्रास्त्रे आवडत नसत. ती कधी कधी आनंद मग्न होऊन नृत्य व गान करी. शंकराचे चित्र काढून किंवा त्याची मूर्ति तयार करून आपल्या सखींना दाखवी.

त्याच सुमारास नारद हिमवानाच्या दर्शनास आला. हिमवानाने सामोरे जाऊन त्याचा सत्कार केला. त्याची पाद्यपूजा करून त्याला नमस्कार केला आणि पार्वतीला नमस्कार करायला सांगितले. नंतर नार-

दाला विचारले–"मुनिवर्य! आपण त्रिलोक-भ्रमण करतां. आमच्या या मुलीला कसा पति लाभेल, हे सांगण्याची कृपा करावी."

नारद पार्वतीचा हात पाहून व त्यावर गज, मत्स्य, अंकुश व रथ पाहून म्हणाला–"हिमवाना! तुझ्या या मुलीत महादेवीची सर्व लक्षणें आहेत. तुला अपार यशप्राप्ती होईल. लक्ष्मी व सरस्वती सारखी हिची पूजा होईल. हिला योग्य पति त्रिलोकात शंकर एकच आहे. म्हणून जास्त विचारपूस करण्याची गरज नाही. शंकराशी हिचा विवाह करून द्यावा."

नारद निघून गेल्यावर हिमवानाने मेनकेला नारद म्हणाला ते सांगितले आणि म्हणाला–"आपण महादेवीकडून जो वर मागितला होता त्याप्रमाणे देवीने आपली पुत्री म्हणून जन्म घेतला आहे.

ते ऐकून मेनकेला परमानंद झाला. ती म्हणाली–"आपली पार्वती आतां विवाह योग्य झाली आहे. म्हणून तिच्या विवाहाची आपण तयार करावी."

तेव्हा हिमवान तिला म्हणाला–"सतीच्या मरणानंतर शंकर तिचा देह खांद्यावर टाकून विश्वभर हिंडत होता. शेवटी गंगेच्या संगमस्थानी कालीघाटा वर नृत्य करीत असता विष्णूने आपल्या मायेने सतीला कालीरूप देऊन तिची तेथे स्थापना केली आणि शंकराला ज्ञानोपदेश केला. तेव्हां शंकराने वैराग्यवृत्तीने तपश्चर्या सुरू केली व तपश्चर्येतच आजपर्यंत लीन आहे. शंकर आशुतोष व भक्त वत्सल महादेव आहे. तपश्चर्या करून त्याला प्रसन्न करणे कठीण नाही. म्हणून आपण पार्वतीलाच तपश्चर्या करावयास सांगू या."

तसे मनाशी ठरवून हिमवान व मेनका पार्वतीला बरोबर घेऊन कैलास पर्वतावर गेले. तेथे शंकर तपश्चर्या करीत होता. शंकराच्या चारही बाजूला त्याचे गण आयुधे धारण करून उभे होते. काही गण शंकराच्या सेवेत लीन होते. रुद्रगणांनी हिमवानाला शंकराच्या दर्शनास जाण्याची अनुमति दिली.



# ११४. इग्वाजचा धबधबा

इग्वाज नदीचा उगम ब्राझिल (दक्षिण अमेरिका) देशात दक्षिणेकडील पर्वतात होतो. पश्चिमेकडे ८०० मैल वहात जाऊन पारिपरना नावाच्या नदीशी तिचा संगम होतो. इग्वाज नदीला जागोजागी लहान मोठे धबधबे आहेत. त्यात जगप्रसिद्ध इग्वाजचा धबधबा (येथे चित्रात दिलेला) मुख्य आहे. परग्वाद ब्राझिल व अर्जेंटिना देशांच्या सरहद्दी ज्या जागी चिकटतात तेथून १२ मैलावर हा धबधबा आहे. तीन मैलपर्यंत डोंगराळ प्रदेशातला भाग ओलांडून एका मोठ्या धबधब्याचे रूप या नदीच्या प्रवाहाला मिळते. एकेक धबधबा १८० फूट उंचीचा आहे. नदीची एक शाखा वहात जाऊन ७६० फुटावरून उडी घेते. पावसाळ्यात या जोड धबधब्याची रुंदी १२,००० फुटापर्यंत पसरते. त्यावेळी दर मिनिटाला २८० लाख घनफूट पाणी खाली कोसळते. व्हिक्टोरिया आणि नायगरा धबधब्यांपेक्षा या धबधब्याच्या पाण्याचा लोट मोठा आहे.






सुलभा: पुरुषा लोके सततं प्रियवादिन:
अप्रियस्य च पथ्यस्य वक्ता, श्रोता च दुर्लभ: ॥ १ ॥

[ गोड व प्रिय वाटणारी वचने बोलणारे लोक पुष्कळ असतात. परंतु कटु असले तरी अप्रिय वचने बोलणारे आणि ऐकणारे लोक क्वचितच आढळतात. ]

य दैवोपनतं दु:खं सुखं तद्विरपांतरं
निर्वाणाय तरुच्छाया तप्तस्य हि विशेषत: ॥ २ ॥

[ दु:खानंतर मिळणारे सुख आह्लादकारक असते. जो (असह्य) उन्हात राहिल्याने थावरून जातो त्यालाच झाडाच्या सावलीचे सुख कसे असते ते कळते. ]

वह्निस्तस्य जलायते, जलनिधि: कुल्यायते, तत्क्षणात्
मेरु: स्वल्पशिलायते, मृगपति: सद्य: कुरंगायते,
व्यालो माल्यगुणायते, विषरस: पीयूषवर्षायते,
यस्यांगेखिल लोकवल्लभ तमं शीलं समुन्मीलति ॥ ३ ॥

[ सर्व लोकांकडून वाखाणणी होण्यालायक ज्याचे शील आहे त्याला अग्नि पाण्यासारखा असतो. मेरुपर्वत एखाद्या शिलाखंडासारखा असतो, सिंह हरणासारखा असतो, साप फुलांच्या माळेसारखा असतो आणि विष अमृत तुल्य असते. ]

प्रिय व अप्रिय



जेष्ठा आणि लक्ष्मी दोघी बहिणी होत्या.

लक्ष्मीच्या भक्तांची संख्या पुष्कळ होती. परंतु जेष्ठाची पूजा कोणी करीत नसे. म्हणून जेष्ठाला आपल्या धाकट्या बहिणीचा हेवा वाटत असे.

एकदा लक्ष्मी शंभर रत्ने घेऊन कोठे तरी जायला निघाली. जेष्ठाने तिला विचारले–"कोठे चाललीस ग ही सर्व रत्ने घेऊन?"

लक्ष्मी म्हणाली–"ताई! एक गरीब मनुष्य कित्येक दिवसांचा उपाशी माझी कृपा व्हावी म्हणून वाट पाहतो आहे. त्याला ही रत्ने देण्यासाठी घेऊन जात आहे."

"अग, पण मी नेऊन देते त्याला, दे इकडे!" जेष्ठा म्हणाली.

नाइलाजाने लक्ष्मीने सर्व रत्ने जेष्ठाच्या हातात दिली. जेष्ठा ती रत्ने नळकांड्या सारख्या काठीत घालून श्रीनिवास नामक एका गरीब माणसाच्या घरी आली.

उजाडल्यावर श्रीनिवासला ती काठी उशाशी दिसली. त्याला आश्चर्य वाटले. तो विचार करू लागला की मला या काठीची काय गरज? त्याने ती काठी घेतली आणि तलावाकडे निघाला. वाटेत त्याला एक मुलगा भेटला. त्या मुलाने श्रीनिवासला विचारले–"काय हो, अशी काठी कोठे मिळते? माझ्या आजोबांनी अशीच एक काठी घेऊन यायला मला एक पावली दिली आहे."

"पाहिजे तर तू हीच काठी घेऊन जा." असे सांगून श्रीनिवासने त्या मुलाकडून ती पावली घेऊन काठी त्याला दिली. नंतर श्रीनिवास तलावावर गेला काठावर पावली ठेवून तो पाण्यात उतरला.

एका खोडसाळ मुलाने ती पावली पाहिली आणि काही बोलल्याशिवाय पावली घेऊन पळून गेला.

सौ. कमळा कोटणीस

लक्ष्मी हे सर्व आकाशातून पहात होती. ती आपल्या मोठ्या बहिणीला म्हणाली– "पाहिलेस न ताई? तू ऐकले नाहीस माझे. तू आपल्या हाताने त्याला ती काठी नेऊन दिलीस. ती त्याला मिळाली नाही. तो दरिद्रीच राहला."

जेष्ठाने तिला रागावून विचारले–"तू तरी काय केले असतेस ग?"

"मी काय करू शकेन हे तुला आताच दाखविते!" असे स्मित करून सांगत लक्ष्मी निघून गेली.

तिकडे त्या मुलाच्या आजाने नातवाच्या हातातली काठी घेऊन त्याला विचारले– "अरे ही इतकी जड कां? मला ही उचलता देखील येत नाही?"

"श्रीनिवास यांना पावली देऊन ही काठी आणली मी दादा!" नातू म्हणाला.

"ही काठी त्यांना परत देऊन पावली मागून घे आणि एकादी हलकीशी काठी घेऊन ये." आजा म्हणाला.

परत करून पावली परत मागितली.

श्रीनिवासने काठी परत घेतली व म्हणाला–"ती पावली हरवली बाबा. उद्यां परवां आणून देईन. तू आपल्या आजोबांना जाऊन सांग."

मुलगा निघून गेल्यावर थोडयाच वेळाने एका म्हाताऱ्याने येऊन श्रीनिवासला पावली दिली व म्हणाला–"माझ्या खट्याळ मुलाने तुमची ही पावली उचलून आणली होती. ती परत करायला आलो मी!"

श्रीनिवासने ती पावली तिच्या मालका-कडे पोचती केली.

ही सर्व कामगिरी लक्ष्मीचीच असली पाहिजे हे ओळखून जेष्ठाला राग आला. ती श्रीनिवासला चावण्यासाठी काळ्या नागाचे रूप घेऊन त्याच्या घरी येऊन बसली. सापाला पाहून श्रीनिवासने त्या काठीने सापाला मारले. काठी पोकळच होती म्हणून मोडली आणि सर्व रत्ने जमिनीवर पसरली.





# देवाचा धर्म

**प्रा**चीन काळी काशी येथे एक राजा राज्य करीत असे. त्याच्या पट्टराणीला दोन मुलगे झाले. राजाने त्यांची नावे अनुक्रमे महिसास व चंद्रकुमार अशी ठेवली. महिसास हाच बोधिसत्व होता. चंद्रकुमार लहान असतानाच त्याची आई म्हणजे पट्टराणीने परलोकगमन केले.

राजाने पुन्हा दुसरे लग्न केले आणि नवीन राणी पट्टराणी झाली. राणी फार सुंदर होती. राजावर तिचे फार प्रेम होते. राजा देखील तिचा आदर करी. यथासमयी नव्या पट्टराणीला एक मुलगा झाला. त्याचे नाव सूर्यकुमार असे ठेवण्यात आले. राजाने राणीला विचारले–"या बारशाच्या वेळी तू पाहिजे तो वर मागून घे!"

तेव्हां राणी म्हणाली–"मी आवश्यकता भासली म्हणजे वर मागून घेईन." काही वर्षांनी सूर्यकुमार वयात आला व राजाला योग्य अशा सर्व विद्यांत पारंगत झाला. तेव्हां त्याच्या आईने राजाला विचारले–"आपण मला मागे एक वर दिला होता. तो आठवतो का? तो आतां मागावा, म्हणते!"

राजा म्हणाला–"मागून घे!"

राणी म्हणाली–"माझ्या मुलालाच आपण गादीला वारस म्हणून नेमावे.

पण राजा म्हणाला--"दोन मोठे पराक्रमी मुलगे असता धाकट्याला वारस कसा काय नेमू म्हणतेस?"

परंतु राजाला राणीची गोष्ट मानावीच लागली. तरी मोठ्या मुलांच्या जिवाला काही अपाय करण्याची दुर्बुद्धी राणीला झाली तर बरे नाही असा विचार करून राजाने आपल्या दोघां मोठ्या मुलांना बोलावून समजावून सांगितले–"मुलांनो! मी सूर्यकुमारच्या आईला त्याच्या जन्माच्या वेळी एक वर दिला होता. तिने आज



तो वर मागून आपल्या मुलाला वारस करण्यासाठी हट्ट धरला आहे. स्त्री हट्टाला पेटली की काय वाटेल ते करायला तयार होते, असा विचार करून मी तिच्या मुलालाच आपला वारस करण्याचे ठरविले आहे. परंतु तुमच्या जिवाला काही अपाय होऊ नये म्हणून तुम्ही घराबाहेर निघून कोठे तरी गुप्तपणे रहा. मी मेल्यावर सूर्यकुमारचा पराभव करून राज्य जिंकून घ्या."

दोघे भाऊ पित्याच्या इच्छेला मान देऊन पित्याचा निरोप घेऊन निघाले. सूर्यकुमारला ती गोष्ट कळली. त्यांच्या बरोबर जाण्यास त्याने हट्ट केला आणि निघालापण.

तिघे भाऊ हिमालय पर्वतावर येऊन पोचले. बोधिसत्व धाकट्या सूर्यकुमाराला म्हणाला–"त्या सरोवरावर जाऊन प्यायला पाणी घेऊन ये."

ते सरोवर एका यक्षाचे होते. कुबेराने ते सरोवर त्या यक्षाला एका अटीवर दिले होते–"ज्यांना देवांचा धर्म काय आहे हे माहीत आहे अशा लोकांना तू कोणत्याही प्रकारे त्रास देऊ नकोस. पण इतर कोणी या सरोवरात पाऊल टाकले तर त्यांना धरून खाऊन टाक. परंतु कोणी सरोवरात पाऊल टाकले नाही तर मात्र तू त्यांच्या वाटेस जाता कामा नये."

त्या दिवसापासून तो यक्ष त्या सरोवरात पाऊल टाकणाऱ्या सर्वांना "देवांचा धर्म काय?" असा प्रश्न करी आणि कोणी बरोबर उत्तर दिले नाही तर त्याला खाऊन टाकी. म्हणून सूर्यकुमारने सरोवरात पाऊल टाकल्याबरोबर त्या यक्षाने त्याला विचारले– "तुला देवांचा धर्म माहीत आहे का?"

सूर्यकुमार म्हणाला–"होय माहीत आहे! देवांचा धर्म म्हणजे सूर्य व चंद्र!"

"तुला देवांच्या धर्माची कल्पना देखील नाही." असे सांगून त्या यक्षाने सूर्यकुमाराला आपल्या घरी कैद करून ठेवले.

सूर्यकुमार बराच वेळ झाला तरी न आलेला पाहून बोधिसत्वाने चंद्रकुमारला पाठविले. यक्षाने त्याला तोच प्रश्न विचारला. चंद्रकुमार म्हणाला–"देवांच्या धर्माचा अर्थ चार दिशा!" यक्षाने त्याला देखील कैद करून ठेवून दिले.

चंद्रकुमार देखील परत न आलेला पाहून बोधिसत्वाला दोघांवर काही तरी संकट ओढवले असल्याचा संशय आला. म्हणून तो स्वतः निघाला. त्याला सरोवरात दोघांची पावले जात असलेली दिसली. पण परत आलेली दिसली नाहीत. ते पाहून या सरोवरात कोणी यक्ष किंवा राक्षस असणार असा विचार करून बोधिसत्वाने आपली तलवार उपसली व तो राक्षस बाहेर येण्याची वाट पाहू लागला.

बोधिसत्व सरोवरात उतरत नाही हे पाहून यक्ष एका रानटी माणसाचे रूप घेऊन जवळ येऊन म्हणाला–"अहो! तहान लागली असेल तर पाणी पिऊन घ्या. असे बाहेर उभे का?"

तो मनुष्य सरोवरातला यक्ष असावा असा संशय बोधिसत्वाला आला. म्हणून त्याने विचारले–"माझ्या दोघां भावांना तूच कैद करून ठेवले आहेस, ना?"

"होय!" यक्ष म्हणाला.

"का?" बोधिसत्वाने विचारले.

"जो कोणी या सरोवरात पाऊल ठेवतो, तो मला वश होऊन जातो." यक्ष म्हणाला.



"प्रत्येक व्यक्ति?" बोधिसत्वाने आश्चर्य करीत विचारले.

"जे देवांचा धर्म ओळखतात ते मला वश होत नाहीत." यक्ष म्हणाला.

"मी देवांचा धर्म काय, हे सांगतो." बोधिसत्व म्हणाला.

"तरमग सांग!" यक्ष म्हणाला.

"स्वाभिमान, परनिंदा करण्यात भय, परहित आणि शांतवृत्ति हा उत्तम पुरुषाचा धर्म होय!" बोधिसत्व म्हणाला.

बोधिसत्वाचे ते उत्तर ऐकून यक्ष खुष झाला. त्याने बोधिसत्वाच्या जेवणाची उत्तम व्यवस्था केली आणि त्याचा यथोचित सत्कार करून म्हणाला–"मी आपल्या या

उत्तराने संतुष्ट झालो आहे. मी आपल्या दोघां भावांपैकी एकाला मुक्त करायला तयार आहे. कोणाला मुक्त करू ?"

"माझा सर्वात धाकटा भाऊ सूर्यकुमार याला मुक्त कर." बोधिसत्व म्हणाला.

"काय हो तुम्हांला देवांचा धर्म फक्त बौधिकदृष्टया माहित आहे. प्रत्यक्षात तसे दिसत नाही." यक्षाने संशय करीत विचारले.

"ते कसे काय ?" बोधिसत्वाने विचारले.

"तुम्ही आपल्या पाठच्या भावाला सोडून धाकटया भावाला मुक्त करायला सांगता आहां. पाठच्याला पहिल्याने नको का मुक्त करायला ?" यक्षाने विचारले.

"यक्षा, मी देवांच्या धर्माचेच पालन करीत आहे. म्हणूनच मी धाकटया भावाला मुक्त करण्यास तुझ्याजवळ विनंती केली. मी आपल्या धाकटया भावासाठीच तर जंगलात आलो. माझ्या सावत्र आईने आपल्या मुलासाठी राज्य मागितले होते व आमच्या हितासाठी आमच्या बाबांनी आम्हांला जंगलात जायला सांगितले. मी [illegible] निघालो होतो. पण तो हट्ट करून आमच्या बरोबर जंगलात आला. अशा भावाला मुक्त केल्याशिवाय मी घरी परत जाऊ म्हणतोस? आणि घरी जाऊन त्याला कोणी पक्ष्याने खाऊन टाकले, असे सांगू का ?"

"शाबास! तुम्हांला देवांचा धर्म बौद्धिक दृष्टया माहीत आहेच, त्याचबरोबर त्या धर्माचे पालन कसे करावयाचे हे देखील माहीत आहे." असे सांगून यक्षाने सूर्यकुमार व चंद्रकुमार दोघांना आणून बोधिसत्वां-समोर हजर केले.

त्यानंतर काही दिवसांनी वृद्ध महाराज मरण पावल्याचे बोधिसत्वाला कळले. म्हणून आपल्या दोघां धाकटया भावांना घेऊन बोधिसत्व राजधानीला परतला. स्वतःचा राज्याभिषेक करून घेऊन चंद्र-कुमाराला युवराजपद दिले आणि सूर्य-कुमाराला सेनापति नेमले आणि न्यायधर्माने राज्य करू लागला.





# शिलारथ

[ ९ ]

[खड्गवर्माच्या गैरहजेरीत भैरवांनी जीवदत्त व पाटलाच्या मुलीला अटक केली. खड्गवर्माने ते पाहिले आणि भैरवांचा पाठलाग करीत सर्व निघाले. गणलिंगेश्वर जीवदत्तचा वध करण्यास पुढे सरकला, ठीक त्याच वेळी खड्गवर्माच्या सूचनेवरून गावातल्या तरुणाने आपले अस्वल गणलिंगेश्वरावर सोडले. पुढे–]

अस्वलाचे गुरगुरणे ऐकून सर्व भैरव घाबरून गेले आणि जवळच्या टेकडीवर पळून जाऊ लागले. अस्वल त्यांचा पाठलाग करीत होते, हे त्यांनी पाहिले. गणलिंगेश्वर ते पाहून घाबरला आणि ओरडून आपल्या अनुयायांना म्हणाला–"पाहतां काय? त्या अस्वलाला भाल्याने ठार करा. मी इकडे तोपर्यंत याच्या काळजाच्या रक्ताने भूमि-पूजन करतो."

गणलिंगेश्वराच्या तोंडातून ते वाक्य जेमतेमच बाहेर पडले असेल, खड्गवर्माचा बाण ऐन वेळी त्याच्या मनगटाला लागला आणि गणलिंगेश्वर 'मेलो' असे एकदांच ओरडला आणि त्याच्या हातातली तलवार जमिनीवर पडली. ती संधी योग्य समजून खड्गवर्मा व गावकरी टेकडीच्या पाठीमागून पुढे आले. "दगा! लबाडी, लुच्चेगिरी! देवकार्यात विघ्न घालणाऱ्या या नास्तिकांची






डोकीं उडवा आणि भाल्यांच्या टोंकाला खोंचून मिरवा!" गणलिंगेश्वराने आपल्या शिष्यांना आज्ञा केली.

"हे सर्व पळून जाण्याच्या प्रयत्नात आपला जीव वांचविण्याऐवजी स्वतःच धोक्यात उडी टाकीत आहेत. या सर्वांना चारी बाजूंनी वेढा घालून अडवा आणि पकडा." असे गावकऱ्यांना सांगून खड्गवर्मा जीवदत्त होता त्या बाजूला धावला.

गणलिंगेश्वराने आपल्या शिष्यांना गावकऱ्यांवर हल्ला करायला आज्ञा केली खरी, पण तो स्वतः डोंगरावरून पळत खाली उतरू लागला. त्याचे शिष्य त्याच्या पाठोपाठ पळाले. त्यांच्यापैकी एकाला अस्वलाने

[illegible]

...मोठमोठ्याने ओरडत होता– "वाचवा, वांचवा!" आणि दुसऱ्या क्षणाला अस्वल आणि तो तोल जाऊन डोंगराच्या उतरणीवर सरकत खाली जाऊ लागले.

जीवदत्त व पाटलाची मुलगी दोघे हे सर्व दृश्य आश्चर्यचकित होऊन पहात होते. ही सर्व घटना घडायला बहापाच मिनिटे सुद्धां लागली नाहीत. खड्गवर्माने चटदिशी जीवदत्तला सोडविले आणि म्हणाला– "आपले नशीब बलवत्तर म्हणून आम्ही वेळेवर येऊन पोचलो. नाहीतर तो दुष्ट आपली कटचार तुझ्या काळजात घालून तुला ठार करणार होता."

"खड्गवर्मा! तू कोठून तरी ऐन वेळी येऊन आमचे रक्षण करशील असे मात्र मला राहून राहून वाटत होते आणि अगदी तसेच झाले बघ! ते दुष्ट भवानीला धरून तर नेत नाहीत ना? पहिल्याने त्या बिचारीला वांचव! पळ!" जीवदत्त म्हणाला.

"मुली भवानी! अग, थांब! तू तिकडे जाऊ नकोस! त्या दुष्टांच्या समाचारास आम्ही येतो आहो." पाटील ओरडून मुलीला सांगत होता.

सर्वांनी डोंगराच्या पायथ्याकडे पाहिले. भवानी डोंगराच्या उतरणीवर उभी राहून



[illegible]

ढकलून सोडीत होती. ते खाली पळत जात होते आणि डोंगराच्या पायथ्या जवळच्या जंगलांत पळून जाण्याच्या प्रयत्नात होते. अस्वल त्या एकाच तरुणाला धरून ओरबाडीत होते.

"तो भैरव माझ्या अस्वलाला ठार करणार वाटते?" असे म्हणत त्या अस्वलाचा मालक तो तरुण डोंगराच्या उतरणीवरून आपल्या अस्वलाला वांचविण्यासाठी धांवला. त्याच्या पाठोपाठ काही गांवकरी तरुण मंडळीपण धांवली. इतर काही गावकरी भैरवांना पकडता आले तर पहावे, या प्रयत्नात धावत होते. खड्गवर्माने त्या सर्वांना थांबायला सांगितले व पाटलाला म्हणाला–"भैरवांची ती टोळी सहजासहजी आपल्या हातात येईल से वाटत नाही. ते पळून गेले. जाऊं द्या त्यांना. पण पुन्हां त्यांना तुमच्या गावाच्या आसपास पाऊल टाकण्याचे धाडस होणार नाही याची काळजी बाळगा. ते पुन्हां येण्याचा प्रयत्न करतील."

भवानी आपल्या बापाजवळ जाऊन उभी राहली आणि म्हणाली–"त्या दुष्टांपैकी एक देखील सापडला नाही. कमीत कमी एक जरी हाती लागला असता तर त्याला गावातल्या पिंपळाला टांगून फांशी दिली असती."

"त्यांना त्यांच्या पापाची फळे चाखावी लागतील. त्यांचा उपाय मी करतो. तू





वांचलीस याहून जास्त मला काय पाहिजे?" पाटील म्हणाला.

कुळकर्णी जीवदत्त व खड्गवर्मा या दोघांकडे पहात म्हणाला—"तुम्ही दोघे शूर आहात यात मुळीच शंका नाही. तुमच्या शौर्यसाहसाची गोष्ट महाराजांना कळवून त्यांच्याकडून तुमचा उचित सत्कार करविला पाहिजे! आम्ही तुमचा पराक्रम प्रत्यक्ष पाहिला आहे. चला आमच्या बरोबर!"

"तुमच्या या कृपेबद्दल आम्ही तुमचे आभारी आहो. परंतु आम्हांला आपल्या कामावर पुढे गेलेच पाहिजे. आम्हांला कोणत्याहि वस्तूची गरज नाही." जीवदत्त म्हणाला.

एवढे उपकार करून तुम्ही असेच जाणार म्हणता? आम्ही नाही ते ऐकणार! माझ्या रक्षणासाठी तुम्ही दोघांनी आपला जीव धोक्यात घातलात. त्याबद्दल मी कोणत्या शब्दांनी तुमचे आभार मानू?" भवानी म्हणाली.

"काही दिवसांनंतर आम्हांला पद्मपूरच्या महाराजांच्या दर्शनास जावयाचेंच आहे. तेव्हां तुमच्या गावी येऊन तुम्हां सर्वांना भेटू!" जीवदत्त म्हणाला.

भवानी पुढे काही बोलणार इतक्यात अस्वलाचा मालक तो तरुण युवक म्हणाला—"माझ्या अस्वलाने एका भैरव तरुणाला ठार केले."

सर्वांनी चकित होऊन त्याच्याकडे पाहिले. त्याच्या समोर अस्वल चालत येत होते. तो तरुण मेलेल्या भैरव तरुणाचा पाय धरून त्याला फरपटत ओढीत आणीत होता. "त्याचे प्रेत तसेच सोड तिकडे. इकडे कशाला आणतो आहेस?" खड्गवर्मा म्हणाला.

कुळकर्णी स्मित करून खड्गवर्मा व जीवदत्त दोघांकडे पहात म्हणाला—"हा तरुण मुलगा आमच्या पाटील साहेबांचा भाचा आहे. पुढल्या वर्षीच, काय पाटील, भवानी अक्काचं.........म्हणजे तो सु योग

असल्यास नवल काय?"

"अस्सं! म्हणून होय?" असे म्हणत जीवदत्तने स्मित करून एकदा भवानीकडे पाहिले आणि पुढे म्हणाला—"भवानी! आम्ही दोघे बहुतेक तुझ्या विवाह प्रसंगी किंवा त्याच्या आधीच तुमच्या गावी येऊ. तू अस्वलांसारख्या भैरवांना पळो की सळो केलेस आणि तुझ्या भावी पतीने एका अस्वलालाच पाळून ठेवले आहे."

ते ऐकून भवानी थोडी लाजली आणि आपल्या वडिलां शेजारी जाऊन उभी राहली. इतक्यात तो तरुण आपल्या अस्वलाला घेऊन टेकडीच्या टोकाला येऊन पोचला. त्याला पाहून पाटील रागाचा आव आणून म्हणाला—"त्या भैरवाला तू जिवंत धरून आणले असतेस तर आम्हांला जास्त आनंद झाला असता. हे प्रेत कशाला घेऊन आला आहेस रे?" नंतर त्याने त्या प्रेताला लाथ मारली. ते प्रेत खाली सरकत जाऊ लागले.

जीवदत्त पाटलाला म्हणाला—"आतां आम्हांला निरोप द्या. तुम्ही आपल्या गावी जा. वाटेत ते भैरव अचानक तुमच्यावर हल्ला करतील, सावध रहा!"

गावकऱ्यांनी खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना नमस्कार केला. भवानीने पुढे



येऊन दोघांना वांकून नमस्कार केला. जीवदत्तने तिला आशीर्वाद दिला आणि दोघे दुसऱ्याच एका वाटेने निघाले.

दोघे शंभरच पावले चालून गेले असतील, तेवढ्यात कुळकर्णी धावत आला व विचारू लागला—"अहो, क्षमा करा, मी विचारायचे विसरलो, तुमच्या पैकी वीरभद्र कोण व रामभद्र कोण?"

त्या प्रश्नाचे उत्तर देण्याचा विचार खड्गवर्माच्या मनात आला. त्याच्या तोंडावर राग झळकत होता. म्हणून जीवदत्त मध्येच म्हणाला—"कुळकर्णीअप्पा! विसरा त्या रामभद्राला आणि वीरभद्राला! महेंद्र-नगरच्या राजाच्या मुलाच्या व त्याच्या



मित्रांच्या भानगडीत तुम्ही मुळीच पडू नका. ते तुमच्या हिताचे नाही. आमच्या पैकी कोणी रामभद्र नाही की वीरभद्रपण नाही."

कुळकर्ण्याने पुन्हां लवून दोघांना नमस्कार केला आणि मान खाली करून लाजल्या सारखा परत गेला व जीवदत्त आणि खड्‌गवर्मा मोठ्या कष्टाने तो डोंगर उतरून गेले. एक दोन तास चालत राहल्यावर ते डोंगरालगतच्या जंगलात येऊन पोचले. ते जंगल दोन डोंगराच्या मध्यभागी होते. तेथे मनुष्य वस्ती किंवा मनुष्यांची 'ये जा' असल्याची चिन्हे सुद्धां दिसत नव्हती. क्रूर रानटी जनावरांच्या पावलांची चिन्हे मात्र स्पष्ट दिसत होती.

दिसते आहे. तो समोरचा डोंगर सूर्यास्तापूर्वी पार करून आपल्याला पलीकडे जाता येईल का?" जीवदत्तने विचारले.

"तो डोंगर पार करण्याऐवजी पलीकडे जायला एकादी चोरवाट आहे का आपण पाहू या." खड्‌गवर्मा म्हणाला.

त्यानंतर दोघे उंचउंच झाडांखालून त्या डोंगराच्या दिशेने चालू लागले. दहा पंधराच मिनिटे चालत राहल्यावर त्यांना शंभर पावलांवर कोणीतरी चालत असल्याचा भास झाला.

जीवदत्त एकदम जागच्या जागी थांबला आणि खड्‌गवर्माला म्हणाला—"तो चालण्याचा आवाज माणसाचा आहे की जनावराचा?"

खड्‌गवर्मा मौनपणे झाडांच्या आडून आपली चाहूल दिल्या शिवाय थोडा पुढे गेला. त्याला एक उंच तरुण मनुष्य हातात परशु घेऊन दहाबारा फूट रुंदीच्या एका झाडाच्या बुंधाभोवती फिरत पाहरा देत असलेला दिसला.

ते दृश्य पाहून खड्‌गवर्माला आश्चर्य वाटले. इतकी झाडे येथे आहेत, पण त्याच झाडाच्या चारी बाजूला तो पाहारा कां बरे देत असावा. त्याने जीवदत्तला चटकन जवळ येऊन पाहण्यास खूण केली. त्याने

पाहरेकऱ्याला पाहिले.

"राजाच्या खजिन्याला पाहरा देतात तसा हा या झाडाच्या चारी बाजूला पाहारा देत आहे. सोड त्याचे नशीब त्याच्याबरोबर, आपण आपल्या वाटेने पुढे जाऊ." जीवदत्त म्हणाला.

"नाही बुवा! याच्या बुडाशी काहीतरी गुपित आहे व ते कळल्याशिवाय पुढे नाही जायचे! कारण पुढे आयुष्यभर आपण हे काय गुपित आहे हे पाहिले नाही, या गोष्टीची हुरहुर मनात राहून जाईल." खड्‌गवर्मा म्हणाला.

"ठीक! तरमग तू त्या पाहरेकऱ्याच्या पाठीमागच्या बाजूला झाडाआड लपून उभा रहा. मी सरळ समोर जाऊन त्याला भेटतो." जीवदत्त म्हणाला.

खड्‌गवर्मा एक दोन मिनिटात त्या पाहरेकऱ्याच्या मागच्या बाजूच्या झाडाआड जाऊन व तलवार उपसून वेळ प्रसंग पाहून जीवदत्तच्या मदतीला धावण्यासाठी तयार होऊन उभा राहला. जीवदत्त निर्भीकपणे सरळ तो मनुष्य होता त्या दिशेला जाऊ लागला. त्याच्या पावलांचा आवाज ऐकून तो तरुण पाहरेकरी दचकून जीवदत्ताकडे पाहून म्हणाला—"कोण तू? जागच्या जागी उभा रहा! इकडे कशासाठी आला आहेस?"

"मी आपली ओळख दिली तरी तू मला ओळखू शकणार नाहीस! पण, तू या झाडाच्या चारी बाजूला पाहरा का देतो



आहेस, हे तर सांगशील! मग मी कोण हे सांगेन तुला!" जीवदत्त म्हणाला.

"हे झाड वाटले होय तुला? बहनोईच्या किल्लयाचा बुरूज आहे हा. येथून कोणी अनोळखी मनुष्याला आत जाता येऊ नये यासाठी मी पाहारा देत आहे." तो तरुण पाहारेदार म्हणाला. बोलताना तो आपल्या परशूची धार चांगली आहे की नाही हे पहात होता.

"क्षमा कर, पण तू हे सर्व जे म्हणालास ते सर्व आम्हांला वेडयाच्या बरळण्यासारखे वाटते आहे. तू येथे पाहारा देत उभा राहला नाहीस तर येथे एखाद्या किल्लयाचा बुरूज आहे हे कोणाला कळणार सुद्धा नाही. या जंगलात अनेक झाडे आहेत, त्यातलेच हे एक झाड आहे. पण तू या झाडाच्या चारी बाजूला प्रदक्षिणा देत पाहरा देतो आहेस यामुळे साहजिकच, येथे काही तरी विशेष असल्याचा संशय पाहणाराला येईल. म्हणजे तू जी गोष्ट म्हणतो आहेस तीच प्रगट होते आहे." जीवदत्त म्हणाला.

आणि मुकाट्याने येथून चालता हो!" असे म्हणत त्याने आपला परशु उचलला. तो जीवदत्तवर उगारून पुढे जाऊ लागला.

जीवदत्त ते पाहून हंसला व म्हणाला–"मी जाईन रे, पण तुझ्या पाठीमागे तलवारीने तुझे डोके उडवायला तो उभा आहे त्याचे काय?"

त्याने चटदिशी एकदां मागे वळून पाहिले. खड्गवर्मा फक्त चार पांच पावलावरच तलवार घेऊन पुढे येत असलेला दिसला. तो स्मित करून म्हणाला–"परशु हातात धरलास म्हणजे परशुराम झालास होय रे? आपला परशु खाली कर आणि झाडाचा बुंध किल्लयाचा बुरूज कसा काय झाला, हे मुकाट्याने सांग! ते गुपित आम्हांला देखील सांगितले पाहिजे!"

त्या तरुणाने पुन्हा समोर वळून पाहिले. जीवदत्त आपली कुबडी उगारून दोन पावलांवर उभा होता. (क्रमश:)





# आत्मविश्वास

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला– "राजा! भविष्य काळात आपल्याला यशप्राप्ती निश्चित आहे अशी खात्री माणसाला वाटली आणि त्याने प्रयत्न केला तर त्याला खरोखरच यश मिळते. याचे उदाहरण म्हणून मी तुला केदारची गोष्ट सांगणार आहे. ती लक्ष देऊन नीट ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

एका लहानशा राज्यात एका सामान्य मध्यवर्ती कुटुंबात केदार नावाचा एक तरुण मुलगा होता. तो रुपाने सुंदर आणि बुद्धीने हुशार होता. पण त्याला कोणत्याहि कामात उत्साह म्हणून वाटत नसे. तरी तो मनातले मांडे मात्र खात असे. केदारला रिकाम-

**वेताळाच्या गोष्टी**

      




टेकडा बसून राहलेला पाहून बापाला काळजी वाटू लागली. त्या विषयी तो आपल्या एका मित्राजवळ बोलला. तो मित्र एक विद्वान पंडित होता. तो केदारच्या घरी दुसऱ्या दिवशी आला आणि केदारला बोलावून विचारू लागला–"काय रे, तुला पुढे काय व्हावेसे वाटते? एखादा शूर योद्धा, विद्वान पंडित, चित्रकार की शिल्पकार?"

केदार म्हणाला–"काका, मला ते सर्व काही नको. एकच इच्छा माझ्या मनात आहे, राजा व्हावे. आपल्या राजाची मुलगी सुंदर व रूपवती आहे. तिला भाऊ बहीण दुसरे कोणी नाही. तिच्याशी लग्न झाले की मी राजा होईन की नाही? पण...! माझ्या- ... राजकुमारीचे लग्न कसे काय होणार? तोच विचार माझ्या मनात सारखा घोळत आहे." असे म्हणत त्याने एक लांब सुस्कारा सोडला.

त्याच्या बापाच्या मित्राने त्याचे सांत्वन करीत त्याला जवळ बोलाविले व हात दाखवायला सांगितले आणि हात पाहून व आश्चर्यचकित मुद्रेने म्हणाला–"अरे मुला! तुला राजयोग आहे! तुझा विवाह राज-कन्येशी झाला तर खात्रीने तूच राजा होशील यात शंका नाही."

त्याच्या बापाच्या पंडित मित्राने हात पाहून जे भविष्य वर्तवले त्यामुळे केदारचा उत्साह वाढला. तो म्हणाला–"मी राज-कन्येला जाऊन विचारू का?"

तो मनुष्य म्हणाला–"वेड्या! राज-कन्येशी विवाह असा सहजासहजी होतो का? तिचे तोंड पाहणे सुद्धा अशक्य आहे तुला? पण त्यासाठी प्रयत्न केल्यास सर्व शक्य होईल. प्रयत्नांती परमेश्वर मिळतो. पहिल्याने तू राजाच्या दरबारी प्रवेश मिळव. नंतर हळूहळू राजाचा विश्वास संपादन केल्यावर तुला खूप मेहनत करून राजघराण्यातल्या लोकांचा विश्वास पण संपादन करावा लागेल. अशा तऱ्हेने राजवाड्यात प्रवेश मिळाला की तुझे काम फत्ते! चिकाटीने प्रयत्न करीत रहा.



मनावर अनुकूल तोच परिणाम झाला. तो स्वभावाने आळशी होता. पण त्याला आता सर्व कामात उत्साह वाटू लागला. तो दर्शनास गेला व राजाच्या पदरी नोकरी देण्यास विनंती केली. त्याचा नम्रपणा पाहून राजाने त्याला नोकरी दिली.

केदार आपले काम मन लावून करू लागला. काही दिवसांनी राजाच्या मनात त्याच्या कार्यपटुत्वाबद्दल विश्वास वाढू लागला. नोकरीखातर काम करणाऱ्यात आणि स्वतःचे काम समजून काम करणाऱ्यात जो फरक दिसतो तो त्याच्या व्यवहारात पाहून राजाने हळूहळू केदारला राज-वाड्यातली कामे सांगायला सुरवात केली. राजवाड्यातल्या कामात कोणी कुचराई केलेली त्याला खपत नसे. मोठमोठ्या अधिकाऱ्यांच्या चुका दाखविण्यात ही तो मागेपुढे पहात नसे. त्यामुळे अधिकारी रागावले तरी राणी व राजघराण्यातली मंडळी त्याच्यावर खूष होती.

लवकरच केदार राजा व राणीचा एक विश्वासपात्र सल्लागार झाला. राजकन्येच्या सर्व गरजा भागविण्याकडे तो लक्ष पुरवी. तो हुशार व रूपवान पण होताच. म्हणून हळूहळू राजकन्येचे मन त्याच्याकडे ओढ घेऊ लागले. तिला कोणत्याही गोष्टीबद्दल



शंका वाटली की ती केदारला बोलावून त्याचा सल्ला घेई.

राजकन्या वयात आल्यावर राजा व राणीने तिच्या विवाहासाठी चवकशी सुरू केली. कित्येक राजकुमार तिच्याशी विवाह करण्यास तयार झाले. परंतु तिला केदारच सर्वात जास्त योग्य वाटू लागला.

राजाला ती गोष्ट कळली व त्याने देखील केदारशी राजकन्येच्या विवाहास नकार दिला नाही. त्यांचे परस्परांवरचे प्रेम पाहून राजकन्येने योग्य वर निवडला असेच प्रत्येकाला वाटले. कारण सर्व दरबारी केदारची कर्तबगारी स्वतःच्या डोळ्यांनी पहात आले होते.









केदार सासऱ्याच्या मदतीने राजाची सर्व कर्तव्ये शिकू लागला आणि त्याने राज्यकारभाराची सर्व कामे लवकरच शिकून घेतली. हळूहळू राजा केदारचाच सल्ला घेऊन राज्यकारभार पाहू लागला.

पुढे काही दिवसांनी राजाने परलोक गमन केले. केदार गादीवर बसला. अशा तऱ्हेने त्याचे स्वप्न खरे झाले. त्याच्या आनंदाला पारावार नव्हता.

परंतु तो आनंद फार दिवस टिकला नाही. कारण शेजारच्या राजांना केदार सारख्या सामान्य माणसाशी राजकन्येचा विवाह झालेला व राजाचा वारस म्हणून केदार गादीवर बसलेला खपला नाही.

[illegible] केदार घाबरला. शत्रूशी संधी करून घेऊन मोकळे व्हावे असा त्याने विचार केला.

त्याच वेळी केदारला त्याच्या बापाच्या मित्राची आठवण झाली. त्याची भाग्य रेखा ओळखून त्यांनी भविष्य वर्तवले होते. तेव्हां पुढे त्याच्या भाग्यात काय आहे हे त्यांनाच विचारुन घेण्याचे ठरवून त्याने त्या विद्वान पंडिताकडे निरोप पाठविला. तो पंडित आल्यावर केदारने त्यांचा यथोचित सत्कार करून त्यांना विचारले–"काका! तुम्ही वर्तवलेले भविष्य आजपर्यंत खरे निघाले. आता आमच्या राज्यावर शत्रू चालून आला आहे व मला युद्ध करावे लागणार आहे. म्हणून माझा हात पाहून माझ्या नशिबात काय आहे, सांगता का?"

तो पंडित स्मित करून म्हणाला–"अरे वेड्या! मला हस्तमुद्रिकेचे थोडेदेखील ज्ञान नाही. मी त्या दिवशी तुझा हात पाहून जे भविष्य सांगितले ते तुझी हस्तरेखा पाहून सांगितले नव्हते. सर्व ज्योतिष्याचे सोंग केले होते."

ते ऐकून केदार रागावला नाही तर त्याने त्या पंडिताला मोठे बक्षिस दिले आणि युद्धाची तयारी केली. त्या युद्धात त्याला जय मिळाला एवढेच नव्हे तर त्याने शत्रूचा पूर्णनाश केला.

[illegible] "मला एका गोष्टीबद्दल शंका वाटते. त्या पंडिताने हस्तमुद्रिक चांगले माहीत असल्याचे नाटक कां केले? केदारने त्या पंडिताच्या सांगण्याप्रमाणे राजा झाल्यावर त्याचा सत्कार कां केला नाही आणि युद्धापूर्वी बोलावून त्याने हस्तमुद्रिकशास्त्राची मुळीच माहिती नसल्याचे व ते सर्व नाटक होते असे सांगितले तरी केदारने त्या पंडिताला बक्षिस देऊन त्याचा सत्कार कसा काय केला? ज्या केदारला युद्धशास्त्राची थोडी देखील कल्पना नव्हती तो युद्धात जय मिळवून कसा काय आला? या प्रश्नांचे उत्तर माहीत असून तु दिले नाहीस तर त्याचा परिणाम तुला माहीत आहेच; तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायाव लोळू लागतील."

ते ऐकून विक्रमादित्त म्हणाला–"केदार मनातले मांडे खात बसण्यापेक्षा काही तरी कामाला लागावा म्हणून त्या पंडिताने त्याचा हात पाहून त्याला ज्योतिष शास्त्राचे उत्तम ज्ञान असल्याचे नाटक रचले होते. केदारच्या मनातली इच्छा पहिल्यानेच विचारुन घेऊन त्याने त्याची लक्षणे हातावर असल्याचे सांगितले. परंतु केदारला प्रेरणा मिळाली व तो प्रयत्न करू लागला. त्याला त्याच्या प्रयत्नात यशपण मिळाले. त्या पंडिताने सांगेपर्यंत की त्याने केले ते सर्व नाटक होते, केदारला ते सर्व त्याच्या भाग्य रेखेप्रमाणे घडल्याचे वाटत होते. परंतु त्यानंतर त्याला स्वतःच्या प्रयत्नानेच मनुष्याचे भाग्य बनते हे कळले. परंतु त्या पंडितानेच त्याच्या मनात आत्मविश्वास उत्पन्न करून त्याला कामाला प्रेरणा दिली होती. म्हणून त्याने पंडिताचे ज्योतिषशास्त्र खोटे असल्याचे कळल्यावरही त्याचा सत्कार केला. प्रयत्नांती परमेश्वर ही गोष्ट प्रत्यक्ष त्याने अनुभवली होती. म्हणून युद्धात देखील त्याला यश प्राप्ती झाली."

अशा तऱ्हेने राजाचे मौनभंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)












# ग्रहगति

वज्रगिरी नामक गावी वज्रपाल नावाचा राजा राज्य करीत असे. त्याच्या मनात चक्रवर्ति होण्याची महत्वाकांक्षा होती. अनेक देश व राज्ये जिंकून तो चक्रवर्ति झाला.

परंतु त्याची महत्वाकांक्षा वाढतच गेली. त्याने विचार केला, अजून जिंकण्यालायक अनेक राज्ये आहेत. सर्व जग जिंकून जगज्जेता ही पदवी मिळविली पाहिजे.

वज्रपालाला एक मुलगी होती. तिचे नाव पूर्णरेखा असे होते. ती सुशिक्षित होती तिला वडिलांची ही राज्याकांक्षा आवडली नाही. ती काही तरी उपाय आहे का विचार करू लागली. कारण मर्यादेबाहेर राज्याकांक्षा वाईट असे तिचे मत होते.

एक दिवशी संध्याकाळी राजाने आपल्या मुलीला बोलवून आणायला दासीला पाठविले तेव्हां ती राजोद्यानात असल्याचे राजाला कळले. म्हणून तो स्वत: राज-कन्येला भेटायला उद्यानात गेला आणि तिला तिथे एकटी पाहून त्याने विचारले—"मुली! संध्याकाळच्या वेळी तू अशी एकटी येथे काय करते आहेस?"

"आकाशाकडे पाहाते आहे, बाबा!" मुलगी म्हणाली.

"आकाशात पाहण्यासारखे असे काय आहे?" राजाने विचारले.

"इतके मोठे विस्तीर्ण आकाश आहे, तरी ते ग्रह पहा आपल्या कक्षेबाहेर, राशि-चक्राबाहेर जात नाहीत, आतल्या आत फिरत आहेत, हे पाहून मला आश्चर्य वाटते!" पूर्णरेखा म्हणाली.

ती गोष्ट वज्रपालला कळली. त्याने त्यानंतर युद्ध बंद केले. —नीरजा राय





# अक्षय संपत्ति

फार पूर्वी बगदाद येथे खलीफा हारून उल रशीद राज्य करीत असे. त्याला वाटे की त्याच्या सारखा श्रीमंत व दानशूर या जगात दुसरा कोणी नसेल. तो ती गोष्ट भर दरबारात म्हणून दाखवी, अशी आत्मस्तुती करण्यास त्याला संकोच वाटत नसे.

एकदां खलीफा सर्वांसमक्ष आत्मस्तुती करीत होता. वजिराला ती गोष्ट आवडली नाही. त्याचे नाव जाफर होते. त्याने खलीफांचे डोळे उघडण्याचे ठरविले आणि म्हणाला—"हुजूर! अपराधाची माफी पहिल्यानंच मागत आहे. मनुष्याने अल्लाच्या समोर नम्र रहावे. गर्व कशासाठी करा-वयाचा? त्याचे स्वत:चे असे या जगात काय आहे. त्या जगन्नियंत्याच्या इच्छेविरुद्ध झाडाचे पानदेखील हलणे शक्य नाही. तोच आपल्याला बुद्धी व धन देतो. मग आपण गर्व करणे रास्त होईल का? आपल्या दानशूरत्वाची वाखाणणी इतरांनी केली तर ती शोभेल पण आत्मस्तुती करणे बरोबर नाही. याशिवाय हे धन वैभव अल्लाने आपणांस दिले आहे तसे इतरांना पण दिले आहे. दानधर्म आपल्या हातून होतो तो तोच करवितो. तोच सर्वगोष्टींचा कर्ता करविता आहे.

मी बसरा नगरीत एका श्रीमंत तरुण माणसाला पाहिले आहे. त्याचे नाव अबुल कासिम असे आहे. त्याच्या जवळ जेवढे धन आहे तेवढे जगात मोठमोठ्या बादशहांजवळ देखील असेलकी नाही, शंकाच. दानधर्मात त्याची बरोबरी करु शकेल असा एकही मनुष्य मी तरी पाहिला नाही."

जाफर म्हणाला ते ऐकून मनस्वी खलीफाला राग आला. तो म्हणाला—

अरबस्तानातील एक लोककथा












"जाफर! अशा खोट्या गप्पांना माझ्याकडे फक्त फाशीची शिक्षा आहे, लक्षात ठेव!"

"मी आपली शपथ घेऊन सांगतो, हुजूर! मी जे काही बोललो ते अक्षर अक्षर सत्य आहे. पाहिजे तर आपण कोणालाही पाठवून मी म्हटले ते खरे आहे की खोटे याची शहानिशा करून घ्या. त्यानंतर मला फाशीची शिक्षा देणे आपल्याला बरोबर वाटले तर द्या. मी आनंदाने ती शिक्षा भोगायला तयार आहे."

राग आल्यामुळे खलीफांच्या तोंडून एक शब्ददेखील बाहेर पडला नाही. त्यांनी जाफरला कैद करण्यास हुकूम केला आणि जुबेदा बेगमच्या महालात खलीफा निघून गेला.

खलीफाचा लालबुंद झालेला चेहरा व डोळे पाहूनच बेगम जुबेदाने, दरबारात काही तरी भानगड झाली असावी हे ओळखले. तिने गुलाब पाणी शिंपडून खलीफाला थंडगार पेय प्यायला दिले आणि म्हणाली–"हुजूर, शांत व्हावे!"

"त्या मूर्ख जाफरने आज भरल्या दरबारात माझा अपमान केला. त्या उर्मटपणाने उत्तरे दिली आणि एका त्रयस्थ माणसाची मनसोक्त वाखाणणी केली." असे सांगून खलीफाने दरबारात घडलेली गोष्ट जुबेदा बेगमला सांगितली.

जाफरला या संकटातून वाचविणे आतां कठीण आहे, हे जुबेदाबेगमने ओळखले तरी तिने धीर करून विनंती केली–"हुजूर! जाफर मियां असेच काही तरी कधी कधी बोलतात. पण बसऱ्याला कोणाला तरी पाठवून हुजूरांनी चवकशी करून पहावी. म्हणते! तोंपर्यंत जाफर मियांना तुरुंगात ठेवावे. फाशीची शिक्षा देऊ नये!"

जुबेदा बेगमचे बोलणे खलीफाला पटले, त्यांचे चित्त शांत झाले. म्हणाला–"मी तरी सर्व हकीगत कळल्याशिवाय जाफर-मियाला शिक्षा कशी काय करीन? मी स्वतः अबुल कासिमचे वैभव पाहून यावे म्हणतो. ... मियां कोठे ... आढळून आल्यास मी त्याला फाशीची शिक्षा करीन."

खलीफाने एकट्याने बसरा शहरी जाऊ नये असे जुबेदाने अनेक प्रकारे समजावून पाहिले. पण एका व्यापाऱ्याचा वेष करून खलीफा बसऱ्याला निघाला.

बसरा शहरी खलीफा एका धर्मशाळेत उतरला. पाणी सुद्धा प्याल्याशिवाय त्याने एका चौकीदाराला बोलावून विचारले–"या गावी कोणी अबुल कासिम नावाचा एक मनुष्य राहतो. तो दानधर्म करतो त्याची बरोबरी कोणी बादशाह सुद्धा करणे शक्य नाही, म्हणे, हे खरे आहे का?"

चौकीदार आकाशाकडे पाहून आदर-पूर्वक मान हलवून म्हणाला–"त्या खुदा-वन्द करीमची मेहरबानी आहे त्या तरुण माणसावर. अबुल कासिमने उपकार केला नाही असा या बसरा शहरात कोण आहे?" धर्मशाळेत आणखी काही व्यापारी आले, म्हणून चौकीदाराला जावे लागले.

खलीफा रात्रभर धर्मशाळेत झोपला. पण त्याला झोप आली नाही. उजाडताच बाजारपेठेत गेला. त्याने एका दुकान-दाराला विचारले–"काय हो, अबुल कासिम कोठे राहतात, सांगता का?"




त्या दुकानदाराने खलीफाकडे आश्चर्य-चकित होऊन पाहिले आणि म्हणाला–"तुम्ही कोणी परगावचे दिसता आहां. राजवाड्यात राहणारे लोक सुद्धा एखादवेळ राजाला ओळखत नसतील पण अबुल कासिम यांचे घर माहीत नसणारा, या गावात कोणी असेल असे मला वाटत नाही."

"मी बाहेर गावाहून त्या तरुण श्रीमंत गृहस्थाला भेटायला आलो आहे." खलीफा दुकानदाराला म्हणाला.

दुकानदाराने एका नोकराला अबुल कासिमचे घर दाखवायला पाठविले.

अबुल कासिमचा महाल निरनिराळ्या रंगाच्या संगमरमरी दगडाचा कोरीव चित्र-



कारी करून बांधलेला होता. दारे हस्तिदंतांवर रत्नमाणिक्ये मढवून केलेली होती. महालासमोर पुष्कळ गुलाम होते. खलीफाने एका गुलामाला बोलावून, त्याच्या मालकाला, कोणी परदेशी भेटायला आल्याची वर्दी देण्यासाठी पाठविले.

निरोप कळताच अबुल कासिम स्वतः अतिथि सत्कारासाठी धावत बाहेर आला. त्याने नम्रपणे आपल्या पाहुण्याला आपल्या महालात बोलावून नेले. तो महाल पाहून खलीफाचे डोळेच दिपून गेले. खलीफाला अबुल कासिम ज्या दालनात घेऊन गेला त्या दालनात मऊ गाद्यांवर मखमलीच्या जरीचे काम केलेल्या ऊबदार चादरी होत्या. [illegible] रेशमी किंवा मखमली काम केलेले होते. दोघे एका उंच जागेवर बसले. थोड्या वेळाने दहाबारा गुलाम माणिक पात्रात अंगूरी घेऊन आले आणि स्फटिकाच्या पेल्यात भरून दोघांना ती प्यायला दिली. त्यांच्या पाठोपाठ बारा तरुण दासी चिनी मातीच्या भांड्यात फळफळावळ व फुले आणि सुवर्णपात्रात सरबते घेऊन आल्या. ते सर्व वैभव पाहून खलीफा चकितच झाला.

एका दुसऱ्या दालनात खलीफाला अबुल कासिमने काही वेळाने जेवायला बोलावून नेले. सर्व वस्तू सुवर्णपात्रात वाढण्यात आल्या. प्रत्येक पदार्थ स्वादिष्ट होता.

मेजवानीनंतर संगीताची व्यवस्था करण्यात आली होती. ते संगीत ऐकून खलीफाला वाटले की त्याच्या दरबारातला इशाक गवई मोठा वस्ताद असला तरी अबुल कासिमच्या गायकासमोर फिक्का पडला असता. ते संगीत स्वर्गात देखील कदाचितच ऐकायला मिळेल.

खलीफा संगीत ऐकण्यात मग्न असता अबुल कासिम थोडा वेळ उठून बाहेर गेला. परत आला तेव्हां त्याच्या हातात चंदनाची एक छडी होती आणि दुसऱ्या हातात एक झाड होते. झाडाचा बुंध चांदीचा होता पाने मरकत मण्यांची होती आणि झाडाला [illegible] एक मोर बसलेला होता. तो मोर बनविण्यात कारागिराने मोठे कौशल्य दाखविले होते. अबूल कासिमने ते झाड खलीफासमोर ठेवले आणि छडीने त्या झाडाला एकदाच मारले. त्या बरोबर मोर आपला पिसारा पसरून नाचू लागला. तो नाचत असतां त्याच्या पिसाच्या डोळ्यातून अत्तराचा सुवास बाहेर येत होता आणि दालनभर दरवळत होता.

खलीफा ते विचित्र दृश्य पाहण्यात तन्मय झाला असता एका एकी अबुल हसन ते झाड व मोर उचलून घेऊन गेला.

"काय पण विक्षिप्त माणूस आहे. चित्र पाहून त्याचे कौतुक करण्याच्या वेळीच तो ते उचलून घेऊन गेला. जाफर म्हणाला ते किती खरे असले तरी हा विक्षिप्तपणा आपल्याला नाही आवडला. मी त्या मोराचे पीस काढून घेईन असे वाटले की काय याला? बरे झाले की मी स्वतः डोळ्यांनी या माणसाचा विक्षिप्तपणा पाहतो आहे." खलीफा मनातल्या मनात खूप रागावला होता.

इतक्यात अबुल कासिम एका सुंदर गुलाम तरुणाला घेऊन आला. तो मोती मढवलेला पोशाख घालून आला होता. त्याच्या हातात एक भांडे होते. ते एक माणिक पात्र होते. त्यात दारू भरलेली होती. गुलामाने नमस्कार करून ते पात्र खलीफाच्या हातात दिले. खलीफाने त्या





पात्रातली सर्व दारू पिऊन टाकली आणि आश्चर्य म्हणजे ते पात्र पुन्हा भरले. ते दारूचे अक्षय पात्र पाहून खलीफाने अबुल कासिमला त्याचे गुपित विचारले.

"गुपित काही नाही. एका जुन्या काळातल्या वैज्ञानिकाने ते तयार करून दिले आहे." अबुल कासिम म्हणाला आणि त्या गुलामाला त्या पात्रासह ओढून घेऊन आतल्या दालनात गेला.

खलीफाला त्याची ती वागणूक मुळीच आवडली नाही. सामान्य शिष्टाचार देखील या माणसात नाही! मी विचारल्याशिवाय एकेक अद्‌भुत वस्तू आणून दाखवितो आणि मी ते पाहून कौतुक करू

करतो. जाफरला याच्या वागणुकीतला हा विक्षिप्तपणा सांगून उगाच कोणाची इतकी स्तुती करू नये असे बजावून सांगतो.

इतक्यात अबुल कासिम पुन्हा परत आला. या खेपेस त्याच्या बरोबर एक अप्रतिम सुंदर तरुण स्त्री होती. तसे सौंदर्य त्या पूर्वी इतरत्र कोठे खलीफांनी पाहिले नव्हते. तिच्या सर्वांगावर निरनिराळी आभूषणे होती. परंतु तिच्या अवयवांच्या रेखीवपणासमोर ती आभूषणे पण फिक्की वाटत होती. ती समोर येऊन बसली आणि वीणा वाजवू लागली. तिच्या वीणा वादनात खलीफा ते मोराचे चित्र आणि ते दारूचे अक्षयपात्र पार विसरून गेला. अबुल हसनला म्हणाला—"तुझ्याजवळच्या या एकाहून एक अद्‌भुत वस्तू पाहून तुझा हेवा वाटू लागला आहे मला." असे म्हणत खलीफा उठून उभा राहिला.

अतिथीच्या इच्छेविरुद्ध काही बोलणे शिष्टाचाराला धरून नसल्यामुळे अबुल कासिमने खाली वांकून सलाम केला आणि फाटकापर्यंत खलीफाला पोंचवायला गेला. खलीफाला निरोप देतांना म्हणाला—"अतिथि सत्कारात काही उणीव राहिली असल्यास माफी करावी."



मनातल्या मनात अबुल कासिमच्या गर्विष्ठपणाची निंदा करीत होता. तो आपल्या वैभवाचे प्रदर्शन करून पाहुण्याचा तिरस्कार करतो. त्यातच त्याला आनंद वाटतो. हा काय दानशूरपणा झाला? हा नुसता लोभीच नव्हे तर महालोभी दिसतो आहे. जाफर म्हणाला ते सर्व खोटे. त्याला परत गेल्यावर फाशीची शिक्षा झालीच पाहिजे.

त्याच रागात खलीफा धर्मशाळेत परत आला. तेव्हां धर्मशाळेच्या आवारात सुंदर सुंदर गुलाम तरुणी अर्ध वृत्ताकार उभ्या होत्या. त्यातल्या अर्ध्या गोऱ्या पान होत्या व अर्ध्या काळ्या हबशी जातीच्या होत्या. त्यांच्या मधोमध वीणा वाजवणारी ती तरुण स्त्री होती. तिच्या उजव्या बाजूला ते दारूचे अक्षयपात्र घेऊन तो गुलाम उभा होता आणि त्याच्या उजव्या बाजूला ते झाड व मोराचे चित्र घेऊन आणली एक गुलाम उभा होता.

खलीफाने धर्मशाळेत पाऊल टाकल्याबरोबर एका गुलामाने पुढे येऊन सलाम केला व खलीफाच्या हातात एक पत्र दिले. खलीफांनी लखोटा उघडून पत्र वाचले. त्यातला मजकूर पुढील प्रमाणे होता.

"आपण माझ्या घरी येऊन मला फार उपकृत केलेत. एक तुच्छ विनंती या पत्राद्वारे



करीत आहे. हे सर्व गुलाम, झाड, मोर, अक्षय पात्र आपणांस प्रेमाची भेट म्हणून पाठविली आहेत. प्रत्येक वस्तु अल्लाने दिली आहे आणि ती अल्लाकडेच परत जाते."

ते पत्र वाचून खलीफाला पश्चात्ताप वाटला. त्या थोर माणसाला ओळखण्यात आपण केवढी मोठी चूक केली. जाफर म्हणाला ते खरे निघाले. जाफर! अल्लाची तुझ्यावर नेहमी अशीच मेहेरबानी राहो! तू माझा गर्व व अहंकार दाखवून माझे डोळे उघडलेस. मोठमोठ्या राजे रजवाड्यांना देण्यालायक उपहार याने माझ्या सारख्या सामान्य पाहुण्याला सहजासहजी देऊन टाकल्या. तरमग हा सामान्य

नागरिक आहे का? त्याचे गुपित विचारणे गैर असले तरी विचारून घेतलेच पाहिजे.

असा विचार करून खलीफाने सर्व वस्तू धर्मशाळेत सुरक्षित नेऊन ठेवल्या आणि अबुल कासिमच्या घरी जाऊन त्याला विचारले–"अबुल कासिम! अल्लाची मेहरबानी नेहमी तुझ्यावर राहो! तू ज्या वस्तू भेट म्हणून माझ्याकडे पाठविल्यास त्या स्वीकारण्यास मला संकोच होत आहे. या सर्व वस्तू परत करण्याची परवानगी दे आणि मी बगदादला परत गेल्यावर तुझ्या अतिथिसत्काराचे व दानशूरत्वाचे वर्णन आपल्या मित्रमंडळीत करीन."

ते ऐकून अबुल कासिम नम्रपणे म्हणाला–"मी केलेला अतिथि सत्कार व मी दिलेली भेट त्यात काहीतरी चूक किंवा उणीव राहून गेली आहे. नाहीतर आपण धर्मशाळेतून परत येऊन माझ्या हृदयाला दुखविणारे हे शब्द नक्कीच बोलला नसता."

खलीफा मध्ये त्याला अडवून म्हणाला–"असा गैरसमज करून घेऊ नकोस थोर

अपमान केलेला नाही. माझ्या सारख्या अनोळखी माणसाला तू अशा मोठमोठ्या भेटी दिल्यास तर त्यात तुझा थोरपणा दिसला तरी तुझा खजिना अशातऱ्हेने रिकामा करणे मला रास्त नाही. तुझ्याजवळ किती संपत्ति असली तरी त्याला सीमा आहेच की नाही?"

"धर्मशाळेतून परत येण्याचे हेच कारण असेल तर आपण मुळीच काळजी करू नये. कारण माझ्या घरी नित्य होणाऱ्या या गोष्टी आहेत. मी अतिथि सत्कार अशाच तऱ्हेने करून त्या अल्लाच्या उपकाराची फेड अल्प का होईना, करीत आहे. अल्लाने मला एवढे मोठे वैभव दिले आहे की ते कधी कमी होतच नाही. माझ्या बोलण्यावर आपला विश्वास बसायला आपण माझे आत्मचरित्र थोडे ऐकले पाहिजे. ती एक विचित्र गोष्ट आहे!" अबुल कासिम म्हणाला. (पुढील अंकात संपूर्ण)





# विचित्र युवक

एका गावी गोपाळ नावाचा एक श्रीमंत मनुष्य रहात असे. त्याला पुष्कळ मुले झाली, पण एक दोन महिन्याची असतानाच देवा घरी निघून गेली. म्हणून तो व त्याची बायको फार दुःखी होते. त्याने मूल व्हावे म्हणून, अनेक व्रते आणि शेवटी काशीयात्रा करण्याचे ठरविले.

वाटेत एका गावी त्याचा गोविंद नावाचा मित्र रहात असे. त्याला भेटायला तो गेला. गोविंदलापण मूलबाळ नव्हते. त्याला सुद्धा काशीयात्रेला जायचे होते. परंतु आपल्या मित्राबरोबर निघणे त्याला शक्य नव्हते. म्हणून त्याने काटकसर करून जमविलेले शंभर रुपये आपल्या मित्राला दिले व म्हणाला–"गोपाळ! तू काशीला जातो आहेसच. माझ्या वतीने पण काशी विश्वनाथावर अभिषेक करून मला एक मुलगा व्हावा असे मागणे माग. माझ्या नशिबात असेल तर देवाची कृपा माझ्यावर होईल."

गोपाळने गोविंदच्या इच्छेप्रमाणे देवाजवळ त्यालापण मुलगा व्हावा असे मागणे मागितले. गोविंदने दिलेले पैसे खर्चून त्याने देवाचा अभिषेक वगैरे करविला. गोपाळला लोकांकडून कळले की काशीत कोणी योगी आहे त्याच्या कृपेने संतानप्राप्ती होते. म्हणून गोपाळ त्या योग्याच्या दर्शनाला गेला आणि त्याची पादपूजा करून स्वतःला व आपल्या मित्राला मुलगा होईल असा आशीर्वाद मागितला. त्या योग्याने गोपाळला एक भस्म दिले आणि म्हणाला–"यातले अर्धे भस्म तू आपल्या बायकोला व अर्धे आपल्या मित्राच्या बायकोला देऊन सेवन करायला सांग. दोघींना मुले होतील." गोपाळच्या बायकोने तेथेच अर्धे भस्म सेवन केले आणि पुढे दोन महिन्यांनी त्याच्या मित्राच्या बायकोने अर्धे भस्म सेवन केले.



गोपाळच्या बायकोला यथा समयी एक मुलगा झाला आणि ठीक दोन महिन्यांनी गोविंदच्या बायकोला पण मुलगा झाला. गोपाळने आपल्या मुलाचे नाव विश्वनाथ ठेवले व गोविंदने आपल्या मुलाचे नाव काशीनाथ ठेवले.

गोविंदचा मुलगा विचित्रपणे वागू लागला. त्याला इतरांसारखे कपडे आवडत नसत. तो स्वतः सांगे ते आईने करून वाढले तरच तो खाई. तो मुलांबरोबर मिसळून खेळत नसे. त्याचा खेळ दुसराच काहीतरी असे. पांचव्या वर्षी बापाने त्याला शाळेत घातले तेव्हां एक विचित्र गोष्ट त्याच्या मास्तरांच्या लक्षात आली.

शिकवावा लागत नसे. एकूण काशीनाथ हुशार मुलगा निघाला.

एकदा गोविंद आपल्या मित्राला भेटायला गोपाळच्या गावी गेला. तेथे गोपाळचा मुलगा विश्वनाथ देखील काशीनाथसारखाच विचित्रपणे वागतो हे गोविंदला कळले. हा सर्व त्या योग्याने दिलेल्या भस्माचा परिणाम आहे असे दोघांना वाटले आणि ते खरेच होते. विश्वनाथच्या मनात एक विचार आला की तोच विचार काशीनाथच्या मनातपण येई. विश्वनाथ करी तेच काम करण्याची इच्छा काशीनाथच्या मनात उपजे. विश्वनाथ जी कविता पाठ करी ती कविता, काशीनाथाला वाचल्याशिवाय येत असे. या विचित्र गोष्टी सर्वांना हळूहळू कळल्या. म्हणून सर्व त्या दोघां मुलांना 'विचित्र मुले' म्हणू लागले. दोघे दिसायला निरनिराळे दिसत. परंतु त्यांची कामे व विचार एक असत. एकाला जे काम करावेसे वाटे तेच काम दुसऱ्यालापण करावेसे वाटे. एक जण जेवायला बसला की दुसऱ्याला पण जेवायला बसावेसे वाटे. निरनिराळ्या गावात रहात असूनही दोघे परस्परांचे अनुकरण करीत.

परंतु दोघांत मैत्री होती असे मात्र नाही. कधी दोघांची परस्पर भेट होई तेव्हां दोघे

विचारले की काशीनाथ तू का रे हसलास? तर काशीनाथ उत्तर देई–"विश्वनाथ कां हसला?" नंतर दोघे परस्परांकडे पहात निघून जात.

दोघे वयात आले. तोंपर्यंत दोघांचे आईवडील वारले.

विश्वनाथाला अनेक मुली सांगून आल्या. त्याने अनेक मुली पाहिल्या. परंतु त्याने ज्या मुलीला पसंत केले तिचे नाव शैलजा होते. विश्वनाथ व शैलजाचा संबंध ठरला आणि शैलजाचे वडील भीमाशंकर यांनी लग्नाचा मुहूर्तपण ठरविला.

ज्या दिवशी भीमाशंकरने शैलजा व विश्वनाथाच्या मुहूर्त ठरविला त्याच्या दुसऱ्याच दिवशी काशीनाथनें भीमाशंकर जवळ शैलजाशी विवाह करून देण्यास विनंती केली.

"अहो, पण कालच शैलजाचे लग्न ठरले." भीमाशंकर म्हणाला.

"अहो पण अक्षत पडली नाही ना अजून?" काशीनाथने विचारले.

भीमाशंकरच्या मनात एक दुसराच विचार आला. तो काशीनाथच्या घरी दुसऱ्या दिवशी गेला आणि देण्या घेण्याच्या गोष्टी सुरू झाल्या. जो संबंध कमी खर्चात होईल तोच बरा, हा विचार त्याच्या मनात आला. परंतु विश्वनाथने तसा मोठा हुंडा मागितला नव्हता. तेव्हां काशीनाथकडे हुंड्या विषयी जास्त बोलण्याची





गरज नव्हती. परंतु आणखी एक गोष्ट त्याच्या मनात होती. ती गोष्ट त्याने सुरवातीलाच दोघांपैकी एकाला देखील सांगितली नाही.

विश्वनाथला संशय आला की भीमाशंकरच्या मनात काही तरी बदल झाला आहे. त्याने त्याला भेटून धमक्या दिल्या की तुम्ही शैलजाचा विवाह आणखी कोणाशी कसा काय करून देता पाहतो."

ते ऐकून भीमाशंकर म्हणाला—"आतां मी काय करू हे मला सुचेनासे झाले आहे. तिकडे तो काशीनाथ पण मला अशाच धमक्या देतो आहे. यातून तो देवच काय तो मार्ग काढील!"

[illegible] विश्वनाथ व काशीनाथ दोघांचे परस्परांशी वैर मनातल्या मनात वाढू लागले आणि दोघे मारामारी करतात की काय याची भीती वाटू लागली. भीमाशंकरला दोघांची फिकीर होती.

एक दिवशी विश्वनाथ पहाटे उठून काशीनाथच्या घरी एक मोठा लोखंडी गज घेऊन त्याचा कपाळमोक्ष करण्यास गेला. तो दारा बाहेर, काशीनाथ बाहेर येण्याची वाट पहात उभा राहला. परंतु चांगले उजाडले तरी काशीनाथ बाहेर आला नाही तेव्हां निराश होऊन विश्वनाथ आपल्या घरी निघाला.

झाले असे की विश्वनाथच्या मनात जो विचार आला तोच विचार काशीनाथच्या मनात पण आला होता. तो सुद्धा पहाटे उठून हातात लोखंडी गज घेऊन विश्वनाथच्या घराबाहेर तो बाहेर येण्याची वाट पहात उभा होता. परंतु उजाडल्यावर तो देखील आपल्या घरी जाऊ लागला. वाटेत दोघांची भेट झाली. दोघांनी परस्परांना विचारले—"कोठे रे गेला होतास तू?" दोघांचे भांडण सुरू झाले व मारामारीपर्यंत मजल येऊन ठेपली. तेव्हां लोकांची गर्दी जमली. दोघांना ओळखणारा एक वृद्ध मनुष्य पुढे येऊन म्हणाला—"तुम्ही उगाच भांडता आहां. कन्यादान करणारा दुसराच [illegible] भांडण मिटवू या."

त्या वृद्ध माणसाने दोघांना भीमाशंकरच्या घरी बोलावून नेले. दोघांना बाहेर बसायला सांगून तो भीमाशंकरशी घरात जाऊन बोलून आला. भीमाशंकर त्याच्या पाठोपाठ बाहेर आला व म्हणाला—"तुम्हां दोघांपैकी माझी मुलगी ज्याची निवड करील त्याच्याशी मी माझ्या मुलीचे लग्न लावून देईन. आज तुम्ही दोघे आपापल्या घरी जा. उद्यां या. चार वडीलधाऱ्या मंडळीसमोर ही निवड होईल!"

दुसऱ्या दिवशी विश्वनाथ व काशीनाथ भीमाशंकरच्या घरी आले. गावातली सर्व वडीलधारी मंडळी हजर होती.

भीमाशंकर दोघांना म्हणाला—"तुम्ही दोघे एकत्र उभे राहलात तर माझ्या मुलीला कोणाला माळ घालायची या गोष्टीचा संकोच होईल. म्हणून तुम्ही आत चला. दोघांना मी निरनिराळ्या खोल्यात बसायची व्यवस्था करून ठेवली आहे. त्याप्रमाणे दोघे भीमाशंकरने दाखविलेल्या खोल्यात जाऊन बसले.

थोड्या वेळाने विश्वनाथ हसत बाहेर आला. त्याच्या गळ्यात वरमाळा होती. त्याच्या पाठोपाठ शैलजापण बाहेर आली. त्याच वेळी दुसऱ्या खोलीतून काशीनाथ हसत बाहेर आला. त्याच्या गळ्यातपण वरमाळा होती. त्याच्या पाठोपाठ जी मुलगी आली ती शैलजासारखीच दिसत होती.

ते दृश्य पाहून तेथे हजर असलेली सर्व मंडळी आश्चर्यचकित झाली. विश्वनाथ व काशीनाथ पण चकित होऊन परस्परांकडे व परस्परांच्या वधूकडे पाहू लागले.

तेव्हां भीमाशंकर म्हणाला—"सर्वांना हे काय गौडबंगाल आहे असे वाटत असेल. पण तसे काही नाही. दोघी सख्या जुळ्या बहिणी आहेत. एकीला आम्ही शैलजा म्हणतो व दुसरीला गिरिजा."

अशा तऱ्हेने विश्वनाथ व काशीनाथ दोघांचा विवाह ठरल्या मुहूर्तावर आनंदाने पार पडला.



# लबाड

एकदा एका शेतकऱ्याला एका मजुराची गरज भासली. गोपू नावाच्या एका मजुराने मजुरीच्या पैशाशिवाय फक्त जेवणावर काम करायला असल्याचे सांगितले. म्हणाला– "मला फक्त तीन वेळ जेवायला वाढा." शेतकऱ्याने दुसऱ्या दिवसापासून कामावर यायला त्याला सांगितले.

दुसऱ्या दिवशी गोपू कामाला आला व न्याहारीला म्हणून बसला. शेतकऱ्याच्या सांगण्या वरून त्याच्या बायकोने त्याला पोटभर जेवायला वाढले. त्याने दोन माणसांना पुरेल एवढे जेवून घेतले. शेतकऱ्याच्या बायकोला आश्चर्य वाटले. तिने ती गोष्ट नवऱ्याला सांगितली. शेतकऱ्याने दुपारचे खाणे सुद्धा आतांच वाढून टाक म्हणून बायकोला सल्ला दिला. गोपू त्या गोष्टीस कबूल झाला व त्याने पुन्हां एका माणसाला पुरेल एवढे जेवून घेतले.

शेतकरी थोडा चपापला व गोपूला म्हणाला–"अरे गोपू! आज संध्याकाळी आम्ही दोघे परगावी जाणार आहों म्हणून संध्याकाळचे जेवणसुद्धा आतांच वाढून द्यायला मी सांगतो आहे.

गोपू त्याला देखील कबूल झाला आणि पुन्हां एका माणसाचे खाणे त्याने खाऊन घेतले..

"बरं मग, जा आतां शेतात कामाला!" शेतकरी म्हणाला.

"अहो, रात्रीचे जेवल्यावर आता काय काम होते? झोंपायची वेळ नव्हे का?" असे म्हणत गोपू बसल्या जागी आडवा झाला.





# नारद मोह

फार प्राचीन काळी एकदा नारद मुनींनी हिमालय पर्वतात गंगेच्या काठी तपश्चर्या सुरू केली. इंद्राला ती गोष्ट कळली तेव्हां त्याला वाटले की हा मुनी आपली गादी बळकावणार. म्हणून त्याने आपला सेवक कामदेव व रंभा आदिक दासींना नारदाची तपश्चर्या भंग करण्यासाठी पाठविले. परंतु कामदेव व रंभा आदिक अप्सरांना हार मानावी लागली. इंद्राने विचार केला की या हरिभक्ताला त्रास दिल्यास हरीचा कोपच होईल. म्हणून तो निश्चित झाला.

नारदाला वाटले की आपण कामदेवाला सुद्धा जिंकले. तो शंकराकडे गेला आणि त्याने कामदेवाला कसे जिंकले हे उत्साहाने वर्णन करून सांगितले. तेव्हां शंकर नारदाला म्हणाला–"नारदा! तू हे सर्व मला सांगितलेस त्यात काही गैर नाही. पण आणखी कोणाजवळ–विशेषकरून त्या वैकुंठवासी विष्णूजवळ हे सर्व जाऊन सांगू नकोस. संदर्भ आला व त्याने विचारले तरी सांगू नकोस. तुझ्या हिताचे म्हणून तुला हे मी सांगत आहे."

परंतु नारदाला कसे पटणार? तो प्रथम ब्रह्मदेवांकडे गेला आणि नंतर विष्णूकडे. विष्णूने नारदाला थट्टेत विचारले–"नारदा! इकडे कसा काय वाट चुकलास?" तेव्हां नारदाने ऐटीत, त्याने कामदेवावर कसा विजय मिळविला हे वर्णन करून सांगितले. तेव्हां विष्णु त्याला जास्त चढविण्याच्या सुरात म्हणाला– "नारदा? तुझ्यासारख्या अखंड ब्रह्मचाऱ्यावर का कामदेव विजय मिळविणार?"

नारद वरकरणी नम्रपणे पण मनात अभिमान ठेवून म्हणाला–"देवा, ही सर्व आपली कृपा आहे!"

श्री ग. मो. चांदोरकर



विष्णूने विचार केला आपल्या भक्ताच्या हृदयात गर्वाचा अंकुर उगवला आहे. वेळीच तो उपटून टाकला पाहिजे. विष्णूने नारदाला निरोप देऊन पाठविले.

विष्णूने आपली अगाध लीला सुरू केली.

नारदाला वाटेत एक सुंदर नगर लागले. ते वैकुंठपुरीहून सुंदर होते. त्या नगराच्या राजाचे नाव शीलनिधि असे होते. त्याला विश्वमोहिनी नावाची मुलगी होती. तिचे रूप पाहून लक्ष्मीचे डोळे देखील दिपून जातील इतकी सुंदर होती ती. तिच्या स्वयंवरासाठी त्या राजधानीत राजे रजवाड्यांची गर्दी जमली होती. नारद मुनीला ते कळले व तो राजाच्या दर्शनास गेला.

[illegible] विचारले–"मुनिवर्य! हिला कसा पति मिळेल, त्याचा काही आभास देऊ शकाल का?"

राजकन्येला पाहून तिच्याशी लग्न करण्याची नारदाच्या मनात इच्छा उत्पन्न झाली. परंतु राजाने विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर द्यावयाचे होतेच. म्हणून नारद म्हणाला–"राजा! हिच्याशी ज्याचा विवाह होईल त्याला रणांगणावर कोणी जिंकू शकणार नाही. त्या थोर पुरुषाच्या सेवेला सर्व चराचर जगत सतत उभे राहील."

असे सांगून नारद विचार करीत निघाला. या मुलीशी आपला विवाह कसा होणार? जपतप आतां सर्व व्यर्थ आहे. त्याचा विचार सोडून दिला पाहिजे. त्या मुलीशी आपला विवाह काय केल्याने होईल हेच मुख्य!

या करितां आपल्याला सुंदर रूप मिळाले पाहिजे, म्हणजे आपल्याला पाहिल्याबरोबर ती राजकुमारी आपल्यावर भाळून जाऊन आपल्यालाच स्वयंवराची माळा घालील.

पण हे रूप आपल्याला मिळणार कसे? तो विचार केल्यावर त्याने मनाशी ठरविले की भगवान विष्णूनेच सहाय्य केले तर



[illegible] सौंदर्य मागून घ्यावे.

असा विचार करून नारदाने विष्णूचे ध्यान केले. विष्णु प्रगट होऊन विचारू लागला–"नारदा! काय रे, इतक्यात माझी आठवण कशी काय झाली?"

"देवा! काय सांगू? तू अंतर्यामि आहेस? पण विचारलेस म्हणून मागतो. आपले रूप मला दे! त्या शिवाय त्या राजकन्येशी माझा विवाह होणे शक्य नाही." नारदाने अगदी काकुळतीने देवाजवळ मागणे मागितले. आणि म्हणाला–"देवा, माझे हित होईल असे काही तरी लवकर कर! वेळ निघून गेल्यावर शेवटी पश्चात्ताप करावा लागेल."

"नारदा! तुझे हित करणे हेच माझे सर्वदा ध्येय राहिले आहे. रोगी कुपथ्य मागू लागला तर वैद्य देईल का? तसेंच तुझ्या हिताचे तेच मी करणार आहे." असे सांगून विष्णु अंतर्धान पावला.

मायावश मुनीला विष्णूचे गूढ अर्थाने भरलेले ते वाक्य कळले नाही व तो धावत स्वयंवर मंडपात जाऊन दाखल झाला.

एकाहून एक सुंदर व शूर राजे आणि राजकुमार आपापल्या आसनावर बसले होते. नारद त्यांच्या मध्ये एका आसनावर जाऊन बसला. आपल्या शिवाय



राजकन्या दुसऱ्याला वरमाळा काय घालते? अशा थाटाने तो आसनावर बसून राहला.

नारदाला भगवान विष्णूने माकडाचे रूप देऊन ठेवले होते. पण इतरांना तो सरळ नारदासारखाच दिसत होता. म्हणून कोणी त्याची थट्टा अगर मस्करी केली नाही. उलट सर्वांनी आदरपूर्वक त्याला नारद मुनी समजून प्रणामच केला.

नारदाच्या जवळ पास शंकराचे दोन गण वेष पालटून बसले होते. नारदाचे बदललेले रूप त्यांना दिसत होते. ते थट्टा करीत नारदाला ऐकू जाईल असे म्हणत होते–"राजकन्या यांचे रूप पाहून यांच्यावर भाळूनच जाईल व वरमाळा यांच्याच

गळ्यात घालील." परंतु मुनीला त्यांची व्यंग्योक्ति कळली नाही. कारण विष्णूची माया त्याच्या डोक्यात शिरून त्याच्या कडून ते सर्व करवीत होती.

नारदाचे वानर रूप इतर कोणाला दिसले नसले तरी राजकन्येला ते स्पष्टपणे दिसत होते. ते रूप पाहून तिला या राजकुमारांबरोबर या मरकटाला कोणी आणून बसविले असा तिला राग आला. म्हणून नारद बसला होता त्या बाजूला तिनें ढुंकून पाहिले देखील नाही. आणि नारद तिचे लक्ष आपल्याकडे आकृष्ट व्हावे यासाठी वांकून वांकून पहात होता. शंकराचे गण नारदाचा तो विचित्रपणा पाहात होते.

भगवान विष्णु स्वतः एका राजकुमाराचे रूप घेऊन स्वयंवराला हजर झाला होता. विश्वमोहिनीने त्याच्याच गळ्यात अचूक माळा घातली. तत्काळ गरुडवाहन विष्णू आपल्या वधूला घेऊन आकाश मार्गे निघून गेला आणि सर्व राजकुमार निराश झाले.

[illegible] होती. शंकराचे गण हळूच त्याला म्हणाले–"मुनिवर्य! जरा आपले तोंड तरी पाहून घ्या!" नारदाला ते ऐकून मनस्वी राग आला. त्याच्या बुद्धीवरचा मायेचा पडदा बाजूला झाला होता आणि त्याला कळले की त्याचा देह जरी विष्णू-सारखा होता तरी त्याचे रूप वानराचे झाले होते. त्याला विष्णूचा भयंकर राग आला. त्याने विष्णूला शाप दिला–"देवा! तू मला स्त्रीविरहाच्या भावनेने जसे दुःखी केलेस तसा स्त्रीविरह तुला सहन करावा लागेल आणि मला माकडाचे रूप देऊन तू माझी अशी जी थट्टा उडविलीस त्याचे फळ म्हणून तुला वानरांची आणि अस्वलांची मदत घेऊनच या विरह दुःखातून मुक्ति मिळेल."

विष्णू म्हणाला–"भक्ताच्या हिता-साठीच मी हे केले व त्यासाठी भक्ताचा शाप मला मिळाला. त्या शापाचे फळ मी आनंदाने भोगायला तयार आहे."





# पंचकल्याणी

[२]

**श्या**मल नगराच्या राजाने विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर वीरदासाने या शब्दात दिले–"ही गोष्ट माझ्या लहानपणातली आहे. माझ्या वडिलांकडे कित्येक एकर जमीन होती आणि गुरांचे अनेक कळप होते.

एकदा आमच्या एका दूरच्या शेतात आमची एक गाय व्याली. तेव्हां माझ्या वडिलांनी त्या गाईला व वासराला घरी घेऊन जायला मला सांगितले. मी वासराला उचलून खांद्यावर घेतले आणि घरी निघालो. तेव्हां साहजिकच गाय माझ्या पाठोपाठ चालू लागली.

आम्ही थोडे अंतर चालून गेलो आणि तेवढ्यात मुसळधार पाऊस पडू लागला. म्हणून पाऊस थांबेपर्यंत आम्हांला कोठेतरी निवाऱ्याची जागा हुडकावी लागली. मला जवळच एक झोपडी दिसली. त्यात मी गाईला घेऊन गेलो.

तासाभराने त्या झोपडीत कोठून तरी बारा मांजरे आली. त्यात एक मांजर इतर मांजराहून बरेच मोठे व भयंकर दिसत होते. ते इतर मांजरांकडे पाहून ओरडू लागले. त्याबरोबर सर्व मांजरे ओरडू लागली. त्याचे ओरडणे म्हणजे काहीतरी खुणेचा शब्द होता. त्यांचा आवाज क्षणा-क्षणाला चढत गेला आणि पाहता पाहता सर्व मांजरांनी वासरावर हल्लाकरून त्याला क्षणार्धात फस्त करून टाकले.

ते पाहून मला राग आला. परंतु त्याच-बरोबर मला त्यांची मनातल्या मनात भीतीच वाटली. त्यांना पळवून लावावे

श्रीमती वेणुताई सावंत

असे एकदां मनात आले. पण ते मला शक्यच नव्हते. तरी मी मोठमोठ्याने ओरडून त्यांना पळविण्याचा प्रयत्न करून पाहिला. परंतु ती गोष्ट जणुकाही त्यांच्या गावीच नव्हती.

त्यानंतर ती मांजरे पुन्हा जोरजोराने ओरडू लागली. त्यांची भूक भागली नव्हती असे दिसले. या खेपेस मांजरांनी गाईवर झडप मारली व लचके तोडून तिला पाच मिनिटांत खाऊन टाकले. मी जास्तच घाबरून गेलो.

पुन्हां तिसऱ्या वेळी मांजरे गुरगुरू लागली तेव्हां मी विचार केला की आता आपली पाळी आहे वाटते. म्हणून मी तेथून पळ काढला. पण ती रानटी मांजरे माझा [illegible] सोडला नाही व एका उंच दाट पानांच्या झाडावर चढून बसलो. पानांच्या आड मी त्यांना दिसलो नाही.

मांजरांना मी दिसलो नाही, तेव्हां ती मांजरे 'म्यांव' 'म्यांव' करीत सर्व झाडांचा वास घेत फिरू लागली मला वाटले सुटलो आपण. परंतु ते मोठे मांजर मी ज्या झाडावर बसलो होतो त्याला हुंगून तेथेच येऊन उभे राहले व वर पाहू लागले. त्या दुष्ट मांजराच्या पाठोपाठ इतर मांजरे पण तेथे आली.

एका मांजराने वर चढण्याचा प्रयत्न केला. ते माझ्याजवळ आल्यावर मी चाकू खुपसून त्याला ठार केले. ते खाली जाऊन [illegible] आला. मोठ्या मांजराने इतर मांजरांना काहीतरी सांगितले. सर्वांनी मिळून त्या झाडाचे मोठे मूळ आपल्या पुढच्या पंजांनी उकरून काढले. ते मूळ तुटले व झाड एका बाजूला वाकले. मी घाबरून जाऊन मोठ्याने ओरडलो.

झाड वाकले होते तरी खाली पडले नव्हते. मांजरांनी हार मानली नाही, दुसरे मूळ तोडायला सुरवात केली. ते तुटले आणि झाड आणखी थोडे वाकले. नंतर मांजरांनी तिसरे मूळ उकरून उपटून तोडले. तेव्हां झाड आगदीच निराधार होऊन खाली पडले.

मी फांदी घट्ट धरून बसलो होतो आणि मांजरांचा आहार व्हायला तयार होतो. परंतु मी ओरडत राहलो ते अगदीच फुकट गेले नाही. जवळच शेतात काम करणारे शेतकरी धावून आले. त्यांच्या हातात काठ्या, फावडी, कुदळी होत्या. त्यांना पाहून मांजरे पळून गेली. परंतु शेतकऱ्यांनी त्यांचा पाठलाग करून सर्वांना एकेक करून ठार केले.

वीरदास येथवर गोष्ट सांगून म्हणाला–"महाराज! आपण आम्हांला आपराधी म्हणून न्याय विचार करून फांशीची शिक्षा केलीत. परंतु माझ्या अपराधापेक्षा त्या रानटी मांजरांनी गाईवासराला खाऊन टाकले व मला खाणार होत्या ही गोष्ट जास्त भयंकर नाही का?"

"तू म्हणालास ते ठीक आहे. तुझी ही गोष्ट खरोखरच चांगली आहे. अशाच तऱ्हेची आपल्या आयुष्यातली आणखी एखादी गोष्ट तू सांगितलीस तर तुझ्या आणखी एका मुलाला मी जीवदान देईन." राजा म्हणाला.

वीरदास थोडा वेळ विचार करून म्हणाला–"आहे महाराज! अशीच गोष्ट आणखी एक आहे. आपली आज्ञा असेल तर ती सांगतो."

"तर मग सांग!" राजा म्हणाला.

(पुढल्या अंकात आणखी एक गोष्ट)







# चिरायु

भार्गव नावाच्या एका ज्योतिष्याला फार उशिरा एक मुलगा झाला. त्याने आपल्या मुलाची जन्मकुंडली पाहून भविष्य वर्तवले की मुलाला फक्त पंचवीस वर्षांचेच आयुष्य आहे. भार्गवला फार वाईट वाटले. तरी त्याने त्याचे नाव चिरायु ठेवले. जन्म-कुंडलीत आयुष्य अल्पायु असले तरी लग्नाचा योग होता. त्याने, ज्या मुलीशी त्याचे लग्न होईल तिच्या ग्रहबलाने त्याला मोठे आयुष्य कदाचित लाभेल असा विचार करून त्याने मनाचे समाधान करून घेतले.

चिरायु लहानाचा मोठा झाला. तो दिसायला सुंदर आणि बुद्धीने हुशार होता. भार्गवने मुलासाठी योग्य वधूचा शोध सुरू केला. भार्गव सर्वांना सांगत असे की माझ्या मुलाला फक्त पंचवीस वर्षांचे आयुष्य आहे. परंतु विवाहाचा योग पण आहे. म्हणून त्याच्या बायकोच्या ग्रहबलावर त्याला दीर्घायुष्य मिळण्याची शक्यता पण आहे. या सर्व गोष्टी कळल्यावर त्याला कोण आपली मुलगी देणार?

हळूहळू चिरायूला देखील त्याला अल्पायु असल्याची गोष्ट कळली. तो आपल्या बापाला म्हणाला—"बाबा! माझे आयुष्य फक्त पंचवीस वर्षांचेच असेल तर उगाच लग्नाची खटखट तरी कशाला? मी आपले उरलेले आयुष्य काशी विश्वेश्वराच्या सेवेत घालवावे म्हणतो." असे सांगून तो काशीला निघाला. तो निघण्यापूर्वी आपल्या बाबांना म्हणाला—"बाबा! पंचविसाव्या वर्षी मला मरण आले नाही तर सव्वीसावे वर्ष लागतांच मी स्वतः घरी परत येईन."

चिरायु काशीला निघाला. वाटेत त्याला यात्रिकांची एक टोळी दिसली. कोणी तरी राजा आपल्या मुलाला घेऊन शेजारच्या

श्री किशोर पाटील

विवाहास निघाला होता. वाटेत जंगलात पडाव टाकून सर्व उतरले होते.

चिरायूने राजाच्या नोकरांना विचारले—"मी आजची रात्र तुमच्या बरोबर राहलो तर चालेल का?" नोकर चिरायूला घेऊन राजाकडे गेले.

राजाने चिरायूला वरपासून खालपर्यंत लक्षपूर्वक पाहिले आणि मनाशी काहीतरी ठरविले. विवाहासाठी म्हणून ज्या राज-कुमाराला तो घेऊन चालला होता त्याला फेफऱ्याचा आजार होता. ऐन विवाहाच्या वेळी राजकुमाराला फेफरे आले तर काय करायचे म्हणून राजाला फार काळजी वाटत होती. चिरायु दिसायला राज-कुमारासारखाच होता. त्याला लग्नाच्या वेळी बसविले की लग्न निर्विघ्न पार पडेल. लग्न झाल्यावर याला काहीतरी बक्षिस देऊन निघून जायला सांगितले की झाले. असा विचार करून राजा चिरायूला म्हणाला—"तू मी सांगितल्याप्रमाणे वागा-यला तयार असशील आणि आम्ही ज्या वेळी निघून जायला सांगू त्या वेळी निघून जायला तयार असशील तर आज रात्रभर तुझ्या राहण्याची व्यवस्था तर आम्ही करून देऊच त्यावर तुला एक हजार सोन्याची नाणी बक्षिस म्हणून देऊ."



बक्षिस मिळविण्याची इच्छा त्याच्या मनात नव्हती. रात्रभर आपल्याला सुरक्षित पणे रहायला मिळते आहे ना, पुरे झाले, असा विचार करून चिरायूने राजाची अट कबूल केली. रात्री तो पोटभर जेवला आणि रात्र भर छान झोपला. दुसऱ्या दिवशी दिवसभर प्रवास केल्यावर ते वऱ्हाड वधूच्या गावी येऊन पोचले. सर्वांच्या राहण्याची उत्तम व्यवस्था करण्यात आली होती.

त्या देशाच्या रीतिप्रमाणे मुहूर्त रात्रीच्या तीन प्रहरी होता. राजाच्या नोकरांनी मध्य रात्रीच्या सुमारास चिरायूला उठविले त्याला स्नान वगैरे करायला सांगून त्याला सुंदर वस्त्राभूषणे अंगात घालायला दिली.



ठीक विवाहाच्या वेळी त्याला बोहोल्यावर नेऊन उभे करण्यात आले. मंगळाष्टके होऊन अक्षता पडल्यावर होम वगैरे झाला आणि सप्तपदी झाल्यावर वरवधू जवळ जवळ बसले असतांना चिरायु वधूला तिला ऐकू जाईल इतक्याच मोठ्याने म्हणाला–

"अग्नीला साक्षी ठेवून सर्व थोर मंडळी समोर ह्या जो विवाह संस्कार होत आहे हे फक्त नाटकच तर ठरणार नाही ना?"

राजकुमारीने ते लक्ष देऊन ऐकले आणि तिला आश्चर्य वाटले की तिचा पति असे कां बरे विचारतो आहे?

उजाडले. राजा आपल्या कुटुंबियांबरोबर आपल्या निवासस्थानी आला. चिरायूला दिलेली वस्त्राभूषणे काढून घेण्यात आली. त्याला एक हजार सुवर्णमुद्रा देऊन राजा म्हणाला–"आतां तू आपल्या वाटेने निघून जा. परंतु तू जर का कोठे जवळपास आढळलास तर मात्र तुझी धडगत नाही. माझे नोकर तुझ्या समाचाराला येतील."

चिरायू काशीयात्रेच्या वाटेवर पुढे निघाला.

दिसऱ्या दिवशी जेवणे चालू होती. राजकुमारी पती शेजारी बसली होती. तिने जवळून आपल्या पतीला पाहिले व तिला थोडी शंका आली. आपल्या शंकेचे निवारण करण्याच्या हेतूने तिने राजकुमाराला विचारले–"तुम्ही काल बोहोल्यावर काहीतरी मला सांगितले पण वाजंत्री वाजत होती म्हणून मला ते त्यावेळी बरोबर ऐकू आले नाही. म्हणून पुन्हां सांगता का काय ते?"

राजकुमार घाबरून गेला. म्हणाला–"मी...मी...! काही नाही सांगितले. त्याचा आवाजपण चिरायूच्या आवाजापेक्षां निराळा होता. राजकुमारी लगेच उठून उभी राहली आणि जोराने म्हणाली–"मला फसविण्याचा प्रयत्न चालू आहे. रात्री



नव्हते."

सर्व पानांवरून उठले. राजकुमारीला तिचा बाप एका बाजूला बोलावून घेऊन गेला आणि तिला रागावू लागला. परंतु राजकन्या आपल्या बापाला चिरायू जे म्हणाला होता ते सांगून म्हणाली–"मला त्या वेळी हे कळले नाही की अग्नीला साक्षी ठेवून माझ्या गळयात मंगळसूत्र बांधणारे हा विवाह नाटकतर होणार नाही ना असे का म्हणाले? पण मला आतां ते कळले. माझे त्या प्रश्नाला एकच उत्तर आहे, मी हे नाटक होऊ देणार नाही. ज्यांनी माझ्या गळयात मंगळसूत्र बांधले तेच माझे पति. तुम्हांला शक्य असेल तर त्यांना आदरपूर्वक बोलावून घेऊन या. पण प्राण गेला तरी मी राजकुमाराबरोबर संसार करायला तयार नाही."

वधूच्या बापाने वर पक्षाच्या नोकरांना लाच देऊन त्यांच्याकडून खरी वस्तुस्थिति विचारून घेतली. राजकुमाराला फेपरे आहे म्हणून एका वाटसरूला पकडून त्याच्या हातून राजकन्येच्या गळयात मंगळसूत्र बांधविण्यात आले हे उघड झाले.

वरपक्षाची मंडळी अपमानित होऊन आपल्या राज्यात परत गेली. वधूच्या बापाने आपल्या राज्यातल्या सर्व धर्मशाळांतल्या




दारावर दगडावर खोदून असा जाहीरनामा काढला की नवरदेवाने वधूच्या कानात काय सांगितले हे जो कोणी येऊन सांगेल त्याला एक मोठे बक्षिस देण्यात येईल. वधू व तिच्या बापाशिवाय इतर कोणालाही नवरदेवाने वधूला काय सांगितले होते हे माहीत नव्हते.

ते सांगणारा खरा वर चिरायू आपल्या नाटकासारख्या विवाहाची गोष्ट पार विसरून काशीला निघून गेला आणि विश्वेश्वराच्या भजनपूजनात मग्न होऊन गेला. पंचविसावे वर्ष त्याला लागले व ते संपून सव्वीसावे वर्ष पण लागले. तेव्हां त्याने बापाला सांगितल्याप्रमाणे तो आपल्या गावी निघाला.

वाटेत चिरायु त्या गावच्या धर्मशाळेतच उतरला होता आणि त्याने राजाचा जाहीरनामा वाचला. त्यापूर्वी त्याला वाटत होते की ज्या राजकन्येशी त्याचा विवाह झाला होता ती आतां सासरी नांदत असेल व एका दोघां मुलांची आई पण झाली असेल. परंतु जाहीरनामा वाचल्यावर त्याने धर्मशाळेत उतरलेल्या लोकांजवळ त्या राजकुमारीविषयी चवकशी केली तेव्हां त्याला राजकुमारी आपल्या पतीबरोबर कोणत्या तरी कारणास्तव गेली नसल्याचे व माहेरीच असल्याचे कळले. विवाह झाला त्याच्या दुसऱ्याच दिवशी राजाने हा जाहीरनामा दगडावर कोरून ठेवला असल्याचे त्या लोकांनी सांगितले.

ते कळल्यावर चिरायु सरळ राजवाड्यात गेला आणि म्हणाला–"मी बक्षिस घ्यायला आलो आहे. बोहोल्यावर नवरदेवाने वधूला जे सांगितले ते मला माहीत आहे."

[illegible] राजाने चिरायूला विचारले–"नवरदेवाने वधूला काय सांगितले?"

"नवरदेवाने वधूला विचारले की अग्नीला साक्षी ठेवून हा जो लग्नाचा सोहळा होत आहे, हे फक्त नाटकच तर नाही ना? मीच ते विचारले होते. आता जे बक्षिस असेल ते देण्याची कृपा करावी." चिरायु म्हणाला. त्यावेळी तो स्मित करून राजकन्येकडे पहात होता.

राजकुमारीने त्याला ओळखले आणि राजाची पण खात्री पटली की चिरायूनेंच राजकन्येच्या गळ्यात मंगळसूत्र बांधले होते. राजा म्हणाला–"आतां कोणते बक्षिस हवे जांवईबुवा? आमची ही मुलगीच ते बक्षिस आहे."

चिरायूने भार्गवला ते वर्तमान कळविले आणि त्याला बोलावून घेतले. राजकन्येच्या जन्मकुंडलीत ग्रहबल असल्या कारणाने चिरायु दीर्घायु झाला.






मैत्रेय मुनी निघून गेल्यावर धृतराष्ट्राने विदुराला किम्मीर राक्षसाच्या वधाचे वृत्त सांगितले. पांडव वनवासास निघाले तेव्हां तीन दिवसांनी त्यांना रात्री किम्मीर वनातून जावे लागले. तेव्हां किम्मीर राक्षस त्यांच्या वाटेवर आडवा उभा राहिला. त्याचे डोळे लाल होते, गुहेसारखे तोंड गिळायला उघडे होते आणि तो पांडवांना धरायला पुढे येत होता. त्याचे गरगरीत डोळे व पांढरे रान डुकरासारखे मोठमोठे दात पाहून आणि त्याची भयंकर गर्जना ऐकून क्रूर जनावरे देखील पळू लागली. त्याच्या एका हातात एक जळते लाकूड होते.

पांडवांनी, द्रौपदीने व ब्राह्मणांनी त्या राक्षसाला पाहिले. द्रौपदी घाबरूनच गेली व डोळे घट्ट बंद करून उभी थर थर कापू लागली. धौम्य ऋषी त्या राक्षसाचा नाश व्हावा यासाठी मंत्र म्हणू लागले.

युधिष्ठिराने त्या राक्षसाला विचारले–"कोण रे तू? या जंगलात कां राहतोस?"

तेव्हां तो राक्षस म्हणाला–"मी बकासुराचा भाऊ आहे. माझे नाव किम्मीर. मी या काम्यक वनात स्वेच्छेने विहार करतो. मनुष्यच माझा आहार आहे. कोण तुम्ही आणि इकडे कशासाठी आलात? तुम्हां सर्वांना खाऊन मी आपली कित्येक दिवसांची भूक भागविणार आहे."

युधिष्ठिर म्हणाला–"आम्ही पांडव आहो. माझे नाव युधिष्ठिर. हे चार जण माझे भाऊ. दिलेल्या वचनाचे पालन



व्हावे यासाठी आम्ही या जंगलात आलो आहो."

ते ऐकून किम्मीर म्हणाला—"तर मग हाच भीम असणार. भीमाचा वध करण्यासाठी मी कित्येक दिवसापासून वाट पाहातो आहे. आज माझी ती इच्छा पुरी होणार तर! याने माझा भाऊ बकासुर याचा वध केला. माझा मित्र हिडिंब, त्याचा पण वध केला आणि त्याच्या बहिणीशी विवाह करून आमचा अपमान केला. नाहीतर स्वतः माझ्यासमोर चालून आला नसता. मी त्याच्या रक्ताने हिडिंब आणि बकासुराचे स्मरण करून तर्पण करीन. तुम्हां सर्वां समक्ष मी त्याचे रक्त प्राशन करून आमच्या जातीचा अपमान केल्याबद्दल त्याला शिक्षा करीन."

युधिष्ठिराला तो राक्षस बोलला त्यांचा फार राग आला. म्हणाला—"दुष्ट राक्षसा! आपली बडबड बंद कर." त्याच वेळी भीम एक झाड उपटून ते घेऊन त्या राक्षसावर धावला. अर्जुनाने गांडीवावर बाण चढविला. पण भीम त्याला म्हणाला—"अर्जुना! तू थांब रे! मी याला एका क्षणार्धात त्याच्या भावाला व त्याच्या मित्राला भेटायला यमलोकी पाठवितो." असे सांगून त्याने ते झाड किम्मीर राक्षसावर टाकले.

भीम म्हणाला ते त्या राक्षसाला झोंबले. भीमाने त्याच्या अंगावर टाकलेले झाड त्याला लागले व तो जास्तच चवताळला. त्याने हातातले ते जळते लाकूड भीमावर टाकले. भीमाने आपल्या डाव्या पायाखाली दाबून ते विझविले. त्यानंतर दोघे एकेक झाड उपटून परस्परावर वार करू लागले. नंतर दोघांची भिडंत सुरू झाली. त्यांचे ते मल्लयुद्ध भयंकरच होते.

किम्मीर दमून गेला होता. भीमाने त्याला आपल्या काखेत धरून आवळला. नंतर गरगर फिरवून जमिनीवर आपटले आणि त्याच्या कंबरेवर पाय ठेवून एकाद्या काठीसारखी त्याची कंबर मोडली. नंतर त्याचे हात पाय उपटून तोडून टाकले





झाले आणि काम्यकवन किम्मीर राक्षसाच्या त्रासातून कायमचे मुक्त झाले. धौम्य मुनींनी व द्रौपदीने भीमाचे अभिनंदन केले.

किम्मीर राक्षसाच्या वधाचा वृत्तांत ऐकून धृतराष्ट्र जणुकाही त्याचाच मुलगा मेला म्हणून दु:खी झाला.

यादव व पांचाल देशाच्या राजांना, पांडव द्यूतात हारले व आता वनवास करीत असल्याने कळले, तेव्हां ते पांडवांच्या दर्शनासाठी आले. यादवांबरोबर कृष्णसुद्धां आला होता. तो पांडवांना त्या स्थितीत पाहून दु:खी होऊन म्हणाला—"पापी दुर्योधन, कर्ण व शकुनी यांच्या रक्ताची तहान या पृथ्वीला लागल्यासारखी दिसते आहे. त्यांचा वध करणे एक पुण्यकार्य आहे. त्या सर्वांना यमलोकी पाठविल्यावर युधिष्ठिराचा राज्याभिषेक होईल."

द्रौपदी, तिचा भाऊ धृष्टद्युम्न व इतर पांचाळ देशातील प्रमुख कृष्णाला येऊन भेटले. द्रौपदीने तिच्यावर जो प्रसंग गुजरला होता तो सांगितला आणि रडू लागली.

कृष्ण तिचे सांत्वन करीत म्हणाला—"द्रौपदी! ज्या दुष्ट लोकांनी तुझा इतका अपमान केला आहे त्यांच्या पत्नींवर तुझ्याहून मोठा डोंगर कोसळणार आहे. पांडवांना पुन्हा राज्यप्राप्ती होऊन ते राज्य करू लागतील व त्यांची पट्टमहीषी म्हणून सर्व तुझा आदर करतील."





नंतर कृष्ण युधिष्ठिराला म्हणाला—"हे द्यूत खेळण्याचे जे नाटक झाले त्यावेळी मी द्वारकेला असतो तर तुम्हांला मी द्यूत खेळू दिले नसते. दुर्योधनाने ऐकले नसते तर जागच्या जागी मी त्याला उचित दंड दिला असता. मी द्वारकेला परत आल्यावर युयुधानकडून मला हस्तिनापूरला घडलेल्या या द्यूताचे वर्तमान कळले. म्हणून मी लगेच तुम्हांला भेटण्यासाठी धावून आलो."

"तू कोठे गेला होतास?" युधिष्ठिराने विचारले.

शिशुपालचा भाऊ साल्व, तुला माहीतच आहे. त्याने, राजसूय यज्ञाच्या वेळी मी शिशुपालाचा वध केला त्याचा सूड उगविण्याचा विचार केला. ती [illegible] मला कळली तेव्हां त्याचे पारिपत्य करण्यासाठी मला सौभ नगरावर चालून जावे लागले.

"साल्व राजाला मी शिशुपालाचा वध केला असल्याचे जेव्हां कळले तेव्हां तो सौभ नामक विमानात बसून द्वारकेवर स्वारी करण्यासाठी आला. त्या वेळी मी इंद्रप्रस्थ येथेच होतो. म्हणून द्वारकेचे रक्षण उग्रसेन आदिकांनी केले. त्यांनी नगरकोटाच्या रक्षणासाठी शूर योद्धे नेमले आणि साल्व राजाला तोंड देण्यासाठी सांब, प्रद्युम्न आदिकांना पाठविले. प्रद्युम्नने साल्व राजाचे सैन्य उधळून लावले.

"त्याच सुमारास मी इंद्रप्रस्थहून द्वारकेला परत आलो. मला हे वर्तमान कळले तेव्हां मी साल्व राजाचा वध केल्यानंतरच द्वारकेत पाऊल टाकायचे अशी प्रतिज्ञा केली. मी येत असल्याचे कळतांच साल्व सौभ विमानात बसून समुद्र किनाऱ्याकडे पळून गेला. मी त्याचा पाठलाग केला. साल्वने आपले विमान समुद्रावर आकाशातच एका जागी थांबवून माझी थट्टा उडवीत मला युद्धाचे आव्हान केले."

त्यानंतर कृष्णाने साल्व राजावर अनेक बाण सोडले, परंतु त्यांपैकी एकदेखील त्याला लागला नाही. परंतु साल्वने मारलेले बाण पावसासारखे कृष्णाच्या सैन्यावर [illegible] राजाचे अनुयायी आनंदाने व्यंग्य हास्य करीत हसत टाळ्या वाजवू लागले. त्या आवाजाच्या दिशेने शब्दवेधी बाण सोडून कृष्णाने अनेकांना ठार केले. परंतु साल्वराजाने आपली माया पसरवून युद्ध आरंभिले. कृष्णाचा सारथी स्वत: दारुक याला देखील त्या युद्धात जय मिळतो की पराजय याची शंका वाटू लागली.

त्याच वेळी कृष्णाकडे कृतवर्माचा दूत आला आणि त्याने कृष्णाचे पिता वसुदेव यांचा साल्व राजाने गुप्तपणे द्वारकेत प्रवेश करुन वध केल्याचे वृत्त सांगितले. ती बातमी खरी की खोटी या विचारात कृष्ण असतां त्याच वेळी आकाशातून वसुदेवाचा मृतदेह खाली जमिनीकडे येत असलेला दिसला. ते पाहून कृष्णाला फार वाईट वाटले व तो दु:खी होऊन रथात पडला. त्याच्या हातातले धनुष्य बाण पण रथात पडले. सैन्यात हाहाकार उडून गेला.

परंतु कृष्णाला, ती सर्व साल्व राजाची माया आहे, हे कळायला फारसा वेळ लागला नाही. साल्व राजाची ती माया ओळखून कृष्णाने पुढील युद्ध सुरू केले. त्या पुढचे युद्ध फारच भयंकर होते. कृष्णाने आपले सुदर्शन चक्र फेकून साल्व राजा, त्याचे विमान व त्यात बसलेले सर्व लोक



सर्वांचा ध्वंस केला. त्या युद्धात विजयी होऊन कृष्ण द्वारकेला आला तेव्हां त्याला हस्तिनापूरला घडलेल्या द्यूताचे वर्तमान कळले. पांडव वनवासास गेल्याचे कळल्यावर कृष्ण त्यांना भेटण्यासाठी काम्यकवनात आला.

त्यानंतर यादव व पांचाळ स्वदेशी निघून गेले.

पांडवांनी वनवासात राहात असतांना पुढे होणाऱ्या महायुद्धासंबंधी विचार विनिमय सुरु केला. एक दिवशी युधिष्ठिर अर्जुनाला म्हणाला—"फार पूर्वी ज्या वेळी वृत्रासुराच्या त्रासाने भयभीत होऊन त्रिलोक त्राहि त्राहि करीत होता तेव्हां



सर्व देवांनी आपापली अस्त्रे इंद्राकडे नेऊन ठेवली होती. व्यास मुनींनी मला प्रतिस्मृति नामक विद्या शिकविली होती. तू त्या विद्येचा अभ्यास करून इंद्राला प्रसन्न कर आणि ती अस्त्रे त्याच्या कडून मागून घेऊन ये. एक महायुद्ध होणार आहे. दुर्योधनाच्या बाजूने भीष्म, द्रोण, कर्ण इत्यादिक युद्धाला येणार आहेत. त्यांच्याशी युद्ध करून कसा जय मिळणार याचा मी विचार करू लागलो तेव्हां व्यास मुनी प्रगट झाले व त्यांनी मला प्रतिस्मृति ही विद्या शिकवून ती तुला शिकवायला मला सांगितले. म्हणून मी तुला ती विद्या शिकवून देतो आणि तू आजच उत्तर दिशेने नीघ!"

त्याप्रमाणे अर्जुनाने युधिष्ठिराकडून प्रतिस्मृती ही विद्या अवगत करून घेतली आणि अग्निनारायणाचे स्मरण करून त्याला प्रदक्षिणा घातल्या. कवच, कुंडल, गांडीव व भाता धारण करून धौम्य मुनींना आणि युधिष्ठिराला नमस्कार केला आणि त्यांचा निरोप घेऊन निघाला. द्रौपदी त्याला निरोप द्यायला थोडे अंतर त्याच्या बरोबर चालून गेली आणि निरोप देताना म्हणाली– "तुम्ही ज्या शुभ कार्यासाठी जात आहां त्यात तुम्हांला यश येवो! तुमची गैरहजेरी आम्हांला सतत आठवत राहील. आम्ही सर्व तुमच्या कुशल मंगलाकरिता देवाची प्रार्थना करीत तुम्ही परत येईपर्यंत तुमच्या वाटेकडे डोळे लावून राहू. आमचे सुख दु:ख सर्व तुमच्यावर अवलंबून आहे. सर्व विघ्नांना व संकटांना तोंड देऊन कार्य-सिद्धी करून तुम्ही सुखरूप परत याल, आम्ही हीच त्या परमेश्वराजवळ प्रार्थना करीत राहू."

अर्जुन प्रवासास निघाला. वाटेत त्याला नद्या व पर्वत आणि जंगले लागली. हिमालय आणि गंधमादन पर्वत पार करून तो इंद्रकील पर्वतावर आला. तो जोर जोराने चालत असता त्याला एका जागी "थांब!" असा गंभीर आवाज ऐकू आला. त्या निर्जन प्रदेशात त्याला तसा आदेश

करणारा कोण बरे असावा, हे अर्जुनाला कळेना. त्याने चतुर्दिक दृष्टी फिरवून पाहिले. तेव्हां त्याला एका झाडाखाली एक तपस्वी दिसला. तो तपस्वी पिंगल वर्ण असलेला, दिसायला अशक्त असा एक पुरुष होता. त्याच्या चेहऱ्यावर ओज व ब्रह्मतेज झळकत होते. अर्जुन त्या तपस्व्याच्या शेजारी जाऊन उभा राहिला.

"मुला! कोण तू? युद्धाला सज्ज होऊन निघालेल्या शूरासारखा कवच व शस्त्रास्त्रे धारण करून या जंगलात कशासाठी आला आहेस? आपल्या इंद्रियांवर काबू मिळवून तपश्चर्या करणारे तपस्वीच राहतात. अशा जागी शस्त्रास्त्रांची गरजच काय? म्हणून तू ती दूर फेकून दे!" तपस्वी म्हणाला.

अर्जुनाने, तपस्वी म्हणाला त्याकडे दुर्लक्ष केले. त्या तपस्वी मुनीने त्याची अनेक प्रकारे समजूत घातली. परंतु काही उपयोग झाला नाही. तेव्हां प्रसन्न होऊन तो तपस्वी म्हणाला—"मी तुझा दृढ निश्चय पाहून संतुष्ट झालो आहे. मी इंद्र आहे. [illegible] म्हणाला—"हे देवाधिदेवा! मला आपण एक दिव्य अस्त्र देण्याची कृपा करावी."

त्यावर इंद्र म्हणाला—"वेड्या! तुला अस्त्रें कशाला? तुला पुण्यलोकाची प्राप्तीच करून देतो. तू सुखपूर्वक तेथे राहात जा."

माझे भाऊ रानावनात नानाप्रकारच्या हालअपेष्टा सहन करीत असता मी सुखोपभोग करणे मला शोभत नाही. मी एकट्याने सुख भोगल्यास मला आनंद तरी कसा वाटेल? ते शक्य नाहीं. मी क्षत्रिय कुळात जन्मलो आहे. माझ्या मृत्यूनंतर ही माझे यश अमर राहील. सुखोपभोगासाठी अपयश मिळाले तर ते कोणत्याही प्रकारे श्रेयस्कर नाही.

अर्जुनाच्या त्या दृढ निश्चयावर संतुष्ट होऊन इंद्र म्हणाला—"बाळ! तुझ्या मनाची इच्छा पूर्ण होण्यासाठी तु शंकराचे ध्यान करून तपश्चर्या कर. त्याला प्रथम संतुष्ट कर." असे सांगून इंद्र अंतर्धान पावला.





# शिवपुराण

[ ५ ]

हिमवानाने सपत्नीक शंकराकडे जाऊन त्याला साष्टांग प्रणिपात केला आणि चंदन, पुष्पादिकांनी त्याची पूजा करून हात जोडून समोर उभा राहिला. शंकराने एकदां डोळे उघडून पाहिले आणि म्हणाला—"हिमवाना! तू एक थोर पुरुष आहेस. म्हणून तुझ्या या कैलास शिखरावर बसून मी निर्विघ्नपणे तपश्चर्या करीत आहे.

"हे महादेवा! तू येथे येऊन तपश्चर्या करीत आहेस हे आमचे भाग्य." हिमवान म्हणाला.

शंकर संतुष्ट होऊन म्हणाला—"हे हिमवाना! तू काही तरी वर मागून घे."

"माझी ही मुलगी पार्वती, हिला आपल्या सेवेला येथे राहू देण्याची परवानगी द्यावी, प्रभो!" हिमवान म्हणाला.

"जे तप करतात त्यांच्या सेवेला कोणी स्त्रीने राहणे उचित नाही. पाहिजे तर तु मधून मधून येऊन काय हवे नको ते पाहून जात जा." शंकर म्हणाला.

"माझी ही मुलगी कन्या आहे. महादेवीच्या कृपेने माझ्या पोटी जन्मली आहे. तिच्या हातून आपल्या सारख्यांच्या तपश्चर्येत विघ्न कसे काय येईल? म्हणून माझी एवढी विनंती मान्य करून माझ्या या मुलीला आपल्या सेवेस ठेवून घेण्याची कृपा करावी!" हिमवान म्हणाला.

शंकराने होकारार्थी मान हलविली.

सतीच्या मृत्यूनंतर शंकर कैलास पर्वतावर परत येऊन तपश्चर्या करू लागला होता. तपश्चर्येच्या तापाने त्याच्या कपाळाला घाम सुटला. एक स्वेद बिंदु पृथ्वीवर पडला.

शेवटच्या मलपृष्ठावरील चित्र










त्याचा एक पुत्र झाला. त्याचे नाव आजानु-बाहु असे पडले. त्याच्या देहाची कांति लाल होती, शरीर भव्य होते. भूदेवीने त्याला उचलून शंकराला दाखविले.

शंकराने भूदेवीला पाहून म्हटले—"तू धन्य आहेस! माझ्या देहाच्या स्वेद बिंदुने जन्मलेला हा मुलगा भौम नावाने तुझी कीर्ति वाढवील."

भौम मोठा झाल्यावर काशीला गेला आणि तेथे त्याने शंकराचे स्मरण करून घोर तपश्चर्या केली. शंकराने संतुष्ट होऊन त्याला ग्रहमंडळात स्थान दिले. त्याच भौमाला पुढे मंगळ, अंगारक नावे पडली.

शंकर तपश्चर्या करीत असतांच पृथ्वीवर गंगावतरण झाले. जेव्हां ऋषी व पितृ देवांनी ब्रह्मदेवाजवळ प्रार्थना केली की भूलोकात पाण्याचा दुष्काळ आहे तेव्हां ब्रह्मदेवाने आपल्या कमंडलूतून पाण्याचा एकच थेंब खाली सोडला. त्याची अजस्र धारा होऊन पृथ्वीकडे वाहू लागली. शंकराने विचार केला ही धारा अशीच वाहात राहाली तर पृथ्वीचे फार नुकसान होईल. म्हणून शंकराने आपल्या डोक्यावर गंगेची धार घेतली. शंकराच्या जटेतून गंगेचे पाणी मानससरोवरात पडले व तेथून गंगा मंदगतीने वाहू लागली. त्यानंतर शंकर पुन्हां आपल्या तपश्चर्येत लीन झाला.

दक्षाला दिति नावाची एक मुलगी होती. ती कश्यपमुनींची दुसरी बायको. तिच्या पोटी हिरण्यकश्यपु व हिरण्याक्ष जन्मले. ते क्रूर राक्षस निघाले व त्यांच्या तापाने त्रिलोक त्रस्त झाला. तेव्हां विष्णूने नरसिंह व वराह अवतार घेऊन त्यांचा संहार केला. पुत्रशोकाने दुःखी झालेली दिति कश्यपाच्या कृपेने पुन्हा गरोदर झाली. ती गोष्ट इंद्राला कळली. इंद्राने तिच्या पोटी आपला आणखी एक शत्रु जन्मणार अशा भीतीने, आपले वज्रायुध दितीच्या गर्भपिंडावरच सोडले. त्या पिंडापासून मरुत आदिक जन्मले व इंद्राची सेवा करू लागले.

दिति फारच निराश झाली. तिने कश्यपाची कृपा संपादन करण्याचा पुन्हां प्रयत्न केला. तेव्हां कश्यप मुनीने ब्रह्मदेवाचे स्मरण करून तपश्चर्या करण्यास तिला सल्ला दिला. दितीने त्याप्रमाणे तपश्चर्या केली व कश्यपाच्याच कृपेने तिला एक वज्रकाय मुलगा झाला. त्याचे नांव वज्रांग ठेवण्यात आले.

वज्रांगाच्या जन्म समयी अग्निवृष्टी, भूकंप व तुफान सर्व संकटे आली. म्हणून सर्व देव घाबरले. दितीने मोठ्या प्रेमाने वज्रांगला लहानाचे मोठा केला. ती त्याला म्हणाली—"बाळा! मला देवांनी फार दुःखी केले आहे. त्यांनी तुझे बंधु हिरण्याक्ष व हिरण्यकश्यपु यांचा विष्णूकडून वध करविला. मरुत् आदिक माझ्या पोटांत असताना इंद्राने वज्रायुध सोडून गर्भपिंडाचे तुकडे तुकडे करून टाकले. म्हणून तू इंद्रादिक देवांचे पारिपत्य कर."

आईच्या म्हणण्या प्रमाणे वज्रांगने राक्षसांचे सैन्य जमविले. रणभेरी वाजवून त्याने स्वर्गाला गराडा घातला. त्याने देवांना त्राहि त्राहि करून सोडले व इंद्राला कैद करून स्वर्गावर अधिकार मिळविला. तेव्हां दितीच्या मनाचे समाधान झाले.

देवांनी ब्रह्मदेवाकडे जाऊन आपल्या पराभवाचे वृत्त सांगितले. ब्रह्मदेवाने शांत



पणे सर्व ऐकून घेतले आणि कश्यप मुनींना बरोबर घेऊन वज्रांगाकडे आला. त्याची समजूत घालून त्याने इंद्राला सोडविला आणि इंद्राचे राज्य त्याला परत देवविले.

वज्रांग म्हणाला—"हे ब्रह्मदेवा! मी धनवैभव मिळविण्यासाठी स्वर्गावर स्वारी केली नव्हती. हा इंद्र दुष्ट आहे. त्याने माझ्या आईला दुःखी केले होते. याचे अपराध अगणित आहेत. हा क्षमा करण्या-लायक देव नाही. तरी मी आपल्या म्हण-ण्याबाहेर नाही. त्याला मी मुक्त करतो. त्याने माझ्या आईला दुःखी कष्टी केले नसते तर आज त्याची ही गति झाली नसती."

ब्रह्मदेवाने ते ऐकून वज्रांगाला वर मागून घेण्यास सांगितले.

"मला परब्रह्मस्वरूप व प्राण्यांवर दया, या शिवाय आणखी काही नको. हे दोन वर द्यावेत." अशी वज्रांगाने प्रार्थना केली.

ब्रह्मदेवाला ते ऐकून फारच आनंद झाला. त्याने वरांगी नांवाच्या एका सुंदर कन्येशी त्याचा विवाह करून दिला. त्यानंतर ब्रह्मदेव कश्यप मुनींबरोबर निघून गेला.

वज्रांग शिवभक्त होऊन आपल्या गावी परतला आणि शिवचरणी लीन होऊन त्याच्या भक्तीत त्याने पुढील आयुष्य घालविले.

काही काळ लोटल्यावर वज्रांग आपल्या बायकोच्या सेवेने संतुष्ट होऊन तिला म्हणाला–"वरांगे! तू, तुला पाहिजे तो वर मागून घे!"

"महाशक्तिशाली इंद्र आदिक देवांना जिंकण्याची शक्ति असलेला आणि जगात ज्याची कीर्ति अजरामर राहील असा पुत्र [illegible]

बायकोच्या तोंडून तो वर ऐकून वज्रांगला फार वाईट वाटले. वरांगीने स्त्रीसुलभ स्वभावाने देवांचा विरोध करणारा पुत्र मागून घ्यावा याचे त्याला फार दुःख झाले. कारण अशा पुत्राला विष्णु फार काळ जिवंत राहू देणार नाही. तरी वज्रांगला दिलेले वचन मोडण्याची इच्छा नव्हती. म्हणून त्याने ब्रह्मदेवाचे स्मरण करून घोर तपश्चर्या केली.

ब्रह्मदेवाने दर्शन देऊन वज्रांगाला स्मरण करण्याचे कारण विचारले. म्हणाला–"मी तुझ्या तपश्चर्येवर संतुष्ट झालो आहे. माग, तुला वाटेल तो वर मागून घे."

वज्रांग म्हणाला–"देवा! माझ्या पत्नीला देवांना जिंकू शकेल असा पुत्र हवा आहे. तिला तसा पुत्र मिळावा, ही इच्छा आहे."

ब्रह्मदेवाने तो वर दिला आणि अंतर्धान पावला. वज्रांगने घरी परत आल्यावर बायकोला तिची इच्छापूर्ण होईल हे सांगितले.



# ११४. मिलन येथील चर्च

जगातील मोठ्या चर्चपैकी याचा दुसरा नंबर आहे. (याच्याहून मोठे रोमचे सेंट पीटर चर्च आहे.)

मिलनचे चर्च फक्त संगमरवरी दगडाचे आहे आणि जगातील मोठ्या आश्चर्यांपैकी एक प्रमुख आहे. याचे बांधकाम इ. स. १३८६ मध्ये आरंभ होऊन १८०५ पर्यंत चालू होते. याची लांबी ४८६ फूट आणि रुंदी २८९ फूट आहे. त्याच्या मधल्या गोपुरात कुमारीची (येशु ख्रिस्ताच्या आईची) मूर्ती आहे. हे चर्च पृथ्वीच्या पातळीपासून ३५४ फूट उंचीवर आहे. या चर्चच्या वरच्या बाजूला १३५ गोपुरे आहेत. ही स्वर्गाचे स्वरूप दर्शवितात, असे म्हणतात. दुसऱ्या महायुद्ध प्रसंगी इटलीच्या इतर शहरांबरोबर मिलन शहरावर देखील बांबहल्ला झाला होता.





# अमरवाणी

यथा कंदुकपातेनोत्पतत्यार्यः पतन्नपि
तथा त्वनार्यः पतति मृत्पिंडपतनम् यथा ॥ १ ॥

[ बुद्धिमान पुरुषार्थी माणसाचे पतन झाले तरी तो चेंडूसारखा जमिनीवर आपटल्यावर वर उडतो. पण मूर्ख माणसाचे पतन झाले की तो मातीच्या गोळ्यासारखा जागचा जागी पडून राहातो. ]

गज, भुजंग, विहंगम बंधनम्,
शशि, दिवाकरयोर्ग्रहपीडनम्,
मतिमताम् च विलोक्य दरिद्रताम्
विधिरहो बलवानिति मे मतिः ॥ २ ॥

[ हत्ती, साप अगर पक्षी पकडला जाणे, सूर्यचंद्रांना ग्रहण लागणे आणि बुद्धिमानाला दारिद्र्य भोगावे लागणे ह्या गोष्टी पाहून प्रारब्ध किती बलवान असते, हे कळते. ]

सृजति तावदशेषगुणाकरम्
पुरुषरत्नमलंकरणम् भुवः,
तदपि तत्क्षण भंगि करोति चे
दहह कष्टमपंडितता विधेः ॥ ३ ॥

[ पृथ्वीला विभूषित करणाऱ्या पुरुषाची सृष्टि करून प्रारब्ध एका क्षणात त्याला ठार करते. असे प्रारब्ध किती कमी बुद्धीचे आहे ! ]

प्रारब्ध



# लक्ष्मीचा जय

विष्णूच्या मनात एकदा असा अहंकार झाला की तोच सर्व सृष्टीचा पालन-कर्ता आहे. एकदा तो त्याची पत्नी लक्ष्मी हिला म्हणाला–"देवी! सर्व लोकपाल, दिक्पाल माझ्या अधीन आहेत सर्व प्राण्यांचे रक्षण मीच करतो. माझे भक्त कधी तुझ्या मायाजाळ्यात सांपडत नाहीत."

ते ऐकून लक्ष्मी म्हणाली–"हा सर्व निव्वळ भ्रम आहे तुमचा. सर्व सृष्टीची खरी अधिकारिणी आणि मूळ मीच आहे. माझ्या कृपेवरच कोणाचे थोरपण अगर लहानपण अवलंबून आहे. माझी कृपा ज्याच्यावर असेल त्याचाच सर्व आदर करतात. पाहिजे तर मी म्हणते त्याची खात्री करून घ्यावी."

विष्णूने ते आव्हान स्वीकार केले आणि दोघे मर्त्यलोकात योगी व योगिणीचा वेष करून निघाले.

एका गावी एक वैष्णव भक्त वैश्य रहात असे. त्या दिवशी सोसाट्याचा वारा सुरू झाला. प्रथम गारा पडू लागल्या आणि त्याच्या पाठोपाठ मुसळधार पाऊस पण पडू लागला. रस्त्यावर हिंडणारांना तर कुड-कुडत कोठे तरी निवाऱ्याला उभे रहावे लागले. त्याप्रमाणे योगी वेष धारण करून आलेला विष्णू कुडकुडत वैश्याच्या दारा-समोर आला.

त्या वैश्य वैष्णवभक्ताने योग्याला घरात बोलाविले आणि नम्रपणे म्हणाला–"योगीश्वर! हे आपलेच घर आहे. आत यावे आणि आपल्याला वाटेल त्या खोलीत विश्राम करावा. मी सर्व घर आपणांला दाखवून देतो."

त्या योग्याने त्या वैश्याबरोबर हिंडून सर्व घर पाहिले. एका कोपऱ्यात एक लहानशी कोठडी होती. ती दाखवून

श्री गोपाळ स. महाजन



म्हणाला—"मला ही खोली आवडली. मी येथे राहतो."

"योगीश्वर! अहो या खोलीत आम्ही घरातली फालतू अडगळ ठेवली आहे. या अडगळीच्या खोलीत आपल्याला मी कसे ठेवू?" वैश्य म्हणाला.

"आम्ही योगी लोक, आम्हांला एकांत हवा." योगी म्हणाला.

शेवटी नाइलाजाने वैश्याने ती कोठडी रिकामी करवून तेथे योग्याच्या उतरण्याची व्यवस्था करून दिली. योग्याने आत खोलीत गेल्यावर दाराला आतून कडी लावून घेतली. तेव्हां विष्णूच्या मनात सहज आले—"माझ्या भक्ताने मला आश्रय दिला. पण बिचाऱ्या लक्ष्मीचे काय होणार कोणास ठाऊक? तिला कोण आश्रय देणार? तिला नक्कीच हार मानावी लागेल."

इतक्यात योगिणीच्या वेषात लक्ष्मी त्याच वैश्याच्या घरासमोर येऊन कुडकुडत उभी राहाली. वैश्य तिचे रूप लावण्य पाहून थक्कच झाला. बाहेर येऊन म्हणाला—"माते योगिणी! या भयंकर थंडीत तू अशी उघड्यावर कां फिरते आहेस? तुला हरकत नसेल तर माझ्या घरी थोडा वेळ विश्रांति घे!"

योगिणी घरात येऊन म्हणाली—"मला फार तहान लागली आहे."

वैष्णव भक्त वैश्याने नोकराकरवी तिला पाणी मागवून दिले. ते पाणी योगिणीने आपल्या झोळीतून एक सोन्याचा रत्नखचित पेला काढून त्यात ओतले व सर्व पाणी पिऊन पेला बाहेर फेंकून दिला व म्हणाली—"मला आणखी पाणी पाहिजे."

वैश्य चकित होऊन विचारू लागला—"माते योगिणी! तू तो सोन्याचा पेला असा फेंकून कां दिलास?"

योगिणी म्हणाली—"आम्ही एकदां तोंड लावून ज्या पेल्याने पाणी पितो तो पेला पुन्हां तोंडाला लावीत नाही. आणखी पाणी मागवा."

अशा तऱ्हेने योगिणीने चार पांच पेले पाणी पिऊन झाल्यावर फेकून दिले.

ते सर्व पाहून वैश्याला परमावधीचे आश्चर्य वाटले. वैश्याची बायको तीनचार वर्षां पूर्वीच वारली होती. त्याने विचार केला की ही योगिणी आपल्याशी लग्न करून आपली बायको म्हणून रहायला तयार झाली तर किती बरे होईल? आणि तिला तो म्हणाला—"माते योगिणी! तुझे सर्व कपडे भिजून ओले चिंब झाले आहेत. कपडे बदलून जेवून घे आणि त्यानंतर पाहिजे तितका वेळ विश्रांती घे. हे घर आपलेच समज आणि या घरात तुला जी खोली आवडेल त्या खोलीत खुशाल पाहिजे तितके दिवस रहा."

त्या वैश्याबरोबर योगिणीने त्याचे सर्व घर पाहिले. आणि योगी उतरला होता त्या कोठडीजवळ उभी राहून म्हणाली—"ही खोली पाहू कशी आहे ती! हीच माझ्या राहण्या लायक आहे."

"पण माते योगिणी! ही खोली तुझ्या लायक नाही. या शिवाय या खोलीत थोड्याच वेळेपूर्वी एक योगी उतरला आहे. म्हणून तू दुसरी खोली पाहून घे."

पण योगिणीने त्याच खोलीसाठी हट्ट धरला. म्हणून वैश्याने दाराची कडी बाहेरून वाजविली आणि म्हणाला—"योगिराज! आपण ही खोली रिकामी करून दुसऱ्या खोलीत रहावे."





"मी या वेळी योगासने करीत आहे. जागेवरून हालू शकत नाही. मी याच खोलीत राहणार." योग्याने आंतून उत्तर दिले.

वैश्याने योगिणीला दुसऱ्या खोलीत राहण्यास आग्रह केला. पण तिने त्याच खोलीत राहण्याचा हट्ट धरला. म्हणून वैश्याने पुन्हां दाराची कडी वाजविली आणि नम्रपणे दुसऱ्या खोलीत जायला योग्याला सांगितले. परंतु योग्याने त्या गोष्टीस साफ नकार दिला. तेव्हां वैश्याला राग आला. त्याने आपल्या नोकरांना बोलावून धक्के मारून दार उघडविले. आणि नोकरांना म्हणाला–"या योग्याला बाहेर काढा."

वैश्याचे नोकर योग्याला हात धरून बाहेर काढू लागलेले पाहून योगिणी हसू लागली. नंतर ती वैश्याला म्हणाली– "तुम्ही जाऊन माझे जेवण वाढून घेऊन या." वैश्य सैंपाकघरात जाऊन योगिणीच्या जेवणाची तयारी करू लागला.

वैश्य निघून गेल्यावर योगिणी खोली-बाहेर आली आणि योग्याला म्हणाली– "पाहिलात माझा प्रताप? सर्व जगावर कोणाचा अधिकार आहे?"

विष्णूने काहीच उत्तर दिले नाही.

दोघे काही बोलल्याशिवाय किंवा कोणाच्या नजरेस पडल्याशिवाय घराबाहेर पडले आणि एका देवळात आले. ते विष्णूचेच देऊळ होते. एका राजाने ते बांधले होते. त्याच्या आज्ञेप्रमाणे देऊळ ठरल्यावेळी उघडले जाई अगर बंद होई. ते देऊळ पाहून विष्णूला या देवळात लक्ष्मीची डाळ शिजणे शक्य नाही असे वाटले. या शिवाय त्या देशाचा राजा व प्रजा विष्णुभक्त होते. कोणी लक्ष्मीला कुळदैवत मानीत नसे. म्हणून विष्णु लक्ष्मीला म्हणाला–"देवी! आपण येथेच काही दिवस राहालो तर कसे?"

"स्वामि! मी आपली दासी आहे! आपली इच्छाच माझी इच्छा. पण येथे आपल्याला माझ्या पेक्षा जास्त मान मिळेल असे मात्र समजून घेऊ नका. सर्वत्र जय माझाच आहे." लक्ष्मी म्हणाली.

दोघांनी देवळात जाऊन विश्राम केला.

दुसऱ्या दिवशी पहाटे पुजाऱ्याने देवळात येऊन पुजा सुरू केली. दर्शनाला भक्त मंडळी येऊ लागली. सर्वांनी विष्णूचे स्तोत्र म्हटले. एकानेदेखील लक्ष्मीचे नाव घेतले नाही. विष्णूला आनंद गगनात मावेनासे झाले.

ठीक दुपारच्या वेळी राजाच्या आज्ञे-प्रमाणे देऊळ बंद झाले.

विष्णु लक्ष्मीला चिडविण्यासाठी म्हणाला–"देवी! पाहिलेस एकानेदेखील लक्ष्मीचे स्तोत्र म्हटले नाही. बोल आतां, आहे की नाही जगावर माझाच अधिकार?" विष्णूने लक्ष्मीला विचारले.

लक्ष्मी स्मित करून म्हणाली–"इतका वेळ आपण भक्तांना दर्शन देऊन थोडे दमलां असाल. म्हणून थोडा वेळ विश्राम करावा म्हणते."

त्याच वेळी राजाच्या मनात पुजारी नियमितपणे देऊळ उघडतो किंवा बंद करतो की नाही याची खात्री करून घेण्याचा विचार आला. तो एका व्यापा-ऱ्याचा वेष धारण करून देवळात आला व पुजाऱ्याला म्हणाला–"अहो भटजी! मी दर्शनाला आलो आहे. देऊळ उघडा."



"शेटजी, बारा वाजल्यानंतर गर्भगाराचे दार उघडू नये अशी राजाज्ञा आहे. आतां संध्याकाळी चार वाजल्यानंतरच दर्शन होईल." पुजारी व्यापाऱ्याला म्हणाला.

"अहो भटजी, पण त्यात कायदा कसला आणि राजाज्ञा कसली? मला गुपचुप दर्शन करून घेऊ द्या. मी परदेशी आहे. देवाच्या अभिषेकासाठी एक हजार रुपये देणार आहे मी! मला लवकर परत जायचे आहे. देवाच्या अभिषेकासाठी एक हजार रुपये दिल्याचे पुण्यकार्य घडले तर कृतार्थ होईन." असे सांगून व्यापारी पुजाऱ्याकडे पाहू लागला.

समोर आलेल्या लक्ष्मीला पाठ दाखविणे शहाणपणाचे नाही, असे पुजाऱ्याला वाटले.

या व्यापाऱ्याला दर्शन घडले तर त्यात नुकसान काय? राजाला तरी हे कसे काय कळणार? असा विचार करून पुजारी व्यापाऱ्याला म्हणाला–"शेटजी! या, तुम्हांला असे परत पाठविणे बरं वाटत नाही मनाला. देवाला राग येईल."

व्यापाऱ्याने एका हजारा ऐवजी दोन हजार देवासमोर ठेवले. आणि देवाच्या पायां पडून तीर्थ प्रसाद घेऊन निघून गेला.

राजवाड्यात गेल्यावर राजाने पुजाऱ्याला बोलावून विचारले–"काय भटजी? देवाची पुजा वगैरे वेळेवर होते आहे ना?"

"होय महाराज! सर्व व्यवास्थित चालू आहे!" पुजारी म्हणाला.

"राजाज्ञेप्रमाणे ठरल्या वेळेला देऊळ उघडण्याची व बंद होण्याची व्यवस्था चालू आहे ना? नाहीतर अवेळी कोणी शेट-सावकार आला की उघडले देऊळ! असे नाही ना होत?" राजाने विचारले.

आपले बिंग फुटल्याचा पुजाऱ्याला संशय आला. म्हणून जरा बतावणी करीत [illegible] होते व उघडते. समजा, आपण एकांतात विश्रांती घेत पडलां आहां आणि राणी सरकार आल्या तर पाहरेकरी द्वार उघडील की नाही? अशाच तऱ्हेने लक्ष्मीमातेनेच देवळात जायचे आहे म्हटले तर द्वार उघडावे लागते!"

पुजाऱ्याच्या त्या चातुर्यपूर्ण उत्तरावर खूष होऊन राजाने त्याला आणखी दोन हजार रुपये बक्षिस देऊन निरोप दिला.

अशातऱ्हेने विष्णूला लक्ष्मीसमोर हार मानावी लागली. लक्ष्मी विष्णूला म्हणाली–"स्वामि! आपण माझी माया पूर्णपणे ओळखली नाही. सृष्टीच्या सुरवातीपासूनच माझा हा अधिकार चालू आहे. जे दिसते ते आणि जे दिसत नाही ते सर्व माझ्याच कृपेने चालू आहे. वास्तविक पुरुषाची शक्ति नारीच आहे. आपल्यात जी शक्ति आहे, म्हणजे आपली लीला ती मीच नाही का? म्हणून माझ्या पराभवाचा प्रश्नच उद्भवत नाही."





# शिलारथ

[१०]

[भैरवांच्या हातात सापडून जीवदत्त व भवानी दोघे बळी जाणार होते. त्यांना खड्गवर्माने गावकऱ्यांच्या मदतीने वांचविले. भैरव पळून जंगलात निघून गेले. गांवकऱ्यांचा निरोप घेऊन जीवदत्त व खड्गवर्मा डोंगर उतरून खाली खोऱ्यात गेले. तेथे एक मनुष्य एका झाडाभोंवती पाहारा देत होता. खड्गवर्मा व जीवदत्त दोघांनी त्याला घेरले. पुढे–]

खड्गवर्माने तलवार उपसून तलवारीचे टोक पाहरेकऱ्याच्या छातीचा नेम धरून ठेवले आणि त्याच्या नजरेला नजर भिडवून उभा राहला. जीवदत्तपण आपली कुबडी उगारून उभा राहला. पाहरेकऱ्याचे जणु काही रक्तच गोठले होते. जीवदत्तने त्याला विचारले–"अरे असा स्यालास कां? तुझ्या सारख्या भितऱ्याच्या हातात हा परशु शोभत नाही?"

ते ऐकून त्या तरुण वीराला भयंकर राग आला. दांत ओठ चावून त्याने एकदां खड्गवर्माकडे व जीवदत्तकडे पाहिले व म्हणाला–"तुम्ही लपून छपून चोरासारखे माझ्यावर वार करायला आला आहां. तरी मी तुम्हांला असा सोडणार नाही. तुमच्या पैकी कोणाला पहिल्याने यमसदनास पाठवायचे हाच विचार माझ्या मनात चालू होता."




"हे बघ, ही बडबड बंद कर आणि या निर्जन जंगलात या झाडा भोवती तू एकटा पाहारा कां देत होतास, हे मला सांग." असे म्हणत खड्गवर्मा एक दोन पावले पुढे सरकला.

ते पाहून स्वतःचा बचाव करण्यासाठी तो पाहारेकरी परशु उगारून खड्गवर्मावर धांवला. परंतु जीवदत्तने तितक्यात त्याला गुडघ्यावर एक लाथ मारून त्याचा परशु आपल्या कुबडीने उडविला आणि त्याला खाली पाडले.

खड्गवर्माने तो परशु उचलला व स्मित करून म्हणाला—"काय हो बहादूर! द्वंद्वयुद्धांत आपल्या पैकी कोणाचे ही काही नुकसान झाले नाही. तुमच्यात अजून दम उरला असेल तर उठून उभा रहा, नाही तर झाडाला टेकून उभा रहा आणि तू म्हणालास तो तुझा कोण आणि हे झाड त्याच्या किल्ल्याचा बुरुज म्हणालास ही काय भानगड आहे, सांग."

"आता तरी तुमचाच जय झाला आहे. परंतु बुरुजाचे गुपित कळल्याने तुमचा फायदा होण्या ऐवजी नुकसानच होईल. मी एकाला ते गुपित सांगितले आणि तो बिचारा सिंहा वाघाच्या तोंडचा घास झाला." पाहारेकरी म्हणाला.

"अस्सं! तर मग मोठीच आसामी दिसते आहे! ते गुपित आम्हांला कळलेच पाहिजे. लवकर सांग काय ते. काळोख पडण्यापूर्वी आम्हांला डोंगर उतरून खाली गेले पाहिजे." जीवदत्त म्हणाला.

"मी ते गुपित सांगितले तर या खोऱ्यात तुम्हांला फुकटचे मरणमात्र येईल." पाहरेकरी म्हणाला.

खड्गवर्मा परशु उगारून म्हणाला—"तुझे डोके उडवू की गुपित काय ते सांगतोस?"

आतां मात्र पाहारेकऱ्याची गाळण उडाली. म्हणाला—"तर मग ऐका! या झाडावर पांच सहाफुटावर तुम्हांला झाडाच्या खोडात पोकळी दिसेल. त्या [illegible] तर तुम्हांला भुयाराची वाट दिसेल. त्या वाटेने भुयार पार करून अर्ध्या तासाने तुम्हांला पलीकडचा डोंगर लागेल. परंतु वाटेत तुम्हांला माझ्या मेहुण्याची टेकडी लागेल. तेथे तुम्हांला निश्चितच यमलोक मिळेल.

जीवदत्त क्षणभरच विचार करीत उभा राहला. पाहरेकरी म्हणाला त्याचा अर्थ समजून घेण्याचा प्रयत्न करीत म्हणाला—"म्हणजे तुझ्या मेहुण्याच्या किल्ल्यात कोणाला प्रवेश मिळू नये या साठी तू येथे पाहारा देत होतास. नंतर त्या डोंगरापर्यंत पोंचायला हीच जवळची चोरवाट आहे. म्हणून आतां आम्ही याच वाटेने जाणार. तुझ्या मेहुण्याने आम्हांला वाटेत अडविले तर आम्ही प्रथम त्याचा शेवट करू."

"मी संध्याकाळी परत येऊन पाहीन. तुम्ही माझ्या मेहुण्याच्या हातातून वांचून जिवंत राहलात तर तुम्ही दोघे खरेच मोठे वीर आहात हे उघड होईल." पाहारेकरी म्हणाला.

पाहारेकरी म्हणाला ते ऐकून दोघांना ती एक थट्टाच वाटली. नंतर दोघे झाडावर चढून त्याच्या पोकळीत शिरले. प्रथम जीवदत्त रांगत पुढे निघाला. त्याच्या पाठीमागून खड्गवर्मा प्रवेश करताना



पाहारेकऱ्याला त्याचा परशु परत देत म्हणाला—"म्हणजे सूर्यास्तापूर्वीच तुझ्या मेहुण्याच्या किल्ल्यात शिरले पाहिजे, होय ना? तू पोचण्यापूर्वी आम्हांला तो किल्ला जमिनदोस्त करावा लागेल."

खड्गवर्मा आणि जीवदत्त दहा मिनिटे रांगत पुढे सरकत जात होते. त्यांना एका जागी मोठी शिळा दिसली. त्या शिळेच्या मध्यभागी एक खुंटा होता. तो धरून दोघांनी ती शिळा हलविली तर ती बाहेर निघून आली आणि एक भूयाराची वाट लागली.

खड्गवर्मा, आपण या भुयारातल्या चोर वाटेने थोडे वांकून चालली की झाले. परंतु



हातातले शस्त्र मात्र सज्ज ठेवले पाहिजे." असे सांगून जीवदत्त उभा राहाला आणि चालू लागला.

त्या चोर वाटेत मधूनमधून उजेड होता. थोड्या वेळाने ती चोरवाट संपली व दोघे पलीकडे उजेडात उघड्या आकाशाखाली येऊन पोचले. त्याना समोर एक विस्तीर्ण मैदान दिसले. काही घरे व झोपड्या पण दिसल्या. त्यांच्या बाजूला एक टेकडी होती. त्या टेकडीवर एक किल्ल्यासारखा दगडी राजवाडा दिसला.

"पाहरेकऱ्याच्या मेहुण्याचा वाडा हाच असावा. खोऱ्याच्या मध्यभागी हा बांधला आहे. हा पाहून यात राहणारा कोणी मनुष्य नसून राक्षस असावासे वाटले." जीवदत्त म्हणाला.

"असेल तो राक्षसच! पण येथवर येऊन परत फिरण्याचा प्रश्नच नाही." खड्गवर्मा म्हणाला.

"छे! ते अशक्यच! आपण सकाळपासून उपाशी आहो. सूर्यास्त व्हायला जास्त वेळ सुद्धा नाही. आज रात्री या महालातल्या राजाचे पाहुणे होऊनच आपल्याला रहावे लागणार आहे." जीवदत्त स्मित करून म्हणाला.

दोघे बाहेर येऊन समोर एक झोपडी दिसली तिकडे निघाले. थोडा वेळ झोपडीत विश्रांती घेऊन टेकडीवरच्या महालात जाण्याचा त्यांचा विचार होता.

दोघे झोपडीपासून शंभर पावलावरच पोचले असतील तेव्हां एकाएकी त्यांना एका स्त्रीची किंकाळी ऐकू आली. त्या पाठोपाठ सिंहाचे गुरगुरणे ऐकू आले. सर्वच अनपेक्षित होते. खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना आश्चर्यच वाटले. दोघे आवाज आला त्या दिशेने पळत निघाले. त्याच वेळी एक बाई बाहेर धावत आली आणि एक सिंह तिचा पाठलाग करीत धावत आला.

जीवदत्त व खड्गवर्मा सिंहाला जणुकाही आव्हान करीतच पुढे सरसावले आणि त्या सिंहाच्या आणि स्त्रीच्या मधोमध जाऊन उभे राहिले. ती स्त्री [illegible] त्या महालाकडे धावत म्हणाली–"सिंहाच्या जिवाला अपाय होऊ देऊ नका. तो आमचा पाळलेला सिंह आहे. माझे यजमान तुम्हांला जिवंत सोडणार नाहीत."

ते ऐकून दोघे चकितच झाले. पण जीवदत्तला विचार करायला वेळ देखील मिळाला नाही. सिंह एकदा गरजला व त्याने जीवदत्तावर उडी मारली. परंतु जीवदत्तने त्याची उडी चुकविली आणि शिताफीने चटदिशी सिंहाच्या पाठीवर जाऊन बसला.

सिंह मोठमोठ्याने ओरडू लागला आणि मागच्या पायावर उभा राहून जीवदत्तला पाडण्याचा प्रयत्न करू लागला. परंतु जीवदत्त आपल्या कुबडीने सिंहाच्या डोक्यावर व तोंडावर वार करू लागला. सिंह चवताळून मैदानात वाट फुटेल तिकडे पळू लागला.

खड्गवर्मा जीवदत्तला ऐकू जाईल इतक्या मोठ्याने म्हणाला–"जीवदत्त! त्याला ठार करू नकोस. त्याला थोडे शिकवले तर घोड्यासारखे त्याच्यावर चढून आपल्याला जाता येईल.

तिकडे ती स्त्री टेकडीवर जाऊन पोचली. टेकडीच्या एका बाजूला बोट दाखवीत ओरडून म्हणाली–"पहा ते आले! तुम्ही दोघे पळा! नाहीतर त्यांच्या तावडीत सापडल्यावर तुम्हांला जिवंत सुटका मिळणे शक्य नाही."





खड्गवर्माने त्या बाजूला वळून पाहिले. सात आठ फूट उंच एक विशाल देहधारी मनुष्य येत असलेला दिसला. त्याच्या हातात एक दगडाची गदा होती. एक हरण व एक रानटी डुक्कर एका खांद्यावर आणि दुसऱ्या खांद्यावर ससे आणि पक्ष्यांनी भरलेले जाळे टाकून तो पुढे येत होता. त्याच्या पुढे व मागे पाळलेल्या कुत्र्यासारखे वाघ सिंह चालत होते. त्यावरून शिकारीच्या वेळी तो विशाल देहधारी त्या रानटी जनावरांचा उपयोग करीत असावा हे उघड होते.

त्याने सिंहावर बसलेल्या जीवदत्तला सर्वात आधी पाहिले. तो चकितच झाला. त्याच वेळी हातात तलवार घेऊन आपल्या मित्राकडे निघालेल्या खड्गवर्मावर त्याची दृष्टि पडली.

त्याने आपल्या खांद्यावरचे डुक्कर व हरण खाली टाकले व दुसऱ्या खांद्यावरचे जाळे दुसरीकडे टाकून गदा घेऊन दोघांवर हल्ला करण्याच्या हेतूने पुढे सरसावला आणि दोघांना उद्देशून म्हणाला–"कोण रे तुम्ही? माझ्या सिंहावर चढून बसण्याची तुमची हिंमत!"

"मी तुझ्या बायकोला या सिंहाच्या हातातून वांचविले. पाहिजे तर तिला विचारून घे." असे म्हणत जीवदत्तने सिंहाच्या डोक्यावर कुबडी मारली आणि उडी मारून सिंहावरून खाली उतरून आला.

त्या विशालकाय मनुष्याने एकदा आपल्या बायकोकडे पाहिले. नवऱ्याची उग्र मुद्रा पाहून ती धावत धावत पुढे येऊन आपल्या नवऱ्याजवळ उभी राहली आणि म्हणाली–"यांना सोडा, हे जातील आपल्या वाटेने पुढे."

"यांना सोडूं? हे माझ्या राज्यात गुप्तपणे शिरले आहेत. झाडाजवळ पाहारा देत उभा असलेला तुझा भाऊ काय करतो आहे, कोणास ठाऊक? झोपला असेल." असे म्हणत तो दोघांकडे संशयी नजरेने पाहून [illegible] नंतर थोड्या वेळाने म्हणाला–"काय रे! झाडाजवळ पाहारा देणाऱ्या माझ्या मेहुण्याला तुम्ही ठार तर केले नाहीत ना?"

"नाही, त्याची गरजच पडली नाही. त्याने स्वतःच आम्हांला येथवर पोचण्याची चोरवाट दाखविली. आम्ही हिसकावून घेतलेला त्याचा परशु त्याला परत दिला." जीवदत्त म्हणाला.

"ठीक, तर मग तुम्ही आल्या वाटेने मुकाट्याने निघून जा. आणि पुन्हा इकडे येण्याचे साहस दाखवू नका. माझ्या बायकोने तुम्हांला सोडून द्यायला सांगितले म्हणून तुम्ही जिवंत सुटत आहां." त्या राक्षसी माणसाने दांत ओठ चावीत म्हटले.

ते ऐकून खड्गवर्माला राग आला. त्याने तलवार उपसून व जीवदत्तकडे एकदाच पाहिले आणि म्हणाला–"जीवदत्त! आम्हांला कोणाचे असले दयादाक्षिण्य नको आहे. या दुष्टाचा काटा काढलाच पाहिजे!" असे म्हणत तो त्या दीर्घकाय माणसाला म्हणाला–"काय रे, तुला आपल्या शक्तीचा गर्व चढलेला दिसतो आहे. माझी ही तलवार तुझा गर्व भंग करण्यास समर्थ आहे!"

ते आव्हान ऐकून तो दीर्घकाय आपली गदा घेऊन खड्गवर्मावर धावून गेला.



परंतु त्याच्या बायकोने त्याला पुन्हा अडविले व म्हणाली–"हे धर्मयुद्ध नव्हे. हे दोघे वीर आहेत. दोघांनी घोड्यावर बसून युद्ध करावे, तेव्हांच खरा पराक्रमी कोण आहे हे कळेल."

ते ऐकून दीर्घकाय थोडा शांत झाल्यासारखा दिसला. खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना संबोधन करून तो म्हणाला–"माझी बायको म्हणते ते बरोबर आहे. आज रात्री तुम्ही दोघे माझे पाहुणे म्हणून रहा. उजाडल्यावर मी तुम्हांला एकेक घोडा देईन. मी एक घोडा घेऊन येईन. माझ्या शस्त्रागारातून तुम्हांला जे पाहिजे ते शस्त्र निवडून घ्या. पण पहिल्याने हे

सांगा, तुमच्या पैकी माझ्याशी प्रथम युद्धाला कोण येणार ?"

"पहिल्याने आणि शेवटी मीच तुझ्याशी द्वंद्व-युद्ध करणार. मला फक्त एक घोडा दे. ही कुबडीच माझे शस्त्र. तू मला जिंकलेस तर तू माझ्या मित्राला पण जिंकलेस हे मी मान्य करीन." जीवदत्त म्हणाला.

"शाबास ! तुझ्या साहसाची वाखाणणी केल्याशिवाय मला राहवत नाही. तरमग चल माझ्या बरोबर आपण किल्ला चढून वर जाऊ." दीर्घकाय म्हणाला.

दोघे दीर्घकाय बरोबर किल्ला चढू लागले. दीर्घकाय शिकार करून आणलेली जनावरे व पक्षी खांद्यावर टाकून आणि सिंहा वाघांना त्यांच्या त्यांच्या पिंजऱ्यात पोचवून टेकडीवरच्या त्याच्या महालात पोचला.

नंतर त्याने खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना एक मोठे दालन दाखविले आणि [illegible] विश्रांती घ्या. आत सैपाकाला आवश्यक सर्व वस्तू ठेवलेल्या आहेत. या मारून आणलेल्या जनावरांचे मांस शिजवून माझी बायको स्वत: आणून देईल."

दोघांनी सैपाकाला सुरवात केली. सुमारे नऊ वाजण्याचा सुमारास जेवणखाण उरकून त्यांचा झोपण्याचा विचार होता. मध्यरात्रीच्या सुमारास त्यांना त्यांच्या खोलीबाहेर कोणीतरी चालत आल्याचा भास झाला. तेवढ्यांत त्यांना दोघांचा परस्पर बोलण्याचा आवाज ऐकू आला–"ते दोघे गर्विष्ठ तरुण येथवर आले होते का? त्यांची प्रेते कोठे आहेत? ते अजून जिवंत असतील तर मी या परशूने त्यांची खांडके उडवून टाकतो."

तो आवाज परशुधारी पाहरेकऱ्याचा होता, हे ओळखायला त्यांना फारसा वेळ लागला नाही. खड्गवर्मा तलवार उपसून दाराजवळ जाऊ लागला.

(क्रमश:)




# तीन कन्या

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि स्मशानाच्या दिशेने मौनपणे चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा ! तू चिकाटीने निर्भय होऊन प्रयत्न करीत आहेस. तू नक्कीच यशस्वी होशील. प्राचीनकाळी दृढ निश्चय असलेला सिंहकेतूचा मुलगा विजय आपल्या प्रयत्नात यशस्वी झाला व त्याला राज्यप्राप्ती पण झाली. मी तुला त्याची गोष्ट सांगतो." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

प्राचीन काळी विदेह् नावाच्या देशात सिंहकेतु नावाचा राजा राज्य करीत असे. त्याला प्रताप, उल्हास व विजय असे तीन मुलगे होते. राजाचे मुलांवर फार प्रेम होते. तिघां भावंडांचे पण परस्परांवर भ्रातृप्रेम होते.

वेताळाच्या गोष्टी



सिंहकेतूला राज्याधिकाराची तेवढी आवड नव्हती. राज्यकारभारात त्याचे मन मुळीच लागत नसे. म्हणून त्याने आपल्या मोठ्या मुलाला वयात आल्यावर राज्याभिषेक करून द्यायचे ठरविले. प्रतापला बोलावून तो म्हणाला—"मी तुझा राज्याभिषेक करून देऊन वानप्रस्थाश्रमात जावे म्हणतो."

परंतु प्रताप त्या गोष्टीस कबूल झाला नाही व वडिलांना म्हणाला—"बाबा! तुम्हांला राज्यकारभार नकोसा वाटू लागला असेल तर तुम्ही या राज्याचे तीन तुकडे करून आम्हां तिघां भावंडांना वाटून द्या. मला एकट्याला हे राज्य नको."

[illegible] मान्य नव्हती. त्यांनी दरबार बोलावून त्यात या विषयावर विचार केला. एक वृद्ध दरबारी म्हणाला—"मी एक उपाय सुचवितो. तिघां राजकुमारांना देशाटनास पाठवावे व कोणती तरी अनमोल वस्तु घेऊन यायला सांगावे. सर्वांत मूल्यवान वस्तु जो आणील त्याचा राज्याभिषेक करून द्यावा."

सर्वांना तो सल्ला पसंत पडला आणि त्याप्रमाणे तिघे राजकुमार देशाटनाला निघाले.

त्या दिवसीची रात्र राजकुमारांना एका जंगलात काढावी लागली. एका झाडाखाली पालापाचोळा अंथरून त्यावर झोपण्याची तयारी ते करू लागले. त्याच वेळी तेथे एक साधु आला व म्हणाला—"मुलांनो! रात्रभर उघड्यावर झोपणे धोक्याचे आहे. तुम्ही माझ्या झोपडीत रात्रभर विश्रांती घेऊन उजाडल्यावर पुढे जा."

राजकुमार साधूचे आभार मानून त्याच्या झोपडीत गेले. हरणाजिनावर तिघे झोपले.

दुसऱ्या दिवशी त्यांना जाग आली तेव्हां त्यांना झोपडीच्या भिंतीवर तीन कन्यांची चित्रे दिसली. त्या कन्या एकीहून एक सुंदर होत्या. परंतु त्यांच्या अंगावर निरनिराळ्या रंगाची वस्त्रे होती. एकीच्या अंगावरची वस्त्रे सोनेरी होती, तर दुसरीच्या अंगावरची रुपेरी आणि तिसरीच्या अंगावरची पोलादी रंगाचीच होती. त्या तिघींना पाहून त्यांच्याशीं विवाह करून घेण्याची इच्छा अनुक्रमे तिघां भावांच्या मनात उपजली. दोघे मोठे आपापल्या निवडीप्रमाणे कन्येशी विवाह करण्यासाठी वाटेल त्या तऱ्हेचा धोका सहन करण्यास तयार होऊन निघाले. परंतु तिसरा विजय त्यांना म्हणाला—"अशी घाई करू नका. त्या कोण व कोठे राहतात याची साधूजवळ चवकशी करून मग जाणे बरोबर होईल."

साधु, उजाडताच तिघां राजकुमारांना जाग येण्यापूर्वीच कोठे तरी निघून गेला होता व दुपारी परत आला. तो आल्याचे राजकुमारांना कळले देखील नाही. ते एक टक लावून त्या तिघां कन्यांकडे पहात होते.

ते पाहून साधु त्यांना म्हणाला—"मुलांनो! त्यांचा मोह सोडा. तुम्हांला त्यांची भेट घेणे देखील अशक्य. त्या आहेत तेथपर्यंत पोचणे देखील धोक्याचे आहे."

तिघे राजकुमार म्हणाले—"हे उदार साधु पुरुषा! त्या कन्यांना प्राप्त करण्यासाठी आम्हांला आमचा जीव धोक्यात घालावा लागला तरी आम्ही त्याला तयार आहो. म्हणून तुम्ही त्या कोठे आहेत व



तेथपर्यंत जाण्याचा मार्ग कोणता हे सांगण्याची कृपा करावी."

"तुमचा एवढाच हट्ट असेल तर मी ते सांगतो, पण मी तुम्हांला बजावून ठेवतो त्या आहेत तेथपर्यंत तुम्हांला पोचता आले तरी तुम्ही जिवंत परत येऊ शकणार नाही." परंतु राजकुमार आपल्या निश्चयापासून ढळले नाहीत."

ते पाहून साधु मोठा प्रताप याला झोपडीबाहेर घेऊन गेला आणि म्हणाला—"ज्या मुलीवर तुझे मन बसले आहे ती सुवर्णकन्या आहे. तू सरळ पश्चिम दिशेने चालत जा. सूर्यास्ताच्या सुमारास तुला एक ओढा लागेल. त्याच्या काठाकाठाने



गेलास तर तुला एक पूल लागेल. ओढ्याच्या काठावरचा एक अणकुचीदार दगड घेऊन तू तो आपल्या तळहातावर मार. जे रक्त येईल त्याचे तीन थेंब तू ओढ्याच्या पाण्यात सोड आणि म्हण–"सुवर्णकन्येच्या निवासाकडे जाण्याची वाट दाखव." लगेच तुला सोन्याचा जिना दिसेल. तो जिना चढून गेलास तर तुला दोन दारे दिसतील–"एका बाजूला सोन्याचे दार असेल व दुसऱ्या बाजूला लाकडी दार असेल. तू पहिल्याने लाकडी दार उघडून आत जा. आत तुला एक सोन्याची सुरई दिसेल. ती घेऊन तू बाहेर ये आणि सोन्याचे दार उघडून आत जा. तेथे तुला सुवर्णकन्या दिसेल. तिच्यावर तू सुरईतले पाणी शिंपड, म्हणजे तुला सुवर्णकन्येबरोबर पुष्कळसे सोने पण मिळेल. जा, तुला यशप्राप्ती होवो!"

साधूने सांगितल्याप्रमाणे प्रताप पश्चिम दिशेकडे निघाला. आणि सूर्यास्ताच्या सुमारास त्याला एक ओढा लागला. त्या ओढ्याच्या काठाकाठाने चालत असता त्याला एक पूल लागला. तेथे तो म्हणाला–"सुवर्णकन्येच्या निवासाकडे जाण्याची वाट दाखव." पण साधूने सांगितल्याप्रमाणे सोन्याचा जिना दिसला नाही. तेव्हां त्याची चूक त्याच्या लक्षात आली. लगेच त्याने एक अणकुचीदार दगड घेऊन तळहाताला एक भोक पाडले आणि रक्ताचे तीन थेंब पाण्यात पाडून साधूने सांगितले तसे म्हणाला. लगेच त्याला सोन्याचा जिना दिसला. तो घाईघाईने जिना चढून वर गेला. त्याला सोन्याचे व लाकडाचे अशी दोन निरनिराळी दारे दिसली. परंतु सुवर्णकन्येला बघण्याच्या अधीरपणामुळे तो साधूने त्याला सांगितले होते ते विसरला. तो लाकडी दाराकडे न जाता सरळ सोन्याचे दार उघडून आत गेला. सुवर्णकन्या एका सिंहासनावर बसलेली होती. तिने प्रतापला विचारले–"तू माझा उद्धार करायला आला आहेस नाही का? ये लवकर माझ्याजवळ येऊन बस."

[illegible] सुवर्ण कन्येने हातातल्या सोन्याच्या कांडीने त्याच्या अंगाला स्पर्श केल्याबरोबर तो जागच्या जागी एक सुवर्ण मूर्ति होऊन गेला.

तिकडे साधूने एक आठवडा वाट पाहिली. धाकटे दोघे आपल्या पसंतीप्रमाणे कन्येला पाहण्यासाठी उतावीळ झाले होते. पण साधू म्हणाला–"तुम्ही तिकडे जाण्याचा विचार सोडा. तुमचा मोठा भाऊ मरण पावला आहे. तो परत येणे शक्य नाही."

परंतु मधला उल्हास याने जाण्याचा हट्टच धरला. तेव्हां साधू त्याला झोपडीबाहेर घेऊन गेला व म्हणाला–"मुला! सरळ दक्षिण दिशेने जा. दुपारच्या सुमारास तुला एक टेकडी दिसेल. त्या डोंगराच्या पायथ्याशी एक शमी वृक्ष आहे. त्या झाडाच्या फांदीला एक चांदीची काठी अडकवलेली दिसेल. ती काठी तू जमिनीवर आपटलीस की तुला एका भुयारात जाण्याची वाट लागेल. त्या वाटेने तू पुढे गेलास तर तुला एकीकडे रुपेरी झोपडी आणि दुसरीकडे रुपेरी पिंजरा टांगलेला दिसेल व त्यात एक रुपेरी पक्षी असेल. तू त्या रुपेरी पक्ष्याचे पीस काढून घे आणि रुपेरी कन्येवर टाक, म्हणजे तिच्या सर्व शक्ती नाहीशा होतील व ती तुला वश होऊन जाईल. तिच्याबरोबर तुला पुष्कळ चांदीपण मिळेल."

उल्हास साधूचा आशीर्वाद घेऊन निघाला. दुपारच्या सुमारास तो टेकडीजवळच्या शमी वृक्षाजवळ येऊन पोचला.





परंतु रुपेरी झुडुपाला टांगलेल्या रुपेरी पिंजऱ्यातल्या रुपेरी पक्ष्याची गोष्ट तो पार विसरून गेला. तो सरळ रुपेरी झोपडीत शिरला. तेथे त्याला ती रुपेरी कन्या दिसली. तिने प्रेमाने उल्हासला जवळ बोलाविले आणि तो जवळ आल्यावर तिने रुपेरी कांडीने त्याच्या अंगाला स्पर्श केला मात्र तो एक रुपेरी पुतळा होऊन जागच्या जागी उभा राहिला.

आणखी एक आठवडा लोटला. तरी प्रताप किंवा उल्हास दोघांपैकी कोणी परत आला नाही. तरी विजयच्या मनात आपल्या पसंतीच्या कन्येकडे जाण्याची इच्छा कमी झाली नाही. साधूने त्याविरुद्ध त्याचे मन वळविण्याचा प्रयत्न करून पाहिला. म्हणाला–"मुला! तुझे दोघे भाऊ हट्टाला बळी पडून प्राणाला मुकले. तू तरी शहाणपणाने वाग. परत जा घरी."

विजय म्हणाला–"हे साधुपुरुषा! माझे नाव विजय आहे. माझा पराजय होणे शक्यच नाही."

साधु म्हणाला–"तू जाण्याचा निश्चयच केला असशील तर उत्तर दिशेने जा. सूर्योदयाच्या सुमारास तुला एक खंदक लागेल. तेथे तुला एक पोलादी झोपडी आणि एक साधी झोपडी दिसेल. तू प्रथम साध्या झोपडीत जा. तुला त्या झोपडीत एक तलवार मिळेल. ती घेऊन तू पोलादी झोपडीत प्रवेश कर. त्या झोपडीत पोलादी कन्या दिसेल. तिच्या हातातली तलवार तू आपल्या तलवारीने उडवून खाली पाड. तेव्हां ती पोलादी कन्या तुला वश होईल. तुला पुष्कळ पोलाद पण मिळेल. तुला आपल्या प्रयत्नात यशप्राप्ती होवो." साधूने त्याला आशीर्वाद देऊन निरोप दिला.

विजय उत्तर दिशेने चालत चालत सूर्योदयाच्या सुमारास एका खंदकाजवळ येऊन पोचला. तेथे त्याला एक पोलादी झोपडी व एक साधी झोपडी मिळाली. तो प्रथम साध्या झोपडीत जाऊन तलवार घेऊन बाहेर आला आणि नंतर पोलादी झोपडीत त्याने प्रवेश [illegible] तेथ सिंहासनावर पोलादी कन्या बसलेली होती. तिने विजयला जवळ बोलाविले. विजयने तिच्या जवळ पोचताच आपल्या हातातल्या तलवारीने तिच्या हातातली तलवार उडवून खाली पाडली. त्याबरोबर त्या कन्येच्या चारीबाजूला पसरलेली माया नष्ट झाली. दोन्ही झोपड्यापण अदृश्य झाल्या. पोलादी कन्येने विजयला आपला पति म्हणून वरले.

पोलादी कन्येला सुवर्ण कन्या व रुपेरी कन्या कोठे आहेत हे माहीत होते. दोघी तिच्या बहिणीच होत्या. तिघी शापबद्ध होत्या. पोलादी कन्येच्या मदतीने विजयने आपल्या दोघां वडील भावांचा व दोघी कन्यांचा उद्धार केला.

त्यानंतर तिघे राजकुमार सपत्नीक साधूच्या झोपडीत आले. त्यांनी साधूचे आभार मानले आणि त्याचा निरोप घेऊन स्वदेशी गेले.

राजकुमारांच्या पत्नींचे रूप पाहून राजघराण्यातली सर्व मंडळी चकित झाली. राजाने थाटामाटाने तिघांचा विवाह समारंभ केला आणि त्यानंतर सिंहासनाला कोण वारस होण्या योग्य आहे याचा निर्णय देण्यासाठी राज्यसभा बोलाविली.

राजा वडीलधाऱ्या दरबारी मंडळीस म्हणाला–"माझ्या तिघां मुलांनी माझ्या



इच्छेला मान देऊन देशाटन केले आणि आपापल्या पसंतीप्रमाणे विवाह करून व वस्तू घेऊन आले आहेत. प्रताप सोने घेऊन आला आहे तर उल्हास चांदी आणि विजय पोलाद घेऊन आला आहे. आतां मी कोणाला वारस करावे याचा निर्णय तुम्हीच द्यावा."

दरबारी मंडळींनी परस्परांचा सल्ला घेऊन सर्वात वृद्ध माणसाकरवी आपला निर्णय दिला. तो म्हणाला–"महाराज! विजय हाच गादीला वारस होण्या योग्य आहे!"

त्याप्रमाणे राजाने विजयचा राज्याभिषेक करविला.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने राजाला विचारले–"राजा, त्या वृद्ध दरवाऱ्याने सोने व चांदी आणून देणाऱ्या दोघां वडील मुलांना वारस करण्याची शिफारस न करता विजयलाच वारस करण्याची शिफारस कां केली? त्याच्या दोघा मोठ्या भावांना ज्या कामात यश आले नाही त्या कामात त्याला यश आले, म्हणून का? की राजा होण्याची त्याच्यात इतर विशेष अशी काही योग्यता होती म्हणून? या सर्व गोष्टींचे उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुला त्याचा परिणाम माहीत आहेच, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"वृद्ध दरबारी मंडळींनी विजयला यश मिळाले किंवा तो आपल्या दोघां मोठ्या भावांना सोडवून घेऊन आला या गोष्टीपेक्षा तो व त्याचे भाऊ कोणती वस्तु घेऊन आले, या गोष्टीचाच विचार केला असावा. कारण परीक्षा त्या गोष्टीचीच होण्याचे [illegible] सोने व चांदी घेऊन आले. त्या वस्तू मूल्यवान अवश्य आहेत. त्यांचे आर्थिक दृष्ट्या मूल्य जास्त असले तरी देशाच्या भरभराटीच्या व रक्षणाच्या दृष्टीने पोलादच जास्त उपयोगी पडणारा धातू आहे. नांगर, कुदळ, फावडी, कोयता, कुऱ्हाड, विळे ही शेतीला आवश्यक असलेली हत्यारे व देशरक्षणास लागणारी शस्त्रसामुग्री यास पोलादच जास्त उपयोगी आहे. म्हणून तोच त्यांना गादीला वारस होण्यालायक वाटला. विजय आपल्या भावांसारखा अधीर उतावळेपणाने वागला नाही. साधूच्या सूचनेप्रमाणे वागला म्हणून त्याला यश मिळाले. राजपुरुषांत साहसाबरोबर शहाणपण व धैर्यपण आवश्यक आहे. ते विजयमध्ये होते."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# खरा न्याय

फार प्राचीन काळची ही गोष्ट आहे. एका राज्यात दूर एका कोपऱ्यात गवळीवाडा होता. तेथे एक वीरदास नावाचा एक तरुण युवक रहात असे. सर्व तरुण मंडळी वीरदासला आपला पुढारी मानीत आणि तो सांगेल तसे वागत. त्याला ते वीर राजा म्हणत आणि 'छोटा राजा' या नावाने सर्व गावकरी ओळखीत.

एक दिवशी सर्व तरुण गुराखी आपली गुरे चरायला घेऊन रानात गेले असता दूर एक ब्राह्मण सकुटुंब जात असलेला वीरदासला दिसला. वीरदास आपल्या साथी गुराख्यांना म्हणाला–"विचारा ब्राह्मण दुःखी कष्टी दिसतो आहे. त्याला बोलावून घेऊन या. थोडा वेळ विश्रांती घेतल्यावर त्याला बरे वाटेल."

त्याप्रमाणे तरुण गुराख्यांनी त्या ब्राह्मणाला थोडा वेळ विश्रांती घेऊन पुढे जाण्यास विनंती केली. पण ब्राह्मण चिडल्यासारखा म्हणाला–"कसली विश्रांती? आम्हांला, जितके लवकर होईल तितके, लवकर या राज्याबाहेर जाऊ दे."

पण ती तरुणमंडळी म्हणाली–"आम्ही तुम्हांला या उन्हात जाऊ देणार नाही. आमच्या छोट्या राजाची आज्ञा आहे."

तेव्हां ब्राह्मण त्यांच्या बरोबर वीरदास बसला होता तेथे आपल्या बायको मुलांना घेऊन आला. वीरदास ब्राह्मणाला जवळ आलेला पाहून उठून उभा राहला आणि नमस्कार करून म्हणाला–"हे ब्राह्मण श्रेष्ठा, आपल्या मनाला कसले तरी कष्ट असल्यासारखे दिसत आहे. आमच्या हातून आपली काही सेवा होण्यासारखी असल्यास अवश्य आज्ञा करावी."

वीरदासाचा नम्रपणा पाहून ब्राह्मण थक्कच झाला. म्हणाला–"मी हे राज्य

सौ. शांता दामले



सोडून निघालो आहे. या राज्यात न्याय धर्म काहीच उरला नाही. म्हणून मी आपले घरदार सर्व सोडून सकुटुंब परदेशी निघालो आहे. मी एक पंडित आहे. मला जी थोडी-फार मिळकत होत होती त्यावर माझ्या कुटुंबाचा उदरनिर्वाह चालत होता. एकदा एका श्रीमंताने माझ्यावर कृपा करून मला एक नीलमणी बक्षिस दिला. मी तो मणी आपल्या पांडित्याची पारख करणाऱ्या उदार श्रीमंत गृहस्थाची आठवण म्हणून ठेवून दिला होता. परंतु पुढे मला माझ्या मुलीच्या लग्नासाठी कर्ज काढावे लागले. म्हणून मी तो एका सावकाराकडे गहाण ठेवून एक हजार सुवर्ण मुद्रा त्याच्याकडून घेतल्या. [illegible] लग्न झाले आणि एका वर्षाने मी सावकाराच्या एक हजार सुवर्ण मुद्रा व्याजासकट परत दिल्या आणि आपला मणि परत मागितला. व्यापाऱ्याने सुवर्ण मुद्रा ठेवून घेतल्या, परंतु मणि परत दिला नाही. म्हणाला–"तुमचा मणि माझ्या बायकोच्या पेटीत आहे. ती माहेरी गेली आहे. ती परत आल्यावर मी तो परत आणून देईन."

त्या नंतर मी मागायला गेलो म्हणजे प्रत्येक वेळी तो काहीतरी थापा मारून मला रिकाम्या हाताने परतवी. कधी किल्ली सापडत नाही म्हणे, कधी बायको पुन्हा माहेरी गेली म्हणे आणि एकदा तर नोकराकरवी स्वत: घरात नसल्याचे पण सांगून पाठविले.

शेवटी मी मणि परत करणार आहेस की नाही दटावून विचारले तेव्हां म्हणाला–"मी तुला तो परत केला आणि पुन्हां मागायला येतो आहेस लाज नाही वाटत तुला?" असे सांगून नोकराकडून धक्के मारून त्याने मला घराबाहेर पाठविले.

म्हणून मी सरळ राजदरबारी आपले गाऱ्हाणे नेले. परंतु व्यापाऱ्याने लांच देऊन दोन साक्षीदार उभे केले. साक्षीदारांनी चवकशीच्या वेळी, त्यांच्या समक्ष सावकाराने मणि परत दिल्याची खोटी साक्ष दिली.

[illegible] बद्दल व एका प्रतिष्ठित सावकाराविरुद्ध खोटी फिर्याद केल्याबद्दल मलाच उपदेश केला. म्हणाला–"पैशाचा लोभ एक तर वाईट आणि ब्राह्मणाला तर तो मुळीच असता कामा नये. अशी खोटी फिर्याद करणे फार मोठा अपराध आहे. परंतु पांडित्याचा आदर करून काही शिक्षा केल्या-शिवाय सोडतो." असे सांगून मला निरोप दिला.

अशा राज्यात अन्याय आणि अपमान सहन करून राहण्यापेक्षा परदेशात उपाशी राहून मरण आले तरी पत्करले. म्हणून मी घरदार सोडून परदेशी निघालो आहे." ब्राह्मणाने त्याच्यावर जो अन्याय झाला होता त्याचे वर्णन वरील शब्दात केले.

ते सर्व ऐकून वीरदास त्याला म्हणाला–"ब्रह्मश्रेष्ठ! आपण मला एकदा संधी द्यावी. आपल्यावर अन्याय झाल्याचे मी राजाला पटवून देण्याचा प्रयत्न करून पाहातो." असे सांगून वीरदासने आपल्या मित्रांना ब्राह्मणाच्या राहण्याची कोठे व काय व्यवस्था करावयाची हे समजावून सांगितले.

दुसऱ्या दिवशी वीरदासने राजाकडे एक पत्र लिहून पाठविले. त्यात नीलमणीच्या



फिर्यादी संबंधी राजाकडून न्याय न झाल्याचा व त्यामुळे महाराजांच्या कीर्तीला बट्टा लागण्याची भीति असल्याचा उल्लेख होता. शेवटी असे ही लिहिले होते–"महाराजांनी अनुमति दिल्यास मी महाराजांसमक्ष पुन्हां चवकशी करून न्याय निवाडा करावा म्हणतो–आपली नम्र प्रजा–छोटा राजा."

ते पत्र वाचून महाराजांना आश्चर्य वाटले. परंतु 'छोटा राजा' कसा न्याय निवाडा करतो, पाहूया तर, असा विचार करून राजाने अनुमति दिली. वीरदास ब्राह्मणाला घेऊन राजवाड्यात आला. त्याने प्रथम महाराजांना तो कोणत्या प्रकारे चवकशी करणार आहे हे थोडक्यात



सांगितले आणि त्यासाठी आवश्यक सरकारी सहाय्य देण्याची विनंती केली.

एक गवळी राजदरबारात न्याय विचार करणार असल्याचे कळले तेव्हां राणी-बरोबर अंतपुरांतील स्त्रिया आपापल्या दासीबरोबर तो न्यायविचार पाहण्यासाठी दरबाराच्या आजूबाजूच्या गवाक्षांजवळ येऊन बसल्या. सावकार, ब्राह्मण व साक्षीदार निरनिराळ्या खोल्यात बसवून ठेवण्यात आले. एका वेळी फक्त एकालाच बोला-वण्यात आले. वीरदास स्वतः महाराजांच्या सिंहासनाच्या पायाजवळ बसला.

सर्वात प्रथम ब्राह्मणाने आपली फिर्याद नोंदवून त्याच्यावर सावकाराने केलेल्या अत्याचाराविषयी जबानी दिली. वीरदासने निरनिराळ्या नीलमण्यांचे खडे दाखवून ब्राह्मणाला रंग हलका की गडद होता याचे परिमाण विचारून घेतले. निरनिराळ्या कमी अधिक प्रमाणात असलेल्या निळ्या रंगाची काही वस्त्रे दाखवून त्याच्या नीलमण्याच्या जास्तच जास्त जवळ कोणते वस्त्र आहे हे देखील विचारून घेतले.

त्यानंतर सावकाराने त्याच्याकडे गहाण ठेवलेल्या नीलमण्याच्या रंगाचे परिमाण ब्राह्मणासारखेच सांगितले. नंतर त्याने आपली जबानी दिली.

दोघांच्या जबानीत नीलमण्याच्या रंगाच्या परिमाणाविषयी फरक मुळीच नव्हता. फरक होता तो फक्त एवढाच होता की ब्राह्मणाने नीलमणी परत मिळाला नाही हे सांगितले आणि सावकाराने परत केल्याचे सांगितले. ब्राह्मणाने नीलमणी ठेवला तेव्हां कोणी साक्षीदार नसल्याचे सांगितले तर सावकाराने नीलमणी परत केला तेव्हां दोन साक्षीदार असल्याचे सांगितले.

पहिल्या साक्षीदाराने जबानी दिली तीत त्याने ब्राह्मणाकडून परत केलेल्या एक हजार सुवर्ण मुद्रातील पाचशे सुवर्ण मुद्रा कर्जाऊ घेतल्याचे व त्यावेळी दुसरा कोणी व्यक्ति किंवा साक्षीदार हजर नसल्याचे सांगून ब्राह्मणाला सावकाराने नीलमणि एका पिवळ्या कपड्यात गुंडाळून दिला असल्याचे व त्याने तो लगेच कनवटीला खोचून ठेवल्याचे सांगितले. मण्याच्या रंगाचे परिमाण विचारता तो त्याचे बरोबर उत्तर देऊ शकला नाही.

त्यानंतर वीरदासने दुसऱ्या साक्षीदाराला बोलावून त्याची जबानी घेतली. दोघां साक्षीदारांच्या साक्षीत तफावत दिसून आली. दुसरा साक्षीदार म्हणाला की तो सावकाराकडे गेला असता तेवढ्यात ब्राह्मण आला. त्याने रंगाचे जे परिमाण सांगितले त्यात देखील फरक दिसून आला.

वीरदास त्या साक्षीदाराला पाठवून दिल्यावर महाराजांना म्हणाला—"दोघे साक्षीदार खोटे आहेत हे त्यांच्या जबानी-वरून स्पष्ट झाले आहे. सावकाराने या खोट्या साक्षीदारांना कां बोलाविले ह्या गोष्टीची माहिती मिळाली की न्याय निवाडा देणे सोपे जाईल. त्यापाऱ्याने सरळ उत्तर दिले नाही तर त्याच्या बायकोला बोलावून तिला, ती माहेरी गेली होती की नाही, गेली होती तर केव्हां केव्हां आणि केव्हां परत आली, तिच्या पेटीत नीलमणी कधी ठेवला होता का आणि तिची किल्ली हरवली होती का वगैरे गोष्टींची चवकशी करता येईल. जरूर तर सावकाराच्या घराची



झडती घेऊन नीलमणी कोठे ठेवला आहे का पाहता येईल."

न्याय विचार करतांना किती बारीकीने विचार करावा लागतो हे तेव्हां कोठे राजाच्या लक्षात आले. त्याने साक्षीदारांना बोलावून खोटी साक्ष दिल्याबद्दल फांशीची शिक्षा देण्याची धमकी दिली तेव्हां दोघांनी राजाचे पाय धरले व सावकाराने प्रत्येकाला पांचपांच सुवर्णमुद्रा देऊन खोटी साक्ष द्यायला सांगितले असल्याचे कबूल करून, त्यांना त्या नीलमण्याविषयी प्रत्यक्षात काही एक माहीत नसल्याचे सांगून महा-राजांना माफी करण्यास आर्जवाने विनंती केली.

साक्षीदारांनी अशा तऱ्हेने सर्व उघड सांगितल्यावर सावकाराला आपला अपराध स्वीकारावा लागला. त्याने ब्राह्मणाला त्याचा नीलमणी दिला. त्यानंतर राजाने त्या सावकाराला व दोघां साक्षीदारांना सक्त मजुरीची शिक्षा करून तुरुंगात पाठविले.

राजाने वीरदासला त्याच्या चातुर्याबद्दल शाबासकी दिली. नंतर पंडिताने वीरदासाला हात दाखवायला सांगून म्हटले– "महाराज! मला ज्योतिषशास्त्र व हस्तसामुद्रिक दोन्हींचे थोडे ज्ञान आहे. या तरुणाच्या हातावर राजयोग स्पष्ट आहे. कदाचित कोणी राजा राज्य भ्रष्ट होऊन अज्ञातवासात असावा. त्यांचाच हा वारस असेल कदाचित."

शेजारच्या खोलीत बसलेल्या राणीने ते ऐकले व बेशुद्ध होऊन जमिनीवर पडली. औषधोपचार केल्यावर ती शुद्धीवर आली तेव्हां राजाने राणीला असे एकाएकी बेरी येण्याचे कारण विचारले. राणीने [illegible] गुपित सांगितले. म्हणाली– "महाराज! आपणांस आठवत असेल, राजमातेने आपणांस, माझ्या पोटी आपल्या सारखाच सावळ्या रंगाचा मुलगा झाल्यास दुसरा विवाह करण्यास सांगितले होते. तेव्हां मीच आपल्या भवितव्याचा विचार करून दासीच्या सहाय्याने गवळीवाड्यात त्याच दिवशी बाळंत झालेल्या एका बाईच्या गोऱ्या मुलाला आपला मुलगा म्हणून ठेवून स्वतःच्या पोटच्या गोळ्याला त्या बाईच्या खाटेवर नेऊन ठेवविले होते. वीरदास हा तोच मुलगा आहे.

राणीने सांगितलेली गोष्ट खरी ठरण्यास जास्त साक्षपुराव्याची गरज राहिली नाही. कारण ती दासी व गवळीवाड्यातील ती बाई अद्यापि जिवंत होत्या. तेव्हां राजाने वीरदासाला आपला युवराज म्हणून स्वीकारून, आजपर्यंत ज्याला युवराजासारखे वाढविले होते त्याला व त्याच्या आईवडिलांना वर्षासन ठरवून दिले.





# अक्षय संपत्ति

[ २ ]

अबू अल कासिम खलीफाचा हात धरून एका दालनात गेला. त्या दालनात धूप, चंदनादिकाचा वास दरवळत होता. अबू अल कासिम खलीफांशेजारी बसून आत्मचरित्र सांगू लागला. म्हणाला–

"माझे वडील अब्दुल अजीज कायरो नगराचे एक सुप्रसिद्ध जव्हेरी होते. माझ्या वडिलांचे आजोबा व पणजोबादेखील तिथलेच राहणारे होते. माझ्या वडिलांनी कायरोच्या श्रीमंत व्यापाऱ्यात फार मोठी मानाची जागा मिळविली. इजिप्तच्या सुलतानाला हेवा वाटू लागला आणि तो माझ्या वडिलांचे काही नुकसान करण्याच्या विचारात असल्याचे कळताच माझे वडील आपले सर्व धन घेऊन बसऱ्याला पळून गेले.

पुढे काही दिवसांनी माझ्या वडिलांचे लग्न बसऱ्याच्या सर्वात श्रीमंत व्यापाऱ्याच्या एकुलत्या एका मुलीशी झाले. मी आपल्या वडिलांचा एकुलता एक मुलगा होतो. माझ्या लहानपणीच माझे आईबाप वारले. म्हणून मला दोन्ही घरची अलोट संपत्ति मिळाली. परंतु मी दोन वर्षात ती सर्व उडवून टाकली. त्यानंतर त्या गावात राहणे मला लाजिरवाणे वाटू लागले. म्हणून मीं आपले घरदार सर्व विकले व जे पैसे मिळाले ते घेऊन एका व्यापाऱ्यांच्या तांड्याबरोबर निघालो. मोसुल, डेमास्कस वगैरे शहरे पाहात आपल्या वाडवडिलांच्या कायरो शहरी येऊन पोंचलो.

कायरो शहरातले महाल व इमारती पाहून मला माझ्या वडिलांची आठवण झाली. माझ्या वडिलांनी त्याच गावात किती ऐश आरामात दिवस काढले असतील याचा विचार करीत मी दुःखी मनाने नील नदीच्या



काठाकाठांन कायरोच्या सुलतानाच्या महालापाठीमागच्या जागी येऊन पोचलो. मी सहज मान वर करून पाहिले तर खिडकीत एक सुंदर तरुण स्त्रीचा चेहरा दिसला आणि क्षणार्धात तो अदृश्य झाला. तो चेहरा पुन्हा दृष्टीस पडावा म्हणून मी रोज संध्याकाळी त्याच जागी तासनतास जाऊन बसू लागलो. परंतु पुन्हां ते चंद्रमुख मला दिसले नाही.

एक दिवशी मी उजाडताच त्या खिडकीकडे एक टक पहात बसून राहालो. त्या दिवशी संध्याकाळपर्यंत ते चंद्रमुख दृष्टीस पडले नाही. परंतु खिडकीवर पडलेला पडदा हलला आणि त्याच्या आड कोणीतरी हलल्याचा भास झाला.

दुसऱ्या दिवशी खिडकीवरचा पडदा बाजूला सरकला आणि चंद्रासारखा सुंदर चेहरा एकदम चमकला. मी स्वतःचे जीवित त्या चेहऱ्यावर ओवाळून टाकले आणि म्हणालो–"हे स्वर्गातल्या अप्सरे! मी एक परदेशी आहे. या कायरो शहरात पाऊल टाकतांच एक शुभ शकुन घडावा तसा तुझा चेहराच प्रथम मला दिसला."

त्या सुंदर स्त्रीच्या चेहऱ्यावर भीतीची सावली दिसली. परंतु दुसऱ्या क्षणाला ती खिडकीबाहेर वांकून मला ऐकूं जाईल इतक्या स्वरात म्हणाली–"तू आतां जा आणि मध्य रात्रीच्या सुमारास ये!"

माझ्या आनंदाला पारावार नव्हता. मी आपले दारिद्रय, कष्ट आणि दुःख पार विसरून गेलो. मी धर्मशाळेत येऊन स्नान केले आणि उत्तमात उत्तम कपडे घालून त्या खिडकीच्या खाली जाऊन पोचलो. खिडकी खाली एक शिडी लोंबत होती. मी साहस करून शिडी चढून वर गेलो. त्या गगनभेदी महालात दोन तीन दालने पार करून आत गेलो. तिसऱ्या दालनांत ती माझी वाट पहात बसलेली दिसली.

मी तिला माझ्या जीविताची करुण कहाणी सांगितली. ती ऐकून तिच्या डोळ्यातून सहानुभूतीची आंसवे घळघळा गळू लागली.

[illegible]र ति[illegible] आप[illegible] आत[illegible]गितले. म्हणाली–"मी सुलतानाची बेगम आहे. माझे नांव लबीबा. माझ्या सवती मला नेहमी पाण्यात पाहतात. म्हणून मला दांपत्यसुखाचा लाभ नाही. तुझे अनन्य प्रेम ओळखून तुझ्या सारखा पती लाभलातर मी किती सुखी होईन, हाच विचार माझ्या मनात घर करून बसला आहे."

आम्ही दोघे बोलतच होतो इतक्यात कोणी तरी दारावर थाप दिली. लबीबा भीतीने अक्षरशः थरथर कापू लागली. म्हणाली–"आपण धोक्यात सापडलो. सुलतानाशिवाय कोणी माझ्या दारावर अशी थाप मारीत नाही."

तिचे म्हणणे खरे ठरले. दुसऱ्या क्षणाला दहा काळे गुलाम त्या दालनात शिरले. त्यांनी मला उचलून खिडकीबाहेर नदीत फेकून दिले. दुसऱ्या खिडकीतून लबीबाला नदीत फेकलेले मी पाहिले. मी कसा तरी वांचलो. परंतु माझ्यासाठी नदीत पडलेल्या त्या निरपराध तरुणीला मी पुष्कळ प्रयत्न करूनही वांचवू शकलो नाही.

मी इजिप्त देश सोडला आणि बगदादला आलो. माझ्याजवळ फक्त एकच दीनार उरला होता. थोडी मिठाई, फळे, अत्तर वगैरे वस्तु विकत घेऊन त्या एका थाळचात ठेवून गाणे गात रस्त्यावर फिरत त्या वस्तु विकू लागलो. मला ईश्वरकृपेने गळा चांगला मिळाला होता म्हणून पुष्कळ लोक





जमत व मालाची चांगली विक्री होई. एक दिवशी बगदादचा सर्वात मोठा व्यापारी माझ्याकडे आला आणि माझ्या जवळचे एक फळ विकत घेऊन मला आपल्या दुकानात बोलावून घेऊन गेला. त्याने मला माझे नाव विचारले.

मी म्हणालो—“शेट साहेब! मला त्या जुन्या आठवणी काढून दुखवू नका. माझ्या काळजाला पीळ पडतो.”

त्या दुकानदाराने विषय बदलून मला या नवीन धंद्यात काय मिळते हे विचारले आणि दहा दीनार देऊन निरोप दिला.

त्या दिवसापासून तो रोज काहीतरी वस्तु विकत घेई आणि मला भरपूर किंमत देई. मला त्याचा स्वभाव आवडला, म्हणून मी मनमोकळेपणाने आपला जीवन वृत्तांत सांगितला. सर्व ऐकून घेऊन तो मला म्हणाला—“अबू अल कासिम आजपासून तू मला स्वतःच्या मुलासारखा झालास. माझ्याजवळ तुझ्या बापाहून जास्त धन व संपत्ति आहे. मला मूलबाळ नाही. तुझ्या हातातला हा थाळा दे फेकून.”

दुसऱ्याच दिवशी तो दुकान बंद करून माझ्याबरोबर बसऱ्याला निघाला. बसरा त्याचे जन्मस्थान होते.

बसऱ्याला माझ्या ओळखीची अनेक स्नेही मंडळी होती. मी आपल्या मानलेल्या बापाला सुखी करण्यासाठी आवश्यक सर्व व्यवस्था करून दिली. तो मला म्हणे, ‘अबू! तुला मी प्रथम पाहिले तो मुहूर्त खरोखरच चांगला होता. तू इमानदार निघालास व स्वभावाने इतका प्रेमळ निघालास, याहून आनंदाची गोष्ट ती काय असणार? माझ्या मागून तूच माझ्या या सर्व संपत्तीला वारस आहेस.’

मी एक वर्षभर आपल्या या प्रेमळ पित्याची जिवेभावे सेवा केली. मित्रांच्या संगतीत फुकट पैसे व वेळ घालविणे सोडून दिले. दुर्दैवाने माझा हा प्रेमळ पिता आजारी पडला. तो जवळ बोलावून मला म्हणाला—“मुला! बापाला मुलाकडून आयुष्यभरात जे सुख मिळते ते मला एका वर्षात तुझ्या-कडून मिळाले. मी तुला आशीर्वाद देतो, तू आयुष्यभर आनंदाने सुखासमाधानाने राहशील. देवाची कृपा तुझ्यावर कायम राहील. मला अल्लाचे बोलावणे येण्यापूर्वी एक काम पुरे करावयाचे आहे. कित्येक पिढ्यांपासून आमच्याकडे इतकी संपत्ति जमा झाली आहे की मोठमोठ्या राजे-रजवाड्यांनासुद्धा लाभणे शक्य नाही.

त्यानंतर त्यांनी पुष्कळ गोष्टी कानात सांगितल्या. म्हणाले—“आमची संपत्ति कधी कमी होणेच शक्य नाही. म्हणून तू वाटेल तितका मनसोक्त दानधर्म करीत जा. त्याहून जास्त महत्वाची गोष्ट म्हणजे, तू स्वतःची तब्येत सांभाळून राहात जा. अल्लाची तुझ्यावर सर्वदा मेहेरबानी राहो. तो तुला सुखी ठेवील.” एवढे सांगून त्यांनी डोळे मिटले ते पुन्हां उघडले नाहीत.

मी आमच्या वंशाच्या रीतीरिवाजा-प्रमाणे आपल्या वडिलांची अन्त्येष्टी क्रिया पुरी केली आणि त्यांची संपत्ति जेवढी होती ती आपल्या ताब्यात घेतली. माझ्या मित्रमंडळींनी मला यावेळी पुन्हां बजावून सांगितले की मी ज्या तऱ्हेने पैसे ‘उधळतो’ आहे त्या तऱ्हेने माझ्या हातात करवंटी येईल. माझा खर्च वाढत गेला, दानधर्म वाढत गेला. बसऱ्याला येणाऱ्या प्रत्येक



अतिथीपाहुण्याचा सत्कार करणे मी आपले आद्य कर्तव्य समजून ते पाळीत आलो. पण अजून मला गरीबी आलेली नाही.

माझी अशी खर्चीक राहणी पाहून बसऱ्याच्या अधिकाऱ्यांना हेवा वाटू लागला. एक दिवशी शहराचा कोतवाल माझ्याकडे आला. म्हणाला—“शहरातला कोण किती खर्च करतो याच्याशी मला काय कर्तव्य, पण माझे पोट भरले पाहिजे की नाही?” म्हणजे त्याला लांच हवी होती.

“तुमच्या कुटुंबाचा मासिक खर्च एकंदर किती आहे म्हणता?” मी विचारले.

“अहो, दररोज दहा दीनार तरी खर्च होतोच.” कोतवाल म्हणाला.



"एवढ्यात भागते? अशक्य! मी शंभर दीनार दररोज आपल्याकडे पाठवीत जाईन. किंवा महिन्याभराची रक्कम माझ्या मुनीमांकडून आपण येऊन घेऊन जात जा." मी म्हणालो.

तो बसऱ्याचा मुख्य कोतवाल होता. वेड्यासारखा माझ्याकडे पाहू लागला. मी त्याची समजूत घालून त्याला निरोप दिला.

दुसऱ्या दिवशी काजीसाहेब आले आणि म्हणाले—"मुला! जकात मुसलमान धर्मियांचे एक जुने कर्तव्य म्हणून मानले जाते. आपल्या प्राप्तीचा पंचमांश गरिबांना वांटावा लागतो."

मी म्हणालो—"आपण काय म्हणालात ते नाही मला कळले. मी पुष्कळ दिवसांपासून आपल्याकडे येऊन एक निवेदन करावे म्हणत होतो. गरीबांमध्ये वांटायला मी दर महिन्याच्या सुरवातीला एक हजार रुपये पाठवावे म्हणत होतो. माझे वडील वारले त्याला दोन वर्षं होत आली. ते चोवीस महिने व चालू महिना मिळून पंचवीस हजार दीनार मी आपणांस देतो. यापुढे एक हजार दीनार पहिल्या तारखेला आपल्या घरी चालून येत राहतील."

काजीने खाली वांकून मला तीनदां सलाम केला. त्यानंतर तीनच दिवसांनी बसऱ्याच्या वलीने माझ्याकडे निरोप पाठविला. मोठ्या नम्रपणे माझ्याशी बोलला. म्हणाला—"तुझ्या सारख्या तरुणाने आपल्या संपत्तीचा आकार प्रकार एकदां मला दाखविला म्हणजे मी कोण किती खर्च करतो हे विचारायला कां येईन?"

मी म्हणालो—"वली साहेबांना मी आपली सर्व संपत्ति दाखविली तर त्यात काही बिघडणार नाही. पण माझा विचार आहे की आपणांकडे दर महिन्याला दोन हजार दीनार फकीरांना वांटण्यासाठी पाठवावे." वलीसाहेबांनी ते काम मोठ्या आनंदाने आपल्याकडे घेऊन त्या मेहेरबानी बद्दल माझे आभार मानले.

त्या दिव[illegible] मी [illegible] काही आणि वली [illegible] बंद करीत आलो आहे. कोणाची वांकडी नजर माझ्या संपत्तीकडे वळली नाही. मी अतिथी-अभ्यागतांना मनसोक्त भेटी देतो. कधी कमी न होणाऱ्या माझ्या अक्षय्य संपत्तीची थोडक्यात ही कहाणी आहे." अबू अल कासिम एवढे सांगून गप्प बसला.

खलीफाच्या मनात त्या तरुणाची संपत्ती पाहण्याची तीव्र इच्छा उत्पन्न झाली. तो म्हणाला—"परंतु ही अक्षय संपत्ति असते कशी, प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिल्या शिवाय मला कसे कळणार? तुझे हे गुपित कोणाला कधी सांगणार नाही, याची शपथ घेतो."

"आपल्या अतिथी अभ्यागताला असंतुष्ट ठेवून निरोप देणे नरकयातनेपेक्षा कठीण आहे. मात्र आपण मी सांगेन त्या अटी मान्य कराव्या, आनंदाने माझी अक्षय संपत्ति दाखवीन. पहिली अट म्हणजे आपल्याला आपल्या डोळ्यांवर पट्टी बांधून घ्यावी लागेल. मी आपल्या बरोबर तलवार घेऊन येईन. आपण माझ्याशी दुर्व्यवहार करण्याच्या प्रयत्नात असल्याची शंका मला आल्यास मी निर्दयपणे या तलवारीचा उपयोग करीन." अबू अल कासिम म्हणाला.

"मला सर्व अटी कबूल आहेत." खलीफा म्हणाला.

अबू अल कासिम खलीफाच्या डोळ्यांवर पट्टी बांधून आपल्या वाड्याच्या तळघरात





घेऊन गेला. भुयाराची वाट बरीच लांब व वांकडी तिकडी होती. अगदी टोकाला तळघरातच खोल व एक मोठे दालन होते. तेथे पोचल्यावर कासिमने खलीफाच्या डोळ्यावरची पट्टी सोडून टाकली. गुहेच्या भिंतींना आणि खांबांना बसवलेली माणिक्ये, हिरे व रत्ने पाहून खलीफाचे डोळे दिपून गेले. त्यांच्या उजेडात खलीफाला शंभर फुटाच्या व्यासाचे एक वर्तुळाकार दालन दिसले. त्यात अशरफींचा एक मोठा सांठा होता. त्याच्या काठाकाठाने बारा मूर्ती होत्या. प्रत्येक मूर्त एका विशिष्ट मण्याची होती आणि ती सोन्याच्या उच्च आसनावर उभी केलेली होती.

सोन्याचे ते 'सरोवर' किती खोल होते याची कल्पनाच करणे अशक्य होते. अबू अल कासिम म्हणाला—"माझ्या पूर्वजांनी कित्येक पिढ्या माझ्याच सारखा मनसोक्त दानधर्म केला तरी या सरोवरातले सोने अर्धा इंच देखील खाली गेले नाही." असे सांगून कासिम खलीफाला दुसऱ्या खोलीत घेऊन गेला. तेथे त्याहून मोठे हिऱ्या माणकांचे एक सरोवर होते. तेथे खलीफाला दिलेल्या झाडासारख्या मयूरवृक्षाच्या दोन रांगा होत्या. त्या सरोवराच्या छपरावर—"जो मनमोकळपणाने खर्च करतो तोच खरा श्रीमंत! आणि मैत्री शिवाय दुसरी कोणती ही गोष्ट वांचविण्या योग्य नाही." असे लिहिलेले होते.

अशा तऱ्हेने खलीफाने कित्येक दालने पाहिली आणि तो दमून गेल्यावर कासिमने खलीफाच्या डोळ्यांना पट्टी बांधली आणि त्याला भुयारातून वर आपल्या घरी बोलावून घेऊन गेला.

दोघे विश्रांतीसाठी लोडाला टेकून बसले तेव्हां खलीफा कासिमला म्हणाला—"तू एका मुलीला भेट म्हणून माझ्याकडे पाठविलीस. तशा कित्येक मुली तुझ्याकडे आहेत असे वाटते."

"कां नाही? परंतु त्यांच्या पैकी एकीवर ही माझी नजर नाही. त्या सर्वांहून माझ्या [illegible] आठवण मला जास्त प्रिय आहे. लबीबाची व माझी भेट करून कोणी देईल तर मी आपली ही सर्व अक्षय संपत्ति तिच्यावर ओवाळून टाकीन." अबू अल कासिम म्हणाला.

**कासिम त्या मुलीला इतकी वर्षे विसरू** शकला नाही या गोष्टीचे खलीफाला कौतुक वाटले.

खलीफा, कासिमने दिलेल्या सर्व वस्तू घेऊन बगदादला आला. त्याने तुरुंगातून जफरला बोलवून आणले. त्याला माफ करून व त्याला अनेक पारितोषिके देऊन म्हणाला—"जफर! अबू अल कासिमचा सत्कार कोणत्या प्रकारे केला तर बरोबर होईल? कारण त्याला काही दिले तरी ते त्याच्या स्वतःच्या संपत्तीच्या मानाने अगदीच क्षुल्लक ठरेल."

जफर म्हणाला—"त्याला बसऱ्याचा सुभेदार नेमणे बरोबर होईल."

"तर मग तू स्वतः जाऊन त्याला आदरपूर्वक बोलावून घेऊन ये. मी तो समारंभ स्वतःच्या हाताने करावा म्हणतो." खलीफा म्हणाला.

जफर बरोबर अबू अल कासिम बगदादला आला तेव्हां खलीफा स्वतःच्या मुलासारखा त्याला भेटला. त्याचा सर्व प्रकारे सत्कार करून त्याला एक मेजवानी दिली. मेजवानीच्या वेळी एक गुलाम स्त्री गाणे म्हणायला म्हणून समोर आली. तिला पाहताच अबू अल कासिम बेशुद्ध होऊन पडला.

तो शुद्धीवर आला तेव्हां ती गुलाम तरुणी लबीबा असल्याचे कळले. ती नदीत पडली तेव्हां एका कोळ्याने तिला वांचविले आणि एक गुलाम म्हणून तिला विकले. तिला विकत घेणाऱ्या व्यापाऱ्याने बगदादला खलीफाच्या महालात तिला विकले.

अबू अल कासिम बसऱ्याचा सुभेदार झाला आणि त्याची प्रेमिका लबीबा बेगम झाली. त्यानंतर कित्येक वर्षे त्यांचा संसार सुखाचा झाला.





# देवमाणूस

एका गावी सुभाष नावाचा एक वैद्य रहात असे. तो पाला, मुळ्या व काही फळे यांची औषधे तयार करून सर्व तऱ्हेच्या रोगांचा इलाज करीत असे.

सुभाष एकटा होता. म्हणून थोडक्या मिळकतीवर त्याचा उदरनिर्वाह चाले. तो गोरगरिबांना फुकट औषधे देई. म्हणून जवळपासच्या पंचक्रोशीत त्याचा नाव-लौकिक वाढला. अर्धांगवायूसारखे भयंकर रोग आणि सर्पदंशासारखे आजार तो थोड्या वेळात बरे करी. अशा रोगांचे औषधपाणी करून देखील तो पैसे फारच कमी घेई. म्हणून त्याला लोक देवमाणूस मानीत.

सुभाषची वाढती कीर्ती पाहून गावच्या जमिनदाराच्या पोटात दुखू लागले. कारण सुभाष त्या गावात येण्यापूर्वी लोक त्या जमिनदाराला एक मोठा देवमाणूस मानीत. परंतु आता स्थिति बदलली होती. त्याच्या घरी लोकांची गर्दी जमण्याऐवजी सुभाषच्या घरी जमू लागली होती. कारण सुभाष गोरगरिबांना पैशाची कमी जास्त मदत करीत असे.

सुभाषचा हा वाढता मान कमी कसा होईल या गोष्टीचा जमिनदार विचार करू लागला. एक दुष्ट विचार त्याच्या मनात आला आणि आपला घाट पुरा होण्यासाठी तो संधी पाहू लागला.

एकदा संध्याकाळी सुभाष काही औषधे एका पिशवीत घालून कोठेतरी परगावी एका रोग्याला पहायला निघाला. जमिन-दाराने ते पाहिले आणि सुभाषला विचारले—"काय हो वैद्यबुवा! कोठे निघालात?"

"शेजारच्या गावी दोघे तिघे आजारी आहेत, त्यांना पाहून औषधपाणी करण्या-साठी जातो आहे." सुभाष म्हणाला.

म. ना. रानडे

जमिनदार अशाच संधीची वाट पहात होता. सुभाष निघून गेल्यावर जमिनदाराने आपल्या नोकरांकरवी सुभाषच्या घराच्या एका भिंतीला भोंक पाडले व आत जाऊन औषधाच्या बाटल्या फोडून टाकल्या आणि ज्या मुळ्या व इतर औषधे होती ती जाळून टाकली. सुभाषच्या घरात कोणीच नव्हते.

दुसऱ्या दिवशी सुभाष गावाहून परत आला. घरात कोणीतरी शिरून औषधाच्या बाटल्या फोडून इतर औषधे जाळून टाक-ल्याचे कळले. एका जागी भिंतीला एक भगदाड पडल्याचे पण दिसले.

चोरी करण्यासारख्या पुष्कळ वस्तू जशाच्या तशाच होत्या. फक्त औषधांची नासधूस झालेली पाहून कोणीतरी दुष्ट-बुद्धीने हे सर्व केले असावे, असे साहजिकच सुभाषला वाटले. परंतु त्याने कधी कोणाचे नुकसान केले नव्हते. मग द्वेषबुद्धीने हे कोणी बरे केले असावे, हे त्याला कळेना.

सुभाषने खूप मेहनत करून पुष्कळ औषधे तयार करून ठेवली होती. पण ती अशातऱ्हेने एका रात्रीत नष्ट झाली. त्याच्याकडे अनेक रोगी येऊन वाट पहात होते. परंतु कोणाला औषध देणे त्याला शक्यच नव्हते. लोकांनी चोराला शिव्या दिल्या. परंतु जमिनदाराला मात्र त्याचा डाव साधल्याबद्दल फार आनंद झाला.



त्याच वेळी जमिनदाराचे नोकर जमिन-दाराच्या मुलाला घेऊन घाबऱ्याघाबऱ्या आले आणि मुलाला साप चावला असल्याचे सांगू लागले. म्हणाले—"शेतात छोट्या मालकांना साप चावला. अर्धा तास झाला शुद्धच नाही. काय वाटेल ते करून औषध वेळेवर देवविले पाहिजे."

जमिनदाराच्या घरासमोर लोकांची गर्दी जमली. गर्दीतला एक मनुष्य म्हणाला—"सुभाष वैद्यांकडे घेऊन जा. एका मिनिटांत मुलगा शुद्धीवर येईल.

निरुपायाने जमिनदाराला सुभाष वैद्या-कडेच मुलाला घेऊन धावावे लागले. नोकर मुलाला उचलून घेऊन पाठीमागून आले.




जमिनदार वैद्याला हाक मारून म्हणाला–"अहो वैद्यबुवा! काय वाटेल ते करून मुलाला वांचवा हो! सांप चावला आहे याला."

"होय हो, पण काय करू? रात्री कोणीतरी दुष्टाने घरात शिरून सर्व औषधांच्या बाटल्या फोडून टाकल्या व औषधांचा पाला व मुळ्या जाळून टाकल्या." सुभाष म्हणाला.

जमिनदाराला जोडे मारल्यासारखे झाले. घोगऱ्या आवाजात म्हणाला–"वैद्यबुवा! तो दुष्ट मीच होतो हो! मला क्षमा करा. माझ्या मुलाला वांचवा. आयुष्यभर मी तुमचे हे उपकार विसरणार नाही."

"बरं थांबा हं, आलोच!" असे सांगून सुभाष घराबाहेर धांवत गेला.

"आतां वैद्यबुवा कशाला येतात? करावे तसे भरावे. देव सर्व पहात असतो." एकजण म्हणाला.

"मी आपल्या मुलाचा गळा स्वतःच्या हाताने कापला हो!" असे म्हणत जमिनदार टाहो फोडून रडू लागला. परंतु सुभाष थोड्याच वेळात परत आला. त्याच्या हातात कसल्या तरी मुळ्या व पाला होता. त्याने पाला चुरगळून मुलाच्या नाकाजवळ नेला. आणि त्याचा रस थोडा डोळ्यात घातला. थोड्या वेळाने जमिनदाराचा मुलगा हलला आणि थोड्या वेळाने चांगला शुद्धीवर आला.

तेथे जमलेल्या सर्व लोकांना जिवातजीव आल्यासारखे झाले.

त्या दिवसापासून जमिनदाराच्या वागणुकीत एकदम फरक झाला. त्याने सुभाषला नुकसान भरपाई म्हणून पुष्कळ धन दिले आणि औषधे तयार करण्यासाठी आपल्या नोकरांना पाठविले.

सुभाषचा नावलौकिक ह्या घटनेनंतर जास्तच वाढला. त्याने त्याच गावात कायमचे रहावयाचे ठरवून लग्न करून घेतले. सर्व म्हणू लागले–"एका देवमाणसामुळे दुष्ट माणूसदेखील देवमाणूस झाला.





# विचित्र मृत्युपत्र

शीलादित्य नावाचा एक प्रसिद्ध राजा होता. त्याला दोन बायका होत्या. त्या जुळ्या बहिणी होत्या. त्या जुळ्या बहिणींनी राजाशी एका अटीवर लग्न केले होते. राजाने दोघींना सारखा मान देऊन वागविले पाहिजे, अशी ती अट होती. दोघींना एकाच दिवशी व एकाच मुहूर्तावर मुलगा झाला आणि दोघी निवर्तल्या.

शीलादित्याच्या दोघां मुलांची नावे अनुक्रमे देवादित्य व सुरादित्य अशी होती. सुरादित्य गोड स्वभावाचा होता व देवादित्य थोडा कठोर स्वभावाचा होता. दोघे अल्पवयी असतांच राजा मरण पावला. राजाला अचानक मरण आल्याने राजा मंत्र्याकडे आपले मृत्युपत्र लिहून देऊ शकला नाही.

मुले वयात येईपर्यंत मंत्री नयपालच सर्व राज्य कारभार पाही. तरी इतर दरबाऱ्यांना व सेनापतीला पुढे काय होणार याची काळजी वाटत असे. कारण दोघे राजकुमार मोठे झाल्यावर गादीवर आपला हक्क सांगणार. दोघांच्या माता पट्टराणी म्हणून ओळखल्या जात असत.

राज्याचे वांटे करणे कोणालाच पसंत नव्हते. शीलादित्याच्या कुळदेवतेची राज्याचे वांटे कोणत्याही परिस्थितीत होऊ देऊ नयेत अशी खास आज्ञा असल्याची लोकांची समजूत होती. तसे वांटे झाले तर राज्याचा सर्वनाश होईल असे कुळदेवतेने राजाला सांगितले होते.

यथावेळी दोघे राजकुमार वयात आले व गादीवर स्वतःचा हक्क असल्याबद्दल दोघे ही हट्ट धरून बसले. तो प्रश्न सुटावा कसा या काळजीत मंत्री पडला. तेव्हां त्याला मायापाल नामक दरबारी मांत्रिकाची मदत घेण्याचे सुचले.

जादूगार श्री ए. सी. सरकार



मायापालने सर्व गोष्टी शांतपणे ऐकून घेतल्या व म्हणाला–"राजाच्या मृत्युपत्राविषयी मला काहीच माहीत नाही. परंतु महाराजांनी फार पूर्वी काही कागदपत्र एका पेटीत ठेवून ती पेटी माझ्याकडे, असे सांगून ठेवून दिली होती की, पुढे मागे कधी गरज वाटली आणि एकाद्या प्रश्नावर वादविवाद किंवा तंटा झाला तर तो मिटविण्यासाठी या कागदपत्रांचा उपयोग होऊं शकेल. पाहिजे तर ही पेटी उघडून पहावी. कदाचित काही तोड निघेल."

दुसऱ्या दिवशीं प्रधान मंत्र्याने दरबारांत सर्वासमक्ष पेटी उघडली आणि त्यातून काही वस्तू बाहेर काढल्या. त्या पाहून सर्व चकित झाले. कारण त्या पेटीत कागदाच्या पट्टीची तीन वळीं होती. त्यांच्यावर १, २, ३, आंकडे होते. त्यांच्याविषयी माहिती आणखी एका कागदावर लिहिलेली होती.

"एक आंकडा असलेले वळे देवादित्याला द्यावे. ते माझ्या राज्याचे आणि संपत्तीचे चिन्ह आहे, नयपालने त्याच्याकडून ते वळे पट्टीच्या मधोमध कापवून दोन वळी करून पहावी."

देवादित्याने कात्रीने आपल्या हातातले वळे कापले व एकाची दोन वळी झाली.

त्यानंतर नयपालने दोन आंकडा असलेले वळे सुरादित्याला देऊन त्याच्या संबंधी माहिती वाचली–"या वळयात संकेत रूपाने माझे राज्य व संपत्ति कशी असावी हे मी सुचविले आहे."

सुरादित्याने ते वळे पट्टीच्या मधोमध कापले तेव्हां त्याची दोन निरनिराळी वळी होण्याऐवजी एक मोठे वळे झाले.

नंतर नयपालने तिसरे वळे देवादित्याच्या हातात देऊन तत्संबंधी सूचना वाचली ती अशी–"हे वळे पट्टीच्या मधोमध कापल्यास आपल्या दोघां मुलांचा परस्पर संबंध कसा असावा व त्यांनी कसे राज्य करावे याविषयी माझ्या मनातली इच्छा कळेल."

देवादित्याने तिसरे वळे पट्टीच्या मधोमध कापले तेव्हां दोन वळी तर झाली, परंतु [illegible] दिसली. सुटी नव्हती.

महाराजांचे हेच मृत्युपत्र असल्याचे सर्वांना स्पष्ट झाले. देवादित्य आणि सुरादित्य दोघांनी आपल्या प्रेमळ पित्याच्या इच्छेप्रमाणे वागण्याचे ठरविले. दोघे परस्परांना प्रेमाने कडकडून भेटले. दोघांच्या डोळयांतून आनंदाश्रू वहात होते.

त्यानंतर राज्याचे वांटे झाले नाहीत. राज्यकारभारात दोघे सारखी सारखी जबाबदारी घेऊन राज्याची व्यवस्था करू लागले. अशा तऱ्हेने नयपाल समोर जो प्रश्न होता तो इतका सहजी सुटला. सर्वांच्या मनाचे समाधान झाले. रात्री एक मेजवानी झाली. मेजवानी झाल्यावर घरी परत जात असताना नयपालने मायापालला बाजूला नेऊन विचारले–"कायरे, महाराजांनी जादूचा प्रयोग केल्यासारखा वाटला. ही जादू राजाला तू शिकविलीस का?"

"होय, मृत्यू पूर्वी महाराजांनी माझ्या जवळ थोडी जादू शिकून घेतली होती. मी वळयांची ती जादू तुम्हांला दाखवीन. तुम्हांला सवड असेल तेव्हां तुम्ही चार बोटे रुंदीच्या व सुमारे तीन हात लांबीच्या कागदाच्या तीन पट्टया घेऊन या."

त्याप्रमाणे नयपाल एक दिवशी तशा तीन पट्टया घेऊन मायापालच्या घरी गेला. मायापालने कागदाच्या एका पट्टीची दोन्ही टोके डिंकाने चिकटवून एक वळे (चाक) तयार केले. नंतर दुसऱ्या पट्टीला अर्धा पीळ (मुरड) देऊन पट्टीची दोन्ही टोकें डिंकाने चिकटविली. तिसऱ्या पट्टीची दोन्ही टोकें चिकटविण्यापूर्वी पट्टीला एक पुरा पीळ दिला. (खालचे चित्र पहा.)

नयपालने कागदांच्या पट्टयांवर मधोमध खूण केली आहे. बरोबर त्या खुणेवर कात्रीने तिन्ही पट्टया निरनिराळया कापल्या. तेव्हां पहिल्या पट्टीचीसारख्या आकृतीची दोन वळी झाली. दुसऱ्या वळयाचे एक मोठे वळे झाले आणि तिसऱ्या वळयाची दोन निरनिराळी वळी झाली, पण ती सुटी नव्हती. दोन्ही कडीसारखी परस्परांना अडकलेली होती.





# पंचकल्याणी

[ ३ ]

**श्या**मल नगराच्या राजाने विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर वीरदासने दिले ते असे–

"मी एकदा समुद्रकाठच्या डोंगराळ प्रदेशात शिकारीला गेलो. मी एका उंच टेकाडावर चढत होतो तेव्हां मला पाठीमागून धूर वर येत असलेला दिसला. धूर येण्याचे कारण कळावे म्हणून मी त्या डोंगराच्या टोकापर्यंत गेलो. एका दरीतून धूर वर येत होता. मी दरीत डोकावून पाहिले तर धुरामुळे मला कोंदटल्यासारखे झाले. दुसऱ्या क्षणाला मी दरीत पडलो. माझे भाग्य बलवत्तर होते. म्हणून मला विशेष लागले नाही. परंतु त्या दरीतून बाहेर कसे यावयाचे हा प्रश्न माझ्यासमोर उभा राहिला. कारण कडा उभा होता. मी मान वर करून पाहिले.

त्याच वेळी एका बाजूने कसला तरी आवाज झाला. मी त्या बाजूला वळून पाहिले. एक राक्षस वीस बकऱ्या व एका हरणाला घेऊन येत होता. त्याने त्या सर्वांना एका गुहेत हांकले आणि माझ्याजवळ येऊन म्हणाला–"आलास, बरे झाले! मी तुझ्यासाठी सुरी पाजळवून ठेवली आहे."

"अरे, मी तुझ्या एका घासाएवढासुद्धा नाही. तुला एकाच डोळयाने दिसते आहे. दुसरा डोळा मी बरा करून देतो. मी डोळयांचा वैद्य आहे." मी म्हणालो.

राक्षस त्या गोष्टीस कबूल झाला. मी गुहेत जाऊन त्याच्याकडून एका मोठ्या मडक्यात पाणी गरम करविले आणि त्या पाण्यात त्याला बसायला सांगितले. एक गवताची चूड तयार करून घेऊन आलो. त्याच्या डोळयांना पट्टी बांधण्याचे मिष

त्याबरोबर तो राक्षस ओरडत पाण्यातून बाहेर आला आणि गुहेच्या दारावर उभा राहून मला शिव्या शाप देऊ लागला.

मी रात्रभर गुहेच्या भिंतीला टेकून राक्षसाचा हात सामान्यपणे जाणार नाही अशा जागी जाऊन बसलो. आपला श्वास लागला तरी मी कोठें आहे हे राक्षसाला कळेल याची भीती पण मला वाटत होती.

मी आपल्या सुरीने हरणाला ठार करून त्याचे कातडे काढू लागलो.

उजाडल्यावर पक्ष्यांची किलबिल सुरू झाली तेव्हां राक्षस मला म्हणाला–"काय रे तू झोपला आहेस की जागा आहेस? माझ्या बकऱ्या सोड पाहू!"

मी म्हणालो–"बकऱ्यांना बांधलेल्या दोऱ्यांच्या गाठी सुटत नाहीत हो!"

त्यानंतर मी एकेक करून सर्व बकऱ्या सोडल्या. राक्षस म्हणे–"ए पांढरे! मला आतां तू कशी दिसणार ग?" असे प्रत्येक बकरीच्या अंगावर हात फिरवीत तो काही ना काही तरी म्हणे.

शेवटी हरणाचे कातडे अंगावर पांघरून मी रांगत रांगत बाहेर जाऊ लागलो. राक्षस हरणाच्या कातड्यावर हरण समजून हात फिरवीत म्हणाला–"ए माझ्या लाडके हरणी! तू मला पाहू शकतेस पण मी तुला



पाहू शकत नाही ग! असे म्हणत त्याने मला सुद्धा बाहेर जाऊ दिले. गुहेबाहेर आल्याबरोबर सूर्यप्रकाशात आल्यामुळे मला हायसे वाटले. वर स्वच्छ आकाश व समोर समुद्र दिसत होता. त्या आनंदात मी ओरडलो–"अरे आंधळ्या राक्षसा! तू मला पकडू शकला नाहीस रे!"

राक्षस माझा आवाज ओळखून म्हणाला–"किती लबाड आहेस रे तू? तुझी हुशारी पाहून तुला शाबासकी द्यावीशी वाटते मला. ही घे अंगठी बक्षिस!"

"मी अंगठी घेण्यासाठी तुझ्याजवळ येईन असे वाटले होय तुला? तू ती फेक माझ्याकडे!" मी म्हणालो.

राक्षसाने अंगठी माझ्याकडे फेकली. मी ती उचलून बोटात घातली.

"तुझ्या बोटात चांगली बसली का रे अंगठी ?" त्याने विचारले.

"हो, छान बसली !" मी म्हणालो.

राक्षस जोराने हसला आणि अंगठीला उद्देशून म्हणाला–"कोठे आहेस ग तू ?"

"ही काय मी येथे आहे !" अंगठी म्हणाली.

तिचा आवाज ऐकून राक्षस आवाजाच्या रोखाने येऊ लागला. आतां मी संकटात सांपडलो. मी अंगठी काढून टाकण्याचा यत्न करून पाहिला पण अंगठी निघेच ना. म्हणून मी आपले ते बोटच कापून अंगठी सकट दूर समुद्रात फेकून दिले.

राक्षस अंगठीच्या आवाजाच्या रोखाने पुढे पुढे येत होता. अंगठीने समुद्रात पडता पडतां 'मी येथे आहे' असे उत्तर दिले. राक्षस समुद्राकडे धावत गेला आणि समुद्रात बुडून मेला. मी देवाचे आभार मानले.

त्यानंतर मी राक्षसाच्या गुहेत गेलो आणि तेथे होते ते सर्व धन उचलून घरी परत आलो.

वीरदास येथवर गोष्ट सांगून म्हणाला– "ते संकट म्हणजे खरोखर जीव घेणारेच होते. अंगठी घातलेले माझे बोट कायमचे गेले, पण माझा जीव वांचला." असे सांगून वीरदासने अंगठी घालतात ते अनामिका नांवाचे बोट नसल्याचे दाखविले.

श्यामल देशाचा राजा ती गोष्ट ऐकून म्हणाला–"तुझी ही गोष्ट खरोखरच अद्भुत आहे. तू सांगितलीस ही गोष्ट खरी असावी असे मला वाटते आहे. तू आपल्या गोष्टी सांगून आपल्या दोन मुलाना वांचविले आहेस. अशीच आणखी एक गोष्ट सांगून तू तिसऱ्या मुलालापण वांचव !"

वीरदास काही वेळ विचार करून म्हणाला–"माझ्या आयुष्यात याहून जास्त धोक्याची घटना घडली आहे."

"तरमग ती गोष्टपण सांग !" राजा म्हणाला. (पुढली गोष्ट पुढील अंकी)





# महाभारत

शंकराचे दर्शन करावे असा अर्जुनाला सल्ला देऊन इंद्र अदृश्य झाला. अर्जुनाने त्या प्रमाणे तपश्चर्या करून शंकराला प्रसन्न करण्याचे ठरविले. अर्जुन पुढे पुढे जातच होता. त्याला वाटेत अत्यंत सुंदर वन दिसले. त्यातले वृक्ष व वेली मनोहर फुला फळांनी जास्तच सुंदर दिसत होत्या. ते निरापद व निर्जन असे रम्य-स्थान अर्जुनाने तपश्चर्येसाठी निवडले.

अर्जुनाने तेथे सतत चार महिने अखंड तपश्चर्या केली. वल्कल वस्त्रे धारण करून व जटा वाढवून त्याची तपश्चर्या चालू असतां त्याच्या शरीरातून उष्ण वारे बाहेर येऊ लागले. सारे वन धुराने भरून गेले. ऋषी व मुनी घाबरून गेले व त्यांनी शंकराचा धावा केला आणि अर्जुनाची इच्छा तृप्त करून त्याच्या तपश्चर्येमुळे तप्त झालेल्या वनाचे रक्षण करण्यास विनंती केली. शंकराने ऋषींना व मुनींना प्रगट होऊन अर्जुनाच्या मनाचे लवकरच समाधान करून देण्याचे वचन दिले.

ऋषीमुनींना निरोप दिल्यानंतर शंकराने किरात वेष धारण केला. पार्वतीने किरातिणीचा व शंकराच्या गणांनी त्यांच्या अनुयायांचे वेष धारण केले आणि सर्व अर्जुन तपश्चर्या करीत होता त्या जागी येऊन विहार करू लागले.

त्याच वेळी मूक नावाचा राक्षस रानटी डुकराचे रूप घेऊन अर्जुनावर धावून गेला. अर्जुन धनुष्य बाण घेऊन त्याला मारायला

२९. उर्वशीचा शाप



धावला. तेव्हां किरात वेषधारी शंकर अर्जुनाला म्हणाला—"अरे! ती शिकार माझी आहे. त्याचा वध मी करणार, तू बाजूला हो."

अर्जुनाने त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले आणि रानडुकरावर बाण सोडला. एकाच वेळी दोघांचा बाण लागल्याने डुक्कर खऱ्या राक्षस रूपात प्रगट होऊन जागच्या जागी मरण पावले आणि जमिनी-वर लोळू लागले.

अर्जुनाने किराताला विचारले—"कोण रे तू? किरात कीं आणखी कोणी? या निर्जन वनात आपल्या बायकोला घेऊन विहार करतो आहेस, कोण तू? ते डुक्कर मला ठार करायला धावले म्हणून मी त्याला ठार केले. तुला मध्येच बाण सोडायची गरजच काय? ही माझी शिकार आहे. तू शिकारीचा नियम भंग केला आहेस. मी तुला त्याबद्दल शिक्षा करतो.

किरात वेषधारी शंकर अर्जुनाच्या तोंडचे ते वाक्य ऐकून एकदां हंसला व म्हणाला—"मी माझ्या बायको बरोबर वनात स्वच्छंद विहार करतो आहे त्याची फिकीर तुला रे कशाला? आम्हां रानटी जातीच्या समाजात नवराबायको दोघं बरोबरच शिकारीला जातात. पण तू या निर्जन वनात कसा काय? तू दिसायला सभ्य जातीचा व कोमल प्रकृतीचा दिसतो आहेस. आतां या रानडुकराची गोष्ट विचारशील तर मीच त्याला पहिल्याने बाण मारला. नंतर तू सुद्धा त्याला बाण मारलास. तू स्वतःला बलवान समजून मला वाटेल ते बोललास. तू खरोखरच बलवान असशील तर माझ्याशी द्वंद्वयुद्धास ये."

अर्जुनाने लगेच किरातावर शरवृष्टि केली. पण किराताला जणुकाही त्या शर-वृष्टीची फिकीरच वाटली नाही. तो हसत म्हणाला—"अरे, हे काय बाण झाले? तुझ्या जवळ याहून चांगले बाण नाहीत वाटते?"

अर्जुन ते ऐकून थोडा चपापला. त्याचे बाण ज्या किराताला स्पर्श सुद्धा करू शकले नाहीत तो किरात सामान्य किरात असेलसे अर्जुनाला वाटले नाहीं. तो कोणी-तरी महापराक्रमी योद्धा असला पाहिजे किंवा आलौकिक पुरुष तरी असला पाहिजे असे त्याला वाटले. तरी अर्जुनाने शरवृष्टी चालू ठेवली. परंतु थोड्याच वेळात त्याचे अक्षय्य तूणीर रिते झाले.

अग्निनारायणाने ते तुणीर त्याला दिले होते. असे तुणीर रिते झालेले पाहून अर्जुनाच्या मनातली शंका जास्तच वाढली. त्याने आपल्या गांडीव धनुष्याचे टोक किराताच्या शरीरात भोसकण्याचा प्रयत्न करून पाहिला. पण गांडीव धनुष्य तुकडे तुकडे होऊन पडले.

आतां अर्जुन निःशस्त्र झाला. त्याने झाडाच्या फांद्या तोडून किरातावर फेंकल्या. नंतर मोठमोठे दगड फेकले. पण किरात जागचा हलला देखील नाही. तेव्हां अर्जुन त्याच्याशी कुस्ती खेळायला गेला. मुष्टियुद्ध सुरू झाले आणि किराताच्या मुष्टिप्रहाराने अर्जुन बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला.

शुद्धीवर आल्यावर अर्जुनाने स्नान केले आणि मातीचे एक शिवलिंग करून त्याची पूजा करू लागला. तो त्या शिवलिंगाला पुष्पगुच्छ वाहू लागला की ते किराताच्या डोक्यावर जाऊन पडत. ते पाहून अर्जुनाच्या मनाची खात्री झाली व आनंद पण झाला



की त्याने आतापर्यंत जे द्वंद्वयुद्ध केले ते स्वतः शंकराशीच केले होते. त्याने शंकराला साष्टांग नमस्कार करून त्याची क्षमा मागितली आणि शंकराचे स्तोत्र म्हणू लागला.

तेव्हां शंकर अर्जुनाची भक्ति व पराक्रम दोन्ही वर प्रसन्न होऊन म्हणाला—"अर्जुना! तुझ्यासारखा वीर त्रिलोकात दुर्लभ आहे. मी तुझ्या भक्तीवर प्रसन्न आहे. आपले दिव्य अस्त्र तुला भेट म्हणून देतो. याचा प्रयोग करण्यास तू समर्थ आहेस. याचा प्रयोग करून तू शत्रूचा पराभव करू शकशील." असे सांगून शंकर पार्वतीने स्वस्वरूपात अर्जुनास दर्शन दिले.



अर्जुनाने शंकराच्या चरणी मस्तक ठेवून वारंवार क्षमाप्रार्थना केल्यावर शंकराने त्याला प्रेमाने उभे करून प्रेमालिंगन दिले आणि म्हणाला–"अर्जुना! तू पूर्वजन्मी नर नावाचा एक ऋषी होतास. कित्येक हजार वर्षे तू व नारायण नावाच्या ऋषीने बद्रिकाश्रमात राहून तपश्चर्या केलीत. तुम्ही दोघांनी अनेक दुष्ट राक्षसांचा वध केलात आणि इंद्रपद निरापद केलेत. त्यावेळी तुझ्या हातात जे धनुष्य होते तेच आता तुझ्या हातात आहे. माझ्या मायेने तुझे गांडीव तुटले व अक्षय्य भाता रिकामा झाला. पण तू एका वीराला शोभेल तेच केलेस. म्हणून तू आपल्या मनात जी इच्छा असेल ती मागून घे. मी ती पूर्ण करीन."

"सदाशिवा! मला पुढे भीष्म, द्रोण, कर्ण आणि दुर्योधनासारख्याशी युद्ध करावे लागणार आहे. त्यांना जिंकण्यासाठी मला पाशुपतास्त्र व ब्रह्मशिरोनामास्त्र देण्याची कृपा करावी." अर्जुनाने विनंती केली.

शंकराने अर्जुनाने पाशुपतास्त्राचा प्रयोग व परत घेण्याची रीति सांगून शिकवून दिली. अर्जुनाचे गांडीव धनुष्य आणि अक्षय्य तूणीर त्यांच्या पूर्व रूपात त्याचे त्याला परत दिले. त्यानंतर शंकर पार्वती अंतर्धान पावले.

अर्जुनाला अपूर्व शक्ति प्राप्त झाल्याबद्दल परमानंद झाला. त्याहून आनंद झाला तो शंकरपार्वतीच्या दर्शनाचा. शंकराच्या देहस्पर्शाने त्याचा देहदेखील पवित्र झाला.

त्याच वेळी लोकपालक इंद्र, यम, वरुण, कुबेर आदिक सपत्नीक अर्जुनाकडे आले आणि आपली अस्त्रे अर्जुनाला दिली. इंद्राने अर्जुनाला स्वर्गात येण्यास आग्रह केला आणि तेथे आल्यावर त्याला अनेक दिव्यास्त्रे देण्याचे वचन दिले. त्यानंतर सर्व लोकपालक अंतर्धान पावले.

थोड्या वेळाने अर्जुनाला घेऊन जाण्यासाठी इंद्राचा रथ आला. मातली त्या रथाचे सारथ्य करीत होता. तो म्हणाला–

"अर्जुना! इंद्राने तुझ्या[illegible] हा रथ पाठविला आहे. तो दरबारात देव, ऋषी, गंधर्व व अप्सरा समवेत बसून तुझी वाट पहात आहेत."

इंद्राच्या रथात बसण्याची योग्यता तर नाहीच नाही, नुसता त्याचा स्पर्श करण्याची योग्यता पण आपल्यात नाही, असे अर्जुनाला वाटले. परंतु इंद्राचा आदेश शिरसावंद्य मानून अर्जुन रथात बसला.

रथ आकाशात उडू लागला आणि सिद्ध मार्गाने जाऊ लागला. वाटेत अर्जुनाला अनेक विमाने दिसली. त्यात स्वयं प्रकाशित असे ऋषी, वीरगति मिळालेले शूरवीर, सिद्ध, गंधर्व, अप्सरा इत्यादि होते. मातलीने त्या सर्वांविषयी माहिती अर्जुनाला दिली.

थोड्याच वेळाने अर्जुनाला दूर अमरावती नगरी दिसू लागली. नगरीच्या प्रवेशद्वारावर एक उंच गोपुर होते. ते पाहून अर्जुनाला फार आनंद झाला. नगरात प्रवेश केल्यावर उद्यानात व उपवनात स्वेच्छेने फिरत असलेल्या अप्सरा दिसत होत्या.

इंद्राच्या आज्ञेने सर्व देव अर्जुनाच्या स्वागतासाठी निघाले. गंधर्व, सिद्ध आणि अप्सरा सर्वांनी मंगलगान करून त्याच्यावर पुष्पवृष्टि केली. नारदादि देवर्षींनी अर्जुनाला आशीर्वाद दिला. अर्जुन रथांतून



उतरून अशा थाटाने सर्व प्राकार पार करीत इंद्राच्या सुधर्मा नामक राजसभेत पोचला.

इंद्र उच्चासनावर बसलेला होता त्याच्या चतुर्दिक गंधर्वादि त्याचा स्तोत्र पाठ करीत होते. वेदघोष चालू होता. सिद्ध, चारण, मरुत्, विश्वदेव, अश्विन, आदित्य, वसु, रुद्र, ब्रह्मर्षि, राजर्षि इत्यादि उपस्थित होते. इंद्राच्या डोक्यावर श्वेतछत्र होते व अप्सरा चंवरी हलवीत उभ्या होत्या.

अर्जुनाने इंद्रासमोर जाऊन लवून नमस्कार केला. इंद्राने उठून अर्जुनाला प्रेमालिंगन दिले आणि त्याला सिंहासनावर स्वत:जवळ बसवून घेतले. तो आपल्या



शूर मुलाकडे वारंवार कौतुकाने पहात होता. इंद्र व अर्जुन दोघांच्या मनोरंजनार्थ नारदाने वीणावादन केले, गंधर्वतुंबुरांनी गायन केले आणि अप्सरांनी नृत्य केले.

त्यानंतर इंद्राच्या आज्ञेने देवांनी अर्घ्य पाद्यसेवा करून अर्जुनाला एका दिव्य विश्रामगृहात नेले. अर्जुनाने कित्येक दिवस स्वर्गात राहून दिव्यास्त्रांचा प्रयोग व ती परतविण्याची रीति अवगत करून घेतली.

त्या अवधीत अर्जुनाने इंद्राच्या सांगण्यावरून चित्रसेन गंधर्वाकडून देवांचे संगीत व नृत्य या कला शिकून घेतल्या. अर्जुन स्वर्गात होता व त्याच्या सुखसोयी साठी व करमणुकीसाठी इंद्राने सर्व व्यवस्था करून ठेवली होती. तरी त्याचे चित्त आपल्या दुःखी मातेकडे आणि वनवास भोगत असलेल्या भावंडांकडे ओढ घेत होते.

इंद्राला असे वाटले की अर्जुनाचे मन उर्वशी वर बसले आहे. म्हणून चित्रसेनाला बोलावून तो म्हणाला–"तू माझ्या वतीने उर्वशीला अर्जुनाच्या सेवेला जायला सांग." त्याप्रमाणे चित्रसेनाने उर्वशीला इंद्राची आज्ञा कळवून तिला अर्जुनाच्या सेवेला पाठविले. उर्वशीच्या मनात, अर्जुनाला प्रथम दरबारात पाहिले तेव्हांपासूनच त्याच्या विषयी प्रेमांकुर रुजला होता. म्हणून इंद्राची आज्ञा मिळतांच ती आनंदाने अर्जुनाच्या सेवेला हजर झाली. त्या दिवशी पौर्णिमेची रात्र होती.

उर्वशी सर्व अलंकार धारण करून अर्जुनाच्या विश्रामालयात आली तेव्हां तिचे रूप पाहून व तिने प्रवेश केल्याबरोबर जो सुगंध दरवळला त्यामुळे अर्जुन चकितच झाला. त्याने तिचे पाय धरले व म्हणाला–"हे देवी! तुझ्या आगमनाचे कारण काय आणि मी तुझी कोणत्या प्रकारे सेवा करू?"

परंतु उर्वशीच्या तोंडून तिच्या आगमनाचे कारण कळतांच अर्जुनाने दोन्ही कानावर हात ठेवले व "शिव, शिव!" म्हणाला. थोडा वेळ थांबून अर्जुन तिला म्हणाला–"हे देवी! तू मला कुंतीमाते




समान, शची देवीसमान आहेस. आमचा मूळ पुरुष पुरूरवा याची तू पत्नी आहेस. तू मातेसमानच नव्हे तर वंशमातेसमान आहेस."

ते ऐकून उर्वशी म्हणाली–"हे सर्व भूलोकाच्या रीतीप्रमाणे झाले. पण आमच्या देवलोकाची रीत निराळी आहे. म्हणून तू मनांतल्या या शंकाकुशंका काढून टाक."

अर्जुन म्हणाला–"माते! तुम्ही सर्व देवलोकातले देवदेवी आहां. तुम्ही जे कराल, त्यात चूक नाही. परंतु मी मनुष्य आहे. मर्त्यलोकातला आहे. आमचे नियम आम्हांला. तुमचे नीतिनियम आम्हांला मान्य होणार नाहीत. तू मला मातेसमान आहेस. म्हणून तू मला इतर दृष्टीने न पाहतां पुत्र म्हणून माझा स्वीकार कर."

तिची मनोकामना पुरी होत नाही हे पाहून उर्वशीला भयंकर राग आला. म्हणाली–"अर्जुना! मी देवलोकात असले तरी स्त्री आहे आणि स्वेच्छाचारिणी आहे. तुझ्यावर माझे मन गेले आणि तू माझ्या प्रेमाचा असा तिरस्कार केलास. म्हणून मी तू नपुंसक होशील असा शाप देते. तू नपुंसक होऊन स्त्रियांच्या संगतीत तुला नृत्य संगीतात मन लावून रहावे लागेल." असा शाप देऊन उर्वशी निघून गेली.

रात्रभर अर्जुनाचा डोळा लागला नाहीं. सकाळी उजाडल्यावर त्याने चित्रसेनाजवळ उर्वशीने दिलेल्या शापाची गोष्ट सांगितली. चित्रसेनाकडून इंद्राला सर्व वृत्त कळले. तो स्वत: अर्जुनाजवळ येऊन म्हणाला–"अर्जुना! तू इतका आत्मसंयमी असशील याची मला कल्पना देखील नव्हती. या दर्जाचा आत्म-संयम ऋषीमुनीत ही आढळून येत नाही. तुला उर्वशीच्या या शापाचे भय वाटण्याचे कारण नाही. तुम्हाला एक वर्ष अज्ञात वासात काढावा लागेल ना? तेव्हां या शापाचा फायदाच होईल. त्यानंतर उर्वशीच्या शापाचा प्रभाव नाहीसा होईल."

इंद्राने या शब्दात अर्जुनाचे सांत्वन केल्यावर अर्जुन चित्रसेनाबरोबर देवलोकात भ्रमण करीत कित्येक दिवस राहला.





# शिवपुराण

[ ६ ]

वज्रांग ब्रह्मदेवाकडून पुत्रप्राप्तीचा वर घेऊन घरी परत आला. त्यानंतर त्याची राणी वरांगी गरोदर झाली व नऊ महिने लोटल्यावर तिच्या पोटी एक मुलगा जन्मला. तो मुलगा जन्मल्याबरोबर सर्व पृथ्वी हादरली. चहूंदिशाना वणवा पेटल्याचे दृश्य दिसू लागले. वादळे आली आणि झाडे पाळांमुळांसकट उपटून पडू लागली. हे सर्व प्रलयकाळाची चिन्हे समजुन त्रिलोक घाबरून गेला.

वज्रांग व वरांगीने आपल्या मुलाचे नांव तारक ठेवले आणि त्याचे सर्व कोड कौतुक पुरवू लागली. तारक दिवसेदिवस वाढत गेला आणि त्याला थोडयाच दिवसात पर्वताकार देह लाभला.

वरांगी एक दिवशी आपल्या लाडक्या मुलाला म्हणाली–"बाळ तारका! तू ब्रह्मदेवाकडून त्रिलोक जिंकण्यासाठी वर प्राप्त करून घे."

तारक ब्रह्मदेवाचे स्मरण तपश्चर्या करू लागला. त्याच्या घोर तपश्चर्येमुळे त्याच्या अंगातून ज्वाळा येऊ लागल्या आणि असे लागले की तो अग्नि त्रिलोकात पसरणार. वाट पाहून ते देव आणि ऋषी मुनी ब्रह्मदेवाकडे धावले म्हणाले–"देवाधिदेवा! आपण तारकाची तपश्चर्या बंद करून त्रिलोकाचे रक्षण करावे."

ब्रह्मदेव सरस्वतीसह तारकाला दर्शन देऊन म्हणाला–"तारका! मी तुझ्या तपश्चर्येवर प्रसन्न आहे. पाहिजे तो वर मागून घे."

तारक ब्रह्मदेवाला प्रणाम करून म्हणाला–"देवा! मला त्रिलोक जिंकण्यात यश येईल असा वर देण्याची कृपा करावी. शंकराच्या पोटी जन्मलेल्या मुलाशिवाय दुसऱ्या कोणा-

शेवटच्या मलपृष्ठावरील चित्र



च्याही हाती मला मरण येणार नाही, असा दुसरा एक वर द्यावा."

ब्रह्मदेवाने दोन्ही वर दिले आणि ब्रह्म-लोकी प्रस्थान केले.

तारक आपली राजधानी शोणित नगर येथे येऊन पोचला आणि ब्रह्मदेवाकडून दोन्ही वर मिळाल्याचे मातेला व गुरुवर्य शुक्राचार्य यांना सांगून म्हणाला–"गुरुवर्य! आतां त्रिलोक जिंकण्यास प्रारंभ करण्यासाठी एक सुमुहूर्त सुचवा!"

शुक्राचार्यांनी सुचविलेल्या मुहूर्तावर तारक चतुरंग सेना घेऊन दिग्विजयाला निघाला. त्याने सरळ स्वर्गावर चाल केली आणि देवलोक जिंकला. त्यानंतर वरुणाला जिंकून त्याचा रथ व घोडे मागून घेतले आणि यमलोकावर स्वारी केली. अशातऱ्हेने अष्ट दिग्गजांना जिंकले आणि त्यांच्याकडून अपार खंडणी वसूल करून आपल्या राजधानीला परत आला.

एक दिवशी नारद त्याच्या दर्शनाला आला. तारकाने त्याचे सर्व प्रकारे स्वागत केले आणि हात जोडून समोर उभा राहून म्हणाला–"हे देवर्षे! मी आपल्या आशीर्वादाने दिग्विजय केला आहे. पुढे काय करावे, आज्ञा करावी!"

नारद म्हणाला–"हे तारका! तू ब्रह्म-देवाकडून वर मिळवून दिग्विजय करु शकलास यात मोठेसे काय आहे? तुझा वध करण्याची शक्तिदेखील कोणाच्या अंगात नाही, ही देखील त्या ब्रह्मदेवाचीच कृपा आहे. फक्त शंकराच्या पोटी जन्मलेला मुलगाच तुझा वध करु शकेल असा वर तू स्वतःच मागून घेतला आहेस. तेव्हां कैलास सोडून तू वैकुंठावर स्वारी करावीस असे मला वाटते."

कळीच्या नारदाने तो सल्ला देतांच तारक वैकुंठावर चालून गेला. ब्रह्मदेवाचा वर त्याला मिळाला असल्याचे विष्णूला माहीत होते. त्याचा वध करणे आपल्याला शक्य नाही हे ओळखून त्याने सामोपचाराने गोड बोलून तारकाला परतवले.

सेवेस ठेवून घेण्यास कबूल झाल्यामुळे खूष झाला. म्हणून तो पार्वतीला व तिच्या सखींना बरोबर घेऊन शंकर तपश्चर्या करीत होता तेथे आला व शंकराला नमस्कार करण्यास त्याने पार्वतीला व तिच्या सखींना सांगितले. तो शंकराला म्हणाला–"प्रभो! माझ्या या अबोध मुलीकडून सेवेत काही अंतर झाले तर क्षमा करावी." त्यानंतर पार्वतीला शंकराची सेवा कशी करावयाची हे मेनकेने समजावून सांगितले आणि ती पतीबरोबर घरी परतली.

त्या दिवसापासून पार्वती दररोज सकाळी उठून दुपारपर्यंत शंकराच्या सेवेला हजर राहू लागली. त्याला लागणारी फुले, फळे व पाणी आणून ठेवी आणि घरी परत येऊन तिने काय कांय केले आपल्या आई-वडिलांना सांगू लागली.

शोणितपूरला परत आल्यावर तारकासुर पुन्हां एकदा स्वर्गावर चालून गेला. आणि इंद्राच्या सिंहासनावर बसून देवांकडून आपली सेवा करवू लागला. तो दिग्पालकांना फार त्रास देऊं लागला आणि ऋषी मुनींच्या यज्ञात विघ्न आणू लागला.

तेव्हां इंद्राला पुढे करून सर्व देव व ऋषी ब्रह्मदेवाकडे गेले व म्हणाले–"देवधि-



देवा! आपण तारकाला वरदान दिले आणि त्याने त्रिलोकाला 'त्राहि त्राहि' करून सोडले आहे."

तेव्हां ब्रह्मदेवाने तारकाकडे जाऊन त्याला समजावून सांगितले की त्रिलोक जिंकण्याचे काम पुरे झाले आहे. पण इंद्रपद मिळविण्याचा वर तू मागितला नव्हतास. तेव्हां तू शोणितपूरला राहून आपल्या सर्व साम्राज्याचा चक्रवर्ति म्हणून राहण्यातच तुझे व तुझ्या साम्राज्याचे हित आहे. इंद्राला व इतर दिक्पालकांना त्यांच्या त्यांच्या राज्यात राज्य करू दे. ते तुझे मांडलिक आहेत. त्यांच्याशी वैर कां?







तारकाने ब्रह्मदेवाच्या सूचनेप्रमाणे स्वर्गाचे राज्य इंद्राला परत केले आणि शोणितपूरला येऊन तेथूनच त्रिलोकावर राज्य करू लागला. तो दररोज शंकराची आराधना नियमितपणे करू लागला.

इंद्राला स्वर्गाचे राज्य अशा तऱ्हेने पुन्हां परत मिळाले. पण हे तारकासुराच्या कृपेने मिळाले हे दुःख त्याच्या मनात सलत होते. म्हणून त्याने एक दिवशी आपले गुरु बृहस्पति यांना बोलावून त्यांचा सल्ला घेतला. म्हणाला–"गुरुवर्य! मी त्रिलोकाचा अधिपति असून ही माझ्या डोक्यावर सतत तारकासुराचा अंकुश आहे, हे मला असह्य वाटत आहे. हा अपमान गिळून मी किती दिवस रहावयाचे? त्यापेक्षां मरण आलेले बरे. आपल्याला माहीत नाही, असे काय आहे? तरी तारकासुराच्या वधाचा काही तरी उपाय सुचविण्याची कृपा करावी."

बृहस्पति म्हणाला–"माझ्या मते या बाबतीत ब्रह्मदेवाचा सल्ला घेणे बरोबर होईल. कारण त्याच्याच कृपेने तारकासुर जन्मला व त्याच्याकडून मिळालेल्या वर प्राप्तीमुळेच तो अखंड त्रिलोक जिंकू शकला."

बृहस्पतीच्या सल्ल्याप्रमाणे सर्व ब्रह्मदेवाकडे गेले व तारकाचा वध कसा होईल याविषयी त्याचा सल्ला घेतला.

ब्रह्मदेव म्हणाला–"बाबा रे, शंकराच्या पोटी जन्मलेल्या व्यक्तीखेरीज कोणाच्या ही हाती त्याला मरण नाही. मीच त्याला तसा वर दिला आहे. सती मरण पावल्यावर शंकराला वैराग्य झाले व तो तपश्चर्या करू लागला. सतीनेच हिमवानाच्या पोटी जन्म घेतला आहे आणि शंकरालाच आपला पति मानून सेवा करीत आहे. तुम्ही शंकराचे मन पार्वतीकडे आकृष्ट होईल असे काही तरी करू शकल्यास आणि त्या दोघांचा विवाह होऊ शकल्यास शिवपार्वतीच्या पोटी जन्मलेला मुलगा तारकासुराचा वध करू शकेल." असा सल्ला देऊन ब्रह्मदेवाने इंद्रदिकांना निरोप दिला.



# ११६. प्राचीन लेखक

**इ.** स. १८६० मध्ये प्राचीन वस्तूंचा संग्रह करण्यासाठी इजिप्त देशात उत्खनन झाले त्या वेळी हे दारुशिल्प प्रकट झाले. ही प्रतिमा 'काअपेर' नामक एका प्राचीन लेखकाची असल्याचे सांगतात. काअपेर हा इजिप्त देशाच्या पांचव्या राजवंशाच्या कारकीर्दीत सुमारे ४,५०० वर्षांपूर्वी जीवित होता. त्या प्रतिमांच्या डोळ्यातल्या पुतळ्या स्फटिकाच्या आणि पापण्या तांब्याच्या आहेत.

